नामदार न्यायमूर्ति

# काशीनाथ त्रिंबक तेलंग

## यांचें चरित्र.

श्रीनिवास नारायण कर्नाटकी.

भारत-गौरव-ग्रंथमाला, पुष्प ८३ वें.

# नामदार न्यायमूर्ति काशिनाथ त्रिंबक तेलंग यांचें चरित्र.



न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।

—भगवान् श्रीकृष्ण.

लेखक

**श्रीनिवास नारायण कर्नाटकी,**

डॉ. सर रा. गो. भांडारकर यांचा चरित्रकर्ता.

---

किंमत तीन रुपये.

# ग्रंथ-समर्पण.



सार्वजनिक हिताची कळकळ बाळगणाऱ्या माझ्या
सर्व महाराष्ट्रीय देशबंधूंना, त्यांच्या कामीं
हें चरित्र वाचून त्यांना जास्त प्रोत्साहन
मिळो, ह्या इच्छेनें हें एका आधुनिक
काळांतील महाराष्ट्रीय थोर पुरुषाचें
जीवनचरित्र परम आदरानें
अर्पण करीत आहें.

—पुस्तककर्ता.

# प्रस्तावना.



मी सन १८८५ च्या सुरवातीस मुबईस गेल्यापासूनच काशिनाथपत तेलग याजबद्दल मला फार आदर वाटत असे त्याची प्रत्यक्ष अशी ओळख मला नव्हतीच फक्त सन १८८९ साली मी नोकरीकरिता खटपट करीत होतो, त्यासबधात एकदा तेलगाना त्याच्या बगल्यावर जाऊन मी भेटलो होतो, इतकेच. परतु त्याची भाषणे, व्याख्याने वगैरे ऐकण्याचे प्रसग मात्र मला अनेकदा आले होते जज्ज या नात्याने कोर्टात—मी त्या वेळी हायकोर्टातच कारकून असल्यामुळे—काम करताना तेलगाना मी पुष्कळदा पाहिलेले होते तरीही त्याच्या खऱ्या योग्यतेची मला काही दिवस कल्पना झाली नव्हती हे कबूल केले पाहिजे पुढे सन १८९८ साली "तेलग पथ" या विषयावर हिदु यूनियन क्लबमध्ये न्या रानडे याचे जे अति सस्मरणीय भाषण झाले, ते वाचताच माझ्या मनात तेलगाच्या योग्यतेविषयी नवीन प्रकाश पडला व मग तेलगाची भाषणे, त्यानी लिहिलेले निबध किवा त्याच्या सबधाचे मिळेल ते वाङ्मय वाचण्याचा मला काही दिवस नादच लागला त्यामुळे तेलगाच्या कामगिरीविषयी लेख लिहिण्याचे व भाषणे करण्याचे मग मला अनेक प्रसग आले परतु त्याचे चरित्र लिहिण्याची कल्पना मात्र माझ्या कधी डोक्यात आली नाही

पुढे सन १९२६ मध्ये डॉ देवदत्त रामकृष्ण भाडारकर हे जेव्हा आपल्या वडिलाच्या प्रथम वर्षश्राद्धाकरिता म्हणून कलकत्त्याहून पुण्यास आले होते, तेव्हा मी लिहिलेल्या डॉ भाडारकराच्या चरित्राची काही प्रकरणे त्याना वाचून दाखविली ते काम होताच मी यावयास निघालो तेव्हा देवदत्तरावानी मला " तुम्ही तेलगाचे चरित्र लिहा " असे म्हटले त्यावर मी म्हटले, " हे हातात घेतलेले काम अगोदर पुरे होऊ द्या मग पुढे पाहू " त्यानतर पुढे भाडारकराच्या चरित्रासबधाच्या व्यवस्थेत माझे बरेच दिवस गेल्यामुळे त्या मुदतीत मला दुसऱ्या तिसऱ्या गोष्टी सुचल्याच नाहीत नतर काही दिवसानी त्या कामातून मी जरा मोकळा होताच वर सागितलेल्या देवदत्तराव भाडारकरानी केलेल्या सूचनेची मला आठवण झाली, व त्या दिशेने काही काम करण्याचे विचार मनात येऊ लागले पण पुढे काही दिवसानी मी ऐकले की, मुबईचे माझे मित्र रा रा वसत नारायण नाईक हे तेलगाचे मराठीत चरित्र लिहीत आहेत त्यामुळे त्यास-

बधानें चौकशी केल्याशिवाय व रा वसतराव याना विचारल्याशिवाय या कामात हात घालणे बरोबर नाही असे मला वाटले सबब पुढे काही दिवसानी मी जेव्हा दुसऱ्या काही कामाकरिता म्हणून मुबईस गेलो तेव्हा मी वसतराव याना भेटलो व चौकशी केली ते फार सरळ मनाचे माणूस त्यानी म्हटले की " तेलगाचे मराठीत चरित्र लिहिण्याची माझी इच्छा आहे पण तुम्ही लिहिणार असाल तर खुशाल लिहा कोठून तरी त्या थोर पुरुषाचे चरित्र प्रसिद्ध व्हावे, एवढाच हेतु " या गोष्टीस दीड वर्षापेक्षा अधिक दिवस झाले असतील

सन १९२८ च्या मे–जून मध्ये कै प्रो पढरीनाथपत तेलग हे लोणावळ्यास होते मी त्या वेळी त्याना जाऊन भेटलो ते अर्धांग वायूने आजारी होते, तरी ते माझ्याबरोबर तास दीड तास बोलत बसले होते त्यात मुबईच्या बऱ्याच जुन्या गोष्टी निघाल्या मी त्याच्या वडिलाचे मराठीत चरित्र लिहिण्याची माझी इच्छा असल्याचे सागितले व त्यासबधात उपयोगी पडण्यासारखे त्याच्याजवळ काही पत्रे किवा इतर कागद पुस्तकें वगैरे असल्यास ती काही दिवस माझ्या स्वाधीन करण्याविषयी त्याना विनति केली वडिलाच्या चरित्राची कल्पना ऐकून त्याना समाधान वाटले व बनारसला जाऊन आपली पुस्तके, कागदपत्र, पत्रे वगैरे काढून पाहातो असे त्यानी म्हटले पुढे काही दिवसानी मी एक त्याना पत्र लिहिले त्याचे ता १८ जुलै १९२८ चे त्याच्याकडून उत्तर आले त्यात त्याचे असे उद्गार होते —

"With regard to your desire to write a life of my father, I may say at once that it would be a happiness to me to be of any use As for the books you want, I will have to take some time before I can ascertain if 'any copies of those things exist in my possession "

तदनतर पुढे पढरीनाथपताना पुन्हा वायूचा झटका आल्याचे व त्यायोगे त्याची अशक्तता वाढल्याचे मला समजले त्यामुळें त्याना माझ्या कामाकरिता मी फिरून तसदी दिली नाही तरी मूळ योजनेप्रमाणे परमेश्वरकृपेने हे आज पुस्तक प्रसिद्ध झालेले पाहण्यास ते राहिले नाहीत याबद्दल मनास अत्यत दु ख वाटते! पण ईश्वराच्या इच्छेपुढे इलाज काय ? असो

कै सर नारायण चदावरकर हे न्या तेलग याचे इग्रजीत चरित्र लिहीत होते असे मी पुष्कळ वर्षे ऐकत होतो अर्थात् त्यानी त्यासबधात काही टिपणे वगैरे केली असावीत असा माझा तर्क झाला त्यामुळे त्याचे चिरजीव बॅरिस्टर विठ्ठलराव चदावरकर याना भेटून मी चौकशी केली पण सर नारायणराव यानी न्या तेलग याच्या सबधाने जे लेख लिहून प्रसिद्ध केले होते, त्यापलीकडे काही त्यानी टिपून ठेवलेले नाही असे समजले

न्या तेलग हे दिवगत होऊनच तीन तपे झालेली असल्यामुळे, त्याच्यासबधाची प्रत्यक्ष माहिती असलेले असे माझ्या समजुतीप्रमाणे फारच थोडे वृद्ध गृहस्थ आहेत पण त्यापैकी दोन चार गृहस्थ सर महादेव चौबळ, रा ब आ स दळवी, रा ब वा गो भाडारकर व रा ब दा ग पाध्ये माझ्या ओळखीचे असल्यामुळे त्याना प्रत्येकी एक एक वेळ भेटून, जी थोडी माहिती मिळाली तिचा हे पुस्तक लिहिताना उपयोग केला आहे यापेक्षा, त्याना जास्त तसदी देणे मला योग्य वाटले नाही

पुस्तक लिहिताना ज्या लेखातील किवा पुस्तकातील माहितीचा मी उपयोग केला आहे, त्यापैकी काहीची नावे खाली देतो —

१ वसतराव नाईक यानी लिहिलेले तेलगाचे ( इग्लिशमध्ये ) चरित्र
२ सर रेमड वेस्ट याचा तेलगासबधाचा चरित्रात्मक लेख
३ जॉन ॲडम याचा वरील सारखाच लेख
४ टाइम्स ऑफ इडियामध्ये प्रसिद्ध झालेला चरित्रात्मक लेख
५ केसरीत प्रसिद्ध झालेला वरील सारखाच लेख
६ इदुप्रकाश सदर प्रमाणेच
७ चुणिलाल पारेख यानी लिहिलेले अल्प चरित्र
८ परमेश्वरम् पिल्ले सदरप्रमाणे
९ न्या रानडे याचे लेख
१० सर दिनशा वाच्छा याचे लेख
११ सर ना चदावरकर याचे लेख.
१२ सार्वजनिक सभेच्या त्रैमासिकाचे व्हॉल्यूम.
१३ आर पी करकेरिया याचा लेख
१४. जमशेटजी दलाल याचा निबध.

१५ अबालाल देसाई याचा निबध.

१६ दत्तोपत दळवी याचा निबध

१७ न्या रानडे याचे चरित्र

१८ लो टिळक याचे चरित्र

१९ वि कृ चिपळूणकर याचे चरित्र

२० मलबारीचे "इडियन स्पेक्टटर"

२१ मोदीकृत फेरोजशहा मेथा याचे चरित्र

याशिवाय वर्तमानपत्राच्या जुन्या फायली, काही मासिकाचे व त्रैमासिकाचे मागील अक वगैरे बरेंच वाङ्मय वाचावे लागले या फायली, अक वगैरे ज्या सस्थामध्ये मला वाचावयास मिळाले त्याची नावे दिली पाहिजेत मुबईची रॉयल एशियाटिक सोसायटी, मराठी ग्रथसग्रहालय, मुबई, व तिकडची नेटीव जनरल लायब्ररी, मुबईची स्टु लि सा सोसायटी, पुण्याचे भाडारकर ओरिएन्टल रिसर्च इन्स्टिट्यूट, फर्ग्युसन कालेज लायब्ररी व सर परशुरामभाऊ कॉलेज लायब्ररी वगैरे

वरील सर्व पुस्तककर्त्याचे, लेखकाचे व सस्थाच्या चालक मडळीचे त्याच्यापासून झालेल्या महत्वाच्या सहाय्याबद्दल मी अत करणपूर्वक आभार मानतो कै श्री ब टिळक याच्याकडून मला केसरीच्या जुन्या फायली मिळाल्या होत्या हे इकडे आभारपूर्वक सागितले पाहिजे

न्या तेलगाच्या चळवळी अनेकविध असल्यामुळे त्याची कामगिरी निरनिराळ्या क्षेत्रातून झाली आहे त्याची वर्गवारी पुस्तकात अशी केली आहे चरित्र–विषयाचे मुख्य पाच भाग करून—धदा, वाङ्मय, शिक्षण, सामाजिक बाबी व राजकीय कामे—पहिल्याकडे एक प्रकरण देऊन दुसऱ्याकडे सात, तिसऱ्याकडे तीन, चवथ्याकडे नऊ व पाचव्याकडे पधरा अशी प्रकरणे दिली आहेत त्याचप्रमाणे तेलग धद्यास लागण्यापूर्वी त्याच्या अभ्यासक्रमासबधानें वगैरे प्रथम सहा प्रकरणात वर्णन करून त्याची धर्मविषयक मते, त्याचे गुणदोष वगैरे किरकोळ बाबीचा शेवटच्या पाच प्रकरणात उल्लेख केला आहे एकदर शेचाळीस प्रकरणे आहेत

हस्तलेख तयार होत होता तसतसा मुबईस, पुण्यास व बेळगावास कित्येक गृहस्थाना मधून मधून मी काही प्रकरणें वाचून दाखवीतच होतो पण त्यापैकी इकडे फक्त दोनतीनच गृहस्थाची नावे सागतो प्राचीन वाङ्मय या सदराखालील काही प्रकरणें बऱ्याच दिवसापूर्वी मी प्रो वैजनाथ काशीनाथ राजवाडे याना

वाचून दाखविली त्याचप्रमाणें गेल्या एप्रिलच्या अखेरीस मी दुसऱ्याच काही कामाकरिता मुबईस गेल्यावेळी, माझे मित्र रा. नरहर रघुनाथ फाटक व रा वसत नारायण नाईक याना पुस्तकातील काही प्रकरणें वाचून दाखविली त्या वेळी हस्तलेख बहुतेक सर्व तयारच झाला होता फक्त शेवटची काही पृष्ठे लिहावयाची राहिली होती सदर्हू सर्व मडळीनी माझ्या विनतीस मान देऊन दोन दोन तीन तीन तास बसून मी प्रकरणे वाचीत असताना मन लावून ऐकल्याबद्दल मी मन पूर्वक सर्वांचे आभार मानतो फाटक व नाईक यानी काही महत्वाच्या सूचना केल्या, त्या अमलात आणल्याच आहेत

वसतरावाच्या इग्रजी चरित्र पुस्तकातील माहितीचा बराच उपयोग केल्याचे मी वर आभारपूर्वक सागितलेच आहे पण नरहरपत फाटक याच्याकडून मला झालेल्या सहाय्याबद्दल इकडे दोन शब्द जास्त लिहिल्याशिवाय माझ्याने राहावत नाही न्या रानडे याचे चरित्र लिहीत असताना फाटकानी तत्कालीन बरेच वाङ्मय वाचलेले आहे त्यामुळे व त्याची स्मरणशक्ति दाडगी असल्यामुळे रानड्याच्या कोणत्याही सहकारी मित्राविषयी कोणती माहिती कोठे मिळ् शकेल हे ते—फाटक—बिनचूक साग् शकतात असा अनुभव आहे त्यामुळे प्रस्तुत चरित्र लिहीत असताना त्याचे कडून मला जे महत्वाचे सहाय्य झाले आहे त्याबद्दल त्याचे मी जितके आभार मानावे तितके थोडेच होतील

न्या तेलगाच्या चरित्राबद्दल—किंबहुना त्याच्या सबधाच्या सर्व वाङ्मयाबद्दल —मुबईस वेळोवेळ जी काही मडळीमध्ये कळकळ व उत्सुकता दिसून येते त्यावरून त्या मडळीचा व त्याच्या कृतीचा येथे गौरवपूर्वक उल्लेख करणे योग्य आहे मुबईच्या "गौ सा ब्रा मित्रमडळाने" दरसाल न्या तेलग याची पुण्यतिथि साजरी करण्याचा जो परिपाठ पाडला, तो आजतागायत अखड चालला आहे त्यायोगाने तेलगाची स्मृति निदान मुबईत तरी ताजी राखण्याच्या कामी नि सशय मदत झाली आहे या परिपाठात अलीकडे काही इष्ट सुधारणाही करण्यात आली आहे हल्ली काही वर्षे सदरील पुण्यतिथि एकाच सस्थेतर्फे करण्यात न येता, ती अनेक सस्थाच्यातर्फे साजरी करण्यात येत असते त्याचप्रमाणे त्या पुण्यतिथीमधले ज्ञातिविशिष्टत्व काढून टाकून तिला सार्वत्रिक—किंबहुना राष्ट्रीय—स्वरूप देण्याचा जो हल्ली कित्येक वर्षे प्रयत्न करण्यात येत असतो तो त्याहीपेक्षा अधिक योग्य व स्तुत्य आहे त्यामुळे काही पुण्यतिथीच्या प्रसगी तेलगाचे गुण-

सकीर्तन करणाऱ्या मडळीमध्ये, डॉ परांजपे, प्रो काणे, चीफ जज्ज कृष्णलाल जव्हेरी व जस्टिस मिरझा अशा भिन्न जातीय व भिन्न धर्मीय गृहस्थाची नावे देखील आढळतात त्याचप्रमाणे सदहू "मित्रमडळाने" कै व्यकटराव अनत मैजरकर याच्या पुरस्कर्तृत्वाखाली व इदूरचे रा वासुदेवराव वामन ठाकूर याच्या सहकारित्वाने सुमारे तेरा वर्षापूर्वी न्या तेलगाच्या भाषणाचा व लेखाचा एक खड प्रसिद्ध करून एक प्रकारे महत्वाची वाङ्मयसेवा केली आहे तेलगाच्या लेखाचा दुसरा खड आमचे तरुण मित्र रा फाटक, रा वसतराव नाईक व दुसरे काही मित्र यानी तयार केला असून तो वरील सस्थेमार्फतच हल्ली छापला जात आहे असे समजते असो वरीलपैकी बहुतेक सर्व मडळीनी तेलगाचे चरित्र कधी तयार होणार आहे म्हणून मला गेल्या वर्षे दीड वर्षात वेळोवेळ विचारून जे एक प्रकारे प्रोत्साहन दिले त्याबद्दल त्याचा मी खरोखरच आभारी आहे

आता कर्नाटक प्रेसच्या मडळीसबधाने दोन शब्द लिहिणे जरूर आहे या छापखान्याचे मालक रा मगेशराव नारायण कुलकर्णी यानी आपला छापखाना वास्तविक धदा या दृष्टीने चालविला आहे ही गोष्ट खरी, तरी त्यानी "भारत-गौरव ग्रथमाले" सारखे महत्वाचे काम हाती घेऊन व स्वामी विवेकानद याच्या स्फूर्तिदायक लेखाचे व भाषणाचे तेरा खड प्रसिद्ध करून, महाराष्ट्र वाङ्मयाची उत्तम सेवा केली आहे, याबद्दल त्याची कोणीही योग्य स्तुतिच करील रा मगेशराव यानी अलीकडे "प्रगति" नावाचे एक साप्ताहिक सुरू करून, वाङ्मयसेवेचे दुसरे एक साधन उत्पन्न केले आहे याप्रमाणे मगेशराव याच्या कामाचा व्याप वाढत असला तरी त्यानी हे न्या तेलगाचे चरित्र प्रसिद्ध करण्याचे कबूल केले, व त्याचेजवळ इतर महत्वाची व जरुरीची कामे होती तरी ती बाजूस ठेऊन हे चरित्र इतके लवकर छापून काढले, याबद्दल त्याचा मी फार फार आभारी आहे

वर काही प्रेमळ मित्रानी माहिती देऊन किंवा चौकशी करून मला प्रोत्साहन दिल्याबद्दल त्याचे मी आभार मानलेच आहेत पण त्या मित्रापैकी रा यशवत हणमत मुखठणकर याच्या नावाचा इकडे जरूर उल्लेख केला पाहिजे त्यानी वेळोवेळी मला तेलगाच्या सबधाने विचारलेली माहिती पुरविली, इतकेच नव्हे तर त्यानी कामाच्या सोयीकरिता—मी पुण्यास व पुस्तक छापत होते मुबईत—शेवटी शेवटी काही प्रुफे तपासण्याचेही काम करून मला महत्वाची मदत केली आहे, याबद्दल मी त्याचा आभारी आहे.

शेवटी, मला एकच गोष्ट सागणे जरूर आहे, ती ही की, ज्या कामास गेल्या छत्तीस वर्षात मोठमोठ्या व लायक माणसाचा हस्तस्पर्श होऊनही अनेक अनपेक्षित अडचणीमुळे ते पुरे झाले नाही, ते काम परमेश्वराने माझ्यासारख्या एका लहान मनुष्याला निमित्तमात्र पुढे करून कसेबसे माझ्या शक्तीप्रमाणे मराठीत पुरे करून घेतले ही केवळ त्याची मजवर कृपा होय त्याबद्दल मी त्याला अनन्यभावाने वदन करून ही प्रस्तावना पुरी करतो

रास्ते पेठ, पुणे,<br>ता १२-८-२९

**श्री. ना कर्नाटकी**

---

# अनुक्रमणिका.





**कै. ना. न्यायमूर्ति काशीनाथ त्रिंबक तेलंग,**

C I E, M A, LL. B., Advocate.

जन्म-ता ३०-८-१८५० ] [निधन-ता १-९-१८९३.

# नामदार न्यायमूर्ति काशिनाथ त्रिंबक तेलंग यांचें चरित्र.

## प्रकरण पहिले.

## चरित्राचें महत्व.

न्या काशीनाथ त्रिबक तेलग हे दिवगत होऊन आज पसतीसापेक्षा अधिक वर्षे झाली म्हणजे तेव्हापासून आतापर्यंत जवळ जवळ दोन पिढयाचा काळ निघून गेला असे म्हणण्यास हरकत नाही एवढया कालावधीत आपल्या हिंदुस्थान देशाच्या स्थितीत वस्तुत जमीन अस्मानचे अतर पडले आहे अर्थात् त्या वेळचे बरेचसे सार्वजनिक स्वरूपाचे प्रश्न मागें पडून किवा निकालात निघून आज दुसरे व नवीनच प्रश्न पुढे येत आहेत किंबहुना काही बाबतीत त्या काळाच्या मानाने आज नवीन सृष्टिच दृष्टीस पडत आहे असे म्हणण्यासही चिता नाही त्यामुळे न्या तेलगाच्या नावाचा अगर क्वचित् त्याच्या कामगिरीचा जरी प्रस्तुत काही पुढाऱ्याच्या भाषणातून प्रसगवशात् उल्लेख येत असला किवा त्याची मुबईस दरवर्षी जरी पुण्यतिथि साजरी करण्यात येत असली तरी एकदर साक्षर जनसमूहाला त्याच्या नावापलीकडे त्याच्याविषयी फारशी माहिती असेल असे वाटत नाही पण हे आमच्या मते चालू पिढीच्या हितैकदृष्टीने इष्ट नाही न्या. तेलग हे एक मुबईच्या हायकोर्टातील नामांकित न्यायाधीश होते इतकेच नसून गेल्या शतकाच्या उत्तरार्धात ज्या काही थोर पुरुषानी देशाभिमानाने प्रेरित होऊन आपल्या मुबई इलाख्यात अनेक प्रकारच्या सार्वजनिक चळवळीचा पाया घालून त्या धिमेपणाने चालविल्या व त्यायोगे अश्रुतपूर्व लोकजागृति केली त्यापैकी तेलग हे एक होते त्याचप्रमाणे त्यानी वाङ्मयक्षेत्रात केलेली कामगिरी तर कायम स्वरूपाची असून ती अत्यत उच्च दर्जाची व लोकोत्तर झाली आहे असे अनेक

पाश्चात्य व पौरस्त्य पडितानी नमूद करून ठेविलें आहे त्यामुळें न्या तेलगाचें आधुनिक काळातील महापुरुषात अत्यत उच्च स्थान आहे यात शकाच नाहीं. त्याच्याविषयी बोलताना न्या रानड्यानी एका प्रसंगी त्यास (India's representative the type of New India) "आधुनिक हिंदुस्थानचे एक नमुनेदार प्रतिनिधि" म्हटले आहे, तर सर फेरोजशहा मेथा यानी आपल्या सार्वजनिक आयुष्यक्रमाच्या सुरवातीस ना तेलगासारख्या हिंदु गृहस्थांचा आपणास सहवास घडला याबद्दल परमेश्वराचे आभार मानले आहेत सर रेमड वेस्ट यानी तर तेलगाना (His inner nature was that of a meditative saint) एकाद्या ध्यानस्थ साधूची उपमा दिली असून ते सदैव आपल्या देशबाधवाच्या उन्नतिविषयक विचारात मग्न ( filled with longing aspirations for the progress &c. &c. ) असत असे म्हटलें आहे वास्तविक न्या तेलगाच्या सार्वजनिक कामाचा काल म्हणजे सारा ( १८७० ते १८९३ ) बावीस तेवीस वर्षाचा—फार तर जेमतेम पाव शतकाचा—होता पण तेवढा अल्पकाल देखील त्याच्या अनेकविध कामगिरीनें एवढा खचून भरला होता की तो तत्कालीन कोणत्याही मनुष्याला "पटकन् केव्हाच निघून गेला" असे वाटले असते खुद्द सर दिनशा वाच्छा यानी तर त्या काळाला one crowded hour of a glorious life)" "एक तासाचा पण अत्यत वैभवशाली काळ" असे म्हटले आहे तात्पर्य, न्या तेलगाच्या थोर योग्यतेविषयीं अगर त्यानी वजावलेल्या बहुमोल देशसेवे-विषयी प्रश्नच नसून त्याचें सबध चरित्र हल्लीच्या तरुण पिढीला अनेक दृष्टीनीं अनुकरणीय वाटेल यात शका नाही दु खाची गोष्ट इतकीच की, अशा सर्वयैव थोर पुरुषाचें—त्रोटक अशी इग्रजीत व मराठीत काही चरित्रे बाहेर पडलीं असली तरी—वाचनीय असे चरित्र अद्यापि प्रसिद्ध होऊ नये कै सर नारायण चदावरकर हे न्या तेलगाचे एक विश्वसनीय असे इग्रजीत चरित्र लिहीत होते असे पुष्कळ दिवस ऐकत होतो, पण त्याचे हातून ते काम पुरें झाले नाही ही दुर्दैवाची गोष्ट आहे त्याच्या पुढे आमच्यासारख्या सामान्य मनुष्याचा अधिकार तो कमला ? तथापि,

**प्रांशुलभ्ये फले लोभादुद्बाहुरिव वामनः ।**

या कालिदासाच्या उक्तीप्रमाणे मिळाली तितकी साधने गोळा करून हा आम्ही प्रयत्न आरभिला आहे, एवढेच आमचे सागणें आहे.

## प्रकरण दुसरे.

# थोडासा पूर्वेतिहास.



काशीनाथपत याचा सन १८५० साली मुबईत एका मध्यमस्थितीतल्या सभावित कुलात जन्म झाला तेलगाचे घराणे हे मुबईतील फार जुन्या अशा सारस्वत ब्राह्मण जातीतील घराण्यापैकी एक असून एकोणिसाव्या शतकाच्या आरभास गोव्याहून जी काही थोडी सारस्वत घराणी मुबईस आली त्यात तेलगाचे एक होते ही गोष्ट कोणत्या साली घडली हे नक्की सागता येत नाही परतु एक गोष्ट मात्र खरी आहे गोव्यातील सारस्वताचे सुमारें तीनशे वर्षापूर्वीपासून मुबईशी दळणवळण चालू होते सतराव्या शतकात मुबई म्हणजे एक लहान लहान बेटाचा समूह असून तो पोर्तुगीज लोकाच्या ताब्यात होता "Bombay in 1670 + + + consisted of a chain of Islands........." पुढे इग्लडच्या दुसऱ्या चार्लस राजाने एका पोर्तुगालच्या राजकन्येशी लग्न केलें. तेव्हा मुबईबेट हे त्या राजकन्येबरोबर आदण म्हणून देण्यात आले होते. ही गोष्ट सन १६६१ मध्ये घडली तेव्हापासून मुबई ब्रिटिश सत्तेखाली आहे असो. तथापि मुबई हे एक त्या वेळी लहान खेडे असून तेथे मुख्यत नेटिव ख्रिस्ती, भडारी व कोळी याचीच वस्ती असे " The inhabitants were Portuguese half-castes, Bhandaris, × × × and Koli fishermen under 10,000 in all." सन १६६९ ते १६७७ पर्यंतच्या मुदतीत मुबईस जिराल्ड औंजीर ( Gerald Aungier ) नावाचा गव्हर्नर होता त्याने ठिकठिकाणी जाहीरनामे प्रसिद्ध करून वाणी व इतर व्यापारी पेशाचे लोक याना हरएक प्रकारे सुरक्षितपणाची व सहानुभूतीची आश्वासने देऊन त्याना मुबईस येऊन वस्ती करण्याविषयी सुचविले. त्या वेळी गोव्यातील ( पोर्तुगीज लोकाच्या ) धर्मच्छळामुळे सर्वत्र धर्मस्वातत्र्य व मनुष्य जीवित किवा मालमत्ता याचा सुरक्षितपणा याबद्दल लोकास कोठेच खात्री वाटत नसे. अशा स्थितीत सदहू मुबईच्या गव्हर्नराने जाहीरनामे काढून लोकास खात्रीलायक आश्वासन दिले की, " तुम्ही मुबईत येऊन राहिल्यास धर्माच्या किंवा इतर कोणत्याही बाबतीत तुम्हास बिलकूल त्रास होणार नाही. " " The

next step was to attract inhabitants. To Portuguese and Mahomedans alike religious toleration was unknown × × × Aungier proclaimed complete religious liberty in Bombay " तेव्हापासून ब्राह्मण, वाणी व इतर धंदेवाले लोक मुबईस येऊन राहू लागले व मुबईचे मग महत्व वाढू लागले " The result of this wise policy was that Indian merchants flocked into Bombay and within a century the population had grown up from 10,000 to 60,000 " अर्थात् मुबई शहराची आज एवढी भरभराट होऊन त्याला ब्रिटिश साम्राज्यातील दुसऱ्या नबरच्या शहराचा जो मान मिळत आहे त्याबद्दलचे सर्व श्रेय पूर्वोक्त गव्हर्नर जिराल्ड औंजीर यास दिले पाहिजे *

सतराव्या शतकात व तत्पूर्वी पोर्तुगीज लोकाची मुबई, वसई वगैरे ठिकाणी सत्ता असल्यामुळें गोव्यातील सारस्वत ब्राह्मणाचा कारकून किंवा लहान लहान व्यापारी या नात्याने वसई, मुबई वगैरे ठिकाणाशी सबध यावा यात आश्चर्य नाही परतु आज उपलब्ध असलेल्या जुन्या कागदपत्रात नमूद असलेले जुन्यात जुनें सारस्वताचे नाव मिळते ते नारायण शेणवी † याचे होय त्याचे त्या वेळच्या

* Vide ( 1 ) " Notes on the life and works of Gerald Aungier, Founder of Bombay" by H G Rawlinson, I E S [Deccan College Magazine for October 1928, Pp 29 to 34 ]

( 2 ) " Shenvis in Bombay in the XVII and XVIII Centuries' by Mr W R Kerkar, B A , LL B , Vakil, High Court 1904 ,

( 3 ) Preface to the सरस्वती मडल by Mr R B Gunjikar, 1884

† दक्षिणी सारस्वत ब्राम्हणाचे मूळ ठिकाण म्हणजे गोवे प्रात हे सर्वविश्रुत आहे तिकडे कारकून, शिक्षक वगैरे याना "शेणवी" म्हणण्याचा पुरातन काळापासून प्रघात आहे जसे महाराष्ट्रात पाढरपेशा मडळीत "पत" "राव" अर म्हणण्याचा प्रचार आहे, तसेच गोव्यात सारस्वत ब्राम्हणात तशा माणसार "शेणवी" म्हणतात हा प्रकार तिकडे इतका दृढमूल झालेला आहे की कित्ये कास हाक मारताना "शेणवी" न म्हटल्यास राग येतो असे होता होता कित्ये कुटुबाचें "शेणवी" हे आडनाव देखील पडलेले आहे ते जातीचे नाव नव्हे.

सरकारदरबारात चागलें वजन होते सन १६७४ साली श्री शिवाजी महाराज याना रायगडावर राज्याभिषेक झाला त्या वेळी मुबईसरकारचे हेनरी ऑग्झेंडन ( Henry Oxenden ) व दोन कारखानदार असे तीन प्रतिनिधी रायगडावर हजर होते त्याच्या बरोबर नारायण शेणवी याला दुभाषी ( Interpreter ) म्हणून मुबई सरकारकडून पाठविण्यात आले होते असो

नारायण शेणवी याच्या नावाशिवाय मुबईच्या जुन्या रेकॉर्डात दुसरें सारस्वताचे नाव मिळतें तें राम कामत किवा रामाजी कामत याचे होय सतराव्या शतकाच्या अखेरीस किंवा अठराव्या शतकाच्या सुरवातीस याने मुबईतील प्रसिद्ध श्री वाळुकेश्वराचे व कोटातील श्री वेकटेशाचे अशी दोन देवालये वाधिली त्याचप्रमाणे मुबईतील दुसरे प्रसिद्ध देवालय म्हणजे श्री भुलेश्वराचे ते मगेश अनत दोंदे या नावाच्या सारस्वत ब्राम्हणाने बाधले ठाकुरद्वार येथील श्री मुरलीधराचे देवालय केशव भाडारे याने बाधले आणि कोटातील ( चकल्यातील ) वेकटेश, शामलाल, मारुति व महादेव या देवाची लहान लहान देवालये राम कामत यानेच वाधली साराश, तीनशे वर्षापूर्वीपासून मुबईस ज्या महाराष्ट्रीय ब्राम्हणानी प्रथम वस्ती केली त्यात सारस्वत हेच मुख्य होते दुसरे ब्राम्हण म्हणजे काही ऋग्वेदी, पळशे व गुजराथी असे होते पण ते सारस्वताच्या मानाने अल्पसख्याक होते पाठारे प्रभु मात्र पुष्कळ होते सन १७८० साली जी खानेसुमारी झाल्याचे मुबई शहराच्या गॅझेटीयरमध्ये नमूद आहे त्यात ब्राम्हणाची शिरोगणती अशी आहे —ऋग्वेदी, १४७, पळशे, १८९, गुजराथी, १४५, शेणवी, ४०९, प्रभु, ११११९ असो पुढे सन १८१८ मध्ये पुण्यास पेशवाईचा अत झाल्यावर महाराष्ट्रातील उच्चवर्णीय लोकाची उद्योगधद्याच्या निमित्ताने बरीच फाकाफाक झाली त्यामुळे पुष्कळ लोक मुबईस येऊ लागले त्याबरोबर मुबईतील ब्राम्हणाचीही लोकसख्या वाढू लागली त्याप्रमाणे सन १८४६ मध्ये ब्राम्हणाची सख्या ६९३६ झाली, पुढे मग १८६४ मध्ये २५,७५७ झाली आणि १८८१ मध्ये ३५,४२८ झाली नतर ही सख्या याहीपेक्षा जास्त वाढू लागली, ते बरोबरच होते त्याचप्रमाणें वाणी, सोनार, सुतार वगैरे इतर जातीचीही सख्या वाढू लागली साराश, याप्रमाणें गोव्यातून वरचेवर सारस्वत ब्राम्हण मुबईस येऊन वस्ती करू लागले त्यापैकी एकोणिसाव्या शतकाच्या आरंभास ज्या बारा सारस्वत कुटुबानी येऊन मुबईत वस्ती केली त्यास "बारघरे" म्हणत असत त्यात तेलगाचे एक होते.

## प्रकरण तिसरे.

# त्या वेळची देशस्थिति.



काशीनाथपत तेलग याचा गेल्या शतकाच्या मध्याम जन्म झाला त्या वेळी हिदुस्थान देशाची एकदरीत काय स्थिति होती या सबधाने चार शब्द लिहिले पाहिजेत वस्तुत एकोणिसाव्या शतकाचे आमच्या मते हिदुस्थानच्या इतिहासात फार मोठे महत्व आहे त्या शतकाचे १८५० या सालाच्या योगाने—तेलगाचा याच साली जन्म झाल्याचे मागील प्रकरणात सागितलेंच आहे–बरोबर दोन भाग पडून त्यापैकी पूर्वार्धात बहुतेक सर्व हिदुस्थान देश ब्रिटिश सत्तेखाली आल्या-कारणाने या देशाच्या इतिहासात मोठीच क्राति झाली व तिचे सुपरिणाम उत्त-रार्धात हळू हळू दृग्गोचर होऊ लागले १८०१ ते १८५० या काळात ज्या गोष्टी घडल्या त्यात दोन गोष्टीचे विशेष महत्व आहे पहिली गोष्ट ही की, इग्लिश लोकाच्या हातात हिदुस्थान सारख्या अफाट देशाची राजसत्ता गेली तरी तिक-डील राज्यधोरण अत्यत उच्च तत्वाप्रमाणे ठेवावयाचे असे इग्लिश पार्लमेंट व मुत्सद्दी लोक यानी ठरविलें ! यासबधाने इकडे विस्तार करण्याचे कारण नाही परतु सदरील जी तत्वे ठरविण्यात आली त्यासबधाने त्या वेळचे गव्हर्नर जनरल लॉर्ड विल्यम बेटिक, मुबईचे गव्हर्नर माउट स्टुअर्ट एल्फिन्स्टन व मद्रासचे गव्हर्नर सर टॉमस मनरो यान्च्या स्तुत्य कामगिरीचा जरूर उल्लेख केला पाहिजे सन १८३३ च्या पार्लमेंटच्या कायद्यात जे—हिदी लोकास राज्यकारभारात इग्लिश लोकाच्या बरोबरीने शिरण्याची सवलत देण्याबाबतचे—कलम घालण्यात आले त्याचे सर्व श्रेय लॉर्ड विल्यम बेटिक यासच दिले पाहिजे हाच स्वराज्याचा पाया होय त्याबद्दलचे प वा रमेशचद्र दत्त यानी आपल्या "आग्लभूमि व आर्यभूमि" ( England and India ) या पुस्तकात जे विस्तृत विवेचन केलें आहे ते वाचकानी जरूर तर अवश्य पहावे त्याचा इकडे फक्त नामनिर्देश केला आहे

गेल्या शतकाच्या पूर्वार्धात जी दुसरी महत्वाची गोष्ट घडली ती इकडे इग्लिश शिक्षणपद्धत सुरू करण्यात आली ही होय हिच्या योगाने सर्व देशातील लोकाच्या दृष्टीतच हळूहळू फरक पडून त्याचा सर्व जनतेच्या आचाविचारावर किती अश्रुतपूर्व

परिणाम झाला आहे व होत आहे, हें आम्ही प्रत्यक्ष पाहातच आहो पण ती पाश्चात्य शिक्षणपद्धत सुरू करण्यात ज्या लोकांच्या उदारबुद्धीचा व दूरदर्शीपणाचा उपयोग झाला, त्यांच्यासबधानें थोडासा उल्लेख केला पाहिजे वस्तुत त्या वेळची हिंदुस्थानची हरएक दृष्टीनें झालेली दु स्थिति पाहून ज्यांच्या मनात खरी तळमळ उत्पन्न झाली तो पुरुष म्हणजे बगाल प्रातातील राजा राममोहनराय हा होय त्यानें आपल्या वेळची सर्व परिस्थिति पाहताच त्यांच्या लक्षात आलें की, आपल्या लोकानी इग्रजी शिकून त्याद्वारें इग्लिश लोकाची विद्या, त्यांच्या कला वगैरे याचा लाभ करून घेतल्याशिवाय दुसरा तरणोपाय उरला नाही ही गोष्ट त्यांच्या लक्षात आल्याबरोबर त्यानें त्या दिशेनें खटपट चालविली त्यांच्या खटपटीच्या विरुद्ध बगालमध्ये पुष्कळ लोक होतेच पण तिकडे त्यानें लक्ष दिलें नाही त्यानें खुद्द कलकत्त्यास इग्लिश शाळा घालून लोकास इग्रजी शिकविण्याची तर तयारी केलीच, परतु त्यानें त्या वेळच्या गव्हर्नर जनरल साहेबास अर्ज करून इकडे इग्रजी शिक्षण सुरू करण्याबद्दल त्याना सुचविलें त्याबद्दल मग सरकारात विचार होऊन त्या प्रश्नाची नीट चौकशी करण्याकरिता एक कमिटी नेमण्यात आली कमिटीचें काम चालू असताना सदहू प्रश्नासबधानें सभासदामध्ये दोन पक्ष उत्पन्न झाले. एक पक्ष म्हणे, इकडे इग्रजी शिक्षण नको दुसरा पक्ष म्हणे, पाहिजे इतक्यात कमिटीच्या अध्यक्षस्थानी मेकॉले साहेबाची नेमणूक झाली व मग मेकॉले साहेबानीच त्या विषयात मन घातल्यामुळें त्यानी इग्रजी शिक्षणाची तरफदारी केली व तेंच शिक्षण इकडे सुरू करण्याबद्दल आपलें प्रसिद्ध मिनिट ( मतदर्शक पत्रक ) लिहून जोराची शिफारस केली ती शिफारस त्या वेळचे गव्हर्नर जनरल लॉर्ड विल्यम बेंटिक यानी मान्य करून त्याबाबतचा आपला सरकारी ठराव सन १८३५ मध्ये प्रसिद्ध केला तात्पर्य, याप्रमाणे गेल्या शतकाच्या पूर्वार्धात दोन महत्वाच्या—किंबहुना क्रातिकारक—गोष्टी घडल्यामुळे त्या पूर्वार्धाचें हिंदुस्थानच्या इतिहासात फार महत्त्व आहे पुढे मग सदहू गोष्टीत अतर्भूत झालेल्या तत्वाचा विकास होऊन तदनुरूप सर्व राज्यधोरणाची दिशा बदलण्याचें काम व्हावयाचें तें उत्तरार्धात हळूहळू होऊ लागलें शिक्षणाच्या बाबतीचाच विचार केला तर सदरील सरकारी ठरावाच्या अनुरोधानें सन १८५४ मध्यें सर चार्लस वुड ( लॉर्ड हॅलिफॅक्स ) याच्या सहीचा कोर्ट ऑफ डायरेक्टर्स तर्फे एक खलिता येऊन हिंदुस्थान देशात शिक्षणविषयक नवीन खातें निर्माण करण्यात आलें व निरनिराळ्या प्रातात डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शनच्या जागा स्थापन झाल्या व त्याप्र-

माणें नवीन शिक्षणपद्धत व्यवस्थितपणें सुरू करण्यात आली तदनतर सन १८५७ साली मुबई, कलकत्ता व मद्रास ह्या तीन मुख्य शहरात तीन युनिव्हर्सिट्या स्थापन करण्यात आल्या व ठिकठिकाणी शाळा व कॉलेजें स्थापन करण्यात आली . एकोणिसाव्या शतकाचे खुद्द इग्लडाच्या किंवा युरोपखडाच्या इतिहासात देखील फार मोठे महत्व होते विशेषत विलायतेत त्या वेळी मोठमोठे राष्ट्रीय महत्वाचे प्रश्न उपस्थित झाले होते, मोठमोठ्या चळवळी चालल्या होत्या, व त्यात मोठमोठे प्रसिद्ध मुत्सद्दी लोक काम करीत होते सन १८३२ सालचे रिफॉर्म बिल, अप्रतिबध व्यापार व सरक्षण, गुलामगिरीचा व्यापार बद करणे इत्यादि महत्वाच्या चळवळी निघून त्यासबधात कॉबडन व ब्राइट, क्लार्कसन व विल्बरफोर्स, ग्लॅडस्टन व डिजरायली याच्या सारखे रणधुरधर मुत्सद्दी काम करीत होते त्याचप्रमाणें तेथे स्त्री-स्वातत्र्यासारखे महत्वाचे सामाजिक प्रश्न ( Emancipation of women ) पुढे येऊन त्यासबधात एलिझाबेथ फ्राय व फ्लॉरेन्स नायटिंगेल याच्या सारख्या प्रसिद्ध विदुषीबाई काम करीत होत्या वाङ्मयक्षेत्रात देखील वर्डस्वर्थ, टेनिसन, व ब्रौनिग याच्यासारखे सरस्वतीभक्त आपल्या कृतीनीं लोकात जागृति उत्पन्न करीत होते साराश, सबध एकोणिसाव्या शतकाचा काळ इग्लडात अत्यत महत्वाचा गणलेला असून त्या काळात तेथील अशेष वातावरण उदार कल्पनानी जणू भरून गेले होते सुदैवाची गोष्ट ही की, तशा उन्नतिकारक व प्रोत्साहक वातावरणात वाढलेले विद्वान् लोक प्रथम काही वर्षेपर्यत आमच्या इकडे निघालेल्या शाळातून व कॉलेजातून अध्यापक, प्रोफेसर या नात्यानें शिक्षण देण्याकरिता येत असत त्यापैकी मुबई इलाख्यात डॉ विल्सन, प्रो हार्कनेस, प्रो पॅटन, प्रो रीड, प्रो हावर्ड, सर अलेग्झॅडर ग्रॅट, सर जॉर्ज बर्डवुड याची नावे प्रसिद्ध आहेत, आणि त्याच्या शिक्षणाने व सहवासानेच आपल्या युनिव्हर्सिटीचे पहिले पहिले पदवीधर तयार झाल्यामुळे त्याच्या हातून साहजिकपणेंच महत्वाची कामगिरी झाली आहे त्या वेळी इग्रजी शिक्षण मुळी नवीनच होते, आणि त्याचा लाभ करून देणारे वरीलसारखे उदारमनस्क व विद्वान् गुरु असल्यावर विद्यार्थिगणावर इष्ट परिणाम झाल्याशिवाय कसा राहील ? याप्रमाणें मुबई युनिव्हर्सिटीतून जे पहिले पहिल्या पिढींतले पदवीधर तयार झाले किंबहुना नवीन शिक्षणाने जे पहिले विद्वान् मडळ तयार झाले त्यास कै सर नारायण चदावरकर यानी आपल्या एका भाषणात "सप्तर्षीं"ची उपमा दिली आहे. ते सात पुरुष हे —

१ कै बाळशास्त्री जाभेकर.
२ ,, दादाभाई नवरोजी
३ ,, डॉ भाडारकर
४ ,, न्या म गो रानडे
५ ,, सर फेरोजशहा मेथा
६ ,, न्या का त्रिबक तेलग
७ ,, मामा परमानद

या थोर पुरुषानीच गेल्या शतकात राष्ट्रीय कार्यास सुरवात केली गेल्या शतकात इकडे ब्रिटिश सत्ता कायम होताच जो काल आला तो अत्यत महत्वाचा होता किबहुना ब्रिटिश सत्तेच्या स्थापनेनतर इकडे हरएक दृष्टीने नवी सृष्टि निर्माण झाली असे म्हणण्यासही हरकत नाही नवीन सुशिक्षित मडळीच्या हरएक बाबतीतील कल्पना बदलू लागून त्याची जागा नवीन कल्पना घेऊ लागल्या नवीन राजसत्तेच्या व नवीन शिक्षणाच्या योगाने हिदु लोकाची जुनी सस्कृति व इग्लिश लोकाची नवी सस्कृति याचा निकट सबध येऊ लागल्यामुळे नवीन शिकलेल्या मडळीना आपल्या स्थितीमधले काही ठळक दोष स्पष्ट रीतीने दिसू लागावेत व ते काढून टाकण्याच्या उद्योगास ते प्रथम लागावेत यात आश्चर्य वाटण्याचे कारण नाही त्या वेळी देशातील सर्व काही गोष्टीत विस्कळितपणा वाटलेला असून परिस्थितींत हरएक दृष्टीने अव्यवस्थितपणा व शिथिलता स्पष्ट दिसत होती त्यामुळें वस्तुस्थितीमध्ये इष्ट सुधारणा घडवून आणण्याकरिता चागले नेते किवा पुढारी हवे होते अर्थात् जे नवीन शिक्षण घेऊन तयार झाले, व मनावर सुसस्कार झाल्यामुळे ज्याची दृष्टि फाकली होती अशा मडळीकडेच ते पुढारीपण ओघाने आले मरहूम दादाभाई नवरोजी, डॉ भाडारकर, न्या रानडे फेरोजशहा मेथा व न्या तेलग यानी आमच्या मुबई इलाख्याच्या वतीने देशाकरिता गेल्या सुमारें पाऊणशे वर्षात जी कामगिरी केली आहे ती अत्यत महत्वाची आहे या पुढाऱ्यावर त्या वेळी जी कामगिरी येऊन पडली, ती फार महत्वाची व जोखमेची होती एका बाजूस आपल्या प्राचीन आर्यसस्कृतीचे स्वरूप जरी त्या वेळी अमळ हीणकस झालेले होते, तरी आपलेपणाच्या भावनेमुळे त्या सस्कृतीतला चागला भाग ठेवण्याबद्दलची उत्कट इच्छा, आणि दुसऱ्या बाजूस नवीन शिक्षणाने पाश्चात्य सस्कृतीचा उत्तम परिचय झाल्यामुळे उत्पन्न झालेल्या आकाक्षा व त्या पुऱ्या करण्याकरिता कराव्या लागणाऱ्या श्रमाची व चळवळीची हौस या दोन उत्साह-

कारक गोष्टीचे वरील बहुतेक सर्व पुढारी मडळीमध्ये योग्य प्रमाणात समिश्रण झालेले असल्यामुळे त्याचे सर्व जीवित आशापूर्ण झाले होते, आणि त्यापैकी प्रत्येकाने देशसेवेच्या कामी आपल्या सामर्थ्याची शिकस्त करून आपल्या मातृभूमीला जगाच्या दृष्टीने, थोडे तरी उच्चतर स्थान प्राप्त व्हावे म्हणून ते झटले, यात शका नाही न्या. तेलगाच्या सबधाचा विशेष हा की, ते वरील सर्व मडळीपेक्षा वयाने जरी लहान होते आणि ते जरी विधिवशात् सर्वाच्याहीपेक्षा पूर्वीच कालवश झाले, तरी परमेश्वराने नेमून दिलेल्या अल्पकालात—within the brief span of life—देखील त्यानी सर्वाच्या बरोबर व सर्वाच्या बरोबरीने देशसेवा केली आणि सर्वापासून धन्यवाद घेतले त्यासबधाचा विस्तार आता क्रमश करण्यात येईल

---

## प्रकरण चवथे.

# बालपण आणि शिक्षणाचा आरंभ.



मागील प्रकरणात सागितल्याप्रमाणे काशीनाथपत याचा सन १८५० सालीं तारीख ३० आगष्ट रोजी जन्म झाला त्या दिवशी गोकुळ अष्टमी होती. काशीनाथपताचे आजोबा रामचद्रपत यास चार मुलगे होते त्रिबकराव, बापुभाई, नानाभाई व चवथे एक पैकी त्या वेळी शेवटचे दोन मृत झाले होते. बापुभाई याना दोन मुलगे, एक कृष्णराव व दुसरे काशीनाथपत म्हणजे बापूभाईचे काशीनाथपत हे द्वितीय अपत्य होत त्रिबकरावाना पुत्रसतान नव्हते. म्हणून त्यानी काशीनाथपताना दत्तक घेतले त्यामुळे ते काशीनाथ त्रिबक तेलग या नावाने पुढे प्रसिद्धीस आले तेलगाचे घराणे मध्यम स्थितीतले, पण खाऊन पिऊन सुखी व सभावित म्हणून मुबईस प्रसिद्ध होते मुबईस फॉर्बस कपनी म्हणून प्रसिद्ध व्यापारी असत त्या कपनीशी रामचद्रपताच्या वेळेपासून तेलगाचा ( असिस्टट मेनेजर ) नोकर या नात्याने सबध असे त्रिबकराव, बापुभाई व पुढे कृष्णराव असे तिघेही त्याच कपनीत नोकर असत

तीनशें वर्षापूर्वी मुबई म्हणजे एक कोळी लोकाचे खेडे होते पण पुढे त्याची व्यापारी दृष्टीने भरभराट होऊन कशी प्रसिद्धि झाली व गोव्याकडील सारस्वत

ब्राह्मणाचा त्या शहराशी कसा सबध येत चालला याचा त्रोटक इतिहास मागील एका प्रकरणात दिलाच आहे त्याप्रमाणे काशीनाथपताचे एक पूर्वज एकोणिसाव्या शतकाच्या आरभास मुबईसारख्या वाढत्या शहरात काही वदा करून आपल्या नशिबाची परिक्षा पहावी म्हणून तिकडे आले होते कोणी म्हणतात की, ते प्रथम टाण्यास येऊन काही दिवस राहिले होते व मग तेथून ते मुबईस आले कसेही असलें तरी ते गेल्या शतकाच्या आरभास मुबईस आले इतकी गोष्ट खरी

काशीनाथपताचे वडील व चुलते हे हल्लीच्या दृष्टीने काही फारसे शिकलेले नव्हते वर सागितलेल्या व्यापारी कपनीत काम करण्यास पुरे इतके त्याचे इग्लिश शिक्षण झालें होते परतु ते फार सद्गुणी, शहाणे, व्यवहारदक्ष व सभावित असे असत काशीनाथपताच्या मातोश्री फार शात व गोड स्वभावाच्या होत्या, व तेच त्याचे गुण काशीनाथपतामध्ये उतरले होते असे म्हणतात

आम्हा हिदु लोकात सामान्यत ऐतिहासिक दृष्टि कमी त्यामुळे आपल्या पूर्वजाच्या हातून काही पराक्रम झाला असल्यास किवा त्यानी देशाकरिता, धर्माकरिता किवा जातीकरिता म्हणून काही कामगिरी केलेली असल्यास त्याची स्मृति ताजी ठेवण्याला सहाय्यभूत होणाऱ्या अशा टिपण, टाचण, यादी वगैरे साधनाचा बहुधा आमच्या लोकात अभावच असतो अर्थात् पुढील पिढ्यामध्ये देशाभिमानाचे किवा कुटुबाभिमानाचे बीजारोपण करून त्याच्या हातून काही तरी कामगिरी करण्याबद्दलच्या आकाक्षाचे पोषण होईल अशी साधने आपल्यामध्ये नसतात इतर सुधारलेल्या देशात ही कामे बऱ्याच अशी सुशिक्षित माता करीत असतात नेपोलियन, शिकदर, जर्मनीचा बादशाहा पहिला विल्यम इत्यादि पुरुषाची चरित्रे पाहिल्यास वरील गोष्ट सहज पटते आपल्या देशात देखील जिजाबाईच्या शिकवणीने तयार झालेले शिवाजी महाराज याच्यासारखे एखादे उदाहरण मिळते, नाही असे नाही, पण एकदर स्थिति शोचनीय आहे यात शका नाही आपल्या देशात हजार दीड हजार वर्षाच्या निद्रावस्थेनतर स्त्रीशिक्षणाप्रीत्यर्थ हल्लीच प्रयत्न होत आहेत या प्रयत्नाची अत्यत गोड फळे या दृष्टीने निदान महाराष्ट्रात तरी कै श्री रमाबाई रानडे, व श्री काशीबाई कानिटकर किंवा श्री सौ कमळाबाई किबे या प्रसिद्ध विदुषी स्त्रियाची नावे सागण्यास हरकत नाही असो पण काशीनाथपताच्या बालपणात तशी स्थिति नव्हती

त्यामुळे आईकडून त्याच्यात महत्वाकाक्षा जागृत करण्याबाबतची दिशा तेव्हा खुली नव्हती सर रेमड वेस्ट म्हणतात त्याप्रमाणे " काही एक सागण्यासारखे नाही " हेच काशीनाथपताच्या आईचे वर्णन ! व इतकीच त्या बाईची प्रसिद्धि !

काशीनाथपताच्या वयास पाच वर्षे होताच त्याना गावठी शाळेंत पाठविण्यात आले ते प्रथम दिनकरपत दात्ये याच्या व मग महादेव पतोजी याच्या शाळेत जाऊ लागले इतक्या लहान वयातदेखील काशीनाथपताचे आपल्या अभ्यासाकडे चागले लक्ष असे त्यामुळे ते आपल्या गुरुजीचे मोठे प्यार असत त्याच्या वयाप्रमाणे त्याना थट्टा, मस्करी आवडत असे व इटीदाडू, आट्यापाट्या हे खेळ ते खेळत असत फक्त त्याना केव्हा केव्हा पोटदुखीपासून मात्र त्रास होई असो पण त्याच्या तेवढया लहान वयातील बुद्धिमत्तेवरून देखील त्याना " बालबृहस्पति " म्हटल्यास अतिशयोक्ति होईल असे नाही वर्गात नबर नेहमी वर असे वार्षिक परीक्षेत बक्षिस ठरलेलेंच असे त्या वेळी रा सा विश्वनाथ नारायण मडलिक व रा ब नारायण भाई दाडेकर हे इन्स्पेक्टर होते त्याच्या हातून काशीनाथपताना अनेकदा बक्षिसे मिळाली होती ते दोघेही गृहस्थ काशीनाथपताची हुशारी पाहून कौतुक करीत असत पुढे काशीनाथपत मोठे झाल्यावर त्याचा सार्वजनिक कामात रा सा मडलीक याजबरोबरच सबध-निकट सबध-यावा हा तरी योगायोगच म्हणावयाचा !

काशीनाथपताचे मराठी शिक्षण पुरे होताच वयाच्या नववे वर्षी ते एल्फिन्स्टन हायस्कुलात इग्रजी शिकण्याकरिता जाऊ लागले त्या वेळी त्याचे वर्गशिक्षक रा रा शाताराम मगेश धुमे हे होते व मिस्तर डब्ल्यु एच स्मिथ हे प्रिन्सिपॉल असून मि आर्देशीर फ्रामजी मूस हे सुपरिटेंडेट होते काही दिवसाच्या अनुभवाने काशीनाथपताची हुशारी पाहिल्यावर मूस शेटजीनी " हा मुलगा पुढे प्रसिद्धीस आल्याशिवाय राहणार नाही " असे तेव्हा भविष्य वर्तविले होते नतर जेव्हा तेलग ॲडव्होकेट झाले, पुढारी झाले, शेट दादाभाई, मेथा याच्या बरोबर काम करू लागले, शेवटी हायकोर्टचे जज्ज झाले, तेव्हा हा सर्व प्रकार पाहून मूस शेटजीना आपला एका काळचा हा विद्यार्थी इतक्या मोठ्या पदवीस चढला म्हणून कौतुक वाटल्यास व आपले भविष्य खरें ठरल्याबद्दल त्याना एक प्रकारचा अभिमान वाटल्यास आश्चर्य कसले ? असो काशीनाथपताची तेव्हापासूनच अभ्यास करण्याची अशी पद्धत असे की, त्यापासून त्याच्या

ज्ञानाची आस्ते आस्ते वाढच होत जावी ! ते वर्गातील अभ्यासाचीच नुसती पुस्तके वाचून राहात नसत, तर त्या विषयावरील आणखी दुसरी पुस्तके वाचून ते आपले ज्ञान वाढवीत असत याचा परिणाम अर्थात्च वर्गात गुरुजीनी विचारलेल्या प्रश्नास काशिनाथपत जी उत्तरें देत असत त्यावरून स्पष्ट होई अशा अभ्यासी मुलाबद्दल गुरुजीना कौतुक वाटल्यास नवल काय ? ही जी अभ्यास करण्याची सवय काशीनाथपतानी लहानपणापासून आपल्यास लावून घेतली तीच पुढे त्याच्या बुद्धीच्या विकासास–किंबहुना कार्यक्षमतेस–कारणीभूत झाली शाळेंत कोणतेही काम निघो, विद्यार्थ्यांच्या दृष्टीने त्या कामासबधाने काशीनाथपताची तयारी नाही असे सहसा कधी घडले नाही त्यामुळे परीक्षेच्या वेळी अभ्यास फार म्हणून अगर वेळ थोडा म्हणून त्याची केव्हाही धादल उडाली नाही उलट केव्हा केव्हा ऐन परीक्षेच्या दिवसात किवा परीक्षेच्या एक दोन दिवसापूर्वी ते बुद्धिबळे खेळत बसल्याचेही आढळून येत असे ! सन १८६१ साली मिडल स्कूलच्या परीक्षेत त्याना इग्रजी भाषेतील प्रावीण्याबद्दल एक बक्षिस मिळाले त्या बक्षिससमारभाचे वेळी इग्रजी कविता म्हणण्याचे कामी काशीनाथपताचीच निवड करण्यात आली होती त्याचे कविता म्हणणे सर्व मडळीस पसत पडून सगळ्यानीच त्याचे कौतुक केले मि एडमड बर्क हे त्या वेळी प्रिन्सिपाल होते त्यानी या मुलाची हुशारी पाहून त्याला–काशीनाथपताना—एकदम एक वर्ग मध्ये टाकून वर–तीसरीतून पाचवीत—चढविले ! पुढील वर्षी—१८६२ मध्ये देखील परीक्षेत काशीनाथपताना पुन्हा बक्षिस मिळाले याच सुमारास त्याना मराठी कवितेची गोडी लागली आणि ती कविता चागली समजण्याकरिता सस्कृत शिकले पाहिजे असे त्याना आटळून आले तेलग पुढे जे मराठीत व सस्कृत कवितेमध्ये प्रवीण किवा वर्डस्वर्थ-टेनिसनच्या कवितेचे रसिक मर्मज्ञ म्हणून प्रसिद्ध झाले, त्याचे मूळ आमच्या मते येथे सापडते असो सस्कृत शिकले पाहिजे असे एकदा वाटल्यावरोबर तेलग त्या उद्योगास लागले व त्या कामी त्याना त्याचे मित्र व सहाध्यायी श्रीपाद बाबाजी ठाकूर याची थोडीशी मदत झाली उभयता मग यज्ञेश्वर चिमणाजीशास्त्री सुरतकर याच्याकडे सस्कृत शिकण्याकरिता जाऊ लागले पुढे मोठे झाल्यावरसुद्धा अनेक सार्वजनिक प्रसगी त्यानी सस्कृत शिकण्याच्या कामी आपणास प्रथम श्रीपादराव ठाकुराची मदत झाल्याचे कबूल केले आहे असो त्या वेळी सस्कृत शिकण्याची हल्लीच्यासारखी सोय नव्हती फक्त हॉवर्डच्या प्राय-

मरचे सस्कृतात केलेले भाषातर शिकावे लागे. पण तेवढयाने तेलगाचे समाधान होईना सबब त्यानी बापुशास्त्री याच्या वर्गात जाऊन पाणिनीची सूत्रे म्हटली व खासगी रीतीने लघुकौमुदी व इतर काही सस्कृत पुस्तकें याचा अभ्यास केला त्यामुळे शाळेत त्याचे इग्रजी व सस्कृत हे दोन विषय चागलेच असत फक्त त्याचा गणित विषयच तेवढा कच्चा असे त्यावेळी हायस्कुलात विनायक जनार्दन बापट व नारायण महादेव ऊर्फ मामा परमानद असे दोघे शिक्षक होते व त्यानी काशीनाथपताना गणित विषयात मदत केल्यामुळे त्याची बरीच सोय झाली तेलग हे जात्याच बुद्धिवान् असल्यामुळें कोणताही विषय त्यातील एकदा खुब्या समजल्यावर त्याना आपलासा करून घ्यावयास फारसा उशीर लागत नसे त्यामुळे थोड्याच दिवसात गणित विषयातदेखील ते चागले तरबेज झाले फक्त त्याचे व्यायामाकडे अगर उघड्या हवेत खेळ खेळण्याकडे मात्र असावे तितके लक्ष नसे अगदी लहान वयात इटी-दाडू वगैरे खेळ ते खेळत असत ही गोष्ट खरी, पण पुढे बुद्धीच्या विकासाकडे त्याचे जसे जास्त लक्ष लागू लागलें तसे किवा तितक्याच प्रमाणात शरीरसामर्थ्य वाढविण्याकडे लागले नाही आणि हीच गोष्ट अखेर त्याना नडली असे म्हणण्यास हरकत नाही त्या वेळेच्या मानाने हल्ली विद्यार्थ्यांचे लक्ष लहानपणापासूनच शरीरसामर्थ्य वाढविण्याकडे लागत आहे ही आनदाची गोष्ट आहे असो

याप्रमाणे अभ्यास करून काशीनाथपत सन १८६४ या वर्षी मॅट्रिकची परीक्षा पास झाले त्या साली ते व ठाकूर असे दोघेही सस्कृत घेऊनच पास झाले सस्कृत ही दुसरी भाषा घेऊन मॅट्रिक परीक्षेत पास झालेले तेलग व ठाकूर हेच दोघे पहिले विद्यार्थी होते ! उभयताचे सस्कृतातले प्राविण्य अखेरपर्यत टिकले होते तेलग हे तर पुढे जगद्विख्यात पडित झाले हे सर्वविश्रुतच आहे असो त्या साली शाळेत मि जेफ्रेसन नावाचे गृहस्थ प्रिन्सिपॉल होते त्यानी काशीनाथपताना प्रो मॅक्समुल्लरचा " सस्कृत वाङ्मयाचा इतिहास " हें पुस्तक बक्षिस दिले.

हायस्कुलात काशीनाथपताबरोबर दुसरे बरेच सहाध्यायी शिकत असत, पण त्यापैकी प वा जमशेटजी आर्देशीर दलाल हे एक होते पुढे शिक्षणखात्यात शिरून गुजराथ कॉलेजचे ( अहमदाबाद येथील ) प्रिन्सिपॉल झाले व शेवटी बडोदे सस्थानात शिक्षणमत्री झाले. नतर त्यानी पेनशन घेतले. त्यानीं सन

१९०६ मध्ये मुबईस हिदु यूनियन क्लबमध्यें न्या तेलगाच्या पुण्यतिथीच्या दिवशी जें भाषण केले ते अनेक दृष्टीनीं महत्वाचें होतें त्यावरून तेलगांच्या स्वभावाविषयी व हायस्कुलातील अभ्यासक्रमासबधानें ज्या काही गोष्टी इकडे जरूर सागाव्या असे वाटते तेवढयाचाच थोडक्यात उल्लेख करतों

दलाल शेटची व काशिनाथपताची सन १८६३ साली मॅट्रिकच्या वर्गात प्रथम गाठ पडली तेव्हा पासून ते दोघेही सारखे परीक्षा पास होत होत सन १८६९ मध्ये एम् ए पास होईपर्यंत एकत्र होते म्हणजे दलाल हे तेलगाबरोबर सारखे सहा सात वर्ष राहिलेले असल्यामुळे त्यानी सागितलेल्या गोष्टीचे महत्व विशेष आहे असो दलाल म्हणतात, हायस्कुलात आपण होतो त्या वेळी आपली पाच जणाची मोठी जूट असे काशीनाथ ( तेलग ), श्रीपाद ( ठाकूर ), गजानन ( भाटवडेकर ), रावजी ( तुल्छु ), आणि जमशेटजी ( दलाल ) हे सगळे एकमेकाशी मित्रत्वाने वागत असत परीक्षेत जरी ते एकमेकाचे प्रतिस्पर्धी असत, तरी एरव्ही सगळे एकमेकाना आनदाने मदत करीत असत पण त्या सर्वामध्यें अत्यत आनदी आणि गोड स्वभावाचा माणूस म्हणजे काशीनाथपतच असत त्याचे सगळेच—पारशी, गुजराथी हिदु, दक्षिणी हिदुमित्र असत इतके पारशी–गुजराथी लोकाचे प्रेम दुसऱ्या कोणत्याच दक्षिणी विद्यार्थ्याने सपादन केले नव्हते त्यामुळे काशीनाथपत एकादे दिवशी काही कारणाने जर गैरहजर राहिले तर सगळ्यानाच चुकल्या चुकल्यासारखे वाटत असे काशीनाथपत हे नेहमी आठवड्याच्या किंवा महिन्याच्या परीक्षेत सर्वाच्यावर असावयाचे पण त्यावद्दल कोणालाही विषाद अगर मत्सर वाटत नसे कारण परीक्षेत त्याचा नबर वर येणार हे ठरलेलेच असे

तेलग नुसती वर्गातील अभ्यासाचीच पुस्तके वाचून तृप्त राहात नसत हे वर सागितलेच त्यामुळे त्याचे शाळेतल्या वेळेपासूनच विस्तृत वाचन असे त्यावेळी एक बोहरी पुस्तकविक्या जुन्या पुस्तकाचे ओझे पाठीशी बाधून दररोज यावयाचा आणि हायस्कूल मधील जिन्याच्या पायथ्याशी ठाणे माडून वसावयाचा दलाल म्हणतात, “ आम्ही विद्यार्थी म्हणजे त्या पुस्तकविक्याची गिऱ्हाइके असू आमची रीत अशी असे आमच्यापैकी प्रत्येकाने त्याच्याकडचे एकादे इग्रजी पुस्तक—एकादी कादबरी, किंवा कविता अगर एकादे चरित्र—आठ किंवा दहा आण्याला विकत घ्यावयाचे आणि ते वाचून झाल्यावर दुसरे दिवशी तें पुस्तक बदलून दुसरें

घ्यावयाचें व त्याबद्दल फक्त एक आणा द्यावयाचा ! " या सवलतीचा काशीनाथ-पत खूप फायदा घेत असत त्यामुळे त्याचे इग्रजी वाङ्मय बरेंच वाचून होई. असो

याप्रमाणे मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण पुरें होऊन ती परीक्षा झाल्यावर सन १८६५ सालापासून काशीनाथपत एल्फिन्स्टन कॉलेजात जाऊ लागले त्यावेळी कॉलेज-मध्ये ह्यूलिग्स, कँडी, हैन्स, बुव्हर व ऑग्झेनहॅम हे प्रोफेसर होते काशीनाथ-पताना पहिल्याच वर्षी जूनियर स्कॉलर्शिप मिळू लागली व पुढच्याच वर्षी एप्रिलमध्ये त्याना सीनियर स्कॉलर्शिप मिळाली सन १८६६ मध्ये त्याची एफ. ए ची परीक्षा पास होऊन पुढच्याच वर्षी त्याना आणखी एक स्कॉलर्शिप, " राजा आफ धार "चे बक्षिस व इग्लिशमधले " गणपतराव विठ्ठल "चे बक्षिस, इतकी पारितोषिके मिळाली सन १८६६ सालच्या परीक्षेत सस्कृतमध्ये डॉ. भाडारकर हे एक परीक्षक होते सस्कृतच्या परीक्षेतील प्रश्नाची काशीनाथपतानी समाधानकारक रीतीने दिलेली उत्तरे पाहून भाडारकर फार खुप झाले व त्याना त्या तरुण विद्यार्थ्याच्या हुशारीबद्दल कौतुक वाटले असो सन १८६७ मध्ये म्हणजे आपल्या वयाच्या सतराव्या वर्षी काशीनाथपत बी ए परीक्षेत पास झाले सन १८६९ साली ते एम् ए च्या परीक्षेत सस्कृत व इग्लिश घेऊन पास झाले तदनतर सहाच महिन्यानी त्यानी " भगवानदास पुरुषोत्तमदास " सस्कृत स्कॉलर्शिपची परीक्षा—त्यावेळी ही परीक्षा विशेष महत्वाची गणली जात असे व ती फार कठीण असे—देऊन ती स्कॉलर्शिप मिळविली त्याच साली त्याची एलएल बी ची परीक्षा पास होऊन दोन्ही पदव्या—एम ए व एलएल बी त्यानी एकदमच घेतल्या मध्यतरी सन १८६८ मध्ये ते एल्फिन्स्टन हायस्कूल मध्ये वासुदेव गोपाळ सोमण याच्या जागी दोन महिने सस्कृत शिक्षकाचे काम करीत होते पण इतक्यात चॅटफील्ड साहेबानी त्याची एल्फिन्स्टन कॉलेजातील सीनियर फेलोच्या जागी नेमणूक केल्यामुळे त्याना तिकडे जावे लगले तिकडे त्यानीं शिकविण्याचे काम करून हायकोर्टात ॲडव्होकेटच्या परिक्षेच्या टर्म्स भरण्यास सुरवात केली त्या वेळी ॲडव्होकेटची परीक्षा विशेष प्रकारे घेण्यात येत असे. त्याप्रमाणें ती परीक्षा सन १८७२ साली काशीनाथपतानी देऊन तीत ते उत्तम प्रकारें पास झाले व आपल्या ॲडव्होकेटच्या ( बॅरिस्टरीच्या ) धद्यास लायक झाले ॲडव्होकेटच्या परीक्षेत त्याचे न्या बेली, ॲ ज व्हाइट व मि वेस्ट, रजिस्ट्रार हे परीक्षक होते असो सन १८६७ पासून १८७२ पर्यंतची सुमारें

पाच वर्षें काशीनाथपतानी कॉलेजात फेलोच्या जागी काम करून ॲडव्होकेटची परीक्षा पास होताच ते हायकोर्टात आपला धदा करू लागले

सन १८७१ साली मि पील हे डिरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शनच्या हुद्यावर होते त्यानी त्या वर्षी दोन नवीन हायस्कुले—एक महाराष्ट्रात व दुसरे गुजराथेत—स्थापन करण्याच्या इराद्यानें सरकारची मजुरी मिळवून त्यानी काशीनाथपत व दलाल या दोघाना बोलावून त्याना त्या नवीन शाळाच्या हेडमास्तरच्या ( रुपये ३०० च्या ) जागा पत्करण्याकरिता फार गळ घातली दलालशेट म्हणतात की, त्यापैकी एक जागा आपण पत्करली पण दुसरी जागा तेलगानी नाकारली ! पीलमाहेबानी तेलगाना पुन्हा स्वदस्तूरचे पत्र लिहून सागितले की, ती जागा दरमहा ५०० रुपयाची होणार आहे, तर ती " नाही म्हणू नका !" तरी तेलगानी ती नाकारलीच ! दलाल सागतात की, ॲडव्होकेटची परीक्षा देऊन हायकोर्टात बाळ मगेश वागळे व महादेव गोविद रानडे याना जाऊन मिळण्याचा तेलगाचा पूर्वीच निश्चय ठरलेला होता कदाचित् ते पुढे ॲडव्होकेट, वक्ते व लोकनायक व्हावयाचा योगायोग असल्यामुळे पीलसाहेबानी देऊ केलेली जागा नाकारण्याची काशीनाथपताना बुद्धि झाली असेल ! ( Probably there was an *afflatus divinus* within him of his future career as an Advocate and an orator and leader of men

काशीनाथपताच्या वक्तृत्वकलेच्या अभ्यासास कॉलेजातच आरभ झाला होता पण कॉलेजातील अभ्यासक्रमाविषयी जरा विस्तृत रीतीने पुढील प्रकरणातच लिहावयाचे असल्यामुळें तो विषयही त्या प्रकरणाकरिता ठेवणे भाग आहे

---

## प्रकरण पाचवे.

# कॉलेजांतील अभ्यास.



काशीनाथपताच्या कॉलेजातील अभ्याससबधाने थोडेसे मागील प्रकरणात लिहिलेलेच आहे परतु त्याविषयी जरा विस्तार करावा हे इष्ट वाटते कॉलेजातील अभ्यासाचा काल हा अनेक दृष्टींनी अत्यत महत्वाचा असतो त्या कालात

ज्या सवयी लागतील, जी ध्येयें ठरतील, जे स्नेह जमतील, जे गुण सपादन केले जातील, त्याचा वहुतेक पुढील सर्व आयुष्यक्रमावर परिणाम होण्याचा सभव असतो त्या सधीचा फायदा घेऊन सगळेच विद्यार्थी आपले कल्याण करून घेतात असे नाही परतु ती प्रत्येक मनुष्याच्या विद्यार्थिदशेतील एक चागली सधि असते. तिचा सदुपयोग करणे हें प्रत्येक विद्यार्थ्याचे कर्तव्य आहे या दृष्टीने पाहिल्यास तेलगाचा कॉलेजातील अभ्यासाचा काळ अत्यत महत्वाचा होता यात शका नाही यासबधात काशीनाथपताचे दोन सहाध्यायी व आमरण स्नेही खा ब जमशेटजी दलाल व दि ब अबालाल साकरलाल देसाई याचे दाखले अत्यत विचारणीय आहेत त्यातील काही ( भाषातररूपाने ) उतारे खाली देतो वास्तविक न्या तेलग हे आपल्या महाराष्ट्रीय लोकापैकी आधुनिक कालातील एक अत्यत थोर, विद्वान् व कर्तबगार असे पुरुष होऊन गेले त्यामुळे त्याची तरुणपणातील अभ्यासाची रीत, त्यानी त्या वयात आपणास लावून घेतलेल्या चागल्या सवयी वगैरे गोष्टीकडे आमच्या तरुण लोकाचे जितके लक्ष जाईल तितके चागले असे वाटते सगळ्यानाच तेलगासारखे होता येईल असे नाही, परतु त्याचे उदाहरण नजरेपुढे ठेवून वागल्यास त्यापासून कोणाही तरुणपिढीतील माणसाचा फायदा झाल्याशिवाय राहाणार नाही

काशीनाथपताच्या वेळच्या परिस्थितीत व हल्लीच्या परिस्थितीत जमीन-अस्मानाचे अतर पडले आहे त्याची अनेक कारणे आहेत पूर्वी युरोपीयन प्रोफेसर लोक फार उच्च दर्जाचे, उच्च ध्येये डोळ्यापुढे ठेवून वागणारे व आपल्या कर्तव्यास जागून वागणारे असे पुष्कळ येत असत आता ते प्रमाण राहिले नाही या उतरत्या कळेला सुरवात होऊन बरीच वर्षे झाली व या सबधाने डॉ भाडारकरानी व ना गोखले यानीं अधिकारी वर्गापुढे अनेकदा तक्रार केली आहे असो दुसरी गोष्ट, तेलगाच्या वेळी कॉलेजात शिकणारे विद्यार्थी फार थोडे असत त्यामुळे दयाळू प्रोफेसर लोकाना हुशार विद्यार्थ्याकडे जातीनें लक्ष पुरवून त्याना प्रोत्साहन देण्यास सवड मिळत असे आता ती सोय राहिली नाही आता शेकड्यानी मोजता येतील इतके विद्यार्थी कॉलेजात असतात त्यापैकी प्रोफेसर कोणाकडे म्हणून लक्ष पुरविणार ? तिसरें—व महत्वाचे—कारण म्हणजे राजकीय परिस्थितीतील फरक होय पूर्वी इग्रजी शिक्षणाची पद्धत नवीन—व काही काळपर्यंत तर बाल्यावस्थेत—असल्यामुळे व प्रोफेसर लोक—हॉवर्ड, सर अलेग्झँडर ग्रँट, वर्डस्वर्थ वगैरे—उदारमनस्क असल्यामुळें ते विद्यार्थ्याना मुलाप्रमाणें वागवून त्यास हरएक दृष्टीने

प्रोत्साहन देत असत आता आम्ही इग्रज लोकाबरोबर भाडून सर्व प्रकारे बरोबरीचे हक्क मागत आहोत अर्थात् आताच्या प्रोफेसर लोकात विद्यार्थ्याविषयी पूर्वीच्या-सारखी आपलेपणाची भावना दिसून येणे शक्य नाही हल्लीची स्थिति अधिक बिकट व्हावयास चवथे एक कारण झाले आहे अलीकडे सुमारे वीस वर्षात—सन १९०६ सालापासून—सुशिक्षित जनतेत उच्च प्रकारच्या देशाभिमानाचे परि-पोषण न होता हीन प्रकारच्या देशाभिमानाचा—किंबहुना पक्षाभिमानाचा किंवा जात्यभिमानाचा—प्रादुर्भाव होत चालला आहे त्यामुळे जिकडे तिकडे हिंदु-मुसलमान, ब्राह्मण-ब्राह्मणेतर, दक्षिणी-गुजराथी, मराठी-कानडी, असे अनेक भेद उत्पन्न होऊन जनतेत फाटाफूट होत आहे आधीच हिंदुस्थानात एरव्हीच्या काळी देखील लोकात फाटाफूट उत्पन्न करणारी कारणे अमूप ती कारणे इग्रजी शिक्ष-णाच्या प्रसाराने नष्टप्राय—निदान हतबल होतील अशी पुष्कळाची प्रथम अपेक्षा होती, पण ती व्यर्थ ठरून गेल्या वीस वर्षाच्या अनुभवाने फाटा-फुटीची पूर्वी अस-लेली कारणे बलवत्तर होऊन त्यात आणखी नवीन कारणाची भर पडत आहे असे स्पष्ट दिसते, ही स्थिति हरएक दृष्टीने अनिष्ट आहे आणि दु खाची गोष्ट ही की, या सर्व प्रकाराची छाया कॉलेजातील विद्यार्थि-वर्गावर पडत आहे हे अनिष्ट तर आहेच इतकेच नव्हे, तर ते खऱ्या देशहिताला घातक आहे असो पण याला उपाय काय ? आम्हास उपाय सुचतो तो हा युरोपीयन प्रोफेसराची गोष्ट वर सागितलीच त्याच्या सहानुभूतीवर सर्वांशी प्रस्तुत विसंबून राहाणे शक्य नाही जे कोणी उदारमनस्क युरोपीयन प्रोफेसर आपणास सहानुभूतिपूर्वक मदत कर-ण्यास तयार असतील त्याची मदत आपण अवश्यमेव घेतली पाहिजे पण खरा कार्यभाग आपल्यामधील नवीन तयार होणाऱ्या हिंदी प्रोफेसर लोकाचा आहे त्यानी व विद्यार्थ्याच्या पालकानी सहकारितेने वागल्यास वरील प्रकारची अनिष्ट स्थिति बदलून विद्यार्थ्याच्या ठिकाणी उच्च भावनाचे पोषण होईल अशी परिस्थिति उत्पन्न करण्यास उशीर लागेल असे वाटत नाही विद्यार्थ्याच्या पुढे उच्च ध्येये ठेवणे, ती गाठण्याकरिता त्याना प्रवृत्त करणे व त्याच्या ठिकाणी आपल्या देशाविषयी अगर समाजाविषयी उच्च प्रकारचे सद्विचार जागृत करणे ही आमच्या मते प्रोफेसर लोकाची कामे होत व ती त्यानी व्या-ख्याने, प्रदर्शने, सदाचरण इत्यादि द्वारानी केली पाहिजेत या दृष्टीने विचार केला म्हणजे न्या तेलग ( व न्या रानडे ) यानी आपल्या विद्यार्थिदशेत केलेले उद्योग व आपणास लावून घेतलेल्या दीर्घपरिश्रम करण्याच्या वगैरे सवयी या गोष्टी जशा

प्रौढ विद्यार्थ्याना तशाच आमच्या मते कदाचित् अध्यापकाचा पवित्र धदा करणाऱ्या लोकाना देखील, नमुन्यादाखल वाटतील सबब त्यासबधाचा या भागात व पुढील भागात तेलगाच्या अभ्यासाच्या दृष्टीने जरा विस्तार करण्याचे योजिले आहे

दलाल व देसाई यानी आपल्या—न्या तेलगाच्या पुण्यतिथीच्या निमित्ताने निरनिराळ्या वेळी वाचलेल्या—निबधात नमूद केलेल्या गोष्टीचा विचार केला म्हणजे त्या वेळच्या अभ्यासाची रीत, विद्याप्राप्तीकरिता वाटेल तेवढे परिश्रम करण्याची तयारी, समवयस्क पण उत्साहपूर्ण सहविद्यार्थ्याचा सहवास, उदारमनस्क व आपलेपणाच्या भावनेने वागणाऱ्या विद्वान् प्रोफेसर लोकाच्या वरचेवर पडणाऱ्या गाठी इत्यादि प्रकारामुळे तेलगाच्या वेळचे कॉलेजाचे सबध वातावरणच जणू अत्यत पवित्र व निर्मळ बनले होते असे स्पष्ट दिसते व त्यामुळे आपल्या प्राचीन कुलपतीच्या आश्रमरूप विद्यापीठाची क्षणभर आठवण होते असो. तेलगाच्या वेळी हायस्कुलात व कॉलेजात दलाल आदिकरून पाच जणाची जूट असे हे मागे सागितलेच त्यात अबालाल देसाई हे पुढे काही दिवसानी अहमदाबादेहून येऊन मिळाले त्या वेळी हल्लीच्या सारखी आडनावानी एकमेकाना हाक मारण्याची पद्धत नसून वरीलपैकी सर्वजण एकमेकास त्याच्या त्याच्या नावानीच–काशीनाथ, गजानन, श्रीपाद, जमशेटजी, अबालाल अशी—हाक मारीत असत ही सर्व मडळी एका कुटुबातल्या माणसाप्रमाणे कॉलेजात वागत असत सर्वाशी स्नेहाने वागावे, त्याचे हित पाहावे, त्याना मदत करावी, हीच सगळ्याची भावना असे काशीनाथपताच्या या गटाची सख्या पाच सहाच होती, ही एक सोयीचीच गोष्ट होती विद्यार्थ्याची सख्या जास्त असली म्हणजे सगळेच गाडे आटोक्याबाहेर जाते असो दुसरी लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे हल्लीच्या सारख्या त्या वेळी परिक्षेस नेमलेल्या पुस्तकाच्या—annotated editions—सटीप आवृत्त्या नव्हत्या त्यामुळे शब्द काढणे, त्याचा अर्थ लावणे वगैरे कामे विद्यार्थ्याना स्वत कोशाच्या--dictionary च्या--सहाय्यानेच करावी लागत असत अर्थात् त्याना स्वत च्या पायावर उभे राहण्याचीच सवय लागे प्रथम ह्युलिंग्स हे कॉलेजाचे प्रिन्सिपाल होते सर रेमड वेस्टच्या म्हणण्याप्रमाणे ह्युलिंग्स साहेब हे नुसते विद्वान् होते इतकेच नव्हे तर त्याची कल्पनाशक्ति–विचारशक्ति–देखील दाडगी होती त्याचा सहवास व सभाषण ही नेहमी प्रोत्साहक असत, व त्याचाच तेलगाना आयता फायदा मिळाला ह्युलिंग्सनतर चॅटफील्ड

प्रिन्सिपाल झाले दलाल म्हणतात की, ऑक्सफर्डहून आलेला खराखुरा प्रोफेसर कसा असतो किंवा कसा असावा हे त्याना प्रथम चॅटफील्ड साहेबानीच दाखविले मुलाना शिकविण्याची त्याना इतकी हौस असे की ते विद्यार्थ्यांना सुटीच्या दिवसात देखील बोलावीत असत व तासाचे तास—at a stretch—शिकवीत असत ते इतके की बेकन व ग्रीक तत्वज्ञ-मडळ याच्यासबधाने ते साहेब इतकी टिपणे—notes—देत असत की त्याच्या वह्यावर वह्या भरून जाव्यात सुशिक्षणाचे खरें लक्षण म्हणजे साधा पोषाख, विनयशील वर्तन व केवळ ऐहिक अगर प्रापञ्चिक गोष्टीकडे दुर्लक्ष हे ( दलाल म्हणतात ) आम्हास चॅटफील्ड साहेबानीच शिकविले त्यानी आपल्या शिकविण्याने व वर्तनाने विद्यार्थ्यांना अभ्यास कसा करावा हे उत्तम रीतीने शिकवून त्याचे शील व नैतिक वर्तन यास इष्ट प्रकारचे वळण दिले. विस्तृत वाचन व शिकस्तीचा उद्योग करण्याची आवड या गोष्टी आपणास चॅट-फील्डसाहेबानीच शिकविल्या असे दलाल सागतात व त्याबद्दल ते कृतज्ञता प्रकट करतात असो या सर्व गोष्टीचा काशीनाथपताना फायदा मिळाला होता

कित्येकाची अशी समजूत झाली आहे की, तेलगाचा कॉलेजातील अभ्यासक्रम चागलासा नसावा कारण ते आपल्या परीक्षा दुसऱ्या वर्गात पास झाले पण ही समजूत चुकीची आहे असे दलाल व देसाई दोघेही सागतात खरा प्रकार असा तेलग बी ए झाले त्या वर्षी फक्त पाचजणच पहिल्या वर्गात पास झाले पण त्या सर्वांचा ऐच्छिक विषय गणित होता ! त्या विषयातले गुण ठरलेले असतात व चागल्या विद्यार्थ्यास ते मिळाल्याशिवाय बहुधा राहात नाहीत तेलगानी इतिहास, अर्थशास्त्र व सस्कृत हे विषय घेतले होते इतिहास हा विषय त्या दिवसात फार कठीण गणला जात असे कारण त्या विषयावर अमकीच पुस्तके म्हणून नेमलेली नसत व परीक्षेला मोठमोठे भाग"—"periods तयार करावे लागत त्यामुळे विद्यार्थी तो विषय टाळीत असत तोच विषय तेलगानी घेतला होता ते एकद-रीत दुसऱ्या वर्गात पास झाले हे खरे, पण ते आपल्या विषयात–इतिहासात–पहिले आलेच होते साराश, पूर्वोक्त दोन्ही सहाध्यायाच्या म्हणण्याप्रमाणे काशीनाथपताचा कॉलेजातील अभ्यासक्रम अगदी सीधा व उत्तम असे आणि प्रोफेसर लोकाचे त्याच्या बुद्धिमत्तेविषयी,उद्योगशीलतेविषयी व वर्तणुकीविषयी उत्तम मत असे दलाल म्हणतात की ज्या गुणाच्या विकासामुळे तेलग पुढे एक अत्यत विद्वान् व कार्यक्षम पुढारी म्हणून प्रसिद्धीस आले, त्या गुणाची पूर्वचिन्हे त्याच्या विद्यार्थिदशेतच दृग्गोचर झाली होती अबालाल देसाई म्हणतात की आपण गवाळिया टॅकवरील

एल्फिन्स्टन कॉलेजात होतो त्या वेळी तेलगाना कोणीही पाहिले तरी त्याची त्याच्या बुद्धिमत्तेविषयी व हुशारीविषयी सहज खात्री होत असे त्यानी तेलगामधील काही विशिष्ट गुण सागितले आहेत ते आमच्या मते सर्वानी—विशेषेकरून विद्यार्थ्यांनी—जरूर लक्षात ठेविले पाहिजेत त्यापैकी **पहिला** गुण म्हणजे त्याचा उद्योगशील-पणा अथवा अभ्यासी स्वभाव देसाई म्हणतात की, मधल्या सुटीत किंवा रिकाम्या तासात आपण बाकीचे विद्यार्थी गप्पा मारण्यात वेळ घालवीत असू, तेव्हा तेलग हे नेहमी एकादी इग्रजी कादबरी, एकादे नाटक किंवा दुसरे एकादे इग्रजी पुस्तक वाचीत बसलेले असत याप्रमाणे मधून मधून थोडी थोडी फुरसत मिळत असे तिचा उपयोग करून कॉलेजातील पहिल्या दोन वर्गात तेलगानी स्कॉट, लिटन, डिकन्स व थॅकरे याच्या सर्व कादबऱ्या व शेक्स्पियर व बेन जानसन याची सर्व नाटके वाचून टाकली! पुन्हा गमत ही की, इतके करून तेलग वर्गाच्या मागे कधीच नसत बरे, त्याना करमणुकीची आवड किंवा जरूर मुळीच भासत नसे असेही नाही परीक्षा झाल्यावर निकाल समजेपर्यंतच्या दिवसात बहुतेक मडळी अबालालच्याच खोलीत पत्ते किंवा बुद्धिबळे खेळत बसत असत त्यात काशीनाथ-पत असतच! म्हणजे तेलगाचा अभ्यास अगदी रखडपट्टीचा असे असे नाही. किंवा तो लुडबुड करून अथवा धादल उडवून दुसऱ्यास उपसर्ग करणारा असाही नसे तेलगाचा खोलीत अभ्यास चालला असता मनाला मधून मधून करमणूक म्हणून सोबत्याची थोडीशी थट्टा किंवा त्याच्याशी थोडासा विनोद हे प्रकार त्याचे चालतच साराश, काशीनाथपताचा स्वभावच मोठा उमदा, उघड्या दिलाचा असा असे त्यात निरुत्साह, एकलकोडेपणा, किंवा चिडखोरपणा यापैकी कशाचाही लेश नसे! बरे, असा मधून मधून थोडासा विनोदाचा प्रकार चालला तरी, त्या-तून मध्येच फिरून अभ्यासाकडे लक्ष वळविण्यास त्याना मुळीच अडचण पडत नसे हा त्याच्यात उपजत स्वभावगुण असे त्यात—एका गोष्टीतून दुसरीत लक्ष घालण्यात—त्याना कठीण काहीच वाटत नसे फक्त त्याच्या चेहऱ्यात मात्र किंचित् फरक पडत असे व ते लागलेच विचारात गर्क होत असत असो

**दुसरा** काशीनाथपतामधला गुण म्हणजे चित्ताची एकाग्रता राखण्याची त्याना साधलेली हातोटी खोलीत त्याचा अभ्यास चालला असता कोणी गोगाट केला अगर अभ्यासात व्यत्यय आणला अशी तक्रार तेलगानी कधीही केली नाही. पत्ते किंवा बुद्धिबळें याचा खेळ खेळून किंवा तो टाकून अभ्यासाकडे लक्ष वळविण्यास त्याना मुळीच प्रयास पडत नसत मनाच्या एकाग्रतेला तेलगाच्या

ठिकाणीं शात—आनदी वृत्तीची जोड लाभल्यामुळे त्याचा अभ्यास चालला असता ते कधी त्रासलेले अगर चिडलेले पाहिल्याचे आपणास स्मरत नाही असे देसाई सागतात

**तिसरा** तेलगामधला गुण म्हणजे त्याची ईश्वरदत्त तैलबुद्धि त्यामुळे कॉले-जात बहुधा एकही विषय असा नसे की जो तेलगाना समजण्यास कठीण वाटे. वास्तविक गणित हा त्याच्या आवडीचा विषय नव्हता परतु ह्या विषयाचा आवश्यक तेवढा भाग त्यानी कधीच उरकून टाकला होता ! भूमितीचे सिद्धात किवा शकुन्छेदाच्या निरनिराळ्या आकृति याची आम्हा कोणाही विद्यार्थ्याप्रमाणे तेलगाना माहिती होती ते त्यात मागे होते असे केव्हाही झाले नाही

काशीनाथपताची चागली स्मरणशक्ति हा त्याच्यातला **चवथा** गुण वास्तविक तेलग किवा इतर जे विद्यार्थी स्मरणशक्तीवर विसबून राहात असत त्याचा पाठ करण्याचा भाग वर्गात येऊन बसल्यावर, दहापधरा मुलाच्या पाळ्या होऊन जाईपर्यंत, सहज पाठ होत असे एकदा असे झाले की वर्गात आत्याबरोबर ह्युलिंग्स साहेबानी काशीनाथपतानाच प्रथम आपला पाठ म्हणण्यास सागितले त्याची तयारी नव्हती तशी दुसऱ्याही काही विद्यार्थ्याची नव्हती साहेब रागावले आणि त्यानी त्या सर्व विद्यार्थ्याना तो पाठ तिकडच्या तिकडे तयार करून पुन्हा म्हणावयास सागितला ! फक्त ठाकूरनी ( श्रीपादराव ) तो सात मिनिटात म्हटला तेलगानी पधरा मिनिटात म्हटला नतर बाकीच्यानी !

देसाई यानी तेलगामधला **पांचवा** गुण सागितला तो त्याच्या बोलण्यात स्पष्ट दिसून येणारा कोणत्याही असभ्य अगर ग्राम्य भाषेचा अभाव, हा होय काशीनाथपताना थट्टा-विनोद, सर्व काही आवडत असे, पण त्याच्या बोलण्यात तरुण, हूडस्वभानुसार एकादी शिवी, अपशब्द किवा ग्राम्य कल्पना अशी कधीच दिसून आली नाही

तेलगामधला **सहावा** गुण म्हणजे त्याचा अगदी निगर्वी स्वभाव त्याची एक हुशार विद्यार्थी म्हणून प्रथमपासूनचीच प्रसिद्धि त्याचे सगळेच विषय चागले. त्यात सस्कृत व इग्लिश याविषयी तर बोलूच नका त्यातूनही त्याचे इग्लिश तर नेहमीच चागले असे त्याचे निबध व इतर लेखी काम याची प्रोफेसर लोक नेहमी तारीफ करीत असत पण त्यामुळें त्याना गर्वाची पीडा कधीही झाली नाही ! इग्लिशमध्ये वास्तविक ते सर्व विद्यार्थ्याचे सल्लागार—a general referee

असत वाटेल तो मनुष्य जाऊन त्याना आपल्या शका विचारीत असे पण तेल-
गानी कोणाला कधी "नाही" म्हटले नाही की कधी कोणाजवळ त्यानी आपल्या
हुशारीचा तोराही मिरविला नाही !

एकदरीत देसाई सागतात की काशीनाथपताचे मन फार उदार व प्रेमळ असे
कॉलेजात असताना तर ते सर्व सोबत्याशीं प्रेमानें वागतच पण कॉलेजातील
अभ्यासक्रम सपल्यानतर व सर्वाची ताटातूट झाल्यावरसुद्धा तेलग कधी आपल्या
जुन्या मित्राना विसरले नाहीत पुढे ते एक नामाकित अॅडव्होकेट झाले, वक्ते
झाले, लोकनायक झाले, हाय-कोर्टचे जज्ज झाले, पण आपल्या पूर्वीच्या मित्रा-
पैकी कोणासही त्याच्या सहाय्याची जरूर वाटल्यास त्याला त्याचा अनेकदा उप-
योग झालेला आहे असे देसाई सागतात केव्हा केव्हा तर मित्राची कामे तेलगा-
कडून परस्पर बिनबोभाट व्हावयाची, पण त्याची खुद्द त्या मित्राना वार्ता देखील
नसावयाची ! समजलेच तर ती वेळ निघून गेल्यावर काही दिवसानी यदृच्छेने
तिसरीकडून त्या मित्राना ते समजावयाचे ! इतकी उदारबुद्धि व सौजन्य अगदी
विरळा ! तात्पर्य, सभ्य वर्तणूक व साधी राहाणी हीच तेलगाची खूण होती असें
देसाई सागतात

देसाई यानी तेलगामधला एक दोष दाखविला आहे. त्याचाही इकडे उल्लेख
केला पाहिजे अबालाल म्हणतात की आपल्या वेळी कॉलेजला जोडलेली एक
व्यायामशाळा असे व्यायामशाळेत जाण्याबद्दल त्या वेळी सरकारी हुकुमानें सक्ति
नव्हती तरी बरेच विद्यार्थी त्या सवलतीचा-व्यायामशाळेत जाण्याचा—फायदा
घेत असत फक्त तेलग मात्र तो घेत नसत यावरून त्याची व्यायामाबद्दलची
नावड मात्र व्यक्त होई ही तेलगाची चूक होती ती मग त्याच्या लक्षात आली.
पण ती फार उशीरा आली असो

तेलग हे मोठे वक्ते होते. पण आपली वक्तृत्वशक्ति वाढविण्याची कल्पना
त्याच्या मनात ते कॉलेजात असतानाच आलेली असून त्या दिशेने त्याची तयारी
तेव्हापासूनच चालू होती दलाल सागतात की, कॉलेजात असताना तेलग हे
नेहमी आपला फुरसतीचा वेळ कॉलेज लायब्ररीत घालवीत असत सन १८६६-
६७ च्या सुमारास विलायतेत मोठमोठ्या राजकीय सुधारणासबधाने वाद चालू
होते व तत्सबधाने पार्लमेंटमध्ये ग्लॅडस्टन साहेबाची वक्तृत्वपूर्ण भाषणे होत
असत ती भाषणे तेलग लक्षपूर्वक वाचीत असत. कॉलेजातले त्या वेळचे गणि-

ताचे प्रोफसर कॅडीसाहेब हेही लायब्ररीत वरचेवर वाचण्याकरिता जात असत, व ते विद्यार्थ्यांच्या विनतीस मान देऊन केव्हा केव्हा वरील सारखी भाषणे त्याना ते मोठ्याने वाचून दाखवीत असत कॅडीसाहेबाची वाचण्याची ढब मोठी मोहक असे व तीच तेलगानी बहुधा उचलली असावी असे दलाल सागतात

पण तेलग एवढेच करून राहात नसत त्या वेळी कॉलेजात आठवड्यातून एक वेळ अशा वक्तृत्वसभा होत असत व त्यात तत्कालीन बहुतेक सर्व विद्यार्थी भाग घेत असत तेलगाच्या अगदी निकट स्नेह्याची—सहाध्यायाची—नावे मागे दिलीच आहेत पण त्याशिवायही कॉलेजात त्याच वेळी शिकणारे दुसरे बरेच त्याचे सहाध्यायी होते त्यापैकी काहीची नावे —घन शाम नीळकठ नाडकर्णी, आबाजी विष्णु काथवटे, गणेश रामचद्र किर्लोसकर, काशीनाथ रामचद्र गोडबोले, आनदराव सखाराम बर्वे, सीताराम विश्वनाथ पटवर्धन, सदाशिव विश्वनाथ धुरधर, यशवत वासुदेव आठल्ये, नारायण बाळकृष्ण गोडबोले, तापीदास मेथा, चदुलाल दौलतजादा, नानु नारायण कोठारे, होर्मसजी चिजगर, एदलजी खोरी, जमशेटजी उनवाला, बमनजी मोदी, रहिमतुल्ला सयानी इत्यादि वरील वक्तृत्वसभातून जो वादविवाद होई त्यात तेलग तर भाग घेतच, पण तशाच सभा केव्हा केव्हा रा व धुरधर याच्या दिवाणखान्यात भरत असत व त्यामधून चाललेल्या वादविवादामध्ये देखील तेलग भाग घेत असत पुढे काही कारणाने या धुरधराच्या घरी भरणाऱ्या सभा बद पडल्या परतु नाना शकरशेटच्या शाळेत दर रविवारी तशाच सभा भरत असत व त्या सभाना गावातील--विद्यार्थ्यांशिवाय–इतर लोकही येत असत वरील सर्व ठिकाणच्या सभामधून निरनिराळ्या विषयावर वादविवाद चालू असताना अध्यक्षस्थानी बहुधा काशीनाथपतच निवडले जात असत त्यामुळे त्याच्या वक्तृत्वाचे परिपोषण करण्यास त्याना तेथे सहजच सवड मिळत असे एकादा विषय घेऊन त्यासबधाची सर्व उपलब्ध माहिती मिळविणे, त्या विषयातील मुख्य मुख्य मुद्दे काढणे, त्याची व्यवस्थित रीतीने माडणी करणे, त्याचे प्रत्येकी स्पष्ट रीतीने विवेचन करून अखेर आपणास काय सागावयाचे ते थोडक्यात सिद्धात-रूपाने सागणे वगैरे जे वक्त्यामध्ये आवश्यक गुण असावे लागतात त्यासबधाचे शिक्षण काशीनाथपताना पूर्वोक्त सभामधील भाषणाच्या सवयीपासून चागलेच मिळत असे त्याचप्रमाणे अध्यक्ष या नात्याने कराव्या लागणाऱ्या कामामुळे–इतर वक्त्याना नियम घालून देणे, त्याच्या भाषणातील विचारणीय मुद्दे टिपून घेणे व त्यासबधाचे साधक बाधक प्रमाणे देऊन विवरण करणे आणि अखेर सर्व

वादाचा समारोप करून आपले म्हणणे साररूपानें सभेपुढे माडणे वगैरे कामे वर-चेवर करावी लागल्यामुळे—सर्व प्रकारचे विषय प्रतिपादन करण्याची त्याना सवय होत असे

काशीनाथपत हे सन १८६७ पासून १८७२ पर्यंत जवळ जवळ पाच वर्षे कॉलेजात फेलो होते हे मागे सागितलेच त्या पाच वर्षात त्यानी सबध कॉलेज लायब्ररीतली पुस्तके चाळली होती ती इतकी किवा इतक्या वेळा की, अमुक विषयावरील अमुक पुस्तक हे अमुक कपाटात आहे हे खुद्द लायब्रेरियनापेक्षा तेलगच अधिक बिनचूक रीतीने सागू शकत असे एका इग्रजी चरित्रकर्त्याने लिहून ठेविले आहे त्यावरून तेलगाचे वाचन किती विस्तृत होते व त्याची हरएक विषयासबधीची माहिती किती चोख होती ह्याची कोणासही सहज कल्पना होऊ शकेल

वक्तृत्वाच्या सवयीविषयी वर लिहिलेच आहे पण तेलगामधला विशेष हा की, त्याचे इग्लिशमध्ये जसे वक्तृत्व दिसून येत असे तसेच ते मराठीतही दिसून येत असे इदुप्रकाशकर्त्यानें एकदा म्हटले होते की "He was quite as good a speaker in Marathi as he was in English" जास्त काय, पण तेलगानी एकदा सस्कृतातदेखील व्याख्यान दिल्याचे नमूद आहे तात्पर्य, तेलगाचे इग्लिश, सस्कृत व मराठी या भाषावर चागले प्रभुत्व होते त्याना गुजराथी व जर्मन या भाषा चागल्या समजत असत व लॅटिनचेही थोडेसे ज्ञान होते

विद्यार्थिदशेतील तेलगाचा अभ्यासक्रम उत्तमच नव्हे तर तो अपूर्व होता. १४ वे वर्षी मॅट्रिक, १७ वे वर्षी बी ए, १९ वे वर्षी एम् ए, २० वे वर्षी एलएल बी आणि २२ वे वर्षी ॲडव्होकेट!

---

## प्रकरण सहावें.

# उच्च ध्येयें व तयारी.

काशीनाथपताच्या चरित्राच्या पूर्व भागातील अत्यत महत्वाची व चिरसस्मर-णीय कोणती गोष्ट असेल तर ती त्यानी आपल्यापुढे देशकार्यासबधी उच्च ध्येये ठेवून ती गाठण्याकरिता केलेली तयारी होय हायकोर्टात वागळे व रानडे

याजप्रमाणे ॲडव्होकेट होण्याचा काशीनाथपताचा निश्चय पूर्वीच ठरला असल्याचे मागील प्रकरणात सागितलेच आहे तो स्वतत्र धदा करण्याचे ठरविल्यामुळे पील-साहेबानी शिक्षणखात्यात दरमहा रु ३०० ची व पुढे लवकरच रु ५०० ची होणारी जागा दिलेली तेलगानी नाकारल्याचेहि सागितले आहे बॅरिस्टरीचा स्वतत्र धदाच करण्याची त्याची इच्छा इतकी बलवत्तर होती की पुढे सन १८८० च्या सुमारास चीफ जस्टिसच्या शिफारशीने ठाण्याच्या जॉइट जज्जाची जागा सरकारकडून आली असताही त्यानी ती नाकारली तात्पर्य, स्वतत्र धदा करून सार्वजनिक कामे करण्याचा त्याचा जो एकदा निश्चय ठरला तो शेवटपर्यंत कायम होता

काशीनाथपताचे असे एक मत असल्याचे इदुप्रकाशकर्त्यानी नमूद केले आहे, “ मनुष्याने आपल्या उदरनिर्वाहाच्या व्यवसायापेक्षा कोणताही उपयुक्त सार्वजनिक व्यवसाय केला नाही तर त्याचे जीवित व्यर्थ होय उदरभर व्यवसायापेक्षा त्याच्या हातून काही तरी कार्य होणे हे मनुष्यमात्राचे कर्तव्य आहे आणि ते बजावण्याकडे त्याने आपला इतर वेळ घालविला पाहिजे ” तेल-गाचे हे मत नमूद करून इदुप्रकाशकर्ते म्हणतात की “अशा प्रकारचे कर्तव्य तेलग हे स्वत बजावीत असत व ते फार उत्तम रीतीने व मुत्सद्दीपणाने बजा-वीत असत ” याच मताचा अनुवाद तेलगाचे एक इग्रजी चरित्रकर्ते चुनिलाल पारेख यानीही आपल्या पुस्तकात केला आहे फार काय, पण खुद्द कै टिळकानी देखील ता २३-८-९२ च्या केसरीमध्ये तेलगाच्या वरील प्रकारच्या सत्प्रवृत्तीबद्दल प्रशसापर उद्गार काढले आहेत असो

सन १८७० ते १९०० या सुमारे तीस वर्षाच्या काळात ज्या पुरुषानी मुबई इलाख्यात अनेकविध चळवळी चालवून उत्तम प्रकारे सार्वजनिक कामे केली, त्यात शेट दादाभाई नवरोजी, डॉ भाडारकर, न्या रानडे, सर फेरोजशहा मेथा, मि बद्रुद्दीन तय्यबजी व न्या तेलग याचीं नावे प्रथम सागितली पाहिजेत त्याना सहाय्य करणारे दुसरे गृहस्थ होतेच व त्यात सर दिनशा वाच्छा, सर नारायण चदावरकर व ना गोखले याचा प्रामुख्येकरून समावेश होतो पैकी चदावरकर व गोखले हे सार्वजनिक कामाच्या दृष्टीने पुढच्या पिढीतले असल्या-मुळे त्याच्या कामासबधाने इकडे आज जास्त लिहिण्याचे प्रयोजन नाही सर दिनशा वाच्छा हे मात्र पहिल्या सहा पुरुषाच्या बरोबरच काम करणारे असल्यामुळे त्याचे याना फार महत्वाचे सहाय्य होत असे असो दादाभाईनी १८७० पूर्वीच्या

काळात मुबईस मुख्यत शिक्षणविषयक व सामाजिक कामगिरी केलेली असून नतरचा बहुतेक सर्व काळ त्यानी अत्यत महत्वाच्या राजकीय कामात घालविला हे आम्ही ठोकळ मानानें सागत आहो कारण ते मधून मधून असे बरेच वेळा इग्लडला गेले होते व तिकडे झाले तरी ते हिदुस्थानदेशाच्या वतीनेच पुष्कळ काम करीत होते असो डॉ भाडारकराची महत्वाची कामगिरी म्हणजे वाङ्मय-क्षेत्रातली व सामाजिक सुधारणेबाबतची होय न्या रानडे हे जरी बाह्यत सामाजिक–धार्मिक क्षेत्रातच मुख्यत काम करीत होते तरी त्यानी सार्वजनिक सभेला हाताशी धरून अत्यत महत्वाची राजकीय कामगिरीही केली आहे इत-केच नव्हे तर सन १८७२ पासून त्याच्या अतकालापर्यंत ते महाराष्ट्रातील बहुतेक सर्व चळवळीचे सूत्रधार होते, असे म्हणण्यासही हरकत नाही फेरोज-शहा मेथा व बद्रुद्दीन तय्यबजी यानी राजकीय दृष्टीने देशाची महत्वाची काम-गिरी केली असून मेथा शेट तर मुबईच्या नमुनेदार मानल्या गेलेल्या म्युनिसिपा-लिटीचे सुमारे चाळीस वर्षपर्यंत केवळ अतरात्मा होते न्या तेलगामधला विशेष हा की, त्यानी वरीलपैकी सर्व क्षेत्रातून कामगिरी केलेली असून ती उत्तम प्रकारे केलेली आहे ! वाङ्मयक्षेत्रातील त्याच्या इतर कामगिरीसबधानें तूर्त काही न म्हटले तरी त्याचे फक्त रामायण-होमर, गीता-बायबल व शकराचार्य-चरित्र यावरील निबधच त्याची कीर्ति अजरामर करण्यास पुरेसे आहेत सामा-जिक बाबीपैकी स्त्रीशिक्षणाप्रीत्यर्थ त्यानी केलेली कामगिरी तर प्रसिद्धच आहे, आणि त्याच्या राजकीय भाषणापैकी, सन १८७९ साली विलायती मालावरील जकात उठविल्याबाबतचे, सन १८८३ सालच्या इल्बर्ट बिलावरचे व सन १८८८ साली राष्ट्रीय सभेत लॉर्ड डफरीनवर टीका करण्याबाबतचे अशी तीन भाषणे उत्तम अशी गणलेली आहेत तेलगामधला दुसरा–अमळ हृदयद्रावक–प्रकार हा की वरील सर्व मडळीपेक्षा ते वयानें लहान असूनही त्यानी इतके महत्वाचे–सर्व क्षेत्रातून–काम केलें आणि ईश्वरी योजनेप्रमाणे ते सर्वाच्या आधी इहलोक सोडून गेले ! तेलग हे मेथापेक्षा पाच वर्षानी लहान होते, बद्रुद्दीनपेक्षा सहा वर्षानी लहान, रानड्यापेक्षा आठ वर्षांनी लहान; भाडारकरापेक्षां तेरा वर्षानी लहान आणि दादाभाईपेक्षा पचवीस वर्षानी लहान होते ! खरा प्रकार असा असूनही ज्या पुरुषाने वरील सारख्या मडळीबरोबर सार्वजनिक कामे करून त्याचेकडून धन्यवाद घेतले त्याच्यामध्ये बुद्धिमत्तेपेक्षा–बुद्धि ही ईश्वरदत्त देणगी आहे !—दुसरे काही गुण असले पाहिजेत हें उघडच दिसते ते गुण कोणते हे आता पाहू

सन १९०० साली कै सर नारायण चदावकर यानी " Mr. Justice Telang as a student " या विषयावर मुबईस विल्सन कॉलेज लिटररी सोसायटीपुढे एक व्याख्यान दिले त्यावरून काशीनाथपत तेलगानी आपली उच्च ध्येये गाठण्याकरिता कशी उत्तम तयारी चालविली होती याची बरीच कल्पना होऊ शकते एका शब्दात सागावयाचे म्हणजे सार्वजनिक कामाची महत्वाची जबाबदारी आपल्या शिरावर घेण्यापूर्वी तेलगाप्रमाणे इतके विस्तृत वाचन, इतका परिश्रमपूर्वक अभ्यास व इतकी उत्कृष्ट पूर्वतयारी, आमच्या अल्प समजुतीप्रमाणे, महाराष्ट्रीय पुढाऱ्यापैकी फक्त न्या रानड्याशिवाय दुसऱ्या कोणी केली असेल असे वाटत नाही मुख्य गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी म्हणजे काशीनाथपतानी या विशेष प्रकारच्या अभ्यासास बी ए ची परीक्षा झाल्यावर सुरवात केली ! प्रथम मनाची एकाग्रता साधण्याची सवय व्हावी म्हणून त्यानी काही महिनेपर्यंत भूमिति व बीज-गणित यातील प्रश्न सोडविण्याचा क्रम ठेविला ते झाल्यावर त्यानी Chillingworth's " Religion of Protestants " याचे दोन मोठाले खड घेतले ते त्यानी नुसते वाचून फेकून दिले असे न करता त्यानी त्यातील साराश साधक बाधक प्रमाणासह आपल्या भाषेत लिहून काढला ! नतर त्यानी प्लेटोचे सवाद ( जोवेटने तयार केलेली आवृत्ति ) घेतले त्याचा देखील त्यानी वरीलप्रमाणेच, त्यातील विचारसरणी साधक बाधक कारणासह आपल्या भाषेत उतरून काढून, अभ्यास केला तदनतर त्यानी डॉक्टर (Strauss) स्ट्रॉसचा बायबलवरील टीका ग्रथ वाचला इतकी तयारी झाल्यावर काशीनाथपतानीं भगवद्गीता घेतली ती त्यानी लक्षपूर्वक वाचून तिचे मर्म समजून घेण्याचा यत्न तर केलाच, पण तिचे रहस्य मनात पक्के बिबावे म्हणून तिचे त्यानी इग्रजीत पद्यात्मक भाषातर केले त्यायोगाने त्याचे गीतेचे अध्ययन उत्तम होऊन त्याना शिवाय इग्लिश भाषेवरचेही प्रभुत्व सपादन करता आले असो मग त्यानी शाकरभाष्य घेतले त्या ग्रथाच्या वाचनानेच तेलगाची धर्मसबधी मते—पूर्वीची—बदलून ते जरा जास्त जास्त विचारवश होऊ लागले तोपर्यंत ते चालू हिंदुधर्मपद्धतीला चिटकून असत शाळेत शिकत असता रोज शाळेच्या शेजारीच असलेल्या मारुतीस प्रथम जाऊन मग ते शाळेत येत असत, असे दलाल सागतात त्याचप्रमाणे पुढे बी ए च्या वेळी देखील परीक्षा पास झाल्यास आपण अमुक दिवस उपवास करू, असा त्यानी नवस केलेला होता ! ही जी काशीनाथपताची जुनीं मते होती ती सर्व बदलून

पुढे ती अधिक विचारप्रधान झाली याला मुख्य कारण म्हणजे त्याचा शाकरभाष्याचा अभ्यास होय ! असो हा सर्व विशेष प्रकारचा अभ्यास त्यानी केला तो एम् ए परीक्षा होण्याच्या पूर्वी केला होता हें लक्षात ठेवले पाहिजे ती परीक्षा झाल्यानतर त्यानी मनास अधिक शिस्त लावण्याकरिता म्हणून जास्तच खडतर अभ्यास—अधिक कडक तपश्चरण—सुरू केला यात त्याचा हेतु एवढाच की एकाद्या विषयाचा आपणास सर्व बाजूनी विचार करण्याची सवय लागावी व आपल्या चिकित्सकबुद्धीला—critical faculty—अधिक कुशाग्रता यावी याकरिता काशीनाथपतानी प्रथम जॉन स्टुअर्ट मिल्लच्या ग्रथाचे परिशीलन आरभिले "याचा असा परिणाम झाला की, ( चदावरकर म्हणतात ) काशीनाथपताचे सगळे मन मिल्लच्या कल्पनानीच भरून गेले फार काय, पण त्याची अगदी साधी व शुद्ध इग्लिश भाषा, त्याची बिनतोड विवेचनशक्ति, आणि त्याच्या सर्व लेखातून व भाषणातून दिसून येणारी त्याना आपली बाजू नि सदिग्ध रीतीनें माडण्याची साधलेली हातोटी ही सर्व मिल्लच्या ग्रथाच्याच अभ्यासाची फळें होत " मिल्लनतर त्यानी हक्स्ले, टिडल, हर्बर्ट स्पेन्सर याचे ग्रथ लक्षपूर्वक वाचले विशेषेकरून स्पेन्सरचे ग्रथ त्याना इतके आवडले की, पुढे त्याच्या अनेक महत्वाच्या लेखातून व भाषणातून स्पेन्सरच्या ग्रथाचे उतारे आलेले आहेत असो त्यानतर त्यानी डार्विनचे काही ग्रथ वाचले

काशीनाथपतानी कोणते ग्रथ वाचले हे सागण्यापेक्षा त्यानी ते कोणत्या पद्धतीने वाचले या गोष्टीचे महत्व विशेष आहे त्याची पद्धत अशी एकादा ग्रथ वाचूनच स्वस्थ बसावयाचे नाही, तर त्या ग्रथाचे रहस्य समजून घेण्याकरिता ते त्याच कर्त्याचे दुसरे ग्रथ वाचीत असत इतकेच नव्हे तर, एकाद्या विषयाची एक बाजू दाखविणारे ग्रथ जर त्यानी प्रथम वाचले तर त्या विषयाची उलट बाजू समजून घेण्याकरिता ते मग त्या बाजूचे ग्रथ वाचीत असत यायोगानें त्याचे काही लेख व महत्वाची भाषणे मुद्देसूदपणा व निरुत्तर कोटिक्रम या गुणानी इतकी भरलेली असत की प्रतिपक्षी ती वाचून साहजिकच हतबल होत असे याचे प्रत्यतर म्हणून तेलगानी लिहिलेले "रामायण" व "भगवद्गीता" यावरील दोन निबध केव्हाही दाखवावयाला हरकत नाही इदुप्रकाशाच्या भाषेंत बोलावयाचे म्हणजे "रामायणावरील निबधानें वेबरला कुठित केले व तो वाचून इग्लिश लोकानी तोडात बोटेच घातली !" असो.

तेलगाची प्रथम प्रथम आणखी एक अनुकरणीय पद्धत असे दुसऱ्या वक्त्याचे विचार आपण बरोबर समजून घेऊन ते आपणास विशद रीतीनें व्यक्त करता येतात की नाहीत हे पाहण्याकरिता ते काही दिवस प्रार्थना समाजात जाऊन तेथील व्याख्यानें, निरूपणे वगैरे लक्षपूर्वक ऐकत असत व मग घरी येऊन ते ती व्याख्यानें साराशरूपानें लिहून काढीत व नतर ती खुद्द व्याख्यात्याना दाखवून दुरुस्त करून घेत असत ! यावरून तेलगामधील स्पष्ट दिसून येणाऱ्या गुणाचे —परिश्रम करण्याची तत्परता, निरभिमानता व मनाचा सरळपणा याचे—काय वर्णन करावे ? या गोष्टीचा स्पष्ट उल्लेख करून तेलगाचा एक इग्रजी चरित्रकर्त्ता ( मि परमेश्वरम् पिळ्ळे ) म्हणतो —" तेलग म्हणत असत की, दुसऱ्याचे विचार नुसते समजून घेऊनच उपयोगी नाही, तर ते विचार स्वत स सुव्यक्त करता आल्याशिवाय कोणालाही विचार करण्याची चागली सवय लागली असे म्हणता येत नाही त्यामुळे तेलगानी आपल्या सर्व लेखात व भाषणात भाषेची नि सदिग्धता ( lucidity ) व मनाचा समतोलपणा हे गुण आणण्याकरिता नुसते उत्तमोत्तम ग्रथ वाचले, किंवा स्वत निबध लिहून वाचले अथवा वक्तृत्व सभातून व्याख्यानें दिली इतकेच नसून त्यानी दुसऱ्याची भाषणे देखील ऐकून त्याचे विचार आपल्या शब्दात व्यक्त करण्याची पात्रता अगी आणली होती म्हणूनच त्याची मुबई इलाख्यातील एक उत्तम वक्ते व लेखक म्हणून प्रसिद्धि झाली !"

काशीनाथपताचे वाचन दाडगे असे हे सागितलेच प्रथम शाळेत असताना त्याना रेनॉल्डसच्या कादबऱ्या वाचण्याचा काही दिवस नाद असे पण तो पुढे सुटला आणि मग महत्वाची पुस्तके वाचण्याकडे त्याच्या मनाचा कल झाला स्कॉट, डिकन्स याच्या कादबऱ्या व शेक्स्पियरची नाटके त्यानी कॉलेजात असताना कधीच वाचून टाकली होती हे मागे सागितलेच आहे वर्तमानपत्रे ते वाचीत असत पण पुढे पुढे ते ती सध्याकाळी किवा कोर्टाला जाताना गाडीत वाचीत असत सकाळचा वेळ ते या कामाकडे केव्हाही खर्च करीत नसत त्या वेळात ते महत्वाची व विचारपूर्वक वाचण्यासारखी पुस्तके वाचीत असत ते वायफळ असे कधीच वाचीत नसत व बोलत नसत

ते सभामधून व्याख्याने वगैरे ऐकण्यास जात असत पण ते सर्वच ठिकाणी आणि विषयाचा पूर्वी विचार केलेला असल्याशिवाय कधीच भाषण करीत नसत सन १८७० ते १८८० च्या सुमारास विल्सन हायस्कूलमध्ये मि मरेमिचेल याचे ख्रिस्ती धर्मावर व मि महादेव मोरेश्वर कुटे याचे " हिदुधर्मा"वर अशी दोन

व्याख्याने झाली दोन्ही प्रसगी तेलग हजर होते व त्याची "एक चागले वक्ते" म्हणून पूर्वीच प्रसिद्धि झालेली होती दोन्ही प्रसगी डा विल्सन अध्यक्षस्थानी होते व त्यानी दोन्ही प्रसगी तेलगाना बोलण्याविषयी विनति केली पण यानी दोन्ही वेळ "माफ करा" म्हणून बोलण्याचे नाकारले चदावरकर सागतात की श्रोत्यामध्ये आपण व दुसरे कित्येक विद्यार्थी होते व तेलगाचे भाषण ऐकण्यास आपण सर्व उत्सुक झालो होतो पण त्याची निराशा झाली. नतर काही वर्षानी तेलगाचा जास्त परिचय झाल्यावर चदावरकरानी सदरील विल्सन हायस्कूल मधील दोन व्याख्यानाविषयी आठवण करून तेलगाना "आपण त्या वेळी डॉ विल्सनसाहेब आग्रह करीत असता का बरे भाषण केले नाही ?" म्हणून विचारले. तेलग म्हणाले, "सर्वच ठिकाणी आणि केवळ बोलावे म्हणून बोलण्याची माझी वहिवाट नाही विषयासबधी पूर्वी विचार केलेला असल्याशिवाय भाषण करणे मला पसत नाही"

तेलगाच्या आयुष्यक्रमातील सन १८७० ते १८८० पर्यंतचा काळ हा ठोकळ मानाने त्याच्या सार्वजनिक कारकीर्दीच्या पूर्वतयारीचा—apprenticeship चा—काळ होता असे त्याचेच एक सहकारी मित्र सर दिनशा वाच्छा यानी म्हटले आहे त्या मुदतीत तेलग हे बॉबे असोसिएशनचे व पुढे ईस्ट इडिया असोसिएशनचे ( मुबईशाखेचे ) सेक्रेटरी होते त्या नात्याने त्याना अनेक बाबतीत सरकारास व पार्लमेटला वगैरे अर्ज करणे, त्याकरिता जरूर लागणारी माहिती मिळविणे, ती सकलित करणे, त्याची मुद्देसूद रीतीने माडणी करणे, तसेच त्या त्या सस्थेच्या तर्फे जाहीर सभा भरविणे, ठरावाची पायाशुद्ध भाषा ठरविणे, वगैरे अनेक प्रकारची कच्ची कामे करावी लागल्यामुळे त्याचे ठिकाणी कार्यक्षमता वाढली, आपल्या जबाबदारीची जाणीव उत्पन्न झाली आणि पुढे मोठमोठी जोखमीची कामे शिरावर घेऊन ती उरकण्याची त्याची पात्रता वृद्धिगत झाली त्याचे पूर्वी सार्वजनिक कामे करणारे डॉ भाऊ दाजी, दादाभाई नवरोजी, नवरोजी फर्दुनजी, रा सा मडलिक, मगळदास नथूभाई वगैरे पुढारी होते त्याची उदाहरणे त्याच्यापुढे होतीच त्या पुढाऱ्यानी चालविलेल्या सस्थातून व चळवळीतून तेलग हळू हळू भाग घेऊ लागले व या रीतीने पुढे फेरोजशहा मेथा व बद्रुद्दीन तय्यबजी याच्या सहकार्याचा लाभ होताच ते एक मुबईतील मुख्य पुढारी झाले व त्यानी देशाची अनेक मार्गानी सेवा केली

याप्रमाणे सर्व बाजूनी तेलगाची उत्तम प्रकारें पूर्वतयारी झाल्यामुळेंच त्याच्या हातून अनेक क्षेत्रामधून महत्वाची कामगिरी झाली ते उदरनिर्वाहाचे साधन म्हणून बॅरिस्टरीचा धदा करीत असत, तरी त्यानी वाङ्मय, लोकशिक्षण, सामाजिक व राजकीय वगैरे अनेक क्षेत्रातून उत्तम कामगिरी केली आहे त्याचा आता क्रमश विचार करू

---

## प्रकरण सातवे.

# धंदा.

—०—

काशीनाथपताची सन १८७२ मध्ये ॲडव्होकेटची परीक्षा पास होऊन ते आपला धदा करण्यास लायक झाल्याचे मागे सागितलेच आहे. ॲडव्होकेट व बॅरिस्टर यामध्ये काही भेद नाही हे सर्वविश्रुत आहे, ॲडव्होकेट इकडे पास होतात व बॅरिस्टर हे विलायतेतील परीक्षा पास होऊन आलेले असतात परतु धद्याच्या दृष्टीने दोघाच्याही कामात फरक नाहीं तेलग ॲडव्होकेटचा धदा करू लागले तेव्हा त्या धद्यात हल्लीच्या प्रमाणे गर्दी होऊन चेगराचेगरीचा प्रसग येत नव्हता तरी पण त्यात दुसऱ्या अडचणी काही कमी नव्हत्या त्या वेळी नेटिव्ह बॅरिस्टर फार नसल्यामुळे बहुतेक सर्व धदा युरोपियन बॅरिस्टराच्याच मुठींत होता दुसरी गोष्ट अशी की, एकादा नेटिव्ह बॅरिस्टर असलाच तर त्याला उत्तेजन देऊन पुढे आणणारे नेटिव्ह सॉलिसिटर त्या वेळी नव्हते त्यामुळे त्या वेळचे प्रसिद्ध व रणधुरधर बॅरिस्टर म्हणजे स्कोबल, लॅथॅम, सार्जट हेच होते. अशाचा जबरदस्त कोट फोडून धद्यात शिरकाव करू पाहाणे हे सोपे काम नव्हते वरील सारख्या अनुभवशीर व पटाईत बॅरिस्टराच्या पुढे काशीनाथपत म्हणजे एक अगदीच तरुण नुकतेच पास झालेले, अनुभवशून्य असे ॲडव्होकेट होते त्याच्याही पूर्वी मि बद्रुद्दीन तय्यबजी व मि फेरोजशाहा मेथा यानीं त्याच धद्यास सुरवात केली होती, पण त्याचीही तेथे प्रथम काही दिवस डाळ शिजली नाही. तेलग आले तेव्हा हे दोघेही कसेबसे काम रेटीत होते हिंदूपैकी फक्त मि बाळ मगेश वागळे हेच कायते हायकोर्टात काम करीत होते मि रानडे यानी पूर्वीच सरकारी नोकरी पत्करली होती अशी त्या धद्याची त्या वेळी अमळ निराशाजनक स्थिति होती. आणि त्यातूनच काशीनाथपताना आपला मार्ग काढावयाचा होता.

तेलगाच्या बाजूसही काहीं अनुकूल गोष्टी–गुण होते ते एक बुद्धिमान् व हुशार विद्यार्थी म्हणून त्याची प्रोफेसर लोक वगैरे याजमध्ये पूर्वीच प्रसिद्धि झाली होती दुसरें असे की, सर रेमड वेस्ट म्हणतात त्याप्रमाणे तेलगाच्या ठिकाणी " Sympathetic faculty "—स्वभावसाधर्म्य ओळखण्याची शक्ति असल्यामुळे ते धद्याला लागल्याबरोबर थोड्याच दिवसानी युरोपियन बॅरिस्टराच्याच बरोबरीने काम करू लागले तशातूनही हिंदु लॉमध्ये तर तेलगाचा सर्व बॅरिस्टरामध्ये—*facile princeps* हे वेस्टसाहेबाचे शब्द आहेत–सहज लीलेने पहिला नबर लागे ! साराश, सभ्यपणाची वागणूक, उद्योगक्षमता, वक्तृत्व, आपली बाजू कोर्टापुढे मुद्देसूदपणाने माडण्याची साधलेली हातोटी व विनयशीलपणा या गुणाच्या योगाने तेलग पुढे सर्वानाच प्रिय व आदरणीय वाटू लागले त्याच सुमारास–१८७२ व १८७३ साली–तेलग याचे रामायण व भगवद्गीता यासबधीचे विद्वत्ताप्रचुर निबध प्रसिद्ध झाल्यामुळे त्याची कीर्ति सहज युरोपखडापर्यत पोंचली व त्यानी **वेबर व लॉरिन्सर** याच्या सारख्या प्रसिद्ध विद्वान् पडिताच्या तद्विषयक नवीन कोड्याना जी समर्पक उत्तरें दिली त्यावरून दिसून आलेल्या त्याच्या विद्वत्तेबद्दल व सस्कृतवाङ्मयप्रवीणतेबद्दल युरोपस्थ पडितानी देखील माना डोलविल्या ! अर्थात् या गोष्टीचा त्याच्या धद्यावर चागलाच परिणाम झाला व त्याची सर्व युरोपियन व्यवसायबधूवर साहजिकच छाप बसली.

तेलगामध्ये आणखी एक विशेष होता ते एक सस्कृतज्ञ पडित होते व त्याचे कायद्याचे ज्ञान उत्तमपैकी होते या गोष्टी खऱ्या आहेत, पण ते स्वत हिंदु असल्यामुळें धर्मशास्त्राच्या दृष्टीनें हिंदु लोकाच्या काय अडचणी आहेत हे ते जाणत असत; आणि त्याच्या मनावर इग्लिश व इतर वाङ्मय वाचून सुसस्कार झालेला असल्यामुळें त्याच्या ठिकाणी उदार भावना जागृत झाल्या होत्या व त्यामुळें ते कोणत्याही गोष्टीचा उदारदृष्टीने विचार करीत असत तेलगाच्या मते हिंदु धर्मशास्त्र म्हणजे केवळ कायम ठशामध्यें बसविलेले धर्मपुस्तक नसून त्याला वाढ आहे त्याच्या अगी विकासक्षमता—growth—आहे त्यामुळें जे नियम हजार वर्षापूर्वीच्या समाजाला लागू पडत असत तेच हल्लीच्या समाजास जशाचे तसे कसे लागू होतील ? हिंदु धर्मशास्त्र हें ज्या वेळी रचिलें गेले त्या वेळच्या समाजस्थितीच्या दृष्टीने ते रचण्यात आलें व ते ठीकच होतें पण समाजस्थितीतच जर प्रत्यहीं परिवर्तन चाललें आहे, तर तदनुसार धर्मशास्त्रातही रास्त तो फेरबदल झाला पाहिजे हे ओघानेंच प्राप्त होतें इतकेच नव्हे तर तसा फेरबदल करण्यास

स्वराज्यातल्यापेक्षा हल्ली ब्रिटिश राज्यात फार कमी सवड मिळते अशी तेलगानी एकदा तक्रार केली आहे "Gleanings from Maratha Chronicles" या इग्रजी निबधात तेलग म्हणतात —

"Speaking broadly it would appear that the general effect of British administration has been to render feeble the various forces, which were, in old days, working from within the community as a community. The old rules would, by common if tacit consent, have been relaxed, and in process of time custom would have sanctified every thing But such a process hardly takes place at our present stage of progress, or at all events is incomparably more slow and tedious in its operation, wherever British influence is in other respects powerful"

यामुळे हिदुलॉचा खटला आल्यास ते त्यासबधाचे धर्मशास्त्र अगर स्मृतिच पाहून राहात नसत, तर त्यासबधाच्या टीका, निबध वगैरे वाचून ते मूळ धर्मशास्त्राचा उदार मनाने प्रस्तुत परिस्थितीच्या दृष्टीने अर्थ लावण्याचा प्रयत्न करीत असत. हे सामर्थ्य तत्कालीन फारच थोड्या बॅरिस्टराच्या अगी असे हे तेलगाचे—**वेस्ट** साहेबाच्या भाषेत सागावयाचे म्हणजे It was refreshing to hear him arguing for modernization—धोरण पाहिले व त्याप्रमाणे ते कोर्टापुढे आधार व प्रमाणे ठेऊन आपली बाजू माडू लागले म्हणजे जज्ज लोक खूष होऊन जात असत अशा प्रकारचा एक कज्जा मुबई हायकोर्टात सन १८७६ साली आला तो "लल्लुभाई बापूभाई वि मानकुवरबाई" या नावाने १८७८ सालच्या लॉ रिपोर्टात दाखल झालेला आहे पण तो पुढे "मानकुवरबाई केस" म्हणूनच प्रसिद्धीस आला तो खटला अत्यत महत्वाचा असून त्यात एका बाजूचे मि फॅरन व मि बद्रुद्दीन असे दोन बॅरिस्टर होते व दुसऱ्या बाजूस मि स्कोवल, मि लॅथॅम व मि तेलग असे तीन बॅरिस्टर होते खटला कैक दिवस चाललेला असून दोन्ही बाजूचे बॅरिस्टर मोठमोठे रिपोर्टांचे व्हाल्यूम आधारासाठी आणून आपापली बाजू सजवून कोर्टापुढे माडीत होते अखेर खटला फुलबेच पुढे—चीफ

जस्टिस सर मायकल वेस्ट्रॉप, जस्टिस सार्जंट व जस्टिस वेस्ट याच्यापुढे—निकालाकरिता येऊन कित्येक आठवडे तत्सबधाची " भवति न भवति " चाललेली होती, व शेवटच्या ठरावाने बरोबर ६० पाने घेतली आहेत ! खटल्यातले मुद्दे अगर दोन्ही बाजूकडील बॅरिस्टरानी पुढे केलेले आधार यासबधाचा तपशील इकडे देण्याचे कारण नसून फक्त इतके सागितल्यास बस्स आहे की खटल्यात स्त्रियाच्या वारसा हक्कासबधाचाच मुख्य प्रश्न होता स्त्रियाच्या हक्कासबधाने उदार मनाने विचार करून त्याना कायद्याच्या दृष्टीने बरीच स्वतत्रता ठेवल्याचा मान, हिदुस्थानातील सर्व हायकोर्टाचा विचार केल्यास फक्त मुबईच्या हायकोर्टाचाच आहे, व त्याबद्दलचे बहुतेक सर्व श्रेय, परवा बॅरिस्टर जयकरानी एकदा म्हटल्याप्रमाणें, तेलग, रानडे, चदावरकर इत्यादि हिदी न्यायाधिशाचे आहे ! असो ज्या उदार धोरणानुसार तेलगानी पुढे जज्ज या नात्याने हिदुधर्म शास्त्रीय काही प्रश्नाना कायद्याचे स्वरूप दिले, त्या धोरणाची सुरवात त्यानी बॅरिस्टर या नात्याने काम करीत असतानाच केली होती, हे लक्षात ठेविले पाहिजे सदर्हु " मानकुवरबाई " ची केस हे एक तेलगाच्या उदार धोरणाचेच उदाहरण होय तेलगाच्या बोलण्यात मनु, मिताक्षरा, मयूख हे सर्व आधार आलेच होते, पण स्त्रीला हिदु धर्मशास्त्राप्रमाणें—मुबई हायकोर्टाच्या आजपर्यंतच्या निवाड्याच्या दृष्टीने—वारसा हक्क आहे हाच त्याच्या भाषणातला मुख्य मुद्दा होता त्याचे म्हणणे असें मिताक्षरा व मयूख या दोन्ही ग्रथाच्या आधाराप्रमाणे स्त्रीचा तिचे लग्न झाल्यावर नवऱ्याच्या कुटुबात जन्म होतो वारसा हक्काच्या दृष्टीने स्त्री ही दोन कुटुबामध्ये गोत्रज होऊ शकते, एकात जन्म झाल्याने व दुसऱ्यात लग्न झाल्याने मनु हा स्त्रियाच्या "वारसा हक्काला विरुद्ध आहे" या म्हणण्याला आधार नाही बगालच्या बाजूस जे आधारभूत ग्रथ मानतात त्याप्रमाणे बायकाना वारसा हक्कापासून—inheritance—वगळले आहे ही गोष्ट खरी, पण तो अर्थ आपल्या मुबई--पश्चिम हिदुस्थान--कडील कायदेपडिताना ग्राह्य वाटत नाही मनूमध्ये वारसाहक्काच्या दृष्टीने पणजी व बहीण याचा उल्लेख नाही परतु पश्चिम हिदुस्थानात--मुबईस--जी वारसदाराची यादी तयार झाली आहे त्यात त्याचा—पणजी व बहीण याचा—समावेश झालेला आहे मनूने बायकास वारसा हक्काला—inheritance—अपात्र मानलेले आहे असे म्हणणे चुकीचे आहे खरा प्रकार म्हणजे मनूच्या काही श्लोकाचा अर्थ करताना जरा गोधळ झाला असला पाहिजे त्यामुळे त्या श्लोकाचे दोन अर्थ झाले त्यापैकी एका

अर्थाप्रमाणें बंगाल व मद्रास या बाजूचे कायदेपडित वागतात व दुसरा अर्थ पश्चिम हिंदुस्थानाकडच्या कायदेपडितास मान्य होऊन ते तसे वागत असतात

खटला चालला असताना तेलगाच्या आगचे काही गुण–त्याची विद्वत्ता व त्याचे वक्तृत्व–इतक्या उत्कृष्ट रीतीनें प्रकट झाले की, त्याबद्दल सर्वानीच व विशेषेकरून चीफ जस्टिस सर मायकल वेस्ट्रॉप यानी लागलीच तेलगाची उघड-पणे फार स्तुति केली ! याचा परिणाम असा झाला की हायकोर्टात जज्जलोकामध्ये व वकील–बॅरीस्टरामध्ये कैक दिवसपर्यंत तेलगाच्या विद्वत्तेशिवाय दुसरा विषय नव्हता वेस्ट्रॉपसाहेब तर कोणीही चागला मनुष्य भेटला तरी त्याच्याजवळ तेलगाच्या हुशारीबद्दल तारीफ केल्याशिवाय राहात नसत अर्थात् स्कोबल वगैरे बॅरिस्टर मडळीनी तेलग पुढे मागे लवकरच हायकोर्टचे जज्ज होतील असे जे भाकीत केले त्याबद्दल आश्चर्य वाटण्याचे कारण नाही असो तेलगाचा मग धदा उत्तम ( बॅरिस्टराच्या पुढाऱ्याप्रमाणे ) चालावा व त्याची भरभराट व्हावी हे ओघानेच प्राप्त झाले त्यामुळे पुढे तेलगाचे हायकोर्टात इतके वजन वाढले की, हिंदुलॉचा कोण-ताही महत्वाचा खटला आला म्हणजे तेलगानी त्यापैकी कोणत्याही पक्षाचे वकील-पत्र घेतले नसेल तर, जज्जानी त्याचा नेहमी सल्ला घ्यावा एखाद्या अशा खट-ल्याच्या वेळी काही कारणाने तेलग हजर नसले म्हणजे वेस्ट्रॉप साहेबानी–थोडेंसे विनोदाने–असे म्हणावे की, बुधवारच्या दिवशी ॲपेलेट बाजूला तेलगानी कधी गैरहजर राहाता कामा नये असा सक्तीचा हुकूम सोडला पाहिजे ( " There ought to be a standing injunction against Mr Telang being away from the Appellate side on Wednesdays" ) असो पुढे सन १८८० च्या सुमारास तेलगाना सरकारकडून ठाण्याच्या जॉइंट जज्जाची जागा देण्यात आली; पण ती त्यानी नाकारली

तेलग आपली बॅरिस्टरी करीत असत त्या मुदतीत सन १८८७ मध्ये हायकोर्टात दुसरा एक खटला आला तो त्यावेळी पुष्कळच गाजला तो "दादाजी विरुद्ध रखमाबाई" हा होय त्या खटल्याची थोडक्यात हकीकत अशी आहे जनार्दन पाडुरग या नावाचा एक पाचकळशी जातीचा गृहस्थ सन १८६७ मध्ये वारला त्याला एकुलती एक मुलगी होती तीच रखमाबाई जनार्दनच्या मृत्यूनतर त्याची २५ हजाराची मिळकत रखमाबाईला मिळावयाची होती जनार्दनच्या विधवेने सन १८७१ साली डॉ सखाराम अर्जुन नावाच्या गृहस्थाबरोबर पुनर्विवाह केला.

अर्थात् बापाच्या मिळकतीची रखमाबाई मालक होऊन डॉ सखारामच्या घरी राहण्यास आली तिचे तेराव्या वर्षी दादाजी नावाच्या (वीस वर्षाच्या) मनुष्याशी लग्न झाले होते त्याने काही दिवस वाट पाहिल्यावर बायकोला आपल्या घरी नादण्याकरिता म्हणून बोलाविले पण तिच्या तर्फे आज एक सबब, उद्या दुसरी, परवा तिसरी असे होऊ लागल्यामुळें दादाजीने आपल्या वैवाहिक हक्काची अमलबजावणी करण्याच्या इरायाने हायकोर्टात दावा माडला प्रकरण कोर्टात गेल्यावर रखमाबाईने आपल्या कैफियतीत दादाजी विरुद्ध अशी पुष्कळच कारणे दाखविली, ते ओघानेच झाले पुराव्यात ती कारणे खोटी ठरली पण पहिल्या कोर्टाने—जस्टिस पिन्हे यानी—दादाजी विरुद्ध निकाल दिला दादाजीने अपील केले अपिलात खालच्या कोर्टाचा निकाल रद्द होऊन हिंदुधर्मशास्त्राप्रमाणे रखमाबाईने नवऱ्याचे घरी गेले पाहिजे असा हुकूम फर्माविण्यात आला त्याप्रमाणे ती न गेल्यास तिला कैदेची शिक्षा भोगावी लागेल असे कोर्टाने ठरविले कोर्टाच्या हुकुमाप्रमाणे रखमाबाई नवऱ्याकडे जाईना अशा वेळी मुबईस प्रिन्सिपाल वर्डस्वर्थ साहेबाच्या मदतीने "रखमाबाई डिफेन्स कमिटी" नेमण्यात येऊन तिला कैदेची शिक्षा चुकविण्याचे प्रयत्न सुरू झाले त्या कमिटीत तेलग, रानडे वगैरे मडळी सामील झाली असो मुद्याची गोष्ट ही की, तेलग हे रखमाबाई तर्फे बॅरिस्टर होते व त्यानी हिंदुधर्मशास्त्राप्रमाणे तशा प्रकारची फिर्याद माडता येत नाही आणि इग्लिश कायदा लागू करून हिंदु स्त्रीला प्रस्तुत सारख्या बाबतीत कैदेची शिक्षा होऊ शकत नाही असे कोर्टास सागितले रखमाबाई तर्फे तेलग हे लॅथम बरोबर काम करीत होते पण मुख्य मुद्दे कोर्टापुढे तेलगानीच माडले ते म्हणाले, नवरा आणि बायको याची कर्तव्ये धर्माने ठरविलेली आहेत व ती कर्तव्ये धर्मनियमानीच बजावली गेली पाहिजेत व्यवहारमयूख म्हणतो की, तशी कर्तव्ये बजावण्यास भाग पाडण्याचे साधन म्हणजे राजाला दड भरणे होय ! नवऱ्याला जर बायकोला सोडावयाची असेल तर त्याने राजाला त्याबद्दल दड भरला पाहिजे बायकोला जर नवऱ्यापासून विभक्त व्हावयाचे असेल तर त्याच्या उपायाचा मात्र वरील ग्रथात—व्यवहारमयूखात—उल्लेख नाही ! तरी दंड हाच उपाय आहे असे समजण्यास हरकत नाही परतु "वैवाहिक हक्क" व "त्याची अमलबजावणी" अशा कल्पनाचा नुसता ध्वनिदेखील मयूखातून निघत नाही सामाजिक दृष्टीने जी कर्तव्ये नवरा-बायको यानी बजावयाची असतील ती पाहिजेत तर "जात" या सस्थेने करवून घ्यावीत पण तशी सक्ति दिवाणी कोर्टाना करता येत नाही वास्तविक प्रस्तुत स्थळी राजाच्या

जागी दिवाणी कोर्टे आहेत तेव्हा नवऱ्याची बायकोसबधाने व बायकोची नवऱ्यासंबधाने काय कर्तव्ये आहेत ते प्रथम पाहिले पाहिजे काही धर्मशास्त्रीय ग्रथातून नवऱ्याला सोडून विभक्त राहू इच्छिणाऱ्या स्त्रीचा उल्लेख आहे हे खरे. परतु तिला "तू नवऱ्याकडे जाच" असा राजादेखील हुकूम देऊ शकत नाही अशा प्रकारच्या डिक्रीची–उपायाची–योजनाच हिंदुधर्मशास्त्रात नाही अर्थात् अशा प्रकारच्या फिर्यादीला त्या ग्रथात मुळी आधारच नाही म्हणजे असली फिर्याद माडताच येत नाही यांप्रमाणे कोर्टाने निकाल दिल्यास बालविवाहाचा प्रश्न आपोआप सुटेल!

एकादी स्त्री, कोणत्याही कारणाने नवऱ्याकडे राहण्यास न गेल्यास तिला कैदेची शिक्षा देण्याबाबतची कल्पना ही इग्लिश कायद्याची असेल हिंदुधर्मशास्त्रातली नव्हे हाच प्रश्न पुढे सन १८९५ साली वरिष्ठ कायदेकौन्सिलपुढे निघाला. तेव्हा यासबधाने सिव्हिल प्रोसीजर कोडची दुरुस्ती करण्याबद्दल प वा सर फेराजशहा मेथा यानी सदर कौन्सिलात सूचना आणली त्या वेळी त्यानी जे अन्यत मुद्देसूद भाषण केले त्यात न्या तेलगाच्या नावाचा तर उल्लेख आलाच, परतु मुद्याची गोष्ट ही की, कलकत्ता हायकोर्टातील न्या घोस व न्या बानर्जी, मि रमेश्चद्र दत्त व मद्रासचे न्या मुत्तुस्वामी आयर या सर्वांची मते तेलगाच्या मताप्रमाणेच पडली होती

वर सागितलेल्या रखमाबाई–कमिटीत तेलग सामील झाल्याचे सागितलेच. पण रखमाबाईला इग्लिश कायदा लागू करून कैदेची शिक्षा करू नये इतक्या गोष्टीवरच फक्त कमिटीने भर द्यावा, लग्नाच्या वेळी तिची समति घेतली नव्हती या किंवा इतर धर्मशास्त्रविषयक प्रश्नात कमिटीने शिरू नये असे तेलगाचे स्पष्ट मत होते असो त्या खटल्यातील तेलगाच्या कोटिक्रमाने त्याच्या स्त्रियाच्या हक्काविषयीच्या उदार धोरणाचे तर स्पष्ट दिग्दर्शन झालेच परतु या त्याच्या–रखमाबाई सबधाच्या—तरफदारीने त्यावेळी मुबईतील सबध हिंदुसमाजात मोठी खळबळ उडवून दिली यात मात्र शका नाही

याप्रमाणे तेलगाची धद्याच्या दृष्टीने एकसारखी भरभराटच होत चालली पुढे सन १८८९ मध्ये जेव्हा जस्टिस नानाभाई हरिदास याच्या निधनामुळे हायकोर्टात एक जज्जाची जागा रिकामी झाली, तेव्हा नामदार तेलगाची त्या जागेवर नेमणूक झाली तेलगाच्या नेमणुकीसबधाने मि चुनिलाल पारेख हे आपल्या

पुस्तकात असे लिहितात — " तेलगाची जज्जाचे जागी नेमणूक झाली त्याची अनेक कारणें होतीं ते एक उत्तम कायदेपडित असून सस्कृतज्ञही होते त्याचे-विषयी हायकोर्टातील सर्व जज्जाना व खुद्द गव्हर्नरसाहेब लॉर्ड रे याना अत्यत आदर वाटत असे त्याची बुद्धिमत्ता दाडगी होती त्याचे शील उत्तम होते व त्यानी पुढारी या नात्याने कैक वर्षे सार्वजनिक कामे केलेली होती; आणि सर्वात महत्वाची गोष्ट ही की, हे सर्व गुण जिच्यामध्ये एकवटले आहेत अशी दुसरी एकही व्यक्ति त्या वेळी वकील किंवा बॅरिस्टर यामध्ये नव्हती ! चागले कायदेप-डित दुसरे होते, सार्वजनिक कामे केलेलेही दुसरे मिळाले असते, परतु वरील सर्व गुण ज्यामध्ये एकत्र वसत आहेत असे गृहस्थ त्या वेळी हायकोर्टात तेलगाशिवाय दुसरे नव्हते त्यामुळें हायकोर्टाने व मुबईसरकारने तेलगाचीच शिफारस केली व तिला सेक्रेटरी ऑफ स्टेट याचा दुजोरा मिळून त्याची नेमणूक झाली " तेलं-गामधला दुसरा विशेष हा की त्यानी हायकोर्टात आपला बॅरिस्टरीचा धदा फक्त सतरा वर्षे केल्यावर त्याना जज्जाची जागा मिळाली ! असे उदाहरण मुंबई हाय-कोर्टात पूर्वी घडलेले दुसरें बहुधा एकही मिळणार नाही असे इदुप्रकाशकर्ते म्हणतात

तेलगाची नेमणूक झालेली पाहून सर्वानाच आनद झाला, व त्याप्रमाणें सर्व इग्रजी व देशी वर्तमानपत्रातून आनदोद्गार निघाले आम्ही फक्त केसरीतलाच व जरूर तेवढा एक लहानसा उतारा देतो – " नामदार काशीनाथ त्रिंबक तेलग यास हायकोर्टातील जज्जाची रिकामी असलेली जागा मिळाली असे आनदकारक वर्तमान आले आहे ××× ते पुष्कळ वर्षें या मिळालेल्या पदाचा उपभोग घेवोत, त्याच्यापासून रयतेला न्याय व सुख मिळो, आणि त्याच्या वाढत्या कीर्तीने आम्हा एतद्देशीय जनाच्या नावास अधिक अब्रू येवो असे आम्ही प्रार्थितो " (केसरीचा ता १५–१०–८९ चा अक पाहा )

काशीनाथपताची ॲडव्होकेटचा स्वतत्र धदा करून सार्वजनिक कामे करण्याची प्रथमपासूनच इच्छा होती हें मागे एकदोन वेळा सागितलेच आहे ही त्याची इच्छा इतकी प्रबल होती कीं मध्यतरीं त्याना सरकारी मोठ्या पगाराची नोकरी दोन वेळा चालून आली असताही त्यानी तिचा अनादरच केला ! असा खरा प्रकार असूनही त्यानी वर सागितल्याप्रमाणे हायकोर्ट जज्जाची जागा पत्करली याविषयी लोकानी त्यावेळी निरनिराळे तर्क चालविले होते पण त्याची खरी कारणें निराळीं होतीं व ती तेलगाच्या अगदीं जवळच्या मडळीशिवाय किंवा निकट

सहवासातल्या मित्राशिवाय इतराना माहित असण्याचा सभव नव्हता त्यामुळे लोकानी चालविलेल्या तर्काविषयी खुलासा करण्याच्या अगर त्याना उत्तरें देण्याच्या भरीस कोणी पडला नाही स्वत काशीनाथपत लोकाच्या टीकेकडे केव्हाही फारसे लक्ष देत नसत असो खरी वस्तुस्थिति अशी होती ज्या अर्शो-रोगाने तेलगाचा १८९३ मध्ये अत झाला तो त्याना निदान दहा बारा वर्षें पूर्वी जडला होता इदुप्रकाशकर्त्यानी ( ता ४-९-९३ ) आपल्या अकात याचा उल्लेख केलाच आहे. व टाइम्सनेही म्हटले होते की, " तेलग थोडेसे आजारीपणात होते अशा स्थितीतच त्याची जज्जाचे जागी नेमणूक झाली " असो त्या रोगा-मुळे त्याना दररोज मनस्वी रक्तस्राव होत असे पण ही स्थिति त्यानीं आपल्या आईबापास--त्यास एकदम धास्ती बसेल म्हणून--कित्येक दिवसपर्यंत कळू दिली नाही पण ही चोरी किती दिवस चालणार ? एके दिवशी त्याच्या धोतरावर रक्ताचे डाग पडलेले त्याच्या आईच्या दृष्टीस पडले व त्यानी त्याना लागलीच " अरे, हे डाग कसले ? " म्हणून विचारले तेव्हा खरा प्रकार घरा-तील मडळीला समजला आणि मग उपाय-योजना सुरू झाली ही माहिती आम्हास कै पढरीनाथपत तेलग याजकडून मिळाली काशीनाथपत हे आईबापाची मने न दुखविण्याबद्दल जी खबरदारी घेत असत ती स्तुत्य होती पण वरील-प्रमाणे त्यानी आपल्या प्रकृतीबद्दल हयगय केली ही मात्र चूक झाली सदरहू सारखा रोग जडण्याची मुख्य कारणें म्हणजे नेहमी बैठे काम करण्याची लावून घेतलेली सवय ( sedentary habits ), व्यायामाची नावड आणि मोक-ळ्या हवेत फिरण्याविषयीची अनास्था ! न्या मू रानडे रोज सकाळ-सध्याकाळ मैलचे मैल सपादून फिरत तरी असत पण काशीनाथपताचे तेही नसे त्यामुळेच वरील विकृति त्याना जडली होती पण जज्जाच्या जागी त्याची नेमणूक झाली, तेव्हा आणखी दुसरें एक कारण घडले होते त्याचा धदा-फुरसत क्वचितच देणारा असा-चालू होताच पण सुमारे १८८०-८१ पासून पुढे याच्या सार्वजनिक कामाचा व्याप मनस्वी वाढला होता एजुकेशन कमिशन, इल्बर्ट बिल, रिपन-साहेबाचे प्रयाण, प्रेन्सिडेन्सी असोशिएशन, राष्ट्रीय सभा, हेमतोत्सव व्याख्यान-माला वगैरे कामे व त्यातील काशीनाथपताचा महत्वाचा भाग हे गाडें सारखे चालू होते ते इतके की, इदुप्रकाशकर्त्याच्या म्हणण्याप्रमाणें —He was the busiest man of his time —त्याच्या वेळी त्याच्या इतका सार्वजनिक काम करणारा कोणीच नव्हता ! पण या सगळ्याचा त्याच्या आधीच्याच नाजूक

प्रकृतीवर परिणाम झाल्याशिवाय कसा राहील ? तसा तो नि संशय परिणाम झाला व वर सांगितल्याप्रमाणे एका दुष्ट रोगाने त्याच्या शरीरात बिऱ्हाड केलेले असल्यामुळे त्या शरीरास सक्तीची विश्रांति द्यावी म्हणून त्यानी जज्जाची आलेली जागा पतकरली सर रेमड वेस्ट यानी असेच म्हटले आहे —" He found time for manifold public services amid the calls of his profession Yet continuous work began at length to tell on his delicate constitution, and he accepted with gladness the appointment of a Judge of the High Court " त्या वेळच्या टाइम्स आफ इंडियानेही असेच म्हटले आहे असो. तेलगानी शरीरास विश्रांति मिळावी म्हणून जागा पत्करली हे खरे, पण ते मनाला विश्रांति कसे देणार ? मनाला कामे पाहिजे होती व ती तेलगाची चालूच होती हेमंतोत्सव व्याख्यानमाला चालू होती, एलफिन्स्टन हायस्कुलातील ग्यादरिंगे होती, मग संमतिवयाचा वाद निघाला, मराठी वाङ्मय समृद्ध करण्याबाबतची योजना चालली होती, मराठ्याचा विश्वसनीय इतिहास लिहिण्याचा बेत व तदनुसार जुन्या बखरी वगैरेचे परिशीलन ही कामे चालूच होती

खरा प्रकार वर लिहिल्याप्रमाणे असल्यामुळे काही लोकानी केलेली टीका व ध्वनित केलेले आरोप केवळ अनुदारतादर्शक व निराधार होते इंदुप्रकाशकारानी ( २१-१०-८९ ) " फार वाईट वाटते चाळीसाव्यावर्षी लोभ सुटला तेलगानी धैर्य दाखविले नाही मोह निराळा आहे " असे लिहिले आहे केसरीने तर एकदा ( २२-१२-९१ ) " रुपेरीबेडी अगर जरूर तर सोनेरी बेडी पायात अडकवून घेणारे गृहस्थ " व दुसऱ्या प्रसंगी ( ७-२-९३ ) " मोठीशी नोकरी मिळताच स्वतंत्र वदा टाकणारे, " असे म्हटले आहे ! या सगळ्याचा स्पष्ट अर्थ असा की तेलगानी लोभाला बळी पडून नोकरी पतकरली व ती पतकरली म्हणून त्यानी आपले स्वातंत्र्य गमावले व ते आपल्या देशाविषयीच्या कर्तव्यासंबधाने उदासीन राहिले ! ह्या दोन्ही कल्पना केवळ मनाची अनुदारता व्यक्त करितात तेलगाना नोकरी का पतकरावी लागली हे वर सप्रमाण दाखविले आहे त्यातूनही लोभाचा आरोप तर अगदीच असत्य ! जज्ज या नात्याने तेलगाना दरसाल ४५००० रुपये मिळत असत पण त्याचे धंद्यापासून होणारे उत्पन्न त्यापेक्षा कितीतरी अधिक होते असें केसरीतच ( १५-१०-८९ व २४-१२-८९ ) अनेकदा प्रसिद्ध झालेले आहे. अशा स्थितीत तेलगाच्या कृतीच्या बुडाशी लोभ होता की लोभाचा अभाव होता हे

सुज्ञ वाचकानीच ठरवावें तोच प्रकार त्याच्या स्वातत्र्यहानीसबधाचा अगर त्याच्या देशकार्याविषयी उदासीनतेसबधाचा तेलग हे जज्ज झाल्यामुळें राष्ट्रीय सभादिकार्यात त्याना उघडपणे प्रामुख्याने भाग घेता येत नसे हे खरे पण त्यामुळे त्यानी आपली पूर्वीची मतें बदलली अगर त्यानी राष्ट्रीय कार्याकडे अगदीच दुर्लक्ष केले असे एकाही जबाबदार पुढाऱ्याने म्हटले नाही ! मि चुनिलाल पारेख या मुबईच्या गृहस्थानी सन १८९२ मध्ये आपले "Eminent Indians in Indian Politics–" हे पुस्तक लिहून प्रसिद्ध केले त्या वेळी तेलग हयात होते तेलगाविषयी पारेख यानी आपल्या पुस्तकात असा उल्लेख केला आहे — Even now, though in consequence of taking Office, he is precluded from taking any active part in public movements, his sympathies with the people are unabated, and he is still the trusted guide and counsellor of his former colleagues on any emergencies– तसेच लडन येथील त्या वेळच्या "इडिया"ने—अक्टोबर १८९३ मध्ये" म्हटले की तेलगाची जज्जाचे जागी नेमणूक झाल्यावर सुद्धा, " it was well known that he had not changed his views, and his advice was as freely sought and as wisely given " तात्पर्य, सरकारी नोकरीत शिरल्यामुळें तेलग देशहिताविषयी उदासीन झाले किंवा त्यानी तिकडे दुर्लक्ष केले हे म्हणणे अगदी निराधार आहे

वरील प्रकारचे निराधार आरोप फक्त काही अनुदार मनाचे व दोषैक दृष्टीचे लेखक करीत असतात पण आश्चर्याची गोष्ट ही की, ते मिस्तर बद्रुद्दीन तय्यबजीसबधाने तसे काही लिहिताना आढळत नाहीत ! तेलग जसे अॅडव्होकेट होते तसेच बद्रुद्दीन हे बॅरिस्टर होते तेलग जसे राजकारणी पुरुष असून कॉंग्रेसभक्त होते, तसेच बद्रुद्दीनही होते पण पुढे तेलगानी जशी सन १८८९ मध्ये हायकोर्ट जज्जाची जागा पतकरली तशीच सन १८९५ साली बद्रुद्दीन तय्यबजी यानीही पतकरली मग तेलगासबधाने लिहिताना अनुदार कल्पना का ? आणि तय्यबजीविषयी मूकभाव का ? जस्टिस बद्रुद्दीनपेक्षा जस्टिस तेलगावर या टीकाकाराचे अधिक प्रेम होते असे समजावयाचे की काय ? या सर्व गोष्टीविषयी सुज्ञ वाचकानी जरूर आपल्या मनाशी विचार करावा, इतकेच सागणे आहे

काशीनाथपतानी जज्ज या नात्याने सुमारे चार वर्षें काम केले त्या मुदतीत त्याच्या अगी असलेले काही अमोलिक गुण जास्तच प्रकट झाले इदुप्रकाश-

कर्त्यांनी एकदा (ता ४-९-९३) तेलगाविषयी लिहिले की, "ज्या अल्पावकाशापर्यंत त्यानी हे (जज्जाचे) अत्यत महत्त्वाचे काम केले तेवढयामध्ये त्यानी पक्षकारात, वकीलात आणि फार तर काय आपल्या बरोबरीच्या इग्रजी न्यायाधीशबाधवातही उत्कृष्ट कीर्ति सपादन केली आणि ते **न्यायाधीशाच्या कामाचा केवळ कित्ताच बनून राहिले !** त्याच्या एकदर कामावरून असे दिसून आलें की, हे नि पक्षपाती व दुराग्रहरहित असून त्याच्या अगी ततोतत न्याय करण्याची विवेकबुद्धि अत्यत तेजस्वी अशी होती त्याचे अव्वल किंवा अपील शाखेचे निवाडे इतके अपूर्व असत की, त्यात दिसून येणारें कायद्यासबधाचे नैपुण्य आणि त्याच्या भाषेचा सरळपणा व मनोहरपणा याबद्दल त्याची फारच प्रशसा होत असे" टाइम्स ऑफ इडियाच्या कर्त्यांनी एकदा (२-९-९३) लिहिलें की —For the first time in the history of that great body (High Court), there was, while Mr. justice Telang sat on the Bench, no need to go outside for the ripest scholarship to interpret the ancient laws of the country and to control the interpretation of others It is not too much to say that if scholars of his calibre had sat in our High Courts from their institution the condition of Anglo-Indian Law would have been something very different from what it is " सर रेमडवेस्ट यानी अशाच अर्थाचे मत आपल्या एका तेलगाविषयीच्या लेखात दिलें आहे. व मद्रासचे मिस्टर जॉन ॲडम यानीही सन १८९३ साली (अक्टोबरच्या) लडन येथील "इडिया" मध्ये तेलगाविषयी एक आदरयुक्त लेख लिहून असेच उद्गार काढले आहेत तेव्हा यासबधाने विशेष लिहिण्याचे कारण नाही असो जज्ज या नात्याने देखील तेलगाचे धोरण धर्मशास्त्राला धरूनच पण उदार असे व ते प्रगतीला पोषक असेंच असे त्याच्या त्या थोड्याच दिवसाच्या कारकीर्दीत "हिंदुधर्म-शास्त्राप्रमाणें" दत्तक प्रकरण, स्त्रीधन, वारसा हक्क, मिळकतीचे विभाग करणे वगैरे अनेक प्रश्न त्याच्यापुढे आले व त्यासबधाने त्यानी आपल्या रास्त धोरणाप्रमाणेच निकाल दिले त्यापैकी फक्त एका खटल्याचा इकडे उल्लेख करतों तो १८९१ च्या लॉ रिपोर्टातील "अपाजी नरहर कुलकर्णी वि रामचद्र रावजी कुलकर्णी" हा खटला होय तो मिळकतीच्या विभागणीबद्दलचा (parti-

tion ) खटला असून फार गुतागुतीचा होता त्यात एकाने बापाच्या हयातीत, पण त्याच्या व चुलत्याच्या इच्छेविरुद्ध, वडिलोपार्जित स्थावर मिळकतीचे विभाग केले जाऊन आपला हिस्सा आपल्या ताब्यात मिळावा अशी फिर्याद प्रथम सातान्याच्या कोर्टात माडली होती व पुढे ह्यासबधाचे अपील हायकोर्टात दाखल होऊन सर्व खटला फुलबेचपुढे ( सार्जट, तेलग व कॅडी ) सुनावणीकरिता आला खटला बरेच दिवस चालला, व अखेर सार्जट व कॅडी याचा तेलगाशी मतभेद होऊन कोर्टाने हिदु लॉ-प्रमाणे बापाच्या हयातीत तशी विभागणी करता येत नाही असा निकाल दिला तेलगाचे मत निराळे पडलें आणि ते त्याच्या नेहमीच्या उदार धोरणाला अनुरूपच होते त्याच्या ( निराळ्या ) ठरावातून एकच लहानसा उतारा द्यावा हे इष्ट वाटते —" It seems to me obviously more safe and logical, as it is more in accordance with the Hiudn methods of interpretation in the case of such works as the *Mitahskara,* to gather together, the principles which can be collected with reasonable certainty and accept whatever conclusions can be logically deduced from those principles, unless such conclusions are found to be opposed to other well established principles or of course to any proved custom This is the only procedure that in my opinion can be legitimately adopted unless indeed we are prepared to hold that the Hindu law is a mere farrago of arbitrary rules and not a coherent system based on logical grounds " तेलगाच्या मते हिदुधर्मशास्त्र हे कायम ठशात बसविलेले व कधी न फिरणारें शास्त्र नसून त्याला वाढ आणि तशी तर्कशुद्ध पद्धतीनें वाढ होऊ देण्याला त्या शास्त्रात सवड ठेविलेली आहे असे प्रगतिपोषक तेलगाचे धोरण असल्यामुळे त्यानी वरील खटल्यातील मुलाच्या मागण्याप्रमाणे मिळकतीचे रास्त ते विभाग करून त्याचा हिस्सा त्याच्या ताब्यात देण्यास हरकत नाही असे आपले मत दिले त्या वेळी दोन जज्ज एका बाजूला व तेलग एका बाजूला असा प्रकार झाला खरा पण पुढे हाच प्रश्न इतर हायकोर्टात निघून तेलगाचेच मत सर्वत्र मान्य करण्यात आले. आणि आता हिदुस्थानात तोच कायदा झाला आहे!

सदर्हू खटल्यात एका कुटुबातील वडिलोपार्जित मिळकतीचाच प्रश्न असल्या-मुळे तेलगाच्या (इतर जज्जावरोबर) झालेल्या मतभेदासबधी वर्तमानपत्रातून वगैरे फारशी चर्चा झाली नाही पण पुढे काही दिवसानी दुसऱ्या एका बाबतीत तेलगाचा चीफ जस्टिस सार्जट याच्याशी मतभेद झाला, व त्या वेळी मात्र काही वर्तमानकारानी तेलगावर टीका केली सन १८९२ साली बगाल प्रातात जुरीच्या पद्धतीसबधी काही प्रश्न निघून ती पद्धत या देशात यशस्वी झाली आहे की काय, याविषयी सरकारकडून चौकशी सुरू झाली जुरीची पद्धत हिदुस्थानच्या सर्व प्रातातून चालू असल्यामुळे, तिच्यात फेरफार करण्यापूर्वी मोठमोठे सरकारी अधि-कारी व सर्व हायकोर्टातील न्यायाधीश याचे अभिप्राय मागविण्यात येणे साहाजिक होते त्याप्रमाणे प्रकरण मुबई हायकोर्टात आल्याबरोबर निरनिराळ्या डिस्ट्रिक्ट कोर्टात जुरीची कामे कशी होत आहेत याविषयी प्रथम हायकोर्टाने डिस्ट्रिक्ट जज्जाचे अभिप्राय मागविले व ते आल्यावर मग हायकोर्टातील जज्जानी आपले अभिप्राय दिले चीफ जस्टिस सार्जट यानी जुरीचे हक्क प्रस्तुत आहेत ते काढून घेऊ नयेत असे मत दिले. पण तेलगानी पुढे आलेल्या कागदपत्रावरून बेळगाव, अहमदाबाद व सुरत या जिल्ह्यातील जुरीकडे खुनाचे खटले पाठवू नयेत असें मत दिले! हायकोर्टातील जज्जाचे अभिप्राय प्रसिद्ध झाल्यावर वर्तमानपत्रानी तेलगावर बरीच टीका केली त्यात पुण्याच्या केसरीने (कै टिळकानी) पुढाकार घेऊन ता १० जानेवारी १८९३ च्या अकात "कुऱ्हाडीचा दाडा गोतास काळ!" या मथळयाखाली एक अत्यत कडक लेख लिहून प्रसिद्ध केला तेलगानी वरील प्रकारें जुरीच्या हक्काविरुद्ध मत दिले ही गोष्ट वस्तुत पुष्कळास आवडली नाही हे कबूल केले पाहिजे जशी ती केसरीला आवडली नाही तशीच ती इदुप्रकाशला (१६-१-९३) व इतर पत्रकारानाही आवडली नाही पण त्याला भलतेच महत्व देऊन केसरीकर्त्याप्रमाणे दुसऱ्या कोणीच काहूर उठविले नाही सार्वजनिक कामात दोन किंवा अधिक माणसात असे मतभेदाचे प्रसग अनेकदा येत असतात. खुद्द तेलग व रानडे याजमध्ये सन १८८६ साली मलबारी शेटजीना मदत करण्याच्या बाबतीत मतभेद झाला होता, हे प्रसिद्ध आहे तसेच सन १८८८ मध्ये अलाहा-बादच्या राष्ट्रीय सभेत हत्याराच्या कायद्यासबधाच्या ठरावाच्या बाबतीत तेलग व फेरोजशहा मेथा याजमध्ये तीव्र मतभेद झाला होता! पण त्याबद्दल कोणालाच काही वाटले नाही तसाच हा जुरीसबधाचा प्रश्न

वरील प्रश्नाविषयी कोणीही शात मनाने विचार केल्यास त्याला कळून येईल की जुरीचा प्रश्न तेलगापुढे जज्ज या नात्याने आला होता व त्यानी समोर आले-

ल्या पुराव्यावरून—कागदपत्रावरून—त्या प्रश्नावर जज्ज या नात्यानेच आपले मत दिले एकाद्या प्रश्नासबधाने जज्जा—जज्जामध्ये अनेकदा मतभेद होत असतो तसाच सदरील प्रसगी झाला चीफ जस्टिस साहेबाचे मत तेलगाच्या विरुद्ध पडले तरी फॅरन वगैरे दुसऱ्या जज्जाची मते तेलगाच्या प्रमाणे पडलीच होती जज्जानें न्यायासनावर बसल्यावर आपल्या विवेकबुद्धीस योग्य दिसेल ते मत दिले पाहिजे मग इतर लोक काहीही म्हणोत याच तत्वाप्रमाणें पुढें न्या रानडे हेही वागत असत सन १८९७ साली पुण्यास दोन युरोपीयन मनुष्याचे खून झाले, त्यासबधात हायकोर्टात रानड्यापुढे जज्ज या नात्याने बरीच अपीले आली त्याचा त्यानी—लोकाच्या टीकेची फिकीर न करिता—आपल्या न्याय-बुद्धीप्रमाणे काटेतोलपणाने निकाल दिला असो वरील जुरीप्रकरणी केसरीने तेलगानी दिलेल्या मताविषयी इतर पत्रकाराप्रमाणे नापसती दर्शविली त्याबद्दल कोणीच काही म्हणणार नाही पण तेवढ्यावरून केसरीकर्त्यानी जो तेलगाविषयी एक सरसकट सामान्य सिद्धात ठोकून दिला आहे तो मात्र विस्तुस्थितीशी विसगत असल्यामुळे अगदी चुकीचा आहे

"कुऱ्हाडीचा दाडा गोतास काळ !" या लेखातील उतारे देऊन इकडे जागा अडविण्यात अर्थ नाही ज्याची तो लेख वाचण्याची इच्छा असेल त्यानी रा न. चि केळकरानी प्रसिद्ध केलेल्या केसरीतील लेखा ( खड १ ) त तो सामील झाला आहे तो वाचावा आम्ही येथे फक्त एकच उतारा देतो—"या गृहस्थाच्या ( न्या तेलगाच्या ) अगी इतर कोणतेही गुण असले तरी निर्भीडपणे स्वमतप्रति-पादन करण्याचे धैर्य अगर त्याप्रमाणें वर्तन ठेवण्याची अगर त्यासाठी झीज सोसण्याची याची हिमत होत नाही असे आमचे सामान्यत मत आहे" यात म्हटल्याप्रमाणे "स्वमतप्रतिपादन करण्याचे धैर्य व तसे वागण्याची अगर त्यासाठी झीज सोसण्याची हिंमत" या विषयीच्या केसरीकर्त्याच्या त्या वेळी कल्पना अगर व्याख्या काय होत्या हे समजण्यास मार्ग नाही पण सर्व समजस लोक ज्याला धैर्य व झीज सोसणें म्हणतात, त्याप्रकारचे धैर्य तेलगानी अनेकदा दाखविले होते व त्यानी झीजही सोसली होती सन १८७२ पासून १८८९ पर्यंत ( त्याचे अनेक लेख सोडले तरी ) तेलगानी जितकी जाहीर भाषणें केली तितकी बहुतेक सर्व सरकारच्या व सरकारी अमलदाराच्या विरुद्ध असल्यामुळे, ती भाषणें करण्यात तेलग हे नि सशय मोठे धैर्य दाखवीत होते, हे कोणीही समजस व निर्विकार बुद्धीचा मनुष्य कबूल करील ! ह्या भाषणाचा पुढील प्रकर-

णात योग्य स्थळी उल्लेख यावयाचाच असल्यामुळें त्यासबधाने इकडे काही विशेष लिहिण्याचे कारण नाही पण मासल्या करिता दाखवावयाची तर सन १८७७ साली आयात मालावरील जकात ठरविल्याबद्दल भाषण करताना तेलगानी खुद्द लॉर्ड लिटनसाहेबाच्या काही उद्गाराचा जो स्पष्ट शब्दात निषेध केला तो व सन १८८८ साली लार्ड डफरिन यानी राष्ट्रीय सभेविरुद्ध केलेल्या भाषणाचा तेलगानीं अलाहाबादच्या राष्ट्रीय सभेत जो आपल्या भाषणात निषेध केला तो ही दोन तेलगामधील वैर्याची नि सशय उदाहरणें होत ! शिवाय सन १८८३ मध्ये हटर ( एजुकेशन ) कमिशन मधील इतर सभासदाच्या मताहून भिन्न मत प्रदर्शित करण्यात तेलगानी मोठे धैर्य दाखविले असे आजवर प्रत्येकाने म्हटले आहे

साराश, वरीलसारखें सन १८९३ मध्ये सामान्य विधान करताना केसरीकर्त्याना ( टिळकाना ) तेलगाची पूर्वींची सार्वजनिक कारकीर्द माहीत तरी नव्हती अगर माहीत असून तिची त्याना विस्मृति तरी झाली होती, असेच कोणीही म्हटले असते पण टिळकासारख्या विद्वान् व बहुश्रुत गृहस्थासबधाने असे कसे म्हणावयाचे ? तर मग तिसरें कारण काय समजावयाचे ? सुज्ञ वाचकानी हवी तर कल्पना करावी ! त्याचप्रमाणे एजुकेशन कमिशनचे काम चालू असताना तेलगानी कित्येक महिनेपर्यंत आपला किफायतशीर धदा सोडून आपले नेमलेले कर्तव्य केले, हे एक त्यानी मोठेच देशकार्य केले असे सर रेमड वेस्ट, मिस्तर लॅग, ॲडव्होकेट जनरल, व इतर लहान मोठ्या अनेक गृहस्थानी म्हटले आहे हे स्वार्थत्यागाचे अगर झीज सोसण्याचे उदाहरण नव्हे काय ? बाकीच्या गोष्टी सोडून दिल्या तरी तेलगानी स्वतत्र धद्याच्या आवडीमुळे दोन वेळा चालून आलेल्या मोठ्या पगाराच्या सरकारी नोकरीचा अनादर केल्याबद्दल किवा एजुकेशन कमिशनच्या वेळी त्यानी कित्येक महिने धदा सोडून दिल्याबद्दल एकही शब्द काढावयाचा नाही आणि क्षुल्लक बाबतीत मतभेद झाल्यावरून त्याच्यात धैर्य नव्हते व त्याची झीज सोसण्याची तयारी नव्हती असे खऱ्या वस्तुस्थितिविरुद्ध लिहावयाचे, हे सरळमनाचे लक्षण काय ? असो

काशीनाथपतानी न्यायाधीश या नात्यानें केलेल्या कामासबधानें जे उत्तमोत्तम अभिप्राय प्रसिद्ध झाले होते त्यापैकी काही मागे दिलेच आहेत तेलगाची कित्येकानी Jurists ( उत्तम न्यायाधीश ) मध्ये गणना केलीच आहे ("*Indian Spectator*" 8-9-93 ) सर माधव चौबळ हे मुबई हायकोर्टात काही वर्षे

सरकारी वकील असून त्याना त्या कोर्टांतील कामाचा पुष्कळच अनुभव आहे. त्यानी सुमारें सहा वर्षापूर्वी एका सार्वजनिक प्रसंगी बोलताना असे आपले मत दिले की, कायद्याचे ज्ञान व कांटेतोलपणानें न्याय करणें या बाबतींत मुबई हाय-कोर्टात आजपर्यंत जे हिंदी जज्ज होऊन गेले त्या सर्वांत तेलगाचाच पहिला नबर लागतो ! त्याचप्रमाणें त्यानी हिंदुधर्मशास्त्र ग्रथांचा उदार दृष्टीने अर्थ करून हिंदु लोकाच्या—विशेषेकरून स्त्रियाच्या—मार्गातील सामाजिक दृष्टीने ज्या काही अडचणी होत्या त्या दूर करण्याचा प्रयत्न केला, ही त्यानी बहुमोल कामगिरी केली आहे सर रेमड वेस्ट म्हणतात —

" During his short subsequent career his success on the Bench at last equalled that which he had achieved at the Bar. He showed himself not only learned and able, but courteous, patient, firm and diligent. In the field of Hindu Law, he at least, maintained the traditions of the High Court, and his judgments will be referred to with no less respect than those of his colleagues. "

असो काशीनाथपतानी सुमारें चार वर्षें जज्जाचे काम केल्यावर ते स्वर्गवासी झाले सर रेमड वेस्ट म्हणतात की, तेलग हे नुसते कायदेपडित होते, इतकेच नसून ते वाङ्मयसेवक होते, लोकशिक्षणात मन घालणारे होते, आणि त्याना सार्वजनिक कामे करण्याची मोठी हौस होती त्यामुळें त्याच्या हातून निरनिराळ्या क्षेत्रात अमोलिक कामगिरी झाली आहे

---

## प्रकरण आठवे.

# वाङ्मयसेवा.



### संशोधनकार्याची पूर्वपीठिका

काशीनाथपत तेलग यानी पुष्कळ वाङ्मयात्मक सेवा केली आहे ती इतकी कीं, तशी वाङ्मयसेवा त्याच्या स्थितीतल्या फारच थोड्या माणसाच्या हातून झाली असेल. त्यापैकीं बराच भाग प्राचीन वाङ्मयाच्या वाट्यास आलेला असून

त्यातच ताम्रपटाचे विशदीकरण, महत्वाच्या वादात भाग घेणे इत्यादि गोष्टीचाही समावेश झाला आहे त्याचप्रमाणे काही ग्रथाचे अगर ग्रथकाराचे काल ठरविणे, पुस्तक परीक्षण करणे, चालू वादविवादात्मक प्रश्नाची चर्चा करणे इत्यादि विषया-वरही काशीनाथपतानी वाचनीय लेख लिहून अनेक वर्तमानपत्राचे व मासिकाचे अक अलकृत केले आहेत एका शब्दात सागावयाचे म्हणजे काशीनाथपतानी वाङ्मयसेवेचे कोणतेच साधन किंवा दिशा बहुधा सोडली नव्हती तेलगाचा त्याच्या वेळी चालू असलेल्या बहुतेक सर्व प्रमुख पत्राशी व मासिकाशी सबध असे सन १८६८-६९ च्या सुमारास "इदुप्रकाश"ची मडळी पुण्यास पुनर्वि-वाहाचा वाद चालला होता त्यात गुतलेली असल्यामुळे तर काशीनाथपतानी त्या पत्राच्या सपादकाचे एक वर्षभर काम केले शिवाय "नेटिव्ह ओपीनियन", सुबोधपत्रिका, पुण्याच्या सार्वजनिक सभेचे त्रैमासिक, मुबईच्या एशियाटिक सोसायटीचे त्रैमासिक, इडियन ॲटिक्वरी वगैरे नियतकालिकाशी काशीनाथपताचा लेखक या नात्याने नेहमी सबध येत असे सन १८६९ मध्ये मुबईस "ईस्ट इडिया असोशियेशन" या सस्थेमार्फत एक मराठी मासिक निघत असे त्यात तेलग हे भापातर प्रसिद्ध करीत असत त्याचप्रमाणे कोणीही तरुण होतकरू मनुष्याने एकादे वृत्तपत्र किंवा मासिक काढून तेलगाजवळ लेखाच्या रूपाने अगर अन्य रूपाने मदत मागितली तर ती त्याला विनतक्रार मिळत असे इतकेच नव्हे तर, कोणत्याही पत्राकरिता अगर मासिकाकरिता तेलगानी एकवेळ लेख लिहितो असे म्हटले म्हणजे त्या कामी त्याचेकडून केव्हाही हयगय होत नसे व लेख वेळेवर तयार असे असो याशिवाय काही विषयासबधाने जनतेस नवीन व मनोरजक माहिती करून देण्याच्या इराद्याने ते वरचेवर निबध लिहून वाचीत असत ही वाङ्मयसेवा त्याची इतकी नि सीम असे की, सन १८६९ ते १८९३ पर्यंत बहुधा एकही वर्ष असे नसेल की, ज्या साली काशीनाथपतानी एकाद्या महत्वाच्या विषयावर निबध वाचला नाही, किंवा लेख लिहिला नाही अगर व्याख्यान दिले नाही ! फार काय, पण मुबईच्या "स्टूडटस लिटररी ॲड सायटिफिक सोसायटी"च्या विद्यमाने काशी-नाथपतानी जेवढी वाङ्मयात्मक कामगिरी केली आहे तेवढी कोणीच केली नाही, असे सर दिनशा वाच्छा यानी एके ठिकाणी लिहून ठेविले आहे ते म्हणतात —

I think I am not far wrong or exaggerating when I say that amongst the distinguished *alumni* who passed in the earliest period of our local University,

none has been so prolific in his literary work for that society (S L & S Society) as Mr Telang. आणि महत्वाची गोष्ट ही की, ही वाङ्मयसेवा तेलग बॅरिस्टरीसारखा क्वचित्च फुरसत देणारा धदा व इतर सार्वजनिक कामे सभाळून करीत असत आणि त्यातही लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट ही की, या सर्व कामाच्या गर्दीत काशीनाथपत आपल्या मातृभाषेला विसरले नव्हते त्यानी मराठी भाषेत देखील ग्रथरचना केलेली असून अनेक व्याख्याने दिली आहेत व भाषणे केलेली आहेत वस्तुत त्याना बॅरिस्टरीचा धदा हायकोर्टामध्येच करावा लागल्यामुळे व सार्वजनिक कामे मुबईसारख्या अठरापगड जातीचे व अनेक धर्माचे लोक असलेल्या शहरात करावी लागल्यामुळे काशीनाथपताचा बराच सार्वजनिक व्यवहार इग्रजीत चालावा यात आश्चर्य नाही परतु असा खरा प्रकार असूनही व त्याच्या वेळच्या सुशिक्षित लोकाची मराठी भाषेविषयी उदासीनता जगजाहीर असतानाही काशीनाथपतानी मराठीकडे इतके लक्ष पुरवावे हे खरोखर आश्चर्य आहे ! तेलगाचा मराठीबद्दलचा अभिमान इतका कडकडीत असे की खासगी भाषणात देखील धेडगुजरी भाषा वापरणे त्याना पसत नसे त्यानी एकदा हिंदु यूनियन क्लबमध्ये असा नियम केला होता की, सभासदानी मराठी बोलताना कारणाशिवाय इग्रजी शब्द वापरू नयेत व इग्रजी बोलताना मराठी शब्द वापरू नयेत ! साराश, काशीनाथपतानी ही सस्कृत, इग्लिश व मराठी या भाषाच्या द्वारे जी वाङ्मयसेवा केली आहे ती अनेक दृष्टीनी इतकी महत्वाची व सस्मरणीय आहे की, इदुप्रकाशकर्त्यानी एकदा म्हटल्याप्रमाणे तेलगानी दुसरे काहीही केले नसते तरी त्याची ही फक्त सरस्वती-सेवाच—आणि त्यातूनही विशेषेकरून सस्कृत वाङ्मयाची सेवा—त्याची कीर्ति अजरामर करण्यास पुरेशी होती ! (His literary work alone leaves an undying fame as a ripe and learned scholar of Sanskrit )

काशीनाथपतानी प्राचीन वाङ्मयात्मक विषयावर व चालू वादविवादात्मक विषयावर अनेक निबध, लेख वगैरे लिहिल्याचे सागितलेच पण त्यानी जे निबध वाचले, लेख लिहिले व व्याख्यानें दिली ती बहुतकरून मुबईची रायल एशियाटिक सोसायटी, स्टूडट्स लिटररी अँड सायटिफिक सोसायटी, हिंदु यूनियन क्लब, ससून मेकॅनिक्स इन्स्टिट्यूट, डेक्कन कॉलेज यूनियन इत्यादि सस्थाच्या विद्यमाने दिली असून ती सर्व त्या सस्थाच्या मासिकातून किंवा " इडियन अँटि-

करी " मधून किंवा स्वतंत्र पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाली आहेत त्या सर्व निबधाचे अगर लेखाचे विवेचन इकडे करता येणें शक्य नाही तेलगाचे काही लेख व भाषणे ही पूर्वीच पुस्तक रूपाने ( खड १ ) प्रसिद्ध झाली आहेत दुसरे काही लेख आमचे विद्वान् मित्र रा रा वसतराव नाईक हे थोड्याच दिवसानी प्रसिद्ध करणार असल्याचें समजते सबब आम्ही इकडे इग्रजी न जाणणाऱ्या वाचकाच्या सोयीकरिता, फक्त तेलगाच्या काही महत्वाच्या लेखाचा थोडक्यात साराश देणार असून बाकीच्याचा नुसता नामनिर्देश करू एवढी योजना प्रस्तुत चरित्रात बरस आहे असे आम्हास वाटतें

पण काशीनाथपताच्या प्राचीन वाङ्मयात्मक कामगिरीविषयी लिहिण्यापूर्वी तत्सबधाचा थोडासा पूर्वेतिहास देणें जरूर आहे अठराव्या शतकात हिंदुस्थान देशावर इग्रज लोकाची सत्ता कायम होण्याची चिन्हे दिसू लागली त्याच सुमारास काही शोधक बुद्धीच्या उद्योगी इग्लिश लोकाचे इकडील प्राचीन वाङ्मयाकडे लक्ष गेले, आणि त्यातील महत्वाची व उपयुक्त माहिती भाषातर रूपाने व निबध-रूपाने त्यानी युरोपखडात प्रसिद्ध केली या सबधात सर विल्यम जोन्स, चार्लस विल्किन्स, टॉमस कोलब्रुक व होरेस विल्सन याची नावे प्रसिद्ध आहेत त्यानी आमची सस्कृत भाषा शिकून इकडील प्राचीन वाङ्मयाचा जो अभ्यास चालविला त्यावरून दिसून येणारी त्याची उद्योगशीलता व त्याचे ठिकाणी वसत असणारी ज्ञानलालसा याचा विचार केला म्हणजे त्यानी घेतलेल्या श्रमाबद्दल त्याची तारीफ करावी तेवढी थोडी होईल असे वाटते सदरहू पाश्चात्य पडितानी अत्यत परिश्रम करून आमचे वेद, आमची गीता, काव्ये, नाटके वगैरेसबधाने बरीच उपयुक्त माहिती जगास पुरविली पुढे त्या विद्वन्मडळात काही फ्रेंच पडित येऊन मिळाले तदनतर काही जर्मन पडित येऊन मिळाले यासबधात बर्नो, बॉप, ग्रिम, मॅक्स मुल्लर याची नावे प्रथम सागितली पाहिजेत यानी अत्यत परिश्रमपूर्वक आमच्या प्राचीन ग्रथाचा अभ्यास करून बरीच उप-युक्त माहिती उजेडात आणली आहे याविषयीची रमेशचद्र दत्त यानी आपल्या प्राचीन इतिहासाला जोडलेल्या प्रस्तावनेंत विस्तृत माहिती दिली आहे पण तिचा नुसता निर्देश करण्यापलीकडे आम्हास इकडे काही करता येत नाही असो याप्रमाणें इकडील प्राचीन वाङ्मय म्हणजे एक अगाध महासागर आहे असे आढ-ळून येताच त्यामध्ये मन पूत बुडून जी काही अनर्घ्य रत्ने पैदा होतील ती जगास सादर करण्याच्या कामी वरील पाश्चात्य पडितात जणू चढाओढ सुरू झाली मग

त्या ज्ञानप्रसारासारख्या सत्कार्यास व्यवस्थित स्वरूप आणण्याच्या हेतूने सर विल्यम जोन्स यानी सन १७८४ मध्ये बगालची रॉयल एशियाटिक सोसायटी स्थापन केली त्याचप्रमाणें मॅकिटॉश यानें सन १८०४ मध्ये मुबईची लिटररी सोसायटी स्थापन केली तिचेच पुढें एशियाटिक सोसायटीमध्ये रूपातर झाले असो पुढे काहीं वर्षांच्या अतराने क्रमाक्रमानें मद्रास, पॅरिस, लडन, बर्लिन, बॉस्टन इत्यादि ठिकाणी वरीलप्रमाणें सोसायट्या ( विद्वन्मडळें ) स्थापन होऊन कित्येकाची त्रैमासिकेही सुरू झाली त्यातून मग सशोधनात्मक लेख प्रसिद्ध होऊ लागले पुढे सन १८७२ साली डॉ वर्जेस यांनी "इडियन ॲटिक्करी" ( Indian Antiquary ) नावाचे एक मासिक पुस्तक प्रसिद्ध करण्यास सुरवात करून त्या द्वारानें त्यानी जुने लेख, ताम्रपट, शिलालेख याचे विशदीकरण, पुस्तकपरीक्षणें, वादविवादात्मक लेख इत्यादि कामे चालविली साराश, याप्रमाणें अनेक शोधकबुद्धीच्या पाश्चात्य पडितानी आमच्या देशातील प्राचीन वाङ्मयाचे आलोडन करण्याचा स्तुत्य उद्योग सुरू करून आम्हा हिंदु लोकास उपकृत केले यात शका नाही कारण त्या कालपर्यंत आमच्या देशाविषयींची माहिती—आमच्या रीतिभातो, आमच्या पूर्वजानी सचित करून ठेवलेले ज्ञानभाडार वगैरे गोष्टी—पाश्चात्य राष्ट्रास मिटलेल्या पुस्तकाप्रमाणे केवळ अज्ञात होत्या त्यामुळे आमच्या सबधानें त्याच्या अनेक बाबतींत विचित्र कल्पना असाव्यात यात आश्चर्य नाही पण वरील पाश्चात्य पडिताच्या परिश्रमाने ती अज्ञानदशा मागे पडून युरोपियन राष्ट्राना वाटू लागले की, हिदुस्थान ही जशी एका काळी सुवर्णभूमि होती तशीच ती ज्ञानभूमिही होती या दृष्टीने पाहिल्यास वर सागितलेल्या पाश्चात्य पडिताच्या परिश्रमामुळें आमच्या देशाचा बराच फायदा झाला आहे यात शका नाही पण सदहु विद्वान् लोकाच्या सर्व योजनेत एक चूक राहिली होती ती प्रथम काही दिवस त्याच्या लक्षात आली नाही मग आली ती चूक हीच की, त्यानी आरभिलेल्या वाङ्मयसशोधनाच्या कामात काही एतद्देशीय लोकास सामील करून घेतल्याशिवाय तें संशोधनकार्य केव्हाही समाधानकारक रीतीने होणार नाही हिदुस्थानदेशावर जशी इग्लिश लोकाची राजकीय सत्ता आहे त्याचप्रमाणें हे वाङ्मयसशोधनाचे कामही फक्त युरोपीयन राष्ट्राचे आहे अशी त्याची समजूत झालेली दिसली कारण, आमच्या मुबई इलाख्यापुरते बोलावयाचे म्हणजे, सन १८४० पर्यंत ( सुमारें ३५ वर्षे ) मुबईच्या एशियाटिक सोसायटीचे कोणी एतद्देशीय सभासद होऊ शकले नाहीत त्या साली फक्त एक पारशी गृहस्थास—मिस्टर माणकजी कर-

शेटजी यास—मात्र सभासद करून घेण्यात आले नतर काही दिवसानी डॉ भाऊ दाजी हे सभासद झाले त्याच्या पाठीमागून डॉ भाडारकर, रा ब शकर पाडुरग पडित व न्या तेलग हे सभासद झाले तेलग हे एशियाटिक सोसायटीचे सन १८७४ साली सभासद झाले असा दाखला मिळतो साराश, प्रथम काही वर्षेपर्यंत सदरहू सशोधनक्षेत्रात बहुतेक युरोपीयन लोकाचेच साम्राज्य होते कदाचित् आपल्या पहिल्या पदवीधरापैकीं कित्येकाचे सस्कृत वाङ्मयाकडे लक्ष गेले नसावे हेही कारण असेल कारणे काहीही असली तरी—त्यात राजकीय कारणे अशत असलीच पाहिजेत—सशोधनक्षेत्र म्हणजे फक्त युरोपीयन लोकाचे–तिकडे हिंदी मनुष्यास मज्जाव—असा प्रकार बरीच वर्षे चालला होता ही गोष्ट मात्र खरी मोठमोठ्या जबाबदार सरकारी अधिकारी लोकाचीसुद्धा हिंदी लोक या कामास लायक नाहीत—अशी इतकी पक्की समजूत होती की, सन १८८६ साली व्हिएन्ना येथे भरलेल्या प्राच्यभाषाविशारद लोकाच्या परिषदेत हिंदुस्थानचे प्रतिनिधि पाठविण्याचे जेव्हा लॉर्ड डफरीन अधिष्ठित सरकारने ठरविले तेव्हा फक्त डॉ फ्लीट, मिस्टर ग्रीयरसन व प्रो हॉर्नेल याचीच निवड झाली मुबईसरकारतर्फे प्रो पीटर्सन याची योजना करण्यात आली. पण डेक्कन कॉलेजात काम करीत असणाऱ्या व सर्वथैव लायक अशा डॉ भाडारकरानी कोणालाच आठवण झाली नाही ! मग सर विल्यम वेडरबर्न याच्या खटपटीमुळे काठेवाडमधील सस्थानिकातर्फे डॉ भाडारकर याना प्रतिनिधि म्हणून पाठविण्यात यावे असे ठरले ! व्हिएन्ना येथील परिषदेत खरे तेज पडले डॉ भाडारकराच्याच विद्वत्तेचे हे सर्वविश्रुतच आहे असो अशा निरुत्साहजनक स्थितीत उत्तम रीतीने वाङ्मयसशोधन करून न्या तेलग व डॉ भाडारकर यानीच युरोपीयन पडिताची खात्री केली की, त्यानी चालविलेल्या चिकित्सक दृष्टीने सशोधन करणारी माणसे हिंदुस्थानात आहेत.

एकदरीत डॉ भाडारकर, न्या तेलग वगैरे मडळी वाङ्मयसशोधनक्षेत्रात अगदी योग्य वेळी पुढे आली असेच म्हटले पाहिजे सशोधनाच्या कामास पाश्चात्य पडितानीच सुरवात केल्यामुळे हिंदुस्थानदेशाने त्याचे सदैव ऋणी राहिले पाहिजे हें मागे सागितलेच पण त्याच्या कामास दुसरी एक बाजू आहे तिचा उल्लेख थोडक्यात केला पाहिजे सदरहू पाश्चात्य पडित आमच्या प्राचीन वाङ्मयाचा ऐतिहासिक दृष्टीने परिश्रमपूर्वक अभ्यास करीत असतात ही गोष्ट खरी आहे पण ह्या ऐतिहासिक दृष्टीच्या बिनचूकपणाला काही अशी नैसर्गिक शक्ति व

काही अशी निर्विकार विचारसरणी या आवश्यक गुणाची जोड असावी लागते ते गुण सर्वच पडितामध्ये असतात, असे नाही दुसरे असे की, ज्या एखाद्या गोष्टीचा त्या पडिताना विचार करावयाचा असेल तिच्याविषयीचे थोडेंसे पूर्वपरपरेचे ज्ञान त्याना असावे लागते ते त्याना असणे केव्हा केव्हा शक्य नसते सदहू पडित भिन्न सस्कृतीत वाढलेले असून त्याची मने ग्रीक, लॅटिन वाङ्मयाच्या अभ्यासावरच पोसलेली असतात त्यामुळे इकडच्या सस्कृतीचे व परपरेचे आकलन त्याना लवकरच होणे शक्य नसते तिसरें कारण असे की, ते बहुतेक सर्व धर्माने ख्रिस्ती असल्यामुळे त्या धर्मातच सर्व काही चागले भरलेलें आहे व बाकीच्या धर्मात ते असणें शक्य नाही ही त्याची दृढ समजूत असते या कारणसमुच्चयामुळें ह्या पडिताच्या काही काही समजुती विचित्र असल्या तरी इतक्या दृढ असतात की त्यापासून त्याना अगदी अलिप्त राहाणें शक्य नसते उदाहरणार्थ, काही पाश्चात्य पडित हिंदुलोकाच्या ग्रथाचे प्राचीनत्व कबूल करण्यासच मुळी तयार नसतात दुसरे, हा देश हजारो वर्षे परकीय सत्तेखाली असल्यामुळे इकडील लोकात काही चागले गुण असणेच शक्य नाही, असे त्याचे मत झालेले आहे तिसरे असे की, त्याच्या समजुतीप्रमाणे "ब्राह्मण" म्हणजे ही एक लबाड लोकाची जात आहे आणि त्यानी आपला स्वार्थ साधण्याकरिता अनेक गोष्टी आपल्या मनाप्रमाणें काही ग्रथात घुसडून दिल्या आहेत ! अशा पूर्वग्रहानी बहुतेक सर्व पाश्चात्य पडिताची मनें दूषित झालेली असल्यामुळे त्याच्या हातून सत्यनिर्णय होणे अत्यत दुर्घट असते ह्यामुळे सशोधनक्षेत्रात आमच्या काही सुशिक्षित पदवीधरानी पडून त्या कार्यास हातभार लावणे आवश्यक होते व तसे तेलग, भाडारकर वगैरे मडळीनी करून त्यानी वाङ्मयदृष्ट्या देशाची बरीच मोठी कामगिरी केली आहे इतराचे असो, पण ह्या तेलगानीं—इतर व्यवसाय व सार्वजनिक कामे सभाळून—या क्षेत्रात केलेल्या कामगिरीचे महत्व इतके मोठे होते की, तशी कामगिरी, आपल्या मुबई इलाख्यापुरते बोलावयाचे म्हटल्यास, फक्त डॉ भाडारकर खेरीज करून, कोणाच्याही हातून झाली असेल असे वाटत नाही टाइम्स ऑफ इडियाने तर म्हटले आहे की,

It is correctly stated that Mr Telang is unequalled among his countrymen, as an exponent of the treasures to be found in the rich mine of Oriental literature–"

तेलगाचें वाङ्मयदृष्टीनें लिखाण बरेंच विस्तृत आहे. त्यात त्यानीं अनेक ग्रथांचे काल ठरविले आहेत, बऱ्याच पाश्चात्य पडिताचे भ्रम निरस्त केले आहेत सधि मिळाली तेव्हा खुद्द सरकारच्या व सरकारी अधिकाऱ्याच्या चुका निर्भीडपणें त्यांच्या पदरात घातल्या आहेत, व लोकात—विशेषत· सुशिक्षित लोकात—स्वकर्तव्याविषयी जागृति उत्पन्न करून त्याना योग्य दिशा दाखविण्याचे यत्न केले आहेत अशा समुच्चयदृष्टीने विचार केल्यास त्याचे रामायण व भगवद्गीता यावरील निबध, खुला व्यापार व सरक्षण यावरील निबध व "पेशवाईतील सामाजिक स्थिति" यावरील निबध; हे तेलगाच्या सबध आयु पटावर ठळक अक्षरानी लिहिलेले असे सदैव राहतील त्यातूनही त्यांचे रामायण–भगवद्गीतेवरील दोन निबध तर केवळ बिनमोल असून ते त्याची कीर्ति अजरामर करून ठेवतील !

सर हेमड वेस्ट हे कांहीं वर्षे मुबईच्या एशियाटिक सोसायटीचे अध्यक्ष होते. त्यानीं तेलगाच्या—त्याच सोसायटीतील—कामासबधाने पुढीलप्रमाणें गौरवपूर्ण उद्गार काढले आहेत —

"He was most thoroughly at home amongst scholars, and during many years was a mainstay of the B B. of the R. A. Society He enriched its transactions with acute and learned essays, and took an active part in the management of the institution and in the discussions at its meetings."

सर रे वेस्ट हे पेनशन घेऊन विलायतेस गेल्यावर त्याच्या जागीं न्या. तेलगाचीच निवड झाली एशियाटिक सोसायटीचे तेलग हेच पहिले हिंदी अध्यक्ष होते. असो तेलगाच्या काहीं लेखाचा ( व भाषणाचा ) एक खड पूर्वीच (१९१६ साली) प्रसिद्ध झाला आहे दुसरा खड सध्या छापत आहे असें समजते. कदाचित् आणखी एखादा तिसरा खड प्रसिद्ध करावा लागेल. असो. अशा उपयुक्त व विद्वत्ता-प्रचुर लेखाचें महत्व ज्याना समजून घ्यावयाचे असेल त्यांनीं ते लेख मुळातच वाचले पाहिजेत, त्या सर्वांचाच साराश येथें देता येणें शक्य नाहीं पण वाचकाना कांहीं त्याविषयीं, अस्पष्ट का असेना, कल्पना यावी म्हणून मागें म्हटल्याप्रमाणें आम्ही फक्त काहीं मुख्य व महत्वाच्या लेखांचा व पुस्तकांचा अगदीं थोडक्यात साराश देऊन बाकीच्याचा नुसता नामनिर्देश करू. याशिवाय गत्यतर नाही.

---

## प्रकरण नववे.

# निबंध.

—:०—

### रामायण व भगवद्गीता.

काशीनाथपतानी प्राचीन वाङ्मयासबधाने जे लेख लिहिले आहेत त्यात पाश्चात्यपडितानी उपस्थित केलेले काही महत्वाचे वाद, कित्येक ग्रथाचे किंवा ग्रथकाराचे काल ठरविणें, शिलालेख—ताम्रपट याचें विशदीकरण वगैरे गोष्टीचाही अतर्भाव होतो या सदराखालील तेलगाचे लिखाण बरेंच विस्तृत आहे. परतु त्यापैकी त्यानी जे रामायण व भगवद्गीता या दोन विषयासबधीं फार सुदर निबध लिहिले आहेत त्याचा प्रथम अति सक्षिप्त रीतीने उल्लेख करतो रामायण व गीता हे आमचे राष्ट्रीय ग्रथ असल्यामुळें त्यातील कथानकें किवा विषय सर्व हिंदुलोकाच्या परिचयाचे आहेत अर्थात् याचा साराश इकडे देण्याचे कारण नाहीं सुमारें पन्नास वर्षापूर्वी डॉ वेबर व डॉ लॉरिन्सर या दोन प्रसिद्ध पाश्चात्यपडितानी अनुक्रमे रामायण व भगवद्गीता या दोन ग्रथासबधाने लेख लिहून काही नवीन कल्पना काढून त्याचे काल अगदीं अलीकडे ओढून आणले होते त्या वादात शिरून तेलगानी परिश्रमपूर्वक दोन निबंध लिहून त्या पडिताना समर्पक उत्तरें दिली त्या उत्तरामधला विशेष हा की, सद्दहू पाश्चात्यपडितानी काढलेल्या त्या नवीन कल्पना अगदी निराधार ठरून तेलगाचींच तद्विषयक मतें इतर पडितानी मान्य केली आहेत ! आता प्रथम रामायणावरील निबधासबधी थोडेंसें विवेचन करू

हा निबध सन १८७२ मध्ये लिहिलेला मागें सागितलेल्या पहिल्या खडात सामील झालेला असून त्याने बरोबर ९३ पृष्ठें घेतलीं आहेत त्यात आधार, प्रमाणें, दाखले याची रेलचेल असून त्यातील एकही विधान आधाराशिवाय केलेलें आढळत नाही. तेलगानी त्यात डॉ वेबर याचे मुख्य मुद्दे क्रमाने घेऊन त्याचें बारीक रीतीने परीक्षण केले आहे तेलगानीं केलेलें सर्वच विवेचन अत्यत मुद्देसूद व हृदयगम झालेले आहे पण त्याचा येथें विस्तृत उल्लेख करता येणें शक्य नाही वेबरच्या मुद्यापैकी फक्त दोनच महत्वाचे निघतात, १. वाल्मीकीने आपलें रामायण ( बौद्धधर्मीय ) दशरथ जातकाच्या आधारानें लिहिलें असून त्यात होमरच्या ईलियडची मदत घेतली आहे, व २ रामायण हें ख्रिस्ती शकाच्या आरं-

भाच्या सुमारास लिहिले गेले असले पाहिजे या मुद्याचा विचार करून उत्तर देण्यापूर्वी तेलगानी कैक दिवसपर्यंत "Biblical Criticism," "Proofs of Historical Criticism," वगैरे सबधी इग्रजी ग्रथाचे अवलोकन चालविले होते त्यामुळे त्याच्यामधील काही उत्तम गुण अगदी ठळक रीतीने दिसून येतात निबधावरून तेलगाच्या ठिकाणी आपल्या आर्यपूर्वजाविषयी वसत असलेला सदभिमान तर व्यक्त होतोच तेलगाच्या आपल्या प्राचीन पूज्यग्रथाविषयी अभिमानपूर्ण भाषा वापरण्याचा हा एक मासला पहा —

" To be told that the *Ramayana*—that noble work with which so many of one's pleasing and exalting associations are bound up—that work which sings the superhuman exploits of a deified man, who, beyond almost any other Deity in their Pantheon is the great- est favourite of the Hindus of this day—that work which has ingiained itself into the very life of the nation, so that there is scarcely a Hindu who is not more or less acquainted with its plot—to be told that after all that work is nothing more than a Buddhist saga dovetailed to the Homeric story of the Trojan war, that causes a shock to ones notions under which not many will find it easy to be stoical "

तरी आपण प्रस्तुत वादातील सर्व गोष्टीचा निर्विकार बुद्धीने विचार करण्याचा यत्न करितो असे तेलग निक्षून सागतात—

and therefore, feeling what I do feel, I still hope to be able to preserve towards the new theory that scientific attitude which is the only proper attitude in such an inquiry."

असो पण त्यामुळें सत्य शोधून काढण्याकडे त्याच्या मनाचा जो कल होता तो यत्किंचितही ढळलेला दिसत नसून त्या सत्यशोधनाच्या कामी करावी लागलेली सर्व विधाने त्यानी फार काळजीपूर्वक व आधारासहित केली आहेत सदहू निब- धातील दुसरा विशेष हा की, त्यावरून तेलगाचा इग्लिश वाङ्मयाशी असलेला

निकट परिचय व त्याचे विस्तृत वाचन ही सुव्यक्त होतात रामायणावरील निबंधा-वरून तेलंगाचे संस्कृत वाङ्मयासंबंधाचे परिशीलन स्पष्ट रीतीने दृग्गोचर व्हावे यात फारसे आश्चर्य नाही पण वेबरसारख्या युरोपियन पंडिताचा सर्व कोटिक्रम निर्मूल असल्याचे सिद्ध करताना त्यानी जे ग्रीक वाङ्मयासंबंधी ( इंग्रजी वेषात प्रसिद्ध झालेल्या ) नैपुण्य दाखविले आहे ते मात्र निःसंशय कौतुकास्पद आहे

वेबरचा पहिला मुद्दा हा की, वाल्मीकिने आपले रामायण दशरथ जातकाच्या आधाराने लिहिले असून त्यात होमरच्या "इलियड"ची मदत घेतली आहे पण या विधानाला आधार काय असे तेलंगानी स्पष्ट विचारले आहे रामायणातील कथानकात व दशरथ जातकातील दंतकथेत थोडेसे साम्य आहे, एवढाच जर वेबरच्या विधानाला आधार असेल तर जातकावरून रामायण रचिले गेले असे म्हणण्याच्याऐवजी जातकच रामायणावरून लिहिले गेले असे का म्हणू नये ? बरे, दोन्हीकडच्या कथानकात साम्य तरी कितीसे आहे ? रामायणात सीता ही रामाची बायको असे म्हटले असून त्याचे वनवासास जाण्यापूर्वी लग्न झाले होते दशरथ जातकात सीता ही रामाची बहीण दाखविलेली असून या बहीण-भावाचे लग्न वनवासातून परत आल्यावर झाले असे म्हटले आहे दुसरा फरक रामायणात नमूद असलेल्या दोन मुख्य गोष्टीचा—रावणाने सीतेचे हरण केले ही व राव-णाशी युद्ध करतेवेळी वानर सैन्याने लंकेस वेढा दिला ही—दशरथजातकात नुसता पत्ताही नाही ! यावर वेबरसाहेब म्हणतात या ही—दोन गोष्टी—उणीव वाल्मीकीने इलियडची मदत घेऊन भरून काढली "इलियड" च्या मदतीचे तूर्त राहो पण जातकाच्या खऱ्या संभवनीय प्रकाराविषयी प्रथम दोन शब्द लिहिले पाहिजेत गौतमबुद्ध हा मुळी हिंदु असल्यामुळे त्याच्याविषयीच्या ( जातकातल्या ) गोष्टीत पूर्वीच्या ब्राह्मणी हिंदु धर्मातील काही कल्पना व काही दंतकथा मिश्रित होऊन जाव्या हें संभवनीय व साहजिक आहे फॉसबॉल याने प्रसिद्ध केलेल्या जातकाचे "Academy" च्या आक्टोबर १८७२ च्या अंकात परीक्षण करताना मिस्टर चिल्डर्स याने असे म्हटले आहे —

Nearly all the tales of the *Jatak book* are old folk-lore in common for all India, without regard to religion, and many of them treat evidently of pre-Buddhistic Brahmanical affairs and have been made Buddhistic in their application only."

हे जर खरें तर जातके रामायणाची नक्कल असणें अधिक सभवनीय की रामायण जातकाची नक्कल असणे अधिक सभवनीय ? हिमालयातून खाली उतरलेली गगा-नदी ही पूर्वाभिमुख होऊन समुद्राकडे जाऊ लागणें अधिक सभवनीय की ती परत फिरून पश्चिमाभिमुख होऊन हिमालयाकडे वळणें अधिक सभवनीय ? साराश, दशरथजातकाच्या आधाराने रामायण लिहिले गेले ही कल्पनाच मुळीं अगदीं निराधार आहे !

बरे, रामायणात "ईलियड"ची मदत घेतली याला तरी आधार काय ? दोन्ही ग्रथात एक दोन गोष्टीसबधाने साम्य दिसते, एवढयावरूनच वेबरने बहुधा आपली कल्पना बसविली असावी ! वस्तुत दोन भिन्न राष्ट्रातील ग्रथात अशा साम्यदर्शक गोष्टी असल्याची इतिहासात अनेक उदाहरणे मिळतील पण तेवढयाच आधारावर मोठमोठे सिद्धात बाधणें अगर त्या ग्रथाचे काल ठरवू पाहाणें हास्यास्पद आहे डॉक्टर गोल्डस्टकर या विद्वान पाश्चात्य पडिताने सन १८६८ साली "वेस्ट मिनिस्टर रिव्हु" या त्रैमासिकाच्या एप्रिलच्या अकात ( पृ ३८० ते ४२० ) "महाभारत" या विषयावर एक लेख लिहिला आहे त्यात लेखकाने पुढील उद्गार काढले आहेत —

Coincidences of this nature are so frequent in history that an attempt at basing on them inferences of a chronological bearing seems almost ludicrous. "

असो रामायणात व ईलिडमध्ये फक्त एका स्त्रीला पळवून नेल्यामुळें लढाई झाली एवढया एका गोष्टीचेच कायते साम्य आहे बाकीच्या बऱ्याच गोष्टीसबधाने बिलकूल साम्य नाही ईलियड मधली मुख्य राजकन्या हेलेन हिला ट्रॉयच्या पॅरिस नावाच्या राजपुत्राने तिच्या घरून पळवून नेली, हे खरें, पण तिला त्याच्याही पूर्वी आथेन्सच्या थिसियस राजानें एकदा पळवून नेली होती ! पण मग तिला तेव्हा तिच्या कॅस्टर व पोलुक्स या दोघा भावानी सोडवून आणली होती. याच्याशी सदृश असें रामायणात काय आहे ? पॅरिस हा मिनेलॉस याच्या—हेलेनच्या नवऱ्याच्या घरी पाहुणा आला होता पण मिनेलॉसच्या गैरहजेरींत त्याने तिला फुसलावून नेली आणि ती खुषीनें गेली ! याच्याशीं सीताहरणाची तुलना करावयाची काय ? हेलेनसारखी पळपुटी स्त्री कोठें आणि अत्यत पतिव्रता, साध्वी अशी सीता कोठे ? त्याचप्रमाणें हेलेनला पळवून नेणारा स्त्रैण व भ्याड असा पॅरिस कोठे आणि सीतेचे हरण करणारा पण सर्व देवाना गुलामाप्रमाणें

वागविणारा रावण कोठें ? ग्रीक सैन्याचा मुख्य सेनापति आगेमेम्नन असून तो मिनेलॉसचा भाऊ होता रामायणात वानरसेनेचा सेनापती सुग्रीव असून तो रामाचा भाऊ नव्हता ! लढाई संपल्यावर आगेमेम्नन परत आपल्या राज्यात आला पण त्याच्या बायकोनेंच त्याचा खून केला आणि ती आपल्या दुसऱ्या प्रियकराबरोबर उठून गेली ! याचा नुसता गध तरी रामायणात आहे काय ? तेव्हा या दोन्ही ग्रथाची ज्या भिन्न कालांत व वातावरणात रचना केली गेली असेल त्यात केवढे अतर असले पाहिजे बरें ? सर रेमड वेस्ट म्हणतात —

The legendary atmosphere and the whole mental tone of the Ramayana, are so different from those of the Homeric poems that no substantial influence of the latter can be traced in the Indian epic. " अगदी सत्य आहे

वेबरची सगळीच निधाने कल्पनेवर रचलेली दिसतात, आणि ही ईलिडची मदत वाल्मीकीने घेतल्याची कल्पना तरी वेबरला सुचली कशी ? तर ख्रिस्ती शकाच्या तीनशे-साडेतीनशें वर्षापूर्वी शिकदर हिंदुस्थानात आला होता; तेव्हापासून ग्रीक सस्कृतीचा या देशात प्रसार झाला असला पाहिजे ! ही वेबरची कल्पना ! पण ही तरी संभवनीय किती ? शिकदरने ख्रिस्त पूर्व चवथ्या शतकात हिंदुस्थानावर स्वारी केली, हें खरें पण तो मुळी वायव्य दिशेकडून आला तो सिंधच्या अलीकडे उतरलाच नाहीं ! सैन्यातील बडाळीमुळे त्याला सिंधपर्यंत येऊनच परत फिरावे लागलें, हें इतिहासज्ञास श्रुतच आहे अर्थात् शिकदर हा हिंदुस्थानात फारच थोडे दिवस राहिला होता तितक्या अल्पकाळात ग्रीक सस्कृतीचा या देशात प्रसार तो कितीसा होणार ? शिवाय रामायणाच्या कथानकाचे मुख्य स्थळ जी अयोध्या ती सिंधपासून किती लाब ? आमच्या मते शिकदरला किंवा त्याच्या सैन्यातील लोकास अयोध्या ही ऐकूनही माहीत नसेल ! अर्थात् वेबरची सगळीच कल्पना अगदी असंभवनीय व विचित्र दिसते ! अलीकडील इतिहासकर्त्यांच्या मताप्रमाणें पाहिल्यास सदरील कल्पना एक क्षणभरही टिकत नाही व्हिन्सेट स्मिथ—" हिंदुस्थानचा प्राचीन इतिहास " या पुस्तकाचा कर्ता–पृ २२८ ( Ed 1908 ) वर स्पष्ट म्हणतो की—

The invasions of Alexander, Antiochos the Great, Demetrios, Eukratides and Menander were in fact ×××

merely military incursions, which left no appreciable mark upon the institutions of India "

तात्पर्य, रामायणाचा कोणताही भाग होमरच्या ईलियडची नक्कल आहे ही कल्पनाच अगदी चुकीची असून तिला काडीचाही आधार नाही नुसते सभवनीय काय व असभवनीय काय हेच पाहावयाचे असेल, तर वेबरच्या कल्पनेच्या उलट कल्पना मात्र अधिक सभवनीय दिसते म्हणजे होमरच्या ईलिडलाच रामायणाची कदाचित् मदत झाली असेल हेच अधिक शक्य कोटीतले दिसते याबद्दल तेलगानी आपल्या निबधास जोडलेले परिशिष्ट "एफ" फार वाचनीय आहे त्यात त्यानी Ancient classics for English readers या पुस्तक मालेतील होमरच्या कथेसबधाच्या दोन खडाचा उल्लेख केला आहे त्यातील काही प्रकृतविषयक प्रमाणाचा उल्लेख करून तेलग थोडक्यात म्हणतात की, हिदु ग्रथा ( रामायणा ) च्याच आधाराने ग्रीक ग्रथ लिहिला गेला असावा हे अधिक सभवनीय आहे

रामायण हा ग्रथ ख्रिस्ती शकाच्या आरभापेक्षा अधिक प्राचीन नाही, हा वेबरचा दुसरा महत्वाचा मुद्दा तोही मुद्दा निराधार आहे असे तेलगानी मुद्देसूद रीतीने दाखविले आहे वेबरने आपला मुद्दा सिद्ध करण्याकरिता बरीच रामायणातील अत प्रमाणे आपल्या निबधात दाखविण्याचा प्रयत्न केला आहे पण तो सफळ झाला नाही वेबरच्या विवेचनासबधी इकडे विस्तार करीत नाही पण एक दोन मासले दाखवितो रामायणात " यवन " शब्द अनेक ठिकाणी आला आहे वेबर साहेब म्हणतात की, " यवन " म्हणजे ख्रि पूर्व दुसऱ्या शतकात या देशात आलेले बॅक्ट्रियन ग्रीक लोक ! सबब ज्या अर्थी या ग्रीक लोकाचा रामायणात उल्लेख आहे त्या अर्थी वाल्मीकीचा ग्रथ तदनतरचा, हे उघडच झाले यावर तेलग म्हणतात की, रामायणात योजिलेल्या " यवन " शब्दाचा " ग्रीक " असा अर्थ घेण्यास आधार काय ? मॅक्स मुल्लर व लॉसन, दोघेही म्हणतात की सर्व सेमिटिक—हिब्रु, फिनिशियन, अरेबिक वगैरे—राष्ट्रास पूर्वी "यवन" हा शब्द लावीत असत पाणिनीच्या सूत्रात " यवन " शब्द अनेकदा आलेला आहे, त्यावरून तर वरील पडितद्वयाच्या विधानाला पुष्टिच मिळते शिवाय, शिकदरच्या पूर्वी डरायस हिस्टॅस्पीस याने हिदुस्थानवर स्वारी केलीच होती तेव्हा रामायणातील " यवन " म्हणजे " बॅक्ट्रियन ग्रीक " असाच अर्थ घेण्याला काहीच आधार दिसत नाही ! सगळीच नुसती कल्पनासृष्टि !

वेबर साहेब म्हणतात की, सिलोन बेटाचे नाव ग्रीक लोकास माहीत होते ते "सिलोन किंवा सिंहलद्वीप" हे होय "लंका" हे नाव नंतरचे दिसते आणि तेंच रामायणांत योजिलेलें आहे म्हणून रामायण ग्रंथ नंतरचा तेलंग म्हणतात, "लंका" हे नाव त्याच्याही (ग्रीक लोकास माहीत होण्याच्या) कदाचित् पूर्वीचे असेल म्हणजे "लंका" पूर्वीचें नाव होतें असें मानल्यास मग "सिलोन" नाव चालू झाल्यावर ते बंद पडलें आणि तदनंतर ते पुन चालू झालें, असें मानावें लागेल ! तेलंग म्हणतात, तसें झालें तरी काय बिघडलें ? "लंका" हे नाव मागें पडून फिरून त्या बेटाचें प्रस्तुत काळांत "सिलोन" हे चालू झालें की नाही ? तात्पर्य, वरील प्रकारच्या नावांच्या फेरबदलीनें वेबरच्या उपपत्तीस कांहींच पुष्टि मिळत नाही

वेबर म्हणतात की वाल्मीकीला दक्षिण हिंदुस्थानच्या भूगोलाची फारशी माहिती असलेली दिसत नाही ! फारशी कां ? त्याला दक्षिण हिंदुस्थानचा भूगोल मुळींच माहीत नव्हता असें डॉ भांडारकर म्हणतात पण पतंजलीला दक्षिणेंतील स्थळांची बरीच माहिती होती पतंजलीच्या महाभाष्यांत व अशोकाच्या शिलालेखांत "चोल" (Coromandel), "केरल" (Malabar), "सुम्ह" (Siam) 'कांचीपूर" (Conjeveram) ही नावें आलीं आहेत अर्थात् वाल्मीकीचें रामायण पतंजलीच्या पूर्वीचें हें सहजच सिद्ध होतें पतंजली ख्रि पू दुसऱ्या शतकांत झाला !

राजतरंगिणींत काश्मीरच्या दामोदर राजानें कांहीं ऋषींना प्रथम अन्नदान करण्याचें नाकारल्यामुळें यांनीं क्रुद्ध होऊन राजास शाप दिल्याची गोष्ट आहे पुढें राजानें त्यांना प्रसन्न करून घेतल्यावर त्यांनी पुढील प्रकारें उःशाप दिला आहे —

**अशेषमेकेनैवान्हा श्रुत्वा रामायणं तव ॥**
**शापस्य शांतिर्भवितेत्यूचिरेते प्रसादिताः ॥ १ ॥**

याचा " सर्व रामायण एका दिवसांत श्रवण केल्यास शाप निघून जाईल असा ऋषींनी प्रसन्न होऊन उःशाप दिला " असा स्पष्ट अर्थ होतो पण वेबरसाहेबांनी " अशेषम्" याचा a work that had not been completed — " अपूर्ण राहिलेलें रामायण " असा चुकीचा अर्थ करून, असें प्रतिपादन केलें की, " दामोदरच्या वेळीं अपूर्ण राहिलेलें रामायण " मग पुरें करण्यांत आलें ! तेलंगांनीं अर्थाची चूक दाखविली इतकेंच नव्हे, तर रामायण पूर्ण झालेलें असून दामोदरच्या वेळीं तें इतकें पवित्रत्व पावलें होतें की, तें सबंध एका दिवसांत

श्रवण केल्यास मोठे पाप नष्ट होऊ शके ! तात्पर्य, वेबरची ही कोटीहि लटकी पडली ! दामोदर हा ख्रि पू. दुसऱ्या शतकात झाला असे तेलगानी दाखविले आहे " पवित्र ग्रथ " मानलें जाण्यास रामायण हे त्याच्याही किती तरी पूर्वीचे असले पाहिजे ! यापेक्षा आता अधिक विस्तार करीत नाही

येथपर्यत तेलगानीं " नास्ति " पक्षीं ( negative part ) विवेचन केले. म्हणजे वेबर साहेबाची सगळी उपपत्ति कशी निराधार आणि चुकीची आहे हे एथवर दाखविलें वरील सर्व विवेचनाचा निष्कर्ष इतकाच की, वाल्मीकि रामायणाचा काल पतजलीच्या कालाच्या ( ख्रि पू १५० वर्षे ) अलीकडे ओढताच येत नाही त्याच्याही पूर्वी तो किती जातो हे मात्र नक्की सागता येत नाही तरी तेलगानी त्या दिशेने थोडेसे—" अस्तिपक्षी " ( positive part of argument ) विवेचन केलें आहे तें वाचण्यासारखे आहे सबब ते अगदी थोडक्यात देतों

पाणिनीच्या सूत्रात " इक्ष्वाकु " पासून " एक्ष्वाक " शब्द कसा होतो हे दाखविले आहे ऐक्ष्वक म्हणजे अनेक वेळा "राम" असा अर्थ होतो हे सर्वविश्रुत आहे त्याच प्रमाणें " केकय " पासून " कैकेयी " शब्द कसा झाला हे काही सूत्रात दाखविलें आहे पाणिनीच्या तिसऱ्या एका सूत्रात रामाच्या आईचा–कौसल्येचा–उल्लेख आला आहे एवढया वरून निदान पाणिनीला रामायणातील कथेची माहिती होती हें स्पष्ट दिसते पतजलीच्या महाभाष्यात तर " धनपति, राम, केशव," याचा स्पष्ट उल्लेख आहे —

**" मृदंग शंख तूणावाः । पृथङ्नदंति ससंदि ।**
**प्रासादेधनपतिरामकेशवानाम् ॥**

त्याचप्रमाणे गणपाठात सुमित्रा, सौमित्री, पुष्करसद्–पौष्करसदी असे शब्द आले आहेत पाणिनीच्या दुसऱ्या एका सूत्राप्रमाणें शिवादिगणात रावण व काकुस्थ ही नावे आली आहेत साराश, रामायणीय कथेतील बरीच नावे पाणिनीच्या वेळी प्रसिद्ध होतीं, यांत शकाच नाही

रामायणात ब्रह्मा, विष्णु व शिव याचा आदरपूर्ण भाषेत उल्लेख आला आहे. पण ब्रह्मा–विष्णु–शिव हे परब्रह्मस्वरूपी आहेत असें पतजलीच्या महाभाष्यावरूनही दिसतें परतु त्या त्रिमूर्तीमध्ये सृष्टि, स्थिति व लय ही कामे कसकशीं वाटलीं गेली, ह्याची कल्पना मात्र रामायणात उद्भूत झालेली दिसत नाहीं त्याचप्रमाणे रामायणात

**इंद्रश्च भगवान् साक्षान्मरुद्गणवृतः प्रभुः ।**

असा इद्राचा देखील आदरपूर्ण उल्लेख सापडतो तात्पर्य, रामायणाचा नक्की काल कोणता हे जरी सागता आले नाही, तरी तो ग्रथ बराच प्राचीन आहे याबद्दल शकाच राहात नाही

याप्रमाणें हिंदु लोकाना अत्यत पूज्य अशा एका प्राचीन ग्रथावर—वाल्मीकि-रामायणावर—सुमारें पन्नास वर्षापूर्वी पाश्चात्यपडिताकडून झालेला हल्ला काशीनाथपत तेलग यानी मोठ्या कुशलतेने व आधार देऊन परतविला ही त्यानीं आपल्या देशाची व आपल्या आर्यसस्कृतीची मोठीच कामगिरी केली यात सदेह नाही हा निबध त्यानी आपल्या वयाच्या बाविसाव्या वर्षी लिहिला ही गोष्ट लक्षात आणली म्हणजे त्याच्या बुद्धिमत्तेचें व उद्योगशीलतेचे आश्चर्य वाटतें. तेलगाचा निबध सर्वमान्य झाला आहे, याबद्दल सर रेमड वेस्ट म्हणतात —

The theory of the latter ( Professor Weber ) has not been generally accepted and the criticisms of the young Hindu Scholar have been confirmed by subsequent investigations both in India and in Europe. "

विलायतेत " The Academy " नावाचे एक प्रतिष्ठित मासिक निघत असते त्या मासिकाचा तेलगाच्या रामायणावरील निबधासबधाने प्रसिद्ध झालेला अभिप्राय वाचण्यासारखा आहे त्यातून आम्ही फक्त एकच वाक्य इकडे देतो —

The author seemed to possess an excellent knowledge of Sanskrit and had thrown considerable light on the history of Sanskrit literature.

काशीनाथपताचे उत्तर वाचून खुद्द प्रो वेवर याच्या मनावर देखील काही परिणाम झाला असे मानण्यास जागा आहे सन १८९३ साली ६ अक्टोबर रोजी न्या तेलगाच्या स्मारकासबधानें जी मुबईस सभा झाली त्यात रेव्हरंड डॉक्टर म्याकिकन—एका काली मुबई युनिव्हर्सिटीचे व्हाइस-चॅन्सेलर असलेले गृहस्थ—यानी आपल्या भाषणात असें सांगितलें की, " आपण थोड्या दिवसांपूर्वी युरोप खडात गेल्या वेळी डॉ वेबर यांची गाठ पडली होती त्या वेळी त्यानी न्या. तेलगाच्या विद्वत्तेविषयीं स्तुति करून त्यानीं केलेल्या वाङ्मयसेवेबद्दल आपली

पसती दर्शविली होती !" ही गोष्ट कांही लहानसहान नव्हे ! तेलगाचा हा निबध पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाला आहे

तेलग यानी सन १८७३ मध्ये दुसरा एक ( भगवद्गीतेवर ) असाच निबध लिहिला आहे त्या वेळी डॉ लॉरिन्सर या नावाच्या एका विद्वान पडिताने भगवद्गीता ही बायबलच्या आधाराने लिहिली गेली असून तिचा काळ ख्रिस्ती शकाच्या आठव्या शतकानतर केव्हा तरी असला पाहिजे असे प्रतिपादन केले होते या विषयासबधाने तेलगानी अत्यत परिश्रमपूर्वक शोध करून प्रथम बरेच वाङ्मयाचें आलोडन केले व मग एक निबध लिहून सदरील पडितास उत्तर दिले अशा महत्वाच्या विषयावर लिहिलेल्या तेलगाच्या निबधात दुरभिमानाची यत्किंचित् देखील छाया दिसत नाही इतकेच नव्हे तर, केवळ सत्य शोधून काढण्याकरिता सर्व उपलब्ध साधनाचा उपयोग करून त्या साधनाचे कसे काटेतोलपणाने परीक्षण करावे व त्यापासून निघणारे कसे बिनचूक सिद्धात काढावे हे ज्याना शिकावयाचे असेल त्याना सदहू निबध—गीतेवरचा व रामायणावरचा देखील—नमुन्यादाखल वाटतील अशी आमची खात्री आहे हा गीतेवरील निबध लिहिण्यापूर्वी तेलगानी प्राचीन सस्कृत वाङ्मयाबरोबरच ख्रिस्ती धर्मविषयक बरेच वाङ्मय वाचले होते यावरून कोणत्याही गोष्टीचा सर्व बाजूनी विचार करण्याची त्याच्या मनाची कशी प्रवृत्ति होती हे स्पष्ट दिसून येते हा निबध तेलगानी आपल्या वयाच्या तेविसाव्या वर्षी लिहिलेला असल्यामुळे आपल्या वयाला शोभेल अशा विनयशीलपणाने जरी त्यानी निबधात प्रोफेसर मॅक्समुल्लर साहेबासारख्या वयोवृद्ध पडितासबधाने व त्याच्या प्रकृत विषयातील अधिकारासबधाने ठिकठिकाणी आदरोद्गार काढले आहेत तरी दुसऱ्या काही पूर्वग्रहदूषित पडिताच्या भ्रामक कल्पनाही उघडकीस आणण्यास त्यानी कमी केले नाही

लॉरिन्सरचे दोन मुख्य मुद्दे होते १ गीता ही बायबलाच्या आधाराने लिहिली गेली आहे, व २ ती ख्रिस्ती शकाच्या आठव्या शतकाच्या सुमारास लिहिली गेली असली पाहिजे साहेब मजकूर यानी ते मुद्दे व त्याच्या समर्थनार्थ कारणें देऊन जें विवेचन केले आहे ते बरेंच विस्तृत असल्यामुळें त्यातून इकडे उतारे देता येणें शक्य नाही काशीनाथपताचें उत्तरही बरेच विस्तृत—त्याच्या निबधाची ११९ पृष्ठे आहेत—असून त्यातून आधार, दाखले वगैरे खचून भरलेले आहेत. सबब त्या निबधाची वाचकाना साधारण कल्पना यावी इतक्यापुरतेच आम्ही

इकडे तत्सबधी सक्षिप्त विवेचन करण्याचे योजिले आहे ज्याना जास्त माहिती पाहिजे असेल त्यानी तो निबध मूळातच वाचला पाहिजे

पाश्चात्य पडिताचे काही काही सिद्धात जणू ठरलेलेच असतात व त्याचेच प्रतिबिब प्रस्तुत लॉरिन्सरच्या निबधात उमटलेले दिसते लॉरिन्सरसाहेब म्हणतात की, "गीता ही बौद्धधर्मानतरची आहे हे सिद्धच आहे" पण ते सिद्ध केले कोणी व कोठे हे मात्र ते सागत नाहीत ! पण प्रो विल्सनसाहेबानी एके ठिकाणी, "It is clear from the subsequent passage that the Bauddhas are especially intended as the beings of the demoniacal order" असे गीतेच्या सोळाव्या अध्यायातील सातव्या श्लोकाविषयी लिहिताना म्हटले आहे आणि याच आधारावर लॉरिन्सर साहेबानी बहुधा आपले वरील विधान केलेले दिसते विल्सन साहेबाच्या मते गीतेच्या सोळाव्या अध्यायात बौद्धाचा उल्लेख स्पष्ट आलेला आहे पण तेलग म्हणतात की, विल्सनचे हे म्हणणे चुकीचे आहे तो उल्लेख बौद्धासबधाचा नसून लोकायतिकाविषयीचा आहे "लोकायतिक" म्हणजे बौद्धाचाच एक पथ ही कल्पनाच मुळी चुकीची आहे लोकायतिक म्हणजे चार्वाक पर्याय लोक गीतेच्या १६ व्या अध्यायात दिलेली मते तत्वत लोकायतिकाच्या मताप्रमाणेच आहेत हे खरे, परतु ती तेथे अगदी मूलतत्वाच्या ( Elementary ) रूपातच आलेली असून त्याचे परिणत (developed)–स्वरूप बृहस्पतीच्या ग्रथात सापडते चार्वाक पथाचा मुख्य पुढारी बृहस्पति हाच असून त्यानेच त्या पथाच्या मताविषयीची आपल्या ग्रथात व्यवस्थित माडणी केली आहे हा ग्रथ गीतेच्या नतरचा असावा पतजलीच्या महाभाष्यात ज्या भागुरीच्या टीकेचा उल्लेख आहे ती बृहस्पतीच्या ग्रथावरचीच टीका दिसते म्हणजे खरी वस्तुस्थिति कशी प्राप्त झाली ती पहा पतजलि हा ख्रि पू दुसऱ्या शतकात झाला पतजलीच्या पूर्वीचा भागुरि भागुरीच्या पूर्वीचा बृहस्पति आणि बृहस्पतीच्या पूर्वीची भगवद्गीता ! तात्पर्य, गीता ही ख्रिस्ती शतकाच्या किती तरी पूर्वीची ठरते अर्थात् लॉरिन्सरचे पूर्वोक्त विधान अतिव्याप्तियुक्त व चुकीचे ठरते !

लॉरिन्सरची गीतेसबधाने कोटि अशी आहे. गीताकर्त्याला बायबलाची—नव्या कराराची—माहिती होती, व त्याने त्या माहितीचा उपयोग केला आहे कारण गीतेतल्या काही कल्पना बायबलातील कल्पनाशी जुळतात गीतेचा १२ वा अध्याय व जॉनचे शुभवर्तमान—Gospel of St. John यामध्ये बरेच

साम्य आहे आणि याच्या समर्थनार्थ लॉरिन्सरनी अशी कारणपरंपरा लाविली आहे ! ख्रिस्ती शकाच्या पहिल्या शतकात ख्रिस्तभक्त टॉमस ( Thomas ) हा दक्षिण हिंदुस्थानात आला असून त्याने तिकडे बरेच ख्रिस्ताचे अनुयायी तयार केले होते त्यापैकी कोणी एकाने बायबलाचे एका देशी भाषेत (Vernacular) भाषांतर केले असलें पाहिजे कारण असले एक भाषांतर अस्तित्वात होते असे " ख्रिसॉस्टॉम " याने लिहून ठेविलें आहे पण यापैकी प्रत्येक कोटी चुकीची आहे **मूळ** टॉमस दक्षिण हिंदुस्थानात आला होता ही केवळ एक बाजारगप्प आहे ! अलीकडील इतिहासकार तर ती निव्वळ गप्प होती असे म्हणतात व्हिन्सेंट स्मिथ हे आपल्या " Early History of India " मध्ये म्हणतात की,

In my opinion the alleged evangelization of Southern India by St Thomas in person is purely mythical-( P 222 ) दुसरी गोष्ट डॉ स्ट्रॉस ( Dr Strauss ) आपल्या " येशु ख्रिस्ता " च्या चरित्रात म्हणतात की, ख्रिस्ताची शुभवर्तमाने ( Gospels ) ज्या मुख्य चार भक्तानी—मार्क, ल्यूक, मॅथ्यु आणि जॉन—लोकात प्रसृत केली त्यापैकी पहिली तीन ख्रिस्ती शकाच्या **दुसऱ्या शतकाच्या अखेरीपर्यंत** अस्तित्वात नव्हती ! जॉनचे शुभवर्तमान तर त्याच्याही नंतरचे ! अशा स्थितीत त्या शुभवर्तमानाचे भाषांतर पहिल्या शतकात येणार कोठून ? मूळच जिथे नाही तिथे भाषांतर कुठचे ? आडातच नाही तेथे पोहऱ्यात कुठचे ? मग बायबलमधल्या व गीतेमधल्या साम्याची काय वाट ? अशा प्रकारची काही काही साम्ये दोन भिन्न राष्ट्राच्या वाङ्मयात आढळल्याची इतिहासात उदाहरणे आहेत पण तेवढ्याच आधारावर एकाद्या ग्रंथाचा काल ठरवू पाहाणे हास्यास्पद आहे अर्थात् गीता बायबलाच्या आधाराने लिहिली गेली हे म्हणणे निराधार आहे या भागाचे तेलंगानी आपल्या निबंधात केलेले विवेचन अत्यंत मुद्देसूद असून ते आधार, दाखले यानी भरलेले आहे असो पण दोन भिन्नराष्ट्रीय पुस्तकातील कल्पनामध्ये साम्य आढळून आल्यास तेथे दुसरीही एक कल्पना संभवते. पण तिकडे या लॉरिन्सर आदि पंडिताचे लक्ष देखील गेलेले दिसत नाही ! बायबलवरून गीता लिहिली असे प्रतिपादन करण्याकरिता फक्त त्या दोन ग्रंथातील साम्य हुडकीत बसावयाचे, पण ह्या साम्यावरून दुसरीही एक कल्पना उद्भूत होते तिकडे मात्र बिलकूल पाहावयाचे नाही ! किती निःपक्ष-

पाती बुद्धी ही? असो ती कल्पना अशी डॉ स्ट्रॉसच्या मते दुसऱ्या शतकात ख्रिस्ताची जी शुभवर्तमानें लिहिली गेली ती मूळ भक्तानी लिहिली होती त्याच स्थितीत असण्याचा सभव नाही म्हणजे त्यात बाहेरची काहीतरी भर पडत पडत मग ती तयार झाली असली पाहिजेत दुसरी गोष्ट ख्रिस्तपूर्व चवथ्या शतकात शिकदर हिदुस्थानात आला त्यावेळी इकडे बौद्धधर्मासबधी जगी चळवळ चालली होती अशा चळवळीचा बाहेरून आलेल्या लोकावर काही तरी परिणाम होणे अगदीं सभवनीय होतें तिसरी गोष्ट डीन मिलमन हा इतिहासकार म्हणतो कीं मूळ हिदुस्थानात उत्पन्न झालेल्या धर्मसबधी तत्वाच्या योगानेच पाश्चिमात्य राष्ट्रातील धार्मिक चळवळीला वळण लागले असले पाहिजे चवथी गोष्ट प्रसिद्ध ग्रीक तत्त्ववेत्ता मि पिथॅगोरस यानें हिदुस्थानात येऊन इकडील काही अध्यात्मिक गोष्टीचा अभ्यास केला होता असे काही ग्रथकार लिहितात पाचवी गोष्ट खुद्द येशु ख्रिस्ताच्या वेळी एशियामायनरमध्ये "इसिनीस" नावाचा जो एक पथ अगदी जोरात होता, त्याचा पूर्वेकडील देशाशी सबध असून तिकडूनच त्याला प्रेरणा झाली असे नमूद आहे उदाहरणार्थ, मुलाचे काही रोग त्याच्या आईबापापासून उतरलेले असतात हें मत ज्यू लोकानी हिंदुलोकापासून घेतले असे दुसरा एक इतिहासकार म्हणतो या सर्व कारणसमुच्चयावरून असे स्पष्ट निष्पन्न होतें की, हिदुतत्त्ववेत्त्यानी ख्रिस्ती धर्मापासून काही गोष्टी घेतल्या हें मुळीच सभवनीय नसून ख्रिस्ती लोकानीं मात्र हिंदुधर्मापासून बऱ्याच गोष्टी घेतल्याबद्दलचा दृढसभव दिसतो पण गमत ही की, लॉरिन्सर किंवा त्याचे साथीदार दुसरे पाश्चात्य पडित प्रस्तुत विषयाचा विचार करताना या दुसऱ्या सभवनीय उपपत्तीकडे नुसते लक्षही देत नाहीत तात्पर्य, बायबल वरून गीता लिहिली गेली ही कल्पना जरी काही ख्रिस्ती पडिताना गोड वाटली तरी तिला ग्रथाचा व परिस्थितीचा कोणताच आधार मिळत नसून त्या पडिताचे सगळे खेळ कल्पनेवर चाललेले दिसतात खऱ्या ग्रथाचा व उपलब्ध साधनाचा सूक्ष्म दृष्टीने विचार करता ख्रिस्तीधर्मानेंच हिंदुधर्माचे सहाय्य घेतल्याचे अधिक सभवनीय ठरतें तरी हिंदुधर्माचे एक मुख्य तत्त्व अद्यापि ख्रिस्ती किंवा महमदी धर्माच्या अनुयायांच्या गळीं उतरलेले दिसत नाही ते तत्त्व म्हणजे ( religious toleration ) धर्मसहिष्णुता! दुसऱ्या धर्मातले दोष काढीत बसणें हे प्रस्तुत ख्रिस्ती किंवा महमदी धर्माचे एक मुख्य तत्त्व म्हणून ( कित्येकांच्या मतें ) गणलें जाते. पण सत्य सर्व धर्मात कमी अधिक प्रमाणात आहे व ज्यानें त्याने श्रद्धेनें आपल्या धर्माप्रमाणें वर्तन ठेवल्यास परमेश्वर त्याला सिद्धि प्राप्त करून देतो असे हिंदुधर्म शिकवितो असो

आता गीतेच्या कालासबधाने दोन शब्द लिहावयाचे सदर्हू पाश्चात्य पडिताची—लॉरिन्सरचीही—मूळ ठाम समजूतच ही की, हिंदूनी खिस्तावरून श्रीकृष्णाची नक्कल केली आणि बायबलवरून गीतेची नक्कल केली अर्थात् गीता ही खिस्तीशकानतर लिहिली गेली आता बायबलवरून गीता लिहिली गेली ही कल्पना निराधार आणि चुकीची आहे हे वर दाखविलेच तसेच श्रीकृष्णासबधाचे कृष्णलीलेचा उल्लेख पतजलीच्या–खिस्तीशकापूर्वी दुसऱ्या शतकातल्या ग्रथात—महाभाष्यात सापडतो असे डॉ भाडारकरानी सप्रमाण सिद्ध केले आहे दुसरी गोष्ट. खि पू चवथ्या शतकातल्या मेगस्थिनीसने लिहून ठेविले आहे की आपल्या वेळी कृष्णभक्ति प्रचारात असून वैष्णव व शैव असे दोन पथही अस्तित्वात आले होते. म्हणजे हा सर्व प्रकार येशू खिस्त जन्मण्याच्या चारशे वर्षापूर्वीचा ! या सगळ्याचा विचार करता खिस्तावरून कृष्णाची नक्कल केली ही कल्पना अगदी खोटी व हास्यास्पद ठरून श्रीकृष्णावरून खिस्ताची नक्कल झाल्याची कल्पना अधिक सभवनीय ठरू पाहाते आणि त्यास मागे सागितलेल्या डॉ. ट्रॉस, डीन मिलमन वगैरे इतिहासकाराच्या दाखल्याने बळकटी येते अर्थात् गीतेच्या कालासबधाच्या सदर्हू पाश्चात्यपडिताच्या कोट्या लटक्या पडतात

काशीनाथपत तेलगानी आपल्या निबधात भगवद्गीतेचा काल क्रमाक्रमाने मागे मागे नेऊन खिस्तपूर्व चवथ्या शतकापर्यंत भिडविला आहे बाणभट्टाच्या कादबरीतील “ महा-भारतमिव अनत-गीताकर्णन आनदितनरम् ” या शब्दसमुच्चयात अनतगीतेचा—भगवद्गीतेचा—स्पष्ट उल्लेख आहे बाणभट्ट सातव्या—इ. स ६५०—शतकात झाला कालिदासाच्या रघुवशात ( सर्ग १० श्लो ३१ ) “ अनवाप्तमवाप्तव्य न ते किंचन विद्यते । ” हा नुसता गीतेच्या तृतीय अध्यायातील बाविसाव्या श्लोकाच्या उत्तरार्धाचा अनुवाद आहे तसाच कुमारसभवाच्या सहाव्या सर्गाच्या ६७ व्या श्लोकात गीतेचा अनुवाद सापडतो असो कालिदास सहाव्या शतकात होऊन गेला बादरायण व्यासप्रणीत ब्रह्मसूत्रात गीतेचा “स्मृति” म्हणून अनेक ठिकाणी उल्लेख आला आहे असें शकराचार्य, रामानुजाचार्य व मध्वाचार्य या तिन्ही आचार्यांच्या भाष्यावरून स्पष्ट दिसते कोलब्रुक म्हणतो की, ब्रम्हसूत्रावर बोधायनाचार्यांचे भाष्य होते रामानुजाचार्य व मध्वाचार्य हे दोघेही म्हणतात की बोधायनाचार्यांचे भाष्य आपण पाहिलें आहे इतकेंच नव्हे तर त्या भाष्याला अनुसरूनच आपले भाष्य लिहिलें आहे असे रामानुजाचार्य स्पष्ट सागतात आपस्तब हा खिस्तपूर्व तिसऱ्या शतकात झाला असें डॉ. बुल्हर म्हणतात,

बोधायन हा आपतबाच्याही पूर्वींचा म्हणजे ब्रम्हसूत्रे निदान ख्रि पू चवथ्या शतकातली म्हणण्यास मुळीच हरकत नाही. भगवद्गीता तत्पूर्वीची म्हणजे गीतेचा काळ ख्रि पू चवथ्या शतकाच्या अलीकडे ओढताच येत नाही तो काळ त्याच्याही मागे किती लोटता येईल हे मात्र नक्की सागता येत नाही. डॉ भाडारराचेही मत असेच आहे हे त्याच्या "वैष्णव, शैव व इतर पथ" या ग्रथावरून उघडच दिसते तात्पर्य, पूर्वोक्त लॉरिन्सर साहेबाच्या—व त्याच्या इतर साथीदाराच्याही–सर्व कोट्या गजिफाच्या घराप्रमाणे पटापट ढासळून खाली पडतात

आता एका महत्वाच्या गोष्टीचा उल्लेख करून हे प्रकरण सपवितो तेलगाच्या वेळी—सुमारें अर्ध शतकापूर्वी—काही काही पाश्चात्य पडितामध्ये आमच्या प्राचीन ग्रथाना अर्वाचीनत्व आणण्याविषयीची दृढ प्रवृत्ति झालेली स्पष्ट दिसत होती या प्रवृत्तीचा काशीनाथपतानी स्पष्ट निषेध केला आहे, आणि त्यात त्यानी कोणासच सोडलेले नाही तसा निषेध डॉ भाडारकरानीही अनेकदा केला आहे. पण तेलगानी तो अधिक स्पष्ट व कडक भाषेत केला आहे, त्यामुळे तेलगाच्या वरील दोन निबधाचे, हिदु लोकाच्या दृष्टीने, महत्व विशेष आहे व ही एक तेलगानी महत्वाची देशाची कामगिरी केली याबद्दल प्रत्येक हिदु मनुष्याला त्याच्याविषयी आदर व अभिमान वाटला पाहिजे ज्याना तेलगाच्या निषेधाची कडक भाषा पाहावयाची असेल त्यानी ते दोन निबध मुळातच वाचावेत आम्ही फक्त चार शब्दात भाषातररूपाने त्याचा इकडे उल्लेख करतो

वेबरने एके ठिकाणी असे म्हटले आहे की, कृष्णभक्तीचा वराहमिहिरच्या ग्रथात उल्लेख नाही, त्या अर्थी ती फार जुनी नाही ! असल्या बालिश कोटीचा तेलगाना थोडासा सताप आला आणि ते म्हणतात, की कृष्णभक्तीचा उल्लेख वराहमिहिरात नसला तर तो कालिदास व भर्तृहरि याच्या ग्रथात आहे हे दोन ग्रथकार वराहमिहिराच्या पूर्वींचे न मानले तरी ते त्याचे समकालीन होते असे म्हणण्यास तर मुळीच हरकत नाही त्याच्या ग्रथात जर कृष्णपूजेचा उल्लेख आढळतो तर वेबरच्या म्हणण्यात अर्थ काय उरला ? दुसरें असे की, कृष्णभक्तीचा स्पष्ट उल्लेख पतजलीच्या महाभाष्यात आहे व तसाच तो पाणिनिसूत्रात आहे पतजलि ख्रिस्तपूर्व दुसऱ्या शतकात झाला व पाणिनि ख्रि. पू. सातव्या शतकांत झाला, या गोष्टी सर्वमान्य आहेत. मग नुसता कृष्णभक्तीचा उल्लेख वराहमिहिरात नाही एवढयानें ती अर्वाचीन झाली काय ? यासबधानें योग्य

खुलासा करून तेलग म्हणतात " कोणत्याही वाङ्मयात्मक पुस्तकाचा अगर मताचा असा मनास वाटेल तसा काल ठरविण्याची जी वेबर, लॉरिन्सर प्रभृति पाश्चात्य पडितांची प्रवृत्ति स्पष्ट दिसून येते तिजबद्दल जितक्या स्पष्ट रीतीने निषेध करवेल तितका केला पाहिजे एकाद्या ग्रथाचा अगर मताचा दुसऱ्या एका विवक्षित कालीं लिहिल्या गेलेल्या ग्रथात उल्लेख सापडत नाही म्हणून पहिला ग्रथ किंवा मत दुसऱ्याच्या वेळी अस्तित्वातच नव्हतें असा सिद्धात काढणें चुकीचे व भयकर आहे आमच्या काही प्राचीन ग्रथाचे काल अद्यापि अनिश्चित स्थितीत आहेत व ते काल निश्चित करण्याच्या कामी उपयोगी पडणारी बरीच साधने कालचक्रामुळें नष्ट झाली आहेत अशा वेळी काही पाश्चात्य पडित लोक दुराग्रहपूर्ण विधानें करून आमच्या प्राचीन ग्रथाचे अगर मताचे काल अगदीं अलीकडे ओढून आणण्याच्या उद्योगात गुतले आहेत त्याच्या मनाने एकदा एक गोष्ट गृहीत धरली म्हणजे तिच्या आधाराला त्याना अगदी कच्चा पाया अगर एकादी सशयात्मक गोष्टही चालते मग ते असल्या सिकतामय भुसभुशीत पायावर मोठमोठे मनोरे उठवितात व मोठमोठे सिद्धांत रचतात याचा परिणाम असा झाला आहे कीं, आमच्या काही प्राचीन ग्रथाचे काल अगदी अलीकडे ओढून सोडले गेले आहेत. अशा वस्तुस्थितीबद्दलची जबाबदारी अशत आम्हा हिंदु लोकाची आहे, ही गोष्ट खरी कारण, आम्हापैकी कित्येकास आपले ग्रथ फार फार प्राचीन आहेत असें वाटत असतें व तसे आम्ही प्रतिपादन करीत असतो या क्रियेची कदाचित् प्रतिक्रिया म्हणून—अगर लबकाची नैसर्गिक उलट टोंकाच्या बाजूने गति म्हणून—युरोपियन पडिताची वरील सारखी प्रवृत्ति झाली असेल असे खरोखरीच असेल तर " प्राच्य-भाषाग्रथ-सशोधन " ( Oriental research ) चालविण्याचें ज्यांनी आपल्या हातीं ककण बाधलें आहे व ज्याना तशा सशोधनास " शास्त्र " ( science ) हें प्रतिष्ठित व गभीर नाव देणें आवडतें त्यानीतरी निदान तशी भलतीच अशास्त्रविहित प्रतिक्रिया आपल्या हातून न घडू देण्याबद्दल जपलें पाहिजे. दु खाची गोष्ट ही की अशा पूर्वग्रहदूषित प्रवृत्तीपासून मोठमोठे पडित लोकदेखील मुक्त राहिलेले नाहींत. खुद्द प्रोफेसर मॅक्समुल्लरसाहेब एके ठिकाणीं म्हणतात की, " वालखिल्य सूक्त किंवा असलीच दुसरी सूक्तें हीं प्रातिशाख्यपेक्षाही अलीकडचीं आहेत असें प्रतिपादन करणें शक्य झालें तर मला फार बरें वाटेल. तसेंच प्रातिशाख्यादि ग्रथ त्याचेहीपेक्षां अगदीं अलीकडचे आहेत असें सिद्ध झाल्यास मला समाधान वाटेल. पण तें

समाधान मला लाभणार नाही अशी भीति वाटते " या मॅक्समुल्लर-साहेबाच्या उद्गाराचा उल्लेख करून तेलग म्हणतात, "या (सदरील) उद्गारात मुल्लरसाहेबाचा प्राजलपणा दिसून येतो खरा. तसा प्राजलपणा दुसऱ्या कोणामध्ये कदाचित् दिसलाही नसता. परतु त्या उद्गारांवरून एकदरीत युरोपियन पडिताची मन स्थिति कशी असते हें मात्र चक्क सूर्यप्रकाशाप्रमाणें दिसून येतें. मुल्लरसाहे-बानी तरी या विषयात आपल्या आवडी–नावडीची अगर मनाच्या समाधानाची भाषा का बरें वापरावी ? हा शास्त्रीय विषय तत्सबधी विचार करणाऱ्या मनु-ष्याचें लक्ष फक्त सत्य शोधून काढण्याकडे वेधून राहिले पाहिजे तें सत्य मग या बाजूचे मिळाले अगर त्या बाजूचे मिळाले म्हणून काय बिघडलें ? "सत्य असेल ते मिळाले तरच मनाचे समाधान होईल" हीच भाषा शास्त्रीय विवरणामध्ये योग्य होणार नाही काय ? परतु सागण्यास वाईट वाटते की कित्येक पडिताची मन स्थिति शास्त्रीय सशोधनाला योग्य इतकी निर्विकार नसून तिच्यात आवड-नावड, मनाचे समाधान, गृहीत गोष्टी, पूर्वग्रह इत्यादि विकारांचे प्राबल्य माज-ल्यामुळे ती मनस्वी दूषित झालेली असते इतक्या दोषानी पीडित झालेल्या माणसाना त्याना पाहिजेत तशा गोष्टी जिकडे तिकडे आहेत असा भ्रम होतो आणि तो भ्रमच सत्य आहे असे त्यास वाटत असते अशा मन स्थितीमुळें त्याच्या हातून सत्य–शोधन होणें दुर्घट आहे सबब अशा पूर्वग्रहदूषित व शास्त्र-विरुद्ध मन स्थितीबद्दल जितका तीव्र निषेध करावा तितका थोडा आहे. म्हणूनच तशा प्रवृत्तीबद्दल प्रस्तुत प्रसगी अत्यत नम्रपणें पण जोराचा निषेध करणें मी माझे कर्तव्य समजतों "

काशीनाथपताच्या या निर्भीड लिहिण्याचा लागलाच परिणाम झाला असें मानण्यास जागा आहे प्रस्तुत निबध सन १८७३ मधला. सदहू निषेधात प्रो मॅक्समुल्लर याचा नावाने उल्लेख आलाच आहे त्याच मुल्लरसाहेबानी थोड्या दिवसानी तेलगाना विनति करून त्याचेकडून "भगवद्गीता, सनत्सुजातीय व अनुगीता" याची भाषातरें करवून ती आपल्या "प्राच्यधर्म पुस्तकमाले"तील आठवे पुष्प म्हणून प्रसिद्ध केली, हें प्रसिद्धच आहे

## प्रकरण दहावे.

# शंकराचार्य यांचें चरित्र.



काशीनाथपत तेलग यानी सन १८७० मध्ये "श्रीशकराचार्य याचे चरित्र" या विषयावर एक निबध लिहून तो मुबईच्या स्टूडट्स लिटररी ॲड सायटिफिक सोसायटीच्या एका सभेत वाचला प्रथम हें चरित्र "Theosophist" करिता लिहिण्याबद्दल तेलगाना चालकाकडून विनति करण्यात आली होती परतु ते काम त्याच्या इतर व्यवसायामुळे वेळेवर त्याच्या हातून झाले नाही सबब त्यानी प्रस्तुत निबध लिहून स्टूडटस सोसायटी पुढे वाचला तेलगानी आचार्याचे ब्रह्मसूत्र भाष्य, गीता भाष्य वगैरे ग्रथाचा पूर्वीच चागला अभ्यास केलेला होता मग त्यानी माधवाचार्यकृत शकरविजय, आनदगिरिकृत शकरविजय व केवल्ली वेकटर-मणस्वामी यानी लिहिलेली दक्षिणेंतील कवीची चरित्रे या पुस्तकाच्या आधाराने वरील चरित्र लिहिले आणि सोसायटीच्या सभेत वाचले

हिदुस्थान देशात सुमारे हजार बाराशें वर्षापूर्वी ब्राह्मणीधर्म-स्थापनेच्या कामात आचार्यानी केलेली कामगिरी फार मोठी आहे, आणि ती त्यानी अगदी अल्पकाळात केली—आचार्य हे वयाच्या बत्तीसाव्या वर्षी कैलासवासी झाले ! म्हणून ती लोकोत्तर म्हटली पाहिजे अशी लोकोत्तर प्रकारची कामगिरी पुढे तेराव्या शतकात फक्त ज्ञानेश्वरानी केली ! असो. आचार्याच्या कालासबधाने पडित लोकात अद्यापि एक मत असे झालेच नाही खुद्द तेलगानी आचार्य सहाव्या शतकात झाले असे एका निबधात सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे तथापि ते मत अद्यापि सर्वमान्य झालेले नसल्यामुळें आम्ही तूर्त आठवे शतकच धरून चालू असो आचार्याचा अवतार झाला त्याच्या पूर्वी हिंदुस्थानात धर्मसबधी स्थिति समाधानकारक नव्हती ख्रिस्ती शकाच्या चवथ्या शतकापर्यत या देशात बौद्धधर्माचे प्राबल्य असल्यामुळें ब्राह्मणी धर्माची प्रगति होण्यास त्या काळात फारच थोडा अवकाश मिळे चवथ्या शतकापासून बौद्धधर्मास उतरती कळा लागल्याची चिन्हें दिसू लागताच ब्राह्मणीधर्माने साहजिकच उचल घेतली परंतु पूर्वीच्या वैदिक देवता किंवा पशुहिंसायुक्त यज्ञयाग इत्यादि प्रकार मध्यतरीच्या बौद्धधर्माच्या प्रसारामुळें मागें पडले, ते बहुतकरून मागेंच पडले. अर्थात् पौराणिक देवता पुढे येऊ लागल्या. म्हणजे परिस्थिति बदलल्यामुळे अनेक देवता उत्पन्न झाल्या. त्याची

पुराणे झाली, उपपुराणे झाली, व निरनिराळे पथ झाले अशा स्थितींत हिंदुधर्माला व्यवस्थितपणा हवा होता तो शकराचार्यांनी त्याला प्राप्त करून दिला पाचव्या शतकानतर पौराणिक देवता, ब्रह्मा, विष्णु व महेश्वर याची पूजा जास्त प्रचारात येऊ लागली दक्षिण महाराष्ट्रात जैन धर्माचा प्रसार होऊ लागला यासबधाचा बराच विस्तृत खुलासा डॉ भाडारकराच्या महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासात व त्याच्या वैष्णव, शैव वगैरे पथाविषयीच्या ग्रथात आलेला आहे त्याचा इकडे फक्त नामनिर्देश केला आहे असो वर सागितल्याप्रमाणें पौराणिक देवताची भक्ति व पूजा सुरू झाल्यामुळे असख्य लहान मोठ्या देवता निघाल्या आचार्यांच्या वेळी काय स्थिति होती हे शकरविजयातील एका श्लोकावरून स्पष्ट होते तो श्लोक हा —

**शाक्यैः पाशुपतैरपि क्षपणकैः कापालिकैर्वैष्णवैः ।**
**अप्यन्यैरखिलैः खलैः खलुखिलं दूर्वादिभिर्वैदिकं ॥**
**पन्थानं परिरक्षितुं क्षितितलं प्राप्तः परिक्रीडते ॥**

यात काही पथाचा उल्लेख आहेच, परतु त्याशिवायही शाक्तपथ होता, गाणपत्य होता, सूर्योपासक होते यापैकी प्रत्येक पथाचे निरनिराळे ग्रथ होते, व प्रत्येक पथ आपल्या समर्थनार्थ वेदाचा आधार दाखवीत असे, स्मृतीचा दाखवीत असे इतकेच नव्हे तर सर्व पथाचे लोक एकमेकाचा कमीपणा व आपला श्रेष्ठपणा दाखविण्यास झटत असत अशा स्थितीत सर्व पथाचे एकीकरण व्हावयाला हवे होते ते शकराचार्यांनी सर्व पथाना वेदाताचा आधार दाखवून घडवून आणले हीच आचार्यांची बहुमोल कामगिरी होय या आपल्या मताच्या—अद्वैत वेदाताच्या—प्रसारार्थ शकराचार्यांनी भाष्यें लिहिली, इतर ग्रथ लिहिले व ठिकठिकाणी मठ स्थापन केले आचार्यांचा मायावाद व इतर एक दोन मते याविषयी पुढे मतभेद उत्पन्न होऊन नतर झालेल्या रामानुजादि आचार्यांनी भागवतधर्माचा पुरस्कार केला ही गोष्ट खरी, परतु हिंदुधर्मामध्ये त्या वेळी जे नानापथ, नाना मते होती त्याना सर्व साधारण वेदाताचा आधार दाखवून एका दावणीमध्ये आणण्याचा शकराचार्यांनीच प्रथम यत्न केला यात शका नाही त्यामुळेच त्याना अवतारी पुरुष म्हणतात

शकराचार्यांच्या चरित्राची माहिती बहुतेक सर्व हिंदूना आहेच तथापि तेलगाच्या निबधावरून त्याचा थोडक्यात साराश देतो काशीनाथपताना आचार्याबद्दल व त्याच्या ग्रथाबद्दल अत्यत आदर व भक्ति वाटत असे, व तसे प्रस्तुत

चरित्रात ठिकठिकाणी त्याचे उद्गार निघालेले दिसून येतात काशीनाथपतांना आपल्या प्राचीन पूर्वजाचा व त्याचबरोबर शकराचार्यांचा किती अभिमान होता हें त्याच्याच शब्दात इकडे देणे इष्ट वाटतें ते या आचार्यांच्या चरित्रात म्हणतात —

" But I am, first and last a Hindu and my sympathies and humble co-operation are pledged in advance to every legitimate attempt to elucidate the history of India, or better the intellectual condition of my countrymen. From the earliest time, the study of philosophy and metaphysics has been prized and encouraged in this country and high above all other names in its history, are written those of our people who have aimed to help men to clearer thinking upon the subjects embraced in those categories whether by their writings, discourses or example. The life which forms my present theme is the life of one of the greatest men who have appeared in India Whether we consider his natural abilities, his unselfish devotion to the cause of religion or the influence he has exerted upon his countrymen, this splendid ascetic stands *facile princeps*."

शकराचार्यांचा जन्म कोठे झाला व कधी झाला हे अद्यापि नक्की ठरलेले नाहीं. कोणी म्हणतात की आचार्यांची जन्मभूमि शृंगेरी होय दुसरे कोणी तो मान मलबारकडील "ससलग्राम" या गावास देतात कोणी "चिदबरपूर" ही त्याची जन्मभूमि म्हणतात, तर दुसरे कोणी तो मान "कालती" गावाला देतात यज्ञेश्वरशास्त्री आपल्या एका ग्रथात "आचार्य कल्पी येथे जन्मले" असे म्हणतात. साराश, जन्मभूमीबद्दल विद्वान् लोकामध्यें व निरनिराळ्या ग्रथकारामध्ये इतका मतभेद आहे !

ह्याच प्रकार आचार्यांच्या जन्मकालाविषयीं कोणी म्हणतात ते ख्रि पू. दुसऱ्या शतकात जन्मले, तर दुसरे कोणी तो काळ ख्रिस्तोत्तर दहाव्या शतका-

पर्यंत आणून ठेवतात ! पण आम्ही आचार्यांचा काल आठवे शतकच तूर्त समजू असो शकराचार्य हे एक बालबृहस्पतिच होते त्याच्या वयाच्या पहिल्याच वर्षी त्याना त्याच्या जन्मभाषेचे व सस्कृत मूळाक्षराचे ज्ञान झालें दुसऱ्या वर्षी त्याना लिहिता वाचता येऊ लागले तिसऱ्या वर्षी त्याना काव्यें, पुराणे वगैरे ग्रथ अतर्ज्ञानाने समजू लागले आनदगिरी म्हणतो की आचार्यांना त्याच्या बालपणीच प्राकृत, मागधी व सस्कृत या भाषा समजत होत्या सातव्या वर्षी इतिहास, पुराणे, महाभारत, स्मृति, व शास्त्रे याचा अभ्यास पुरा करून आचार्य गुरुगृहाहून आपल्या घरी आले त्याच्या आईने त्याचा जन्म व्हावयाच्या पूर्वी बरेच तपश्चरण केले होते त्यामुळे अशक्तता येऊन त्या बाई केव्हा केव्हा मूर्च्छित होऊन पडत असत याप्रमाणें एकदा मूर्च्छा येऊन त्या बाई पडल्या असता आचार्यांनी काही अद्भुत चमत्कार करून त्याना उठविले ! असो पुढे मग काही दिवसानी आचार्यांना अगस्त्य व इतर काही ऋषि भेटण्याकरिता आले आणि भेट घेऊन जाताना त्या ऋषीनी आचार्यांच्या मातोश्रीस सागितले की, हे ( आचार्य ) वयाच्या बत्तिसावे वर्षी देहत्याग करतील ! असो तदनतर आठ वर्षे वयास होताच आचार्यास सन्यासदीक्षा घेण्याची इच्छा झाली, पण आई काही केल्या समति देईना ! मग काही दैवी चमत्कार करून त्यानी आईची समति मिळविली असा काही ग्रथात दाखला मिळतो सन्यासदीक्षा घेतल्यावर आचार्य देशपर्यटनास निघाले आणि नद्या, पर्वत, अरण्ये, इत्यादि ठिकाणचे सृष्टिसौंदर्य पाहात पाहात ते नर्मदातटाकी भगवान् गोविदयति याचा आश्रम होता तेथे आले काही दिवसानी त्यानी आचार्यास शिष्यत्व देऊन त्याना गुरूपदेश केला आश्रमात राहिलेल्या मुदतीत गुरुजींची एकदा समाधि लागली होती अशा वेळी आचार्यांनी मोठे वादळ उत्पन्न झाले होते ते काही अद्भुत चमत्कार करून शात केले गुरुजीना ही गोष्ट समजताच त्याना आपल्या शिष्याच्या अलौकिक सामर्थ्याबद्दल कौतुक वाटले आणि त्यानी त्यास–आचार्यास–आशीर्वाद देऊन काशीस जाऊन देवतेचा प्रसाद घेण्यास सागितले आचार्य त्याप्रमाणें काशीस जाऊन काही दिवस राहिले व मग सनदन हा त्याचा पहिला शिष्य झाला तो त्याचा अत्यत प्रिय शिष्य होता व त्याचे पुढे "पद्मपाद" हे नाव पडले तदनतर आचार्यांना आणखी पुष्कळ शिष्य मिळाले वयाच्या बाराव्या वर्षी आचार्य बदरीकाश्रमाकडे गेले, आणि तिकडे गगातटाकी राहात असतानाच त्यानी आपलें ब्रम्हसूत्र भाष्य लिहिले तदनतर त्यानी उपनिषदावरील भाष्ये, गीता भाष्य व नृसिंहतापनीय भाष्य हे ग्रथ लिहिले मग त्यानी ते सर्व ग्रथ

आपल्या असख्य शिष्याकडून पाठ करविले त्यातही त्यानी आपला प्रिय शिष्य पद्मपाद याच्या शिक्षणाकडे जरा विशेष लक्ष पुरविले त्यामुळें इतर शिष्यास मत्सर वाटू लागला पण पद्मपाद याची खरी योग्यता त्या शिष्याना समजावी म्हणून आचार्यानी एकदा स्वत नदीच्या अलीकडच्या तीरावर उभे राहून पद्म-पादला त्यानी पलीकडल्या तीरावरून–पाण्यावरून चालत–येण्यास सागितले! पद्मपाद त्याप्रमाणे आला तो आल्याबरोबर आचार्यानी त्याला गाढ आलिंगन दिले! असो पण शिष्याच्या मत्सराची गोष्ट कशास? स्वत शकराचार्य आपल्या अद्वैत वेदातासबधाचे शिष्यास पाठ देत असताना त्याना देखील काही–भिन्न-मताचे लोक–शत्रु झालेच होते! एकदा खुद्द वेदव्यास हे ब्राह्मणवेषाने आचा-र्यास भेटण्याकरिता व त्याच्याशी वाद करण्याकरिता आले होते परतु त्यानी आपल्या ब्रम्हसूत्र भाष्यासबधाचे प्रतिपक्ष्यानी आणलेले सर्व आक्षेप खोडून काढ-लेले पाहाताच वेदव्यास खुष झाले आणि आचार्याच्या आयुष्याची प्रथम सोळा वर्षे होती ती बत्तीस वर्षे केली! इतकेच नव्हे तर देशाटन करून इतर सर्व पथाच्या प्रतिपक्ष्याना अशीच उत्तरे देऊन जीत करण्याविषयी आचार्याना आशीर्वाद देऊन व्यास अतर्धान पावले!

पुढे काही दिवसानी शकराचार्य कुमारिल भट्ट यास भेटण्यासाठी प्रयागेस गेले परंतु ते भट्ट अग्निकाष्ठे भक्षण करून आत्मयज्ञ करण्याच्या तयारीस लागलेले दिसले! मग ते मडन मिश्र यास भेटण्याकरिता महीष्मतीला गेले तिकडे आचा-र्यानी मिश्राशी वाद करून त्याना जिकले वादाचा निकाल सागण्याचे काम दोघाच्या समतीने मिश्राची पत्नी जी "भारती" हिजकडे सोपविलेले होते असो नतर प्रथमच ठरल्याप्रमाणे मडन मिश्र हे सन्यास घेण्याच्या तयारीस लागले! व भारती–सरस्वती–ही परलोकी जाण्याकरिता निघाली परतु आचार्यानी तिजबरोबर वादविवाद करण्याकरिता तिला थाबवून घेतले आचार्य आणि भारती याची प्रश्नोत्तरे बरोबर झाली परतु भारतीने "कामशास्त्र" विषयक प्रश्न विचा-रताच शकराचार्य कुठित झाले कारण ते बालब्रह्मचारी असल्यामुळे कामशास्त्राची त्याना माहिती असणे शक्य नव्हते सबब त्यानी आपल्या योगसामर्थ्याने परका-याप्रवेश करून एक वर्षभर राज्योपभोग घेतला व परत मडन मिश्राचे घरी येऊन सरस्वतीच्या प्रश्नाचे उत्तर दिले! मडन मिश्राने मग सन्यास घेतला तदनतर आचार्यानी बरेच देशाटन केले ते महाराष्ट्रात आले तेव्हा त्याना एक कापालिक भेटला आणि त्याने त्याचे शिरकमल–देवास अर्पण करण्याकरिता म्हणून–मागितले

आचार्य ते देण्यास कबूल झाले ! परतु पद्मपादानें नृसिंहरूप धारण करून त्या कापालिकाचा वध केला ! पुढे आचार्यास दुसरे असख्य शिष्य मिळाले. काही दिवसानी आचार्यास अतर्ज्ञानाने समजले की, आपली आई अगदी अत्यवस्थ आहे आणि आपण—आचार्यानी–येऊन भेटावे अशी तिची इच्छा आहे आचार्यानी लागलीच तिची भेट घेऊन तिला सतुष्ट केलें आईचे प्राणोत्क्रमण झाले पण जमलेले लोक आचार्याना तिचे प्रेत-सस्कार करू देईनात कारण ते सन्याशी होते परतु आचार्यानी तेथल्या तेथे आपल्या उजव्या हातापासून अग्नि उत्पन्न केला आणि आईच्या प्रेताचे दहन केलें, असे माधव म्हणतो ! आचार्यानी असेच आणखी पुष्कळ चमत्कार केले तदनतर काही दिवसानी सुधन्वा राजाबरोबर आचार्यानी देशसचार करून धर्मप्रसार केला ते सेतुबध, पाड्य, चोल, द्रविड वगैरे देश फिरले तेथून मग ते आध्र, विदर्भ, कर्नाटक वगैरे प्रातातून फिरून गोकर्णास आले तिकडे नीळकठ नावाचा कोणी एक मोठा तत्वज्ञानी होता त्याला आचार्यानी जिकले तिकडून मग ते द्वारकेला गेले तिथे काही दिवस राहून आचार्यानी उज्जयिनीस जाऊन भट्ट भास्कर यास जिकले. ननर तेथून आचार्य बाल्हिक, भारत, शूरसेन, कुरु, पाचाल इत्यादि प्रातातून फिरले तिकडून ते कामरूप देशात येताच त्याना एक शाक्त पथीय व आयुर्वेद जाणणारा अभिनव गुप्त नावाचा मनुष्य भेटला तो आचार्याबरोबर वाद करण्याच्या भरीस पडलाच नाही, पण त्याच्याविषयी केवळ मत्सरग्रस्त होऊन त्याजवर काही तरी जबरदस्त सकट–प्रसग आणून सूड घेण्याचा मात्र त्याने घाट घातला त्याच्या मत्रतत्राच्या योगानें लागलीच आचार्यास “भगेद्र” हा एक दु साऽय रोग झाला परतु पद्मपाद याच्या मत्रसामर्थ्याने त्या रोगातून आचार्य बरे झाले आणि तोच रोग अभिनव गुप्त यास होऊन तो मात्र त्यातच मरण पावला !

आचार्य मग काश्मीरात गेले तेथून ते ऋष्यशृग याच्या आश्रमात जाऊन तिकडून बदरीकेदाराकडे गेले तिकडे त्यानी काही शिष्याना आपल्या भाष्यादि ग्रथाचे पाठ दिले काही दिवसानीं त्याच्या आयुष्याची बत्तीस वर्षे भरली व देव, सिद्ध व ऋषि हे त्याना घेऊन जाण्याकरिता आपल्या विमानातून उतरले. इद्र, उपेद्र वगैरे देवादिकानी आचार्याची पुष्पादि साहित्य अर्पण करून पूजा केली आणि सगळे त्याच्या अवतारकृत्याविषयी जयजयकार करीत असतानाच आचार्य निजधामास निघून गेले

याप्रमाणे अगदी थोडक्यात—तपशिलात न शिरता—शंकराचार्यांचे चरित्र दिलेले आहे. चरित्र संपल्यावर काशीनाथपंत तेलंग म्हणतात की, "एकोणिसाव्या शतकातील शास्त्रीय शोधाच्या योगाने ज्याच्या विचारशक्तीला नवीन वळण लागले आहे असे काही चिकित्सक बुद्धीचे लोक वरील आचार्यांचे चरित्र वाचून म्हणतील की, हे खरेखुरे चरित्र आहे की ही कादंबरी आहे? वयाच्या दुसऱ्या वर्षी लिहिता वाचता येणें हे अगदी अशक्य! या त्यांच्या प्रश्नांत काही अर्थ आहे हे मला कबूल आहे, पण त्यांना त्यावद्दल जेवढे आश्चर्य वाटते तेवढे मला मात्र वाटत नाही! सदरील आचार्यचरित्रात काही थोडेसे काव्य असेल असें मीही म्हणतो. पण त्यांत प्रथम वाटतो तेवढा मात्र अर्थ दिसत नाही. फार लांब कशाला? या एकोणिसाव्या शतकातच असे काही ऐतिहासिक थोर पुरुष उत्पन्न झाले नाहीत काय की, ज्यांच्या चरित्रात माधवकृत शंकराचार्यांच्याच चरित्रातल्यासारखे चमत्कार आपणास पाहावयास सापडतील? मी अशी दोनच उदाहरणें दाखवितो. डॉ. टॉमस ब्राउन ( Dr. Thomas Brown ) या नावाचा एकोणिसाव्या शतकात एक मोठा पुरुष होऊन गेला. त्याचे चरित्र, पौरस्त्य लोकांच्या अतिशयोक्तिपूर्ण भाषेपासून ( Oriental hyperboles ) अगदी अलिप्त राहणाऱ्या एका युरोपियन लेखकानेच लिहिले आहे. त्या चरित्रात असे सांगितले आहे की टॉमस ब्राऊन हा आपल्या वयाच्या चवथ्या वर्षी बायबलातील चार शुभवर्तमानामधील (four gospels) चुका दाखविण्याच्या कामात गुंतलेला होता! बायबल म्हणजे धर्मपुस्तक. त्यातील चिकित्सक दृष्टीने चुका दाखविण्यास प्रवृत्त होणे हेच मुळी नास्तिकपणाचे पहिले लक्षण होय! आणि हे काम ब्राऊन हा चार वर्षांचा असतानाच करण्याचा प्रयत्न करीत होता!

दुसरे उदाहरण टर्गोचें ( Turgot)! प्रसिद्ध जॉन मॉर्ले यांनी एकदा फॉर्टनाइटली रिव्ह्यूमध्ये टर्गोचे एक त्रोटक चरित्र प्रसिद्ध केले होते. त्यात त्यांनी असे म्हटले आहे की, टर्गो हा बाल्यावस्थेतून एकदम—क्रमाक्रमाने नव्हे—मनुष्यावस्थेंत पोंचला. इतकेच नव्हे, तर खेळगड्यांबरोबर खेळ खेळताना अंगावर धूळ उडवून घेण्याचे त्याचे वय उलटून जाण्यापूर्वीच त्याची साधुपुरुषांत गणना झाली होती!

ऐतिहासिक पुरुषाचे राहो, पण वरील सारख्या संशय घेणाऱ्या चिकित्सक मंडळीला मी प्रथम "अलीकडे लागलेल्या शास्त्रीय शोधाकडे पाहा व शास्त्रे काय काय चमत्कार करीत आहेत याचा विचार करा" असे म्हणेन. फार कशाला,

तारायंत्रे निघण्याच्या पूर्वी आमची विजेच्या शक्तीविषयी काय कल्पना होती ? तसेच, आगगाड्या व्हावयाच्या पूर्वी वाफेच्या शक्तीची आम्हास काय कल्पना होती ? या मडळीना मी " या गोष्टी अद्भुत आहेत, त्या अशक्य कोटीतल्या आहेत " असे ठाम मत ठरविण्यापूर्वी, वरील ऐतिहासिक पुरुषाच्या चरित्रातील गोष्टीचा व आधुनिक शास्त्रीय शोधाचा व तज्जन्य चमत्काराचा प्रथम विचार करा आणि मग आपले मत द्या असे सुचवीन आचार्यांच्या चरित्रातील काही गोष्टी सामान्य व्यवहारात घडणाऱ्या गोष्टीहून अगदीच भिन्न आहेत हे खरें किंबहुना त्यात अतिशयोक्तीचा बराच भाग आहे असेही मी म्हणेन पण त्या अशक्य कोटीतल्या गोष्टी आहेत, असे जर कोणी म्हटले तर मात्र त्याला मी कबुली देणार नाही."

---

प्रकरण अकरावे.

## किरकोळ लेख, टिपणें, परीक्षणें वगैरे.



काशीनाथपतानी टिपणे, ताम्रपटाचा अर्थ लावणे, परीक्षणें, मनोरजक माहिती देणारे वगैरे असे अनेक लेख मासिकातून लिहिलेले आहेत व तशी व्याख्यानेही दिली आहेत पण त्यासबधाने सविस्तर लिहिणे इकडे शक्य नाही म्हणून त्याचा या प्रकरणात फक्त नामनिर्देश करतो.

सन १८६९ साली तेलगानी "Our Roads" (आमचे मार्ग) या विषयावर एक निबध लिहून स्टूडट्स सोसायटीच्या सभेत वाचला, व त्यात सुशिक्षित लोकानी "जुने व नवे" यात झगडा चालला असता परिस्थितीच्या दृष्टीने कोणत्या धोरणाने वागले पाहिजे हे दाखविण्याचा त्यानी यत्न केला आहे

सन १८७० मध्ये काशीनाथपतानी " नेटिव ओपिनियन " वर्तमानपत्रातून डॉ. कीलहॉर्न साहेबाच्या सस्कृत व्याकरणाचे गुणदोषविवेचनात्मक परीक्षण केले आहे कीलहॉर्न हे डॉ भाडारकराच्यापूर्वी डेक्कन कॉलेजात सस्कृतचे प्रोफेसर होते. त्यानी सन १८७० च्या सुमारास एक सस्कृत व्याकरण लिहून प्रसिद्ध केले. वास्तविक डॉ भाडारकराच्या दोन सस्कृत पुस्तकापुढे कीलहॉर्नच्या व्याकरणाचे तेजच पडले नाही भाडारकराच्या दोन पुस्तकातून आलेली माहिती मॅट्रिकच्या

परीक्षेस बसणाऱ्या विद्यार्थ्यास–पुरण्यासारखी इतकी भरपूर आहे की, त्यांना व्याकरणविषयक माहिती मिळविण्यास दुसऱ्या पुस्तकाची जरूरच नाही. तेलगांनीं आपल्या परीक्षणात जवळजवळ असाच अभिप्राय दिला आहे तथापि व्याकरणासारखा रुक्षविषय, पण तो विशद करून दाखविण्याकरिता डॉ कीलहॉर्न यानीं जे श्रम घेतले आहेत त्याबद्दल तेलगानी त्याची स्तुति केली आहे

सन १८७१ साली तेलगानी स्टूडट्स सोसायटीपुढे "मुक्तिकोपनिषद" यावर निबध लिहून वाचला सन १८७२ मध्ये त्यानी "Indian Antiquary" मध्ये उदयनाचार्यकृत "न्यायकुसुमाजलि" या विषयावर एक लेख लिहून प्रसिद्ध केला त्याच सालच्या इडियन ॲटिक्करीमध्ये तेलगाचा दुसरा एक लेख प्रसिद्ध झाला आहे त्यात त्यानी कलकत्त्याचे प्रसिद्ध डॉ राजेद्रलाल मित्र याच्या एका विधानासबधाने आक्षेप घेऊन तद्विषयक खुलासा केला आहे. राजेंद्रलाल ह्यानी आपल्या एका लेखात म्हटले होते की, प्राचीन हिंदुलोक गोमास भक्षण करीत असत तेलगानी सागितले की, तशी वेळ असलीच तर ती ख्रि पू. दुसऱ्या शतकापूर्वीच निघून गेली असली पाहिजे. कारण पाणिनिच्या १ ४९६ सूत्रावरील पतजलीच्या भाष्यात एक असे वाक्य आहे, "गोमुत्रस्यापिस्यात्" (गोमुत्राचा निदान एक थेबही असेल!) यावरून तेलग म्हणतात की, गाय ही पतजलीच्या वेळी एक पूज्य प्राणी म्हणून गणली जात असे असे उघड दिसतें

सन १८७३ मध्ये तेलगानी इडियन ॲटिक्करीमध्ये श्रीहर्षाच्या कालासबधानें चर्चा केली आहे तेलगानी आपल्या न्यायकुसुमाजलीवरील लेखात सहज ओझरता हर्षाच्या कालाविषयी उल्लेख केला होता त्यावर डॉ बुल्हर यानी आक्षेप घेऊन ॲटिक्करीमध्ये काही विरुद्ध प्रमाणें दाखविली होती. यासबधी स १८७३ साली तेलगानी चर्चा करताना बुल्हर याची प्रमाणे बरोबर नाहीत असें सागितलें आहे फार तर श्रीहर्षाचा काल अद्याप अनिश्चित स्थितीत आहे असें म्हणता येईल!

सन १८७४ सालच्या ॲटिक्करीमध्यें तेलगानी फिरून तोच विषय चालू करून कालिदास, श्रीहर्ष व चद याच्या कालाविषयी चर्चा केली आहे.

त्याच सालच्या ॲटिक्करीमध्ये तेलगानी पतजलीच्या महाभाष्यातून एक उतारा देऊन रामायण हे निदान पतजलीपेक्षा तरी जुने आहे हे सिद्ध केले आहे. पाणिनीच्या ३. ६७ या सूत्रावरील भाष्यांत एक अशी ओळ आहे—

**एति जीवंतमानंदो नरं वर्षशतादपि ।**

हीच ओळ वाल्मीकि रामायणात व अध्यात्मरामायणातही ( युद्धकांड, १४ सर्ग व ६० श्लोक ) आली आहे. तेलंग म्हणतात कीं, यावरून रामायण हे पतंजलीच्याही पूर्वीचे हे नि संदिग्ध रीतीने सिद्ध होते

त्याच सालच्या अॅंटिक्करीमध्ये तेलंगाचा एक " पार्वतीपरिणय " या विषयावर छोटासा लेख आला आहे परशुरामपंत गोडबोले यानी त्या नाटकाचे मराठीत भाषातर केलेले असून त्याच्या प्रस्तावनेत त्यानी म्हटले आहे की या नाटकाचा व कादंबरीचा कर्त्ता एकच ( बाणभट्ट ) असावा तेलंगानी या नाटकातील काही वचने व कालिदासाची वचने याची तुलना करून असे मत दिले आहे की प्रस्तुत नाटक हे कालिदासाच्या कुमारसंभव काव्याच्या आधाराने लिहिले गेले असावे

त्याच साली काशीनाथपंतानी मुंबई रॉयल एशियाटिक सोसायटीपुढे दोन निबंध वाचले एकात त्यानी चालुक्यवंशीय एका राजाने दिलेल्या ताम्रपटाचा अर्थ विशद करण्याचा यत्न केला आहे व दुसऱ्यात मधुसूदन सरस्वती याच्या कालाविषयी चर्चा केली आहे मधुसूदन हे सोळाव्या शतकात झाले असे लासन व बर्नो ( Lassen and Burnouf ) या दोघा पंडितानी ठरविले होते. परंतु तेलंगानी योग्य आधार देऊन ते पंधराव्या शतकाच्या शेवटी अगर सोळाव्याच्या आरंभास झाले असले पाहिजेत असे सिद्ध केले आहे

या निबंधात तेलंगानी मधुसूदन सरस्वतीच्या मताविषयी व वर्तनाविषयी जें लिहिले आहे ते बरेच महत्वाचे असून त्यायोगे सुजाण हिंदुलोकाच्या धर्मसंबंधी भावनावर चागला प्रकाश पडतो असे वाटते सबब त्याविषयी थोडासा उल्लेख करतो तेलंग म्हणतात की, मधुसूदन सरस्वती हे पक्के अद्वैत वेदांती असूनही ते नि सीम कृष्णभक्त होते त्यानी गीतेच्या पंधराव्या अध्यायावरील आपल्या टीकेच्या शेवटी पुढील उद्गार काढले आहेत —

**चिदानंदाकारं जलदरुचिसारं श्रुतिगिराम् ।**
**व्रजस्त्रीणां हारं भवजलधिपारं कृतधियाम् ॥**
**विहंतुं भूभारं विदधदवतारम् मुहुरहो ।**
**महो वारंवारं भजत कुशलारंभकृतिनः ॥ १ ॥**
**प्रमाणतोऽपि निर्णीतं कृष्णमहात्म्यमद्भुतम् ।**
**न शक्नुवंति ये सोढुं ते मूढा निरयं गताः ॥ २ ॥**

त्याचप्रमाणें सोळाव्या अध्यायावरील टीकेच्या सुरवातीसच मधुसूदन सरस्वती म्हणतात,

**शैवाः सौराश्च गाणेशाः वैष्णवाः शक्तिपूजकाः ॥**
**भवंति यमविज्ञाय सोऽहमस्मि परः शिवः ॥ ३ ॥**

सन १८७५ मध्ये तेलगानी स्टूडटस सोसायटीपुढे "बुद्धि व तिचे वैभव' या विपयावर एक निबध वाचला

सन १८७६ साली त्यानी त्याच सोसायटी पुढे "इतिहासाचा अभ्यास" या विषयावर निवध वाचला व त्याच वर्षी त्यानी कदब वशीय राजासबधाच्या तीन ताम्रपटाविषयी एक निबध रॉयल एशियाटिक सोसायटीपुढे वाचला त्याच साली त्यानी आनदगिरीच्या शकरविजयासबधी इडियन ॲटिक्वेरीमध्ये एक टिप्पण लिहून प्रसिद्ध केले त्या ग्रथात असे म्हटले आहे की, त्यात वर्णन केलेल्या गोष्टी, त्या घडल्या त्याच वेळी अगर जरा नतर लिहिलेल्या आहेत व त्या ज्याने प्रत्यक्ष पाहिल्या अशा माणसाने लिहिल्या आहेत ग्रथावर ज्या अर्थी आनदगिरीचे नाव आहे व आनदगिरी हा ज्या अर्थी शकराचार्याचा एक शिष्य होता त्या अर्थी त्याच आनदगिरीने शकरविजय हा ग्रथ लिहिला असावा या प्रश्नाचा तेलगानी नीट विचार करून वरील सर्व उपपत्ति निराधार असल्याचे सिद्ध केले आहे ते सिद्धात रूपाने असे म्हणतात —

"That the शकरविजय is in all probability a work of the 14th century (A C) and that consequently it cannot be a work of आनदगिरी, the pupil of शकराचार्य" तेलगानी त्या ग्रथातील काही व्याकरणदृष्ट्या शब्दाचे अपप्रयोगही दाखविले आहेत जसे —

आचरित्वा, सनिवेशयित्वा, शृणुध्वम्, आस, तिष्ठध्वम्, सेवन्ति, sentences beginning with मे and so on.

सन १८७७ साली तेलगानी सॅसून मेकॅनिक्स इन्स्टिट्यूटपुढे "अप्रतिबध व्यापार व सरक्षण" (Free Trade and Protection) यावर एक महत्वाचा निबध वाचला पण याविषयी पुढील एका स्वतत्र प्रकरणात विवेचन करावयाचे असल्यामुळे त्यासबधाने इकडे काही लिहीत नाही

सन १८७८ मध्ये तेलगानी स्टूडटस सोसायटी पुढे "भरतखडाचे प्राचीन लोक" या विषयावर एक निबध वाचला त्याच साली यानी लॉर्ड लिटन यानी पास केलेल्या "Gagging Act" (मुस्कटदाबीचा कायदा) वर इदुप्रकाशात टीका केली पण याही विषयासबधाने पुढील एका प्रकरणात विवेचन येईल

सन १८७९ मध्ये तेलगानीं "Reign of Law" (कायद्याचे राज्य) या विषयावर एक चागला लेख पुण्याच्या सार्वजनिक सभेच्या त्रैमासिकात लिहिला आहे पण त्याविषयीचे विवेचन देखील पुढील एका प्रकरणात करू

सन १८८० मध्ये काशीनाथपतानी शिलाहार ताम्रपटाविषयी एक लेख लिहून ॲटिक्करीमध्ये प्रसिद्ध केला आहे हा अकराव्या शतकातला ताम्रपट असून त्यात महादेवैय प्रभु व सोमणैय प्रभु अशी दोन नावे आली आहेत परेल शिलालेखात अनत पै प्रभु असे नाव आले आहे व ही कायस्थ प्रभुजातीची नावे आहेत असे वॉथन म्हणतो परतु तेलग म्हणतात सदहू ताम्रपटातील नावे कायस्थ प्रभुजातीची नसून ती ब्राह्मणजातीची आहेत गोवे व कुडाल या प्रातात प्रभु या आडनावाचे ब्राह्मण अद्यापि आहेत.

सन १८८१ साली काशीनाथ पतानी ॲटिक्करी मासिकात रा सा मडलिक याच्या "हिंदु ला" पुस्तकाचे परीक्षण केले आहे सर रेमड वेस्ट म्हणतात की, मंडलीकाच्या पुस्तकाने हिंदु लॉ समजण्यास बरीच मदत होत असते, ही गोष्ट खरी, परतु ते पुस्तक व्यवहारमयूखाचे अपुरेच हस्तलेख आधारास घेऊन लिहिलेले असल्यामुळे त्यात बरीच शकास्थाने राहून गेली आहेत तथापि ते पुस्तक व त्याच्या जोडीला, त्याचे परीक्षण करताना तेलगानी दिलेली माहिती याचा वकील—बॅरिस्टर लोकाना पुष्कळच उपयोग होण्याचा सभव आहे

सन १८८३ मध्ये स्टूडटस सोसायटीपुढे तेलगानी "कलकत्ता व तेथील लोक" या विषयावर एक निबध वाचला हिंदुस्थानात ब्रिटिश अमल सुरू झाला तरी प्रथम प्रथम निरनिराळ्या प्रातातील लोकास एकमेकाची माहिती नसे किंबहुना मुबई, बगाल, मद्रास, पजाब वगैरे हे निरनिराळे देश आहेत अशीच सामान्यत समजूत होती ही समजूत जरा जरा कमी होऊ लागून सदरील सर्व प्रातातील लोक एकाच देशातले रहिवाशी असल्यामुळे एकमेकाची माहिती एकमेकास असणें जरूर आहे असें सुमारे पन्नास वर्षामागे लोकाना वाटू लागले अशा वेळी काशीनाथपताचें "एजुकेशन कमिशन"चे एक सभासद या नात्याने कलकत्त्यास

कित्येक महिने राहणें झाल्यामुळे बगाली लोकाविषयी त्याना साहजिकच माहिती करून घेण्याची सधि मिळाली तीच त्यानी सदरील निबधाच्या रूपाने मुबईतील सुशिक्षित समाजापुढे ठेवली

सन १८८४ मध्ये तेलग यानी ॲंटिक्करीमध्ये एक निबध लिहून असे दाखविले की शकराचार्य हे पूर्णवर्मा या राजाच्या वेळी होऊन गेले हुयेनत्संग या चिनी प्रवाशाने पूर्णवर्म्याचा उल्लेख केल्यावरून तो राजा सहाव्या शतकाच्या अखेरीस झाला असावा असे स्पष्ट दिसतें अर्थात् शकराचार्य सहाव्या शतकात झाले असें सिद्ध होतें हे तेलगाचे मत डॉ. भाडारकरानी मान्य केले आहे.

त्याच सालच्या ॲंटिक्करीमध्ये तेलगानी एक लहानसे टिप्पण लिहून असे म्हटले आहे की बौद्ध लोकाचा छळ झाला या गोष्टीला काही आधार नसून त्यात शकराचार्य अगर कुमारिल भट्ट यांनी भाग घेतल्याची कथा तर अगदीच निराधार आहे

सन १८८५ मध्ये तेलगानी दुसऱ्या पुलकेशीने सातव्या ( ६१४–१५ इ स. ) शतकात एका नारायणस्वामी नावाच्या द्रविड ब्राह्मणास पिरिगिपा ( Pirigipa ) गाव दान करून दिल्यासबधाचा ताम्रपट ॲंटिक्करीमध्ये प्रसिद्ध केला त्या ब्राह्मणास काही धर्म कृत्ये–बलि, चरु व वैश्वदेव–चालू ठेवावी या हेतूने वरील दानपत्र करून दिलेले होते

त्याच साली काशीनाथपंतानी एशियाटिक सोसायटीपुढे "ब्रह्मसूत्राचा कर्त्ता बादरायण" यावर एक निबध लिहून वाचला. डॉ वेबरने असे प्रतिपादन केले होते —"बादरायणाला व्यास म्हणतात शकरविजयावरून पाहता व्यासाचा मुलगा शुक, शुकाचा शिष्य गौडपाद, त्याचा शिष्य गोविद यति, व त्याचा शिष्य शकराचार्य. म्हणजे ( बादरायण ) व्यास फार तर शकराचार्याच्या दोन तीन शतके–म्हणजे चवथ्या किवा पाचव्या शतकात–पूर्वी झाला असला पाहिजे" तेलगानी प्रथम सागितलें की वेदव्यास व बादरायण व्यास हे एक नव्हेत ब्रह्मसूत्र कर्ता व्यास वेबरने दिलेल्या कालाच्या किती तरी पूर्वी होऊन गेला असला पाहिजे.

सन १८९० मध्यें तेलगानी त्याच सोसायटीपुढे (Gleanings from the शारिरक भाष्य ) आचार्यकृत शारिरक भाष्याचे निरीक्षण करून काही वेचीव व मनोरजक माहिती सागितली. आचार्यांनी एके ठिकाणीं "आता जसा सार्वभौम

राजा नाही तसा पूर्वीही नव्हता " म्हटले आहे त्यावरून आपल्या देशात सार्व-भौम असा एकच राजा असल्याचें किंवा होऊन गेल्याचे दिसत नाही मेगॅस्थिनी-सने या देशात निरनिराळी अशी ११८ राज्ये आपल्या वेळी असल्याचे नमूद केलेले आहे हुयेनत्सॅग आपल्या वेळी लहान मोठी ७० राज्ये असल्याचे लिहितो महमुद गझनीच्या वेळी व अल्लाउद्दीन खिलजीच्या वेळी देखील सर्व हिंदुस्थान देश अनेक राजामध्ये जणू विभागून दिलेला होता असे नमूद झालेले आहे. सातव्या शतकातला महाराष्ट्राचा राजा दुसरा पुलकेशी याने हर्षवर्धन याचा पराभव करून दक्षिणेंतून त्याला परतविले पुलकेशीला "महाराजाधिराज" म्हणत असत पण उत्तरेस हर्षवर्धन हा स्वतत्र राजा होता भाष्यात अयोध्या, मगध, वैदेह या प्राताचा उल्लेख आहे आचार्यानी "पूर्णवर्मा"चा उल्लेख केला आहे हा आणि हुयेनत्संग याने सागितलेला पूर्णवर्मा हे दोघेही एकच.

मुक्त झालेला आत्मा ब्रह्माकडे पायरी-पायरीने किंवा मजली-मजलीने जातो. याला उदाहरण म्हणून आचार्यांनी असे म्हटले आहे "एरव्हीदेखील आपण एखाद्याला म्हणतो की जा प्रथम बलवर्माकडे, मग जयसिंहाकडे, तेथून नतर विष्णुगुप्ताकडे." अशीच स्थिति फाहियानच्या वेळीही होती फाहियान म्हणतो की आपल्या वेळी राज्यात कोणी वाटसरू प्रवासी आल्यास तेथील राजाची त्याच्याबरोबर वाटाड्या म्हणून एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी जाताना एकादा मनुष्य देण्याची वहिवाट असे

आचार्य आपल्या भाष्यात ठिकठिकाणीं म्हणतात की त्या वेळी लोक आपली जातिबधने अगर समाजनियम पाळीत नसत पण हुयेनत्सॅग म्हणतो की, आपल्या वेळी हिंदुलोक तसली बधने फार कडक रीतीने पाळीत असत ! वास्तविक हुयेन-त्सॅगच्या वेळी बौद्ध धर्माचा जोर कमी होऊन त्याची वाढ खुटली होती आणि ब्राह्मणी धर्माची चढती कमान होती पण खरा प्रकार म्हणजे दोघेही ( आचार्य व हुयेनत्सग) वरील गोष्टीकडे निराळ्या दृष्टीनें पहात होते हल्ली देखील मुलगी लग्नाला पधरा वर्षाची वाढली तरी कित्येक उदार मतवाल्याना "ते काहींच नाही" असें वाटेल पण तेच कांही जुन्या मताच्या लोकाना "धर्मबाह्य" कृत्य वाटेल !

शकराचार्य हे अद्वैत वेदाताचे पुरस्कर्ते असूनही ठिकठिकाणी विष्णूचा उल्लेख करीत असतात. बार्थ तर आचार्य हे आठव्या शतकातील व सायन चवदाव्या शतकातील वैष्णवच होते असे म्हणतो ! पण महाराष्ट्रात आचार्य हे शकराचा

( विष्णूचा नव्हे ) अवतार होते असे मानतात व रामानुज, मध्व व वल्लभ या आचार्यांना अद्वैताच्या विरुद्ध असलेल्या वैष्णवपंथाचे मुख्य असे म्हणतात

मूर्तिपूजेविषयी आचार्यांचे उदार मत असून ते सहिष्णुतेचे ( toleration) दर्शक असे होते ज्यू किंवा मुसलमान धर्माचे लोक ज्या कारणाकरिता मूर्तिपूजे-विरुद्ध आक्षेप घेतात त्या कारणाकरिता शंकराचार्य त्या पूजेविषयी आक्षेप घेत नाहीत. ज्यू किंवा मुसलमान या लोकाना देवाच्या मूर्ति दृष्टी समोरही नको असतात आचार्यांमध्ये इतका कडवेपणा नव्हता त्याचे म्हणणेच मुळी असे की,

प्रतिमादिषु विष्ण्वादि बुध्य ध्यासः ।

म्हणजे विष्णूची प्रतिमा याचा अर्थ " विष्णु " असा नव्हे तर ती एक त्या देवाची खूण—प्रतीक—( Symbol ) आहे

गोमुत्र हे पतंजलीच्या वेळी पवित्र मानले जात असे हे मागे सांगितलेच आहे पण कदाचित् ती एक औषधी या दृष्टीने पतंजलीने ते पवित्र मानले असेल पण भवभूति व शंकराचार्य यांनी तर गाय पवित्र मानलेलीच आहे

सन १८९१ साली काशीनाथपंतानी एशियाटिक सोसायटीच्या त्रैमासिकात एक " सुबंधु व कुमारिल " यावर टिप्पण लिहून प्रसिद्ध केलेले असून त्यात फाहीयान व हुयेनत्संग या प्रवाशाच्या वेळी हिंदुस्थानची धार्मिक दृष्टीने काय स्थिति होती हे थोडक्यात दाखविले आहे तेलंगाच्या मते फाहीयानच्या वेळी—पांचव्या शतकाच्या आरंभास—या देशात बौद्धधर्म अगदी जोरात होता हुयेन-त्संगच्या वेळी—सातव्या शतकाच्या पूर्वार्धात—तो जोर कमी होऊन त्या धर्माची वाढ बहुतेक खुटली होती मध्यंतरीच्या काळात शंकराचार्य व कुमारिल भट्ट या दोघांच्या कामगिरीमुळें ब्राह्मणी धर्माचा एक सारखा उत्कर्ष होत चालला होता

सन १८९२ मध्ये तेलंगानी " Gleanings from Maratha Chronicles " या विषयावर एक विस्तृत निबंध लिहून डेक्कन कॉलेज यूनि-यन पुढे वाचला तोच पुढे न्या रानड्याच्या " Rise of the Maratha Power " या पुस्तकाच्या शेवटी जोडला गेला आहे याविषयी पुढील एका प्रकरणात स्वतंत्र रीतीने विवेचन करू

## प्रकरण बारावे.

# सटीप पुस्तकें व भाषांतरें.



काशीनाथपत तेलग यानी प्राचीन वाङ्मयाची जी महत्वाची सेवा केली आहे त्यात काही सटीप पुस्तके व भाषातरे याचा अतर्भाव होतो त्यापैकी काही मुख्य पुस्तकासबधी इकडे थोडक्यात निर्देश करतो सन १८८४ साली त्यानी मुबई सरकाराकरिता विशाख-दत्तकृत "मुद्रा राक्षस" या सस्कृत नाटकाची एक सटीप आवृत्ति तयार करून प्रसिद्ध केली ते सात अकी नाटक असून त्याचा राजकारण हा मुख्य विषय आहे नाटकाच्या सविधानकाचा काल ख्रिस्तपूर्व चवथे शतक असून त्यात चाणक्य व राक्षस ही मुख्य दोन पात्रे आहेत नाटक मनोरजक करण्याकरिता कर्त्याने त्यात अनेक लहान मोठी पात्रे आणलेली आहे-तच. परतु मुख्य पात्र जो चाणक्य याला चद्रगुप्ताला नदवशीय राजाच्या गादीवर कायम करण्याकरिता अनेक उपायाची योजना करावी लागली आहे राक्षसाची मुद्रा त्याला न कळतच यदृच्छेने चाणक्याच्या हातात आली असता तिचा त्याने आपल्या कार्यसिद्धीसाठी वाटेल तसा उपयोग केला आहे त्यावरूनच नाटकास "मुद्राराक्षस" हे नाव कर्त्याने दिले असे उघडच दिसते असो. नदाचा अमात्य राक्षस हा उदारमनस्क व सरळ बुद्धीचा मनुष्य असल्यामुळें चाणक्याच्या कुटिल नीतीपुढे त्याला अखेर हार खावी लागली !

या नाटकास तेलग यानी एक विस्तृत प्रस्तावना लिहिलेली असून त्यात नाटकाच्या कालाविषयी ऊहापोह केला आहे नाटकाचा कर्ता विशाखदत्त याचा प्रो विल्सन यानी अकरावे शतक हा काल ठरविला आहे पण तो काल ठरविताना प्रो विल्सन यानी काही विचित्र विधाने केली आहेत त्या विधानातील चुका दाखवून तेलगानी नाटककर्त्यांचा काल (आठवे शतक) ठरविण्याचा यत्न केला आहे त्यासबधाने इकडे विस्तार न करता फक्त एक दोन महत्वाच्या मुद्याविषयीच लिहितों मुद्राराक्षस नाटकांत "म्लेच्छ" शब्द अनेक ठिकाणीं आलेला आहे प्रो विल्सन यानी त्या त्या ठिकाणी त्या शब्दाचा "मुसलमान" असा अर्थ घेतला आहे तो चुकीचा आहे. त्याच नाटकात "म्लेच्छ" शब्द हा सहाव्या अकात

**“ अहो विवेकशून्यता म्लेच्छस्य । ”**

या वाक्यात मलय-केतूला लावला आहे ! तेव्हा विल्सन यानी केलेला सर्व-साधारण अर्थ बरोबर नाही “ म्लेच्छ ” म्हणजे अशिक्षित, असभ्य, आडदाड, रानटी असे अनेक अर्थ होतात. तेव्हा प्रकृत नाटकाचा काल ठरविण्याच्या कामी “ म्लेच्छ ” शब्दाचा काही उपयोग नाही ! ते बौद्ध धर्माचा ऱ्हास होत चालला होता, अशा वेळी रचिले गेलें आहे, असें उघड दिसते.

दुसरी एक प्रो विल्सन याची चुकीची समजूत झालेली दिसते ते “क्षपणक” म्हणजे “ बौद्ध ” असे समजतात पण ते बरोबर नाही तो शब्द बऱ्याच वेळा “ जैना ”स लाविलेला आढळतो फक्त “ श्रमण ” मात्र “ बौद्धा ”स लावीत असतात पण तो देखील एकदा जैनास लावल्याचे तेलग सागतात. खरा प्रकार असा आहे की बौद्ध व जैन या दोन्ही धर्मात काही मताच्या दृष्टीने—उदाहरणार्थ, वेदप्रामाण्य दोन्ही धर्मास कबूल नाही !—इतके साम्य आहे की एकाद्या प्राचीन ग्रंथात वरील सारखा एकाददुसरा शब्द आल्यास त्याचा बरोबर अर्थ करताना दुसऱ्या पुष्कळ गोष्टीचा विचार करावयाचा असतो नाही तर अपुऱ्या माहितीच्या आधारावर बसविलेली अनुमाने चुकीची ठरण्याचा सभव असतो

प्रस्तुत नाटकात राक्षसाच्या मुखातून सातव्या अकात बौद्धासबधाने देखील

**बुद्धानामपि चेष्टितं सुचरितैः क्लिष्टं विशुद्धात्मना ॥**

असे उदार भावनाप्रेरित उद्गार निघालेले नमूद आहेत. अर्थात् बुद्धासबधाने इकडे जो आदर दाखविण्यात आला आहे तो केवळ धर्मसहिष्णुतेचा द्योतक आहे वस्तुत फाहियानच्या वेळी—पाचव्या शतकाच्या आरंभास—या देशात बौद्धधर्म अगदी जोरात होता तसा तो हुयेनत्सगच्या वेळी—सातव्या शतकात—नव्हता तरी देखील त्याच्या वेळी, चालुक्य राजाच्या धर्मसहिष्णुतेमुळे—जशी हिंदु देवाची ठिकठिकाणी देवळे दृष्टीस पडत असत तसेच बौद्ध लोकाचे मठही दिसत असत, असे डॉ भाडारकराच्या प्राचीन इतिहासात नमूद आहे साराश, हिंदूच्या अगी धर्मसहिष्णुतेचे बीज सामान्यत उपजतच असतें. तोच प्रकार राक्षसाचा होता. असो तेलगानी सर्व उपलब्ध साधनाचा विचार करून “ मुद्राराक्षस ” हें नाटक आठव्या शतकाच्या सुरवातीस लिहिले गेले असावे असे मत दिलें आहे नाटकात एक दोन ठिकाणी जी भूगोलविषयक माहिती आली आहे त्याचा व त्याचप्रमाणें शक, यवन, किरात, काबोज, पारसीक,

बाल्हीक, गाधार, चीन, हूण, कौलूट, म्लेच्छ इत्यादि जातीचा जो उल्लेख आला आहे त्याचा विचार करता तेलगानी ठरविलेल्या कालालाच पुष्टि मिळते !

काशीनाथपतानी आपल्या प्रस्तावनेत एका गोष्टीसबधाने स्पष्ट खुलासा केला आहे त्याचा इकडे थोडासा उल्लेख करावा असे वाटते प्रस्तुत नाटकात चाणक्याने चद्रगुप्ताचे स्थान पक्के करण्याकरिता योजिलेल्या युक्त्या, काढलेल्या क्लृप्त्या, केलेली कृष्णकृत्ये याचा विचार केल्यास त्या वेळचे हिदुस्थानचे सबध वातावरणच नैतिकदृष्ट्या इतके दूषित झालेले होते काय अशी शका येते ! शका तरी कशाला ? अशाच काही ग्रथाच्या आधारावर लॉर्ड कर्झन यानी सुमारे पचवीस वर्षापूर्वी कलकत्ता युनिव्हर्सिटीचे चॅन्सलर या नात्याने केलेल्या आपल्या भाषणात सर्व हिदुलोकावर "लबाडी"चा छाप मारण्याचा प्रयत्न केला होता हे सर्वविश्रुत आहे ? त्या धाष्टर्याबद्दल लाटसाहेबाना अशेष हिदु लोकाकडून जेव्हाचे तेव्हा निषेधरूपाने प्रायश्चित्त मिळालेच परतु या प्रकरणासबधाची तेलगाची विचारसरणी अगदी निर्दोष आहे असे वाटते त्याच्या म्हणण्याचे तात्पर्य असे राजकारण हे कोठेही झाले तरी कमी अधिक प्रमाणात सशयात्मक नीतितत्वाच्या मार्गानेच चालत असते युरोपखडात देखील अद्यापि एकादा राजकारणी पुरुष दुसऱ्या एकाद्याला "मुत्सद्दी" म्हणताना आपण ऐकतो कारण काय ? तर त्या दुसऱ्याने एकाद्या विवक्षित प्रसगी लबाडी इतक्या शिताफीने केली असावी, की ती लोकाच्या लक्षातही आली नाही ! या गोष्टीचा विचार केला तर चाणक्य किंवा राक्षस याच्या कालापेक्षा हल्लीच्या एकोणिसाव्या—विसाव्या शतकात किंवा नेपोलियनच्या वेळी देखील राजकारणविषयक नीतीच्या कल्पना फारशा बदलल्या आहेत किंवा बदलल्या होत्या असे म्हणता येत नाही शिवाय सार्वजनिक कामासबधी खलित्यातील—ते प्रसिद्ध करण्यापूर्वी—महत्वाचा मजकूर गाळणे किंवा अपुऱ्या कारणाकरिता किंवा कारण नसताही एकादी लढाई सुरू करणे असले प्रकार जर जिकडे तिकडे अद्यापि चालतात, तर राजकारण हे प्रस्तुत सुधारलेल्या काळातदेखील नीतिदृष्ट्या पूर्वीपेक्षा सुधारले आहे असे कसें म्हणावयाचे ? याबद्दलचे तेलगाचे मूळ शब्द असे आहेत —

"× × × it must not be forgotten that the games of diplomacy and politics have always been games of more or less doubtful morality. When we hear of

one great politician of modern days declaring another to be a great statesman, because, as I believe he expressed it, the latter lied so cleverly, we cannot say that the world has risen to any very perceptibly higher moral plane in the times of Metternich and Napoleon, than in those of Chanakya and Rakshasa. Nor are suppressions of important passages in despatches for the purposes of publication, or wars undertaken on unjustifiable and really selfish pretexts, calculated to convince one that even in Europe in the nineteenth century, the transaction of political affairs has been purged of the taint of immorality, however different, and I may even add, comparatively innocent may be the outward manifestations of that taint "

काशीनाथपंतांनी सन १८८४ साली शंकराचार्य यांच्या कालासंबधानें ॲंटिक्करीमध्ये एक लेख लिहिल्याचें मागील प्रकरणांत सांगितलेंच आहे. तोच निबंध प्रस्तुत पुस्तकास लिहिलेल्या प्रस्तावनेस त्यांनी जोडून दिला आहे

सन १८७४ मध्ये तेलंगांनी दुसरें एक पुस्तक मुंबई सरकाराकरितां प्रस्तावना व टीपा त्याला जोडून तयार केलें भर्तृहरीनें शृंगार, नीति व वैराग्य अशीं तीन शतकें—म्हणजे प्रत्येकीं शंभर शंभर श्लोक—लिहिलीं आहेत हें प्रसिद्ध आहे पैकीं तेलंगांनीं फक्त नीति व वैराग्य अशीं दोनच शतकें पसंत करून दोहोंची मिळून आपली एक आवृत्ति तयार केली दोनच शतकें पसंत करण्याचें कारण शृंगारशतकाची चर्चा करणें अगर त्यासंबधानें कांहीं लिहिणें त्यांना आवडलें नसावें. कै. वे. शा कृष्णशास्त्री भाटवडेकरकृत सुभाषित रत्नाकराच्या संशोधनाचें काम वे शा अप्पाशास्त्री खाडिलकर व नामदार तेलंग हे दोघे करीत असत परंतु त्या वेळीं देखील तेलंगांच्याच सुचनेवरून शृंगारविषयक श्लोक गाळण्यांत आले होते असो सदरील दोन शतकांची आवृत्ति मुंबई सरकाराकरितां काशीनाथपंतांनीं अत्यंत परिश्रमपूर्वक सुमारें ३०-३५ निरनिराळे हस्तलेख तपासून तयार केली होती याशिवाय तेलंगांनीं त्या पुस्तकास एक विस्तृत प्रस्तावना जोडली आहे.

नीतिशतक व वैराग्यशतक या नावावरून कल्पना होते त्याप्रमाणे प्रत्येकी केवळ शभरच श्लोक नसून काही अधिक आहेत नीतिशतकाचे ११० श्लोक असून दुसरे २३ miscellaneous ( किरकोळ किंवा सकीर्ण ) श्लोक त्याला जोडलेले आहेत श्लोक एखाद्या विषयाला अनुसरून लिहिलेले असे नसून फक्त काही "सुजन प्रशसा," "दुर्जन प्रशसा," "विद्वत् प्रशसा," "मानशौर्य प्रशसा," "धैर्य प्रशसा," असे मथळे देऊन त्याखाली प्रत्येकी काही श्लोक दिले आहेत सगळे श्लोक बहुतेक सुभाषितासारखे असल्यामुळें त्यापैकी महत्वाचे श्लोक लेखक किंवा वक्ते यानी तोडपाठ केल्यास त्याना लेखाची व भाषणाची गोडी सहज वाढविता येईल असो वैराग्य शतकातही वरील व्यवस्थाच दृष्टीस पडत असून सगळे श्लोक ११३ असून त्याला आणखी ४३ सकीर्ण श्लोक जोडलेले आहेत

तेलगानी आपल्या प्रस्तावनेत भर्तृहरीचा काल ठरविताना कित्येक युरोपीयन पडितानी जे निरनिराळ्या प्रसगी भर्तृहरीविषयी किंवा त्याच्या शतकद्वयाविषयी विचार नमूद केले आहेत, त्यापैकी काही कसे चुकीचे आहेत, हे सिद्ध केले आहे त्यासबंधी इकडे विस्तार न करता मासल्याकरिता एक दोन उदाहरणे देतो प्रो मॅक्स मुल्लर साहेबानी एके ठिकाणी असे म्हटले आहे की, भर्तृहरीच्या प्रकृत शतकद्वयावर बौद्ध धर्माची छाया पडलेली दिसते तेलगाना तसे वाटत नाही काही काही श्लोकातील व्यापक नीतितत्वे अगर मते ही वस्तुत हिंदु व बौद्ध दोन्ही धर्मातील म्हणता येतील बौद्ध धर्म हा मुळी हिंदु धर्मापासूनच उत्पन्न झालेला असल्यामुळे इकडची काही तत्वे तिकडे गेली असल्यास आश्चर्य वाटण्याचे कारण नाही भर्तृहरी हा बौद्ध होता ही कदाचित् चीन देशाकडची प्रचलित दतकथा असेल पण तिला मुळात आधार मुळीच नाही. सदर्हू शतकातून ठिकठिकाणी त्रिमूर्ति, दशावतार, वेद, स्मृति, पुराणे वगैरेचा जो उल्लेख दृष्टीस पडतो त्यावरून त्या शतकाचे वेदातस्वरूप स्पष्ट होते दोन्ही शतकाच्या पहिल्या श्लोकावरून तर त्या वेदातस्वरूपाविषयी शकाच राहात नाही तो श्लोक हा—

**दिक्कालाद्यनवच्छिन्नानंतचिन्मात्रमूर्तये ।**
**स्वानु-भूत्ये कसाराय नमः शांताय तेजसे ॥ १ ॥**

प्रो विल्सन म्हणतात की शतकात पुराणाचा उल्लेख आहे त्यावरून ती शतके फारशी प्राचीन नसावीत यावर तेलग विचारतात की, निरनिराळ्या पुराणाचे तरी काल कोठे ठरले आहेत ? काही प्राचीन असतील. काही अर्वाचीन पुराणे

असतील त्याचा काल नक्की ठरल्याशिवाय आणि भर्तृहरीच्या मनात कोणतीं पुराणें होती हे समजल्याशिवाय पुराणाच्या सामान्य उल्लेखावरून शतकाचा काल ठरविणें बरोबर नाही शिवाय पुराणाचा–विशेषत वायु पुराणाचा–उल्लेख बाण भट्टाच्या कादवरीत आहे जी पुराणे शकराचार्यांच्या नतरची असे प्रो विल्सन म्हणतात त्यातलेच काही उतारे आचार्यांनी आपल्या श्वेताश्वतर उपनिषदावरील भाष्यात घेतलेले आहेत ! तेव्हा काल ठरविण्याचे कामी विल्सन साहेबाची विचारसरणी उपयोगी नाही

लासन म्हणतो की, “ भर्तृहरीने बुद्धाला अवतारात आणले आहे पण बुद्धाला अवतारात नेऊन बसविले कधी ? तसा उल्लेख दहाव्या शतकातील एका शिला-लेखात सापडतो तेव्हा शतके नतरची तरी असली पाहिजेत किंवा तो श्लोक—शिलालेखातला—प्रक्षिप्त असला पाहिजे ” हे लॉसनचे मत तेलग म्हणतात, लॉसनच्या दोन्ही कल्पना चुकीच्या ! बुद्धाविषयीची अवतारकल्पना बौद्धधर्म जोरात होता तेव्हाच निघाली असली पाहिजे तो धर्म दहाव्या शतकात मुळीच जोरात नव्हता डॉ केर्न ( Kern ) याच्या मताप्रमाणें बुद्धाविषयीची अवतार-कल्पना ही तिसऱ्या किवा चवथ्या शतकातली ! कदाचित् त्याच्याही पूर्वीची असू शकेल तेलगानी भर्तृहरीचा तात्पुरता काल ख्रिस्तोत्तर पहिले किवा दुसरे शतक ठरविले आहे पण हा काल अद्याप सर्वमान्य झालेला दिसत नाही

प्रो मॅक्समुल्लर साहेबानी प्राच्य–धर्मपुस्तक–माला ( Sacred Books of the East ) या सदराखालीं अनेक महत्वाच्या विषयावर विद्वान् लोका-कडून ग्रथ लिहवून प्रसिद्ध केले आहेत हे सर्व विश्रुत आहे त्यातले सर्व लेखक युरोपीयन असून “ नेटिव्ह ” असे फक्त काशीनाथपत तेलग हे एकच आहेत. त्यामुळे तेलगाच्या कृतीचे महत्व आहेच परतु मागे एक दोन वेळा पाश्चात्य पडितापैकी काहीनी आपले सशोधनकार्य अगदी सदोष पद्धतीने चालविले असल्या-बद्दल तेलगानी स्पष्ट निषेध नमूद केलेला असल्यामुळे, त्यानाच—तेलगाना—मुल्लरसाहेबानी आपल्या मालेतील एक खड ( Vol ) लिहिण्यास विनति करणे यात खरोखरीच त्या वयोवृद्ध पडिताचे चित्तौदार्य दिसून येते ! वेबरसाहेबानी देखील तेलगाविषयी एकदा आदरोद्गार काढल्याचे मागे सागितलेच आहे हे चित्तौदार्य अनुकरणीय आहे हे कोण म्हणणार नाही ?

काशीनाथपतानी लिहिलेले पुस्तक हे सदरील पुस्तकमालेतील आठवा खड ( VIII Vol ) या रूपाने सन १८८३ मध्ये प्रसिद्ध झालेले आहे त्यात

महाभारतातील भगवद्गीता, सनत्सुजातीय व अनुगीता या तीन भागाचे इग्रजी भाषातर आले असून शिवाय प्रत्येकाला एक एक विस्तृत प्रस्तावना जोडलेली आहे भगवद्गीतेविषयी माहिती सर्वांनाच आहे सनत्सुजातीय हा एक भारताच्या उद्योग पर्वातील भाग असून त्यात भगवद्गीतेच्याच वळणावर सनत्कुमार-सनत्सुजात व धृतराष्ट्र यामधील अध्यात्मविषयावरील षडध्याय-रूपाने सभाषण प्रसग आलेला आहे अनुगीता हा अश्वमेध–पर्वातील एक भाग असून त्याचे ३६ अध्याय आहेत. अनुगीतेत अर्जुन व श्रीकृष्ण या दोघामधील सभाषण आलेले असून अध्यात्मिक उपदेश हाच त्याचा विषय आहे भारतीय युद्धाच्या समाप्तीनतर पाडव आपल्या राज्यव्यवस्थेस लागले व श्रीकृष्ण द्वारकेस जाण्यापूर्वी पाडवाचा निरोप घेण्याकरिता आले ते अर्जुनाच्या मदिरात आल्याबरोबर त्याला समरागणावरील श्रीकृष्णाच्या अमृतोपम उपदेशाचे–भगवद्गीतेचे–स्मरण झाले व तो उपदेश पुन एक वार ऐकण्याची त्याने देवाजवळ आपली इच्छा प्रकट केली श्रीकृष्णानी उत्तर दिले की, तो उपदेश त्या वेळेला योग्य होता । आता ती वेळ गेली अर्थात् तो उपदेश आता देता येणे शक्य नाही ! तथापि अर्जुनाची जिज्ञासा तृप्त करण्याकरिता श्रीकृष्णानी इतिहास, पुराणे वगैरेच्या आधाराने उपदेश केला तीच अनुगीता !

प्रस्तुत पुस्तकाच्या पहिल्या प्रस्तावनेत तेलगानीं भगवद्गीतेच्या कालासबधाने जो ऊहापोह केला आहे, तो बऱ्याच अशाने त्यानी डॉ लॉरिन्सर यास दिलेल्या उत्तरासारखाच आहे पण त्यात तेलगानी काही काही गोष्टीचा जो उल्लेख केला आहे त्यावरून गीतेच्या प्राचीनत्वाविषयी शकाच रहात नाही भगवद्गीतेत जे तत्वविचार आलेले आहेत त्यात नतरच्या काही ग्रथातून दिसून येणारे प्रमाणशुद्धता, नियम-बद्धता किवा सुसगतपणा, हे गुण आढळत नाहीत याचे एकच उदाहरण गीतेच्या नवव्या अध्यायात " समोऽह सर्व भूतेषु न मे द्वेषोऽस्ति न प्रिय । " असे वचन आहे. ह्याच्या अगदी उलट सोळाव्या अध्यायात एक श्लोक आहे तो हा,

**तानहं द्विषतः क्रूरान् संसारेषु नराधमान् ।**
**क्षिपाम्यजस्रमशुभान् आसुरीष्वेव योनिषु ॥**

तसेच गीतेत अथर्व-वेदाचा उल्लेख देखील नाही फक्त तीन वेदाचा किवा त्रयीचा आहे पण पतजलीच्या महाभाष्यात अथर्व-वेद श्रेष्ठ मानलेला आहे. गीतेत

सामवेद श्रेष्ठ मानण्यात आला आहे तसा तो ऐतरेय ब्राह्मणात श्रेष्ठ मानलेला आहे मनुस्मृतीत "नराणा ब्राह्मण श्रेष्ठ" असे आहे पण गीतेत "नराणा च नराधिपम्" असे म्हटले आहे गीतेच्या द्वितीयाध्यायात वेदाना कमी मानलेले आहे. पण तो उल्लेख कर्मकाडासबधाने आहे. ज्ञानकाडाला किंवा उपनिषदाना गीतेत श्रेष्ठच मानलेले आहे पण मन्वादि ग्रथात असा भेदाभेद मानलेला नसून वेद हे सर्वतोपरी प्रमाणभूत मानले गेले आहेत या सर्व गोष्टीचा विचार करून भगवद्गीता ही जुन्या उपनिषत्कालातली दिसते असे तेलगानी आपले मत दिले आहे ते म्हणतात,

"My view is, that in the *Gita* and the *Upanishads*, the philosophical part has not been consistently and fully worked out We have there the results of free thought, exercised on different subjects of great moment, unfettered by the exigencies of any foregone conclusions or of any fully developed theory"

"And having regard to these various points and to the further point that the sequence of ideas throughout the verses of the *Gita* is not always easily followed, we are safe, I think, in adhering to the opinion, expressed above, that the *Gita* is a non-systematic work and in that respect belongs to the same class as the older *Upanishads*"

सनत्सुजातीय हे प्रकरणदेखील भगवद्गीतेच्याच समकालीन आहे असे तेलगाचे मत आहे सनत्सुजातीय याचा पचतत्रात उल्लेख आहे, पतजलीच्या महाभाष्यात आहे व शकराचार्यांनी श्वेताश्वतर उपनिषदावर जे भाष्य लिहिले आहे, यातही त्याचा उल्लेख आहे. यावरून व इतर काही अत प्रमाणावरून पाहता भगवद्गीता व सनत्सुजातीय ही दोन्ही एकाच काळी रचिली गेली असली पाहिजेत, असे उघड दिसते

अनुगीता मात्र बरीच नतरची दिसते अनुगीतेचा आचार्यांच्या भाष्यात उल्लेख आहे विज्ञानभिक्षूच्या साख्य-सारात आहे. सामाजिक बाबतीत अनुगीता ही

भगवद्गीतेच्या पुढची मजल आहे त्यात राजाचा जुलूम, तुरुगवास, गरीबास छळणारे कायदे, लोखंडी ओतीव मूर्ति तयार करणे, ओझी वाहण्यास हत्तीचा उपयोग करणे, चामड्यात पेढा भरलेले ( चर्ममय ) प्राणी वगैरे गोष्टीचा उल्लेख आहे नृत्य–गायन या कला व कारागिरी ही कमी मानणे या गोष्टी अनुगीतेत आल्या आहेत मनु, गौतम व आपस्तंब याच्या ग्रथात देखील नृत्य व गायन या कलाचा निषेध आहे फार काय पण गायकाच्या आवाजाला त्यात गाढवाच्या ओरडण्याची उपमा दिलेली आहे ! भगवद्गीता अगर सनत्सुजातीय याच्या रचनेत कर्त्याच्या मनात उदार भावनेची प्रेरणा झालेली उघडच दिसते अनुगीता किंवा मनु, आपस्तंब याच्या काळी एकदरीत सामाजिक अध पतन झालेले दिसते अनुगीतेत सौगताचा उल्लेख आलेला आहे सौगत म्हणजे बौद्ध अर्थात् अनुगीता ही बुद्धानतरची भगवद्गीता त्याच्या पूर्वीची म्हणजे ठोकळ मानानें कालदृष्ट्या सदरील ग्रथाचा असा अनुक्रम लागेल भगवद्गीतेनतर बुद्धावतार, बुद्धानतर आपस्तंब आपस्तबानतर अनुगीता

काशीनाथपतानीं भगवद्गीतेचे एक पद्यात्मक इग्रजी भाषातर केलेले प्रसिद्ध आहे ते भाषातर त्यानी ( blank verse ) निर्यमक कवितेत केलेले असून ते एम् ए च्या परीक्षेच्या वेळी कविता करण्याचा अभ्यास ( exercise ) या दृष्टीने केलेले होते अर्थात् ते प्रसिद्ध करण्याचा त्याचा प्रथम बेत नव्हता पुढे जेव्हा ते प्रसिद्ध करावे असे त्याना वाटले तेव्हा ते व लॉरिन्सरसाहेबास उत्तर म्हणून त्यानी लिहिलेला भगवद्गीतेवरील निबध अशी दोन्ही एकच पुस्तकरूपाने त्यानी प्रसिद्ध केली गीतेवरील निबधाविषयीचे मागील एका प्रकरणात विवेचन आलेले असल्यामुळे त्यासबधी इकडे काही लिहिण्याचे कारण नाही फक्त सदर्हू भाषातराविषयी दोन शब्द लिहितो तेलगाचे पद्यात्मक भाषातर अति उत्तम उतरले आहे असे अनेक तज्ञ माणसानी आपले मत प्रसिद्ध केले आहे तेलगाच्या भाषातराचा मासला या दृष्टीने काही उतारे इकडे देण्यास हरकत नव्हती, परतु पुस्तक सामान्य वाचकाकरिता असल्यामुळे तसे उतारे देण्याचे प्रयोजन दिसत नाही परतु त्या भाषातरासबधाने प्रसिद्ध झालेल्या अभिप्रायापैकी मात्र एक दोन इकडे देतो सर रेमड वेस्ट यानी तर त्याविषयी "a remarkable effort on the part of a foreigner" असे म्हटले आहेच टाइम्स ऑफ इडिया म्हणतो की "हे भाषातर इतके उत्तम वटलेले आहे की ते होऊन कितीही काल लोटला तरी त्याचे 'इग्लिश वाङ्मय' या दृष्टीने महत्व केव्हाही

कमी होणार नाही ( will stand the test of ages ) त्याचप्रमाणे दुसऱ्या एका इंग्लिश पंडितानें पुढीलप्रमाणे मत दिल्याचें इंदुप्रकाश सांगतो —
" इंग्रजी ग्रंथातून जी विचारपरिपूर्णता व ज्ञानप्रगल्भता दिसून येते ती या भाषांतरांत जितकी उन्नतपणे दिसून येते तितकी इतर कोठेही दिसून येत नाही या रचनेंत एक प्रकारचा जोम असून ती सुखकर व मृदु आहे इतकेंच नव्हे तर ती रचना अत्यंत रसाळ, गोड व अक्लिष्ट असून उत्साहपूर्णही आहे " असो

---

प्रकरण तेरावें

## मराठींत ग्रंथरचना.



काशीनाथपंत तेलंग यांना आपल्या मातृभाषेचा अभिमान होताच त्यामुळे त्या भाषेत ग्रंथरचना स्वतः करून, विद्वान् लोकांस तसे ग्रंथ लिहिण्यास प्रोत्साहन देऊन, त्या भाषेत स्वतः व्याख्यानें देऊन, त्या भाषेतील नवीन पुस्तकांचे परीक्षण करून व वादविवाद करून ते शक्य तितकी वाङ्मय-सेवा करीत असत त्यांनी लिहिलेली दोन पुस्तकें प्रसिद्ध आहेत एक " स्थानिक राज्यव्यवस्था " व दुसरे " शहाणा नेथन " याशिवाय तेलंगांनी हेमंतोत्सव व्याख्यानमालेंत दिलेली " शास्त्र व रूढि " व " सामाजिक बाबतींतील तडजोड " या विषयावरील दोन व्याख्यानें प्रसिद्ध आहेत तसेंच त्या व्याख्यानमालेच्या वेळीं जे वादविवाद होत असत त्यांत भाग घेतांना त्यांनी वेळोवेळीं केलेली लहान मोठीं भाषणें त्या वेळच्या इंदुप्रकाशादि वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झालेली आहेतच

तेलंगांनी जे " स्थानिक स्वराज्य " यावर पुस्तक लिहिलें, त्यासंबंधी थोडासा इतिहास आहे सन १८८२ च्या सुमारास लॉर्ड रिपन हे हिंदुस्थानचे व्हाइसरॉय होते तेव्हां त्यांनी आम्हांस कांही स्थानिक स्वराज्यासंबंधी ( Local Self-Government ) हक्क देण्याच्या हेतूनें एक महत्वाचा सरकारी ठराव प्रसिद्ध केला. म्हणजे म्युनिसिपालट्या, लोकल बोर्डें वगैरे स्थानिक कारभार पाहण्याकरितां ज्या संस्था सरकारनें निर्माण केल्या होत्या त्यांत लोकांना आपल्यातर्फे निम्मे सभासद निवडण्याचा सदरील ठरावानें हक्क दिला होता त्या वेळपर्यंत सदहू

प्रकारच्या संस्थामधून सरकारने नेमलेले लोकच कामे करीत असत पण सामान्य लोकाना सार्वजनिक कामे करण्याची संधि मिळावी व तशी कामे करण्याची त्याना दिशा दाखवावी या हेतूने रिपन साहेबानी वरील ठराव प्रसिद्ध केला म्हणजे वास्तविक ब्रिटिश सत्ता इकडे सुरू झाल्या दिवसापासून जी सार्वजनिक कामे सरकार नियुक्त लोकच करीत असत ती यापुढे लोकानी निवडून दिलेल्या लोकानी अंशत तरी करावी हाच त्या ठरावाचा मुख्य हेतु होता अर्थात लोकाना दिलेले हे नवीन राजकीय हक्क होते त्या नवीन हक्काचे महत्व काय हे लोकास कळावे, त्या हक्काप्रमाणे सार्वजनिक दृष्टीने जी आपल्यावर एक प्रकारची जबाबदारी येईल ती त्यानी ओळखावी व ती जबाबदारीची कामे करण्यास त्यानी उमेदीने पुढे यावें याबद्दल लोकाना व्याख्याने देऊन व लहान लहान पत्रके वाटून माहिती करून द्यावी म्हणून राव बहा रानडे यान्च्या सल्ल्याने पुण्याच्या सार्वजनिक सभेने त्या वेळी महाराष्ट्रात गावोगाव एजंट पाठविण्याची तजवीज केली होती त्या तेलगाचे सदरील पुस्तक म्हणजे त्याच दिशेने केलेला एक प्रयत्न होता इंग्लडात (Chalmer's Local Self-Government) "स्थानिक स्वराज्य" या विषयावर एक भरपूर माहितीने भरलेलं पुस्तक प्रसिद्ध होते, त्याचेच तेलगानी हे भाषांतर केले वास्तविक रिपन साहेबाचा ठराव प्रसिद्ध झाल्यापासून या सुमारे अर्ध शतकात स्थानिक स्वराज्याच्या कामात आमचे पाऊल बरेच पुढे पडलेले आहे तशीच इतर दिशानी देखील लोकमतात क्रांति होऊन सार्वजनिक कामाच्या दृष्टीने देशाची सारखी प्रगतिच होत आहे या गोष्टी खऱ्या आहेत, तथापि सार्वजनिक काम म्हणजे प्रत्येक नागरिकाच्या दिनचर्येतील एक महत्वाची बाब आहे असे जे पाश्चात्य देशातील लोकास बाळकडू मिळालेले असते तसा अद्यापि आपल्याकडे प्रकार झालेला नाही त्यामुळे हल्ली जी देशात थोडीबहुत जागृति झालेली दिसते तिच्या सुरवातीला—पन्नास वर्षापूर्वी—रानडे किंवा तेलंग यान्च्या सारख्या सर्वतोपरी लायक पुढाऱ्यानी सार्वजनिक कामासबधाने लोकास शिक्षण देण्यासाठी काय परिश्रम केले याची जनतेस माहिती होणे जरूर आहे आणि याच दृष्टीने तेलगाच्या वरील कृतीचे महत्व आहे ते पुस्तक (सुमारे २०० पृष्ठाचे) सन १८८५ साली प्रसिद्ध करण्यात आले

या पुस्तकात आपल्या देशातील प्राचीन काळच्या स्थानिक व्यवहाराची काय स्थिति होती याविषयी काही माहिती देण्याचा तेलगाचा प्रथम विचार होता, परंतु ती माहिती अनेक ठिकाणाहून मिळविण्याची असल्यामुळे व त्या कामास फार

दिनावधि लागण्याचा संभव असल्यामुळे तेलंगाना तो बेत रहित करावा लागला. तेलंगाची इच्छा अशी होती की, प्रस्तुतसारख्या पुस्तकाचा आमच्या लोकांनी जरूर अभ्यास करावा त्यापासून आपला फायदा झाल्याशिवाय राहणार नाही इंग्लंडातील लोकांच्या संबधाने लक्षात ठेवण्यासारखा विशेष हा की, त्यांच्या मनात सार्वजनिक कामासंबंधाने कळकळ सदैव जागृत असते स्थानिक कामापैकी आपापली कामगिरी बजावण्यात ते अगदी दक्ष असतात "केवळ आपले पोट भरले म्हणजे बस्स! तितक्यात आपल्या जन्माचे सार्थक्य झाले" ही त्यांची बिलकुल भावना नसते आमच्या इकडचा प्रकार मात्र सामान्यत त्यांच्या उलट! पण ते असो विलायतेत खरा प्रकार वरीलप्रमाणे असल्यामुळे तिकडील स्थानिक व्यवहाराची स्थिति चांगलीच आहे इतकेच नव्हे तर तिच्यात वरचेवर सुधारणा होत आहे स्थानिक स्वराज्याचे तिकडे इतके महत्व समजले जाते की पार्लमेंटच्या निवडणुकीत उभे राहाणारे उमेदवार—त्या वेळी ग्लंडस्टनसारखे व हल्लीच्या काळी ॲस्क्वीथसारखे किंवा राम्सेमॅक्डोनाल्डसारखे—आपल्या जाहीरपत्रकात—manifestoes मध्ये स्थानिक स्वराज्याच्या सुधारणेचा उल्लेख करीत असतात!

पण इंग्लंडमधील व इकडील परिस्थितीत बरेच अंतर आहे आम्ही साधारणत सार्वजनिक कामाकडे केवळ वर वर पाहात असतो त्यात खरी चित्तवृत्ति व आंतर भावना पाहिजे ती आमच्यात कमी आहे ही उणीव आपण काढून टाकली पाहिजे तेलंगाच्या म्हणण्याप्रमाणे, हे काम मोठेसे अवघड आहे असे नाही इंग्लंडच्याही पूर्वी आमच्या देशात स्थानिक स्वराज्य प्रचारात होते पण ती वहिवाट मग काही कारणाने बंद पडली आता तीच आम्हास फिरून सुरू केली पाहिजे, इतकेच काय ते! त्या कामात आम्ही निरुत्साह होऊन बसण्याचे काही कारण नाही आमच्याकडे पूर्वीची व्यवस्था वंशपरंपरेने चाले इंग्लंडात तसे नाही आता इकडे व्यवस्था करावयाची ती इंग्लंडातल्या प्रमाणे ( नव्या-पद्धतीप्रमाणे ) करावयाची की आमच्या जुन्या वंशपरंपरेच्या तत्वावर करावयाची याचा जास्त खल करीत बसण्यात अर्थ नाही हल्लीच्या काळास जी योग्य दिसेल ती पद्धत पतकरावी मुद्याची गोष्ट ही की, जी गोष्ट आपल्याकडे पूर्वी होती तीच प्रस्तुत आम्हास पुन सुरू करावयाची आहे आम्हास स्थानिक व्यवस्था कशास हवी? त्यापासून काय फायदा आहे? असे आम्हापैकी कित्येकास वाटत असते हे आम्हास माहीत आहे पण ही मनोवृत्ति खऱ्या देशहिताला विघातक आहे स्थानिक व्यवस्था चालविण्याचे आम्हामध्ये सामर्थ्य नाही ही गोष्टच मुळी तेलंगाना

कबूल नव्हती ! मार्गात प्रथम प्रथम अडचणी येतील, सकटे येतील हे खरे, पण आलेल्या अडचणीशी झुजण्यातच सार्वजनिक कामाचे खरे शिक्षण मिळत असते ! आपल्या देशात शिवाजी, अकबर, पेशवे याच्या कामगिरीची आठवण अद्यापि ताजी आहे मुबई, कलकत्ता, मद्रास वगैरे मोठमोठ्या शहरातून असली स्थानिक व्यवस्था आमचे लोकच करीत असतात मुबईची म्युनिसिपालिटी तर सबंध हिंदुस्थान देशात नमुनेदार अशी गणलेली आहे तेव्हा आम्ही निराश होण्याचे कारण नाही.

यात दुसरी एक बाजू आहे तिचाही विचार झाला पाहिजे कित्येकास वाटते की, हे कचरपट्टीचे राज्य घेऊन काय करावयाचे ? पण मोठ्याची इच्छा करणाराने लहान कामाची अवहेलना करावी काय ? सार्वजनिक कामाचे खरे शिक्षण लहान लहान सस्थातच मिळत असते ते घेत असताना सार्वजनिक कामाची आस्था आस्ते आस्ते देशभर प्रसृत झाल्याशिवाय कशी राहील ? असल्या क्षुल्लक कामात अग मोडून श्रम करण्याची सवय झाली म्हणजे मनुष्याची आपलपोटेपणाची वृत्ति हळू हळू वद पडून परार्थघटक असणे हे कर्तव्य आहे अशी समजूत दृढ होईल आणि असे झाले म्हणजे देशाचे कल्याण झाल्याशिवाय राहणार नाही स्थानिक व्यवस्थेसारख्या लहान कामात देखील श्रीमताकडून गरीबास, सुशिक्षिताकडून अशिक्षितास, समर्थाकडून निराश्रितास सहाय्य होण्याचा सभव असतो तेवढे काम आपल्या हातून झाल्यास मनास किती समाधान वाटेल बरे ! शिवाय, आपल्यास अद्याप परक्यावरोबर इंग्लिश लोकावरोबर पुष्कळ दिवसपर्यंत मोठमोठ्या राजकीय हक्काकरिता--स्वराज्याकरिता—भाडावयाचे आहेच अशा स्थितीत वरील सारखी लहान लहान स्थानिक कामे आमची आम्ही करू शकलो तर त्यापासून मोठ्या हक्कासाठी आम्ही चालविलेल्या भाडणास जोर येणार नाही काय ? पण सर्वात मोठा फायदा—लहान लहान सार्वजनिक कामे केल्यापासून होणारा तो–हा की "याव-ज्जीव सुख जीवेत्–ऋण कृत्वा घृत पिबेत्" असली नीच मनोवृत्ति लोकाची कमी होऊन त्याच्या दृष्टीपुढे जरा लाब का असेना !—" परोपकाराय सता विभूतय ।" हे ध्येय राहून त्याची त्या दिशेने काही तरी प्रवृत्ति होईल ! आणि असे झाले म्हणजे शहराचे, जिल्ह्याचे व देशाचे अर्थात् कल्याण झाल्याशिवाय राहणार नाही

इग्लडात स्थानिक गोष्टीमध्ये अनेक बाबीचा अतर्भाव होत असतो त्यापैकी काही आमच्या इकडे स्थानिक व्यवस्थेत येत नाहीत चागले रस्ते, दिवाबत्ती, शुद्ध अन्न व पाणी, मुलाचे शिक्षण, शहरचे आरोग्य, देवळाची व्यवस्था, धर्मा-

दायाची व्यवस्था, प्रेत सस्काराबद्दलची व्यवस्था, दवाखाने, रोगराईच्या वेळी उपाययोजना, नगररचना, लहान लहान कामकरी लोकास मदत, लहान लहान धद्यास मदत, वगैरे सर्व महत्वाच्या बाबी तिकडे स्थानिक—देशाच्या किवा राष्ट्राच्या नव्हे—व्यवहारात मोडतात आमच्या इकडे देखील वरील प्रकारचे प्रश्न उपस्थित होत असतात, पण त्याचा निकाल मात्र पचामार्फत किवा स्थानिक कमिट्याकडून बहुधा होत नसतो परतु इग्लडात यासबधाने आजवर कितीतरी सुधारणा झाली आहे, व आणखी जास्त जास्त सुधारणा होऊन जनतेची सोय व्हावी म्हणून प्रयत्न चालू आहेत त्याकरिता वरचेवर कमिट्या बसतात, रॉयल कमिशने नेमण्यात येतात, असे सारखे गाडे चालू आहे आपल्याकडे वरीलपैकी काही गोष्टी नव्या वाटतील परतु कोणत्याही गोष्टीचा चारचौघाच्या सल्ल्याने निकाल लावून घेण्याची आम्ही आपणास सवय लावून घेतली पाहिजे. सार्वजनिक कामात चार चौघाचा सबध आला म्हणजे, "देवाण, घेवाण" हे तत्व कमी अधिक प्रमाणात फार उपयोगी पडत असते कोणत्याही मनुष्याने किंवा पक्षाने, "माझे तेच खरे" असे म्हणून चालावयाचे नाही, व अशा मनोवृत्तीच्या माणसाची समाजाच्या किवा देशाच्या कार्याला मदत व्हावयाची आशा नाही ! याकरिता मुख्य गोष्ट म्हणजे मनुष्याला उत्साह पाहिजे देशहिताची खरीखुरी कळकळ पाहिजे आणि ह्या दृष्टीने-आपल्याला मोठेपणा मिळावा म्हणून नव्हे !—सार्वजनिक कामे करण्याची इच्छा पाहिजे इतकी तयारी असल्यावर काहीही अशक्य नाही

तेलगानी आपल्या पुस्तकात अकरा प्रकरणे दिलेली असून त्यात इग्लडातील स्थानिक स्वराज्याच्या अनेक शाखाची माहिती दिली आहे इग्लडात स्थानिक-स्वराज्याची स्थापना सन १२७५ मध्ये झाली असून तेव्हापासून आजपर्यंत त्या बाबतीत तिकडे बरीच सुधारणा झाली आहे व सुधारणेचे काम अद्यापि चालू आहे ! तेलगानी पहिल्या काही प्रकरणात इग्लड व फ्रान्स या दोन देशातील स्थानिक स्वराज्यात काय फरक आहेत हे दाखवून विलायतेत स्थानिक बाबतीत पॅरिश, बरो, काउटी वगैरे कसे भाग पाडलेले आहेत व त्यात स्थानिक ( सार्वजनिक ) कामाची कशी वाटणी केली आहे याचे विवरण केलें आहे याहीपेक्षा सदरील पुस्तकात बरीच बारीकसारीक माहिती दिली आहे पण त्यासबधाचा इकडे जास्त विस्तार करण्याचे प्रयोजन दिसत नाही तेलगाचा वरील पुस्तक लिहिण्यातला मुख्य हेतु हाच की इग्लडातील स्थानिक स्वराज्यासबधी इकडील

सामान्य लोकास माहिती व्हावी, तिकडील साधारण लोक देखील सार्वजनिक कामे कशी आवडीने करतात, किंबहुना सार्वजनिक कामे करणे हे तिकडील नागरिक आपल्या नित्यक्रमापैकीच कसे एक कर्तव्य आहे असे समजतात, हे इकडील लोकास समजावे व यानी त्याच्या प्रमाणेच तशी सार्वजनिक कामे करण्याची हाव धरावी अर्थात् लहान लहान सार्वजनिक कामे नि स्वार्थ बुद्धीने करण्याची लोकास सवय झाली म्हणजे मोठमोठी राष्ट्रीय कामे अगावर घेऊन पार पाडण्यास ते सहज पात्र होतील

काशीनाथपत तेलग यानी "शहाणा नेथन" हे दुसरे एक मराठीत पुस्तक लिहिले आहे हे लेसिग नावाच्या एका जर्मन पडिताच्या नाटकाचे भाषातर असून ते प्रसिद्ध करण्यात कर्त्याचे दोन हेतु होते त्या वेळी रेनॉल्डस्, बोकॅशियो वगैरे ग्रथकाराच्या कादवऱ्याची भाषातरें करण्याकडे बऱ्याच महाराष्ट्री लेखकाचे लक्ष लागलेले होते त्या ग्रथकाराच्या कादवऱ्या मनोरजक असल्या तरी त्या अभिजात वाङ्मयात मोडण्यासारख्या नसतात तशी पुस्तके वाचण्याकडे जनतेची झालेली प्रवृत्ति इग्रजीतील उत्तमोत्तम ग्रथ ( भाषातररूपाने मराठीत लिहिलेले ) वाचण्याकडे वळविली गेल्यास लोकाच्या उदारभावना जागृत होतील व त्याच्या एकदर दृष्टीतच फरक पडेल असे तेलगास वाटले दुसरी गोष्ट, सुमारें चाळीस पन्नास वर्षापूर्वी महाराष्ट्रात धर्मसबधी व सामाजिक बाबीसबधी बराच ऊहापोह चालत असे त्यात काही लोकाचे आपल्या हिंदुधर्मात जें एक उदात्त धर्मसहिष्णुतेचे तत्व आहे त्याकडे दुर्लक्ष होत असे ते उदात्त तत्वच " Nathan the Wise" या नाटकात अतर्भूत झालेले आहे त्या तत्वाचे काही उदार मनस्क पाश्चात्य ग्रथकार देखील किती महत्व मानीत असतात हें आमच्या महाराष्ट्रीय लोकास समजावे व हे तत्व वरील ऊहापोहाच्या वेळी त्यानी आचरणात आणण्यास प्रवृत्त व्हावे म्हणूनच तेलगानी वरील पुस्तक लिहून प्रसिद्ध केले असो सदर्हू लेसिगचे इग्रजी पुस्तक तेलगानी सन १८७३ सालीच वाचले होते व त्याचें त्यानी लागलीच मराठीत भाषातरही केले होते पण काशीनाथपताच्या कार्यबाहुल्यामुळे तें प्रसिद्ध करण्याचा बरेच दिवस योग आला नाही तो सन १८८७ मध्ये आला, आणि हे सुमारे दोनशें पानाचे पुस्तक प्रसिद्ध करण्यात आले

मूळ ग्रथकार लेसिग याजविषयी व त्याच्या ग्रथाविषयी वाचकास थोडीशी कल्पना यावी म्हणून पहिल्याने चार शब्द लिहिले पाहिजेत ग्रॅटहोल्ड इफ्राइन लेसिंग ( Granthold Iphraın Lesıng ) हे त्या ग्रथकाराचे सबध

नाव त्याच्यासबधाने काशीनाथपत आपल्या प्रस्तावनेंत म्हणतात की, "लेसिं-गची इग्रजीत दोन चरित्रे हल्ली प्रसिद्ध झाली आहेत त्यावरून दिसून येणारी त्याची अचाटबुद्धि, त्याच्या मनाचा मोठेपणा, त्याचा खरा देशाभिमान, त्याने सासारिक अडचणीत व दु खात देखील विद्यासपादनार्थ व विद्याप्रसारार्थ केलेले परिश्रम, या गोष्टीचा विचार केला म्हणजे वाचकाच्या मनात त्याच्याबद्दल अत्यत पूज्यबुद्धि उत्पन्न झाल्याशिवाय राहात नाही जर्मन भाषेच्या समृद्धीला व जर्मन देशात जो हल्ली ( म्हणजे पन्नास वर्षापूर्वी ) चोहोकडे विद्याप्रसार जारीने चालला आहे त्याला बऱ्याच अशी मूळ कारण लेसिग हाच झाला असे युरोपीयन पडिताचे म्हणणे आहे " हा थोर माणूस सन १७२९ मध्ये जन्मला व सन १७८१ मध्ये वारला तो स्वतत्र विचाराचा मनुष्य असल्यामुळे जर्मनीतील धर्मोपदेशक मड-ळीची त्याच्यावर नेहमी नजर असे त्याने आपले "Nathan the Wise" हे पुस्तक लोकास धर्मसहिष्णुतेचा धडा शिकवावा म्हणून लिहिले त्याचा धर्मा-सबधाने एक सिद्धात असे, "कोणताही एक धर्म तुम्ही घ्या, त्याला सर्वाशी व सर्वत्र अबाधित प्रामाण्य आहे असे म्हणता येत नाही पण दरएक मोठ्या धर्मात सत्याचा काही ना काही तरी अश असतो व त्या धर्माच्या अनुयायी लोकाच्या बुद्धीस व स्वभावास पटतील असे काही चागले गुण त्यात असतात " काशीनाथ-पत म्हणतात की हेच प्रमेय आपल्या भगवद्गीतेच्या पुढील श्लोकात अतर्भूत झालेले आहे —

**यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति ।**
**तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम् ॥ १ ॥**
**स तया श्रद्धया युक्तस्तस्याराधनमीहते ।**
**लभते च ततः कामान् मयैव विहितान् हितान् ॥ २ ॥**
**येऽप्यन्य देवताभक्ता यजंते श्रद्धयान्विताः ।**
**तेऽपि मामेव कौंतेय यजंत्यविधिपूर्वकम् ॥ ३ ॥**

तेलग पुढे म्हणतात की, "आपले प्राचीन मत हेच या ग्रथात सारभूत म्हणून गोवल गेले आहे इतकेच नव्हे तर इतर धर्मामध्ये या सिद्धाताचे ( धर्म-सहिष्णुतेचे ) आपल्यासारखे ग्रहण केले गेलेले नाही असे असता आपल्या लोका-मध्ये अलीकडे अलीकडे व्यवहारात किंचित् निराळा प्रकार दिसू लागला आहे. म्हणजे आपल्याकडे हल्ली व्यवहारात खिस्ती, मुसलमानी व इतर देवता, याची

देखील आराधना होऊं लागावी येथपर्यंत या सिद्धांताचें महात्म्य वाजवीपेक्षां फाजील वाढलें आहे. असो. आपल्यामध्यें हल्लीं धर्मासंबंधानें व सामाजिक विषयासंबंधानें नवा पक्ष व जुना पक्ष असे दोन पक्ष उत्पन्न झाले आहेत. त्यांच्या वर्तनांत कांहीं शोचनीय प्रकार दिसून येतात. तरी एका महापंडिताचें—याच विषयासंबंधानें पण अन्य वेळीं व अन्य स्थळीं प्रकट झालेलें—मत आपल्या लोकांस समजल्यास वरील प्रकारांत कांहीं तरी फरक पडण्याचा संभव आहे." म्हणूनच तेलंगांनीं हें पुस्तक लिहून प्रसिद्ध केलें.

सदर्हू नाटकाचें कथानक फार मनोरंजक आहे. तें आतां थोडक्यांत सांगतों. बाराव्या शतकांत जेरुसलेम येथील येशू ख्रिस्ताच्या समाधीसंबंधानें ख्रिस्ती आणि मुसलमान या लोकांमध्यें बरींच धर्मयुद्धें झालीं हें इतिहासज्ञास श्रुतच आहे. त्या वेळीं जेरुसलेम प्रांताचा सुलतान सालादिन नांवाचा एक राजा होता. तो त्या धर्मयुद्धांतील सेनानायक होता. तोच प्रस्तुत नाटकांतील एक पात्र आहे. जेरुसलेम गांवांत नेथन या नांवाचा एक अत्यंत श्रीमान् यहुदी व्यापारी होता. तो फार धार्मिक वृत्तीचा व नीतिमान् असे. त्याची शहाणपणाबद्दल फार प्रसिद्धि होती. म्हणून लोक त्याला "शहाणा नेथन" म्हणत असत. तो तेथील दुसऱ्या एका गांवीं असतांना ख्रिस्ती लोकांनीं तिकडच्या सर्व यहुदी लोकांची कत्तल केली. त्यांत नेथनची बायको व मुलें मृत झालीं. त्याच सुमारास वुल्फ फिल्ने या नांवाचा वेषानें ख्रिस्ती दिसणारा पण धर्मानें मुसलमान, असा एक नेथनचा मित्र होता. त्याला एक एकुलती एक अशी लहान मुलगी होती. तिची आई मृत झालेली असल्यामुळें तिच्या बापाच्यानें तिला लढाईवर नेववेना. सबब त्यानें तिला आपल्या मोतद्दाराबरोबर नेथनजवळ संभाळण्याकरितां म्हणून पाठविलें. नेथनची बायको-मुलें पूर्वींच मृत झाल्याचें वर सांगितलेंच आहे. अर्थात् देवानेंच ही मुलगी आपणास दिली असें समजून नेथननें त्या मुलीचा स्वीकार केला व तिचें रेका असें नांव ठेविलें. पुढें रेकेचा बाप—वुल्फ फिल्ने—हा मरण पावला तेव्हां नेथननें तिचें पोटच्या मुलीप्रमाणें पालन केलें. तिला त्यानें लहानाची मोठी केली, तिला शिक्षण दिलें. ती मुलगी पुढें चांगली रूपवती, सुस्वभावी व विचारशील अशी निघाली. तिला आपली पूर्वींची माहिती कांहींच नव्हती. नेथनलाच ती आपला बाप समजत असे. तिला धर्मशिक्षण म्हणजे सर्व धर्मांना सामान्य अशीं धर्मतत्वें व नीतितत्वें यांचें शिक्षण देण्यांत आलें होतें. ख्रिस्ती किंवा यहुदी अशा विशिष्ट धर्माचें शिक्षण तिला दिलेलें नव्हतें. नेथनच्या घरीं

**दाया** नावाची एक ख्रिस्ती स्त्री होती तिचे रेकेवर फार प्रेम असे तिनेच **रेकेचें** आईप्रमाणें सगोपन केले होते तिला रेकेच्या जन्मापासूनची सर्व हकीकत माहीत होती स्वत **दाया**चा धर्म ख्रिस्ती जन्म युरोपखडात, त्यामुळे तिच्या मनाचा ओटा त्या बाजूलाच असणे स्वाभाविक होते ती रेकेला वरचेवर बऱ्याच गोष्टी सागे परतु त्याचा रेकेच्या मनावर काहीच परिणाम होत नसे एकदा असे झाले की, नेथन हा व्यापाराकरिता बाहेर गावी गेला होता अशा वेळी इकडे जेरुसलेम गावात त्याच्या घराला आग लागली पण एका " टेंप्लर"ने आगीत उडी घालून रेकेला वाचविली त्या पुरुषाला पाहून रेकेला कृतज्ञता वाटली, व तिला त्याला भेटण्याची इच्छा झाली परतु **टेंप्लर** काही केल्या नेथनच्या घरी येण्यास कबूल होईना मुलगी झुरणीस लागली **दाया**ची इच्छा की, **रेकेनें** एखाद्या ख्रिस्ती तरुणाशी लग्न करावे **दायानें** पुष्कळ खटपट केली परतु **टेंप्लर** हा मनाचा फार थोर मनुष्य होता तो नेथनच्या गैरहजेरीत त्याच्या घरी येण्यास मुळीच कबूल होईना ! काही दिवसानी नेथन घरी परत आला त्याला सर्व हकीकत समजली त्याने **टेंप्लर**ला आपल्या घरी बोलाविले **टेंप्लर** प्रथम जरा उद्धटपणाने वागला परतु नेथनचे शाततेचे व शहाणपणाचे भाषण ऐकून तो जरा नरम झाला, व त्याने नेथनच्या घरी येण्याचे कबूल केले

इकडे सुलतान सालादिन याचा धर्मादाय फार जबरदस्त असल्यामुळे त्याच्या खजिन्यात पैशाची तूट पडली सुलतानच्या मनात नेथनजवळून युक्तीने काही द्रव्य काढावयाचे होते सबब त्यानें नेथनला खरी स्थिति कळविली नाही परतु ती त्याला खजिनदाराकडून पूर्वीच समजली होती नेथन राजास भेटला राजाने त्याला थोडे अडविण्याच्या हेतूने " कोणता धर्म चागला ! " म्हणून प्रश्न केला. नेथनने त्याला तीन आगठ्याची गोष्ट सागून–ही गोष्ट थोडक्यात पुढे येणारच आहे—कळविले की सगळेच धर्म चागले आहेत ! ज्याने त्याने श्रद्धेने आपला धर्म पाळावा हेच उचित ! ! हे उत्तर ऐकून सुलतान आश्चर्यचकित झाला, आणि आपला द्रव्य मागण्याचा हेतु लपवू लागला परतु नेथनने मग आपण होऊन त्याला द्रव्य दिले

तिकडे **टेंप्लर** नेथनच्या घरी जाऊन **रेका** व **दाया** याना भेटला रेकेला पाहून तो मोहित झाला त्याने नेथनजवळ रेकेविषयी मागणे केलें, पण नेथनला **टेंप्लरची** पुरी माहिती नव्हती, सबब त्याने त्याच्या म्हणण्याला एकदम रुकार दिला नाही **टेंप्लरला** राग आला पुढे **दायानें** त्याला सागितले की, **रेका** ही

धर्माने ख्रिस्ती आहे तिला नाकारण्याचा नेथनला अधिकार नाही ती गोष्ट **टेंप्लरनें** मग तेथील धर्माध्यक्षाला कळविली, आणि सांगितले की, एका ख्रिस्ती मुलीला या यहुद्याने आपल्या धर्मात वाढविली आहे ! तदनतर त्या धर्माध्यक्षाने आपला एक मठवासी मनुष्य पाठवून त्याला सर्व प्रकरणाची चौकशी करून येण्यास सांगितले तो मठवासी म्हणजे स्वत संसाराला कंटाळून सन्यास घेतलेला माणूस पण पूर्वीचा मोतद्दार होता ! त्याजबरोबरच रेकेच्या बापाने तिला तिच्या बाळपणात नेथनजवळ पाठवून दिले होते ! त्याने येऊन नेथनला पूर्वीची सर्व हकीकत सांगितली आणि एक पुस्तक दिले त्यावरून **रेका** व **टेंप्लर** ही बहीण-भाऊ आहेत असे त्याला समजले पुढे सुलतान सालादीन याला ते पुस्तक पाहण्याला मिळताच त्यातील काही लेख आपल्या भावाच्या—"असाद"च्या—हातचे आहेत असे आठवून आले व त्या मजकुरावरून **रेका** व **टेंप्लर** ही आपल्या भावाची मुले आहेत अशी सुलतानाची खात्री झाली याप्रमाणे सर्वच गोष्टीचा उलगडा होऊन सगळ्याना आनदी आनद झाला

वर निर्दिष्ट केलेली तीन आगठ्याची गोष्ट थोडक्यात अशी आहे प्राचीन काळी एका गृहस्थाजवळ एक हिऱ्याची आगठी होती ती त्याने आपल्या एका मित्रास दिली आणि सांगितले की, "या आगठीतल्या खड्यात एक गुण आहे ती ज्याच्याजवळ जाईल तोच आपल्या कुटुबात कर्ता व शहाणा असा पुरुष होईल तेव्हा ही तुम्ही आपला जो अगदी आवडता मुलगा असेल त्यालाच द्या" याप्रमाणे ती आगठी एका गृहस्थाजवळ आली त्याला तीन मुलगे होते तिघावर त्याची सारखीच प्रीति होती तो प्रत्येकास सागे की, आगठी तुला देईन पुढे त्याचा अतकाल समीप आला तेव्हा ती आगठी कोणास द्यावी याविषयी त्याला काळजी पडली मग त्याने एक युक्ति काढली त्याने एका जवाहिऱ्यास आपल्या खोलीत बोलाविले आणि त्याला एकातात सांगितले की, या आगठीप्रमाणे हुबेहुब दोन दुसऱ्या आगठ्या तयार करा, खर्च व श्रम कितीही पडोत. आगठ्या तयार झाल्या त्या गृहस्थाने त्या मग तिघा मुलापैकी प्रत्येकाला एक एक देऊन तो स्वर्गस्थ झाला पुढे मुलामध्ये तटे सुरू झाले प्रत्येकजण म्हणे की, आपली आगठी खरी व आपणच घरातला कर्ता पुरुष ! वाद मिटेना पुष्कळ धुसफुस सुरू झाली तडजोडीचे प्रयत्न झाले, पण तिघा भावापैकी कोणीच पड घेईना शेवटी खटला न्यायाधीशापुढे गेला तिघा भावापैकी बापाला कोणीच दोष देईना फक्त तिघापैकी कोणीतरी आपणास फसविले

आहे असे प्रत्येकजण म्हणे न्यायाधीशाने सर्व खटला समजून घेतला आणि आपला निकाल देताना तो म्हणाला, "तुमच्या बापाला ज्या अर्थी इकडे साक्षीला आणता येत नाही, त्या अर्थी या स्थानावरून मला निकाल देता येत नाही तुमची काय समजूत आहे ? मी इकडे कोडी सोडविण्याला बसलो आहे काय ? की आगठी तोंड उघडून बोलेपर्यंत तुम्ही असे वाट पहात बसणार ? खऱ्या आगठीत असा एक गुण असल्याचे मी ऐकिले आहे की ती ज्याच्या जवळ असेल तो सर्वांनाच–ईश्वराला तसाच मनुष्याला–प्रिय असला पाहिजे तसा गुण खोट्या आगठीत नाही वास्तविक या एका गोष्टीवरूनच सगळ्या तंट्याचा निकाल लागतो तुम्ही मला सागा की, तुम्हापैकी कोण दुसऱ्या दोघाना प्रिय आहे ? या आगठ्यातला गुण आतल्या आतच आहे बाहेर काहीच नाहीं तुम्हापैकी प्रत्येकाचे प्रेम केवळ स्वत वरच असेल तर तुम्ही तिघेही ठक आहात, आणि तुम्ही तिघेही ठकविले गेला आहात तुमच्या तिघाच्याही आगठ्या खोट्याच ! खरी आगठी बहुधा हरविली असेल आणि ते छपविण्याकरिता अगर तिची जागा चालविण्याकरिता तुमच्या बापाने तीन नव्या आगठ्या तयार करविल्या असतील यास्तव तुम्हास माझा सल्ला पाहिजे नसेल आणि हुकुमनामाच पाहिजे असेल तर तो मला देता येत नाही तुम्ही जा माझा सल्ला पाहिजे असेल तर ऐका तुम्हापैकी प्रत्येकास तुमच्या बापाने आगठी दिली आहे प्रत्येकाची खात्री की, आपलीच आगठी खरी मला वाटते की, एका आगठीचे फाजील महत्व वाढू नये असेच तुमच्या बापास वाटले असावे एक गोष्ट सत्य आहे बापाचे तुम्हा तिघावर सारखेच प्रेम होते तेव्हा एकावर प्रीति करून दुसऱ्या दोघाना दु खात पाडावे ही कल्पना त्याला रुचली नसावी, म्हणून त्याने तीन आगठ्या करविल्या आणि त्या तुम्हास देऊन तिघानाही सुखी करण्याचा त्याने प्रयत्न केला तरी तुम्ही अशा शुद्ध आणि सात्विक प्रेमाचे अनुकरण करा आपापल्या आगठीतील खऱ्याचा खरा गुण प्रकट करण्याच्या कामी तुम्हा तिघामध्ये चढाओढ लागू द्या, म्हणजे त्या गुणाच्या योगाने तुम्हापैकी प्रत्येकाला सौम्यपणा, शातीची आवड, परोपकारबुद्धि, व ईश्वरावर निष्कपट प्रेम हीं प्राप्त होतील तुमच्या मुलामध्ये, मुलाच्या मुलामध्ये, हे त्या आगठीतल्या खऱ्याचे गुण प्रकट होत गेल्यास तुम्ही एक हजार वर्षांनी या धर्मासनापुढे येऊन उभे राहा, असा माझा हुकूम आहे. त्या वेळी या न्यायासनावर मजपेक्षा अधिक शहाणा न्यायाधीश येणार आहे तो तुम्हाला फैसला सागेल, आता तुम्ही जा " याप्रमाणे सगळ्या गोष्टीचे तात्पर्य

असून ती अत्यंत बोधप्रद आहे. एकाद्या चांगल्या गोष्टीचा दाखला देऊन लोकांस धर्मासारख्या कामांत उदारदृष्टि ठेवण्याबद्दल उपदेश करण्याची तेलंगांची रीत अत्यंत स्तुत्य होती असे कोण म्हणणार नाही ?

---

प्रकरण चवदावें

## व्याख्यानें, परीक्षणें वगैरे.



लोकांची चांगल्या गोष्टीकडे प्रवृत्ति व्हावी व त्यांच्यामध्ये विचारजागृति व्हावी आणि ती चांगल्या मार्गानें व्हावी याकरितां काशीनाथपंतांचे नेहमीं प्रयत्न चाललेले असत. मुंबईस "हिंदु यूनियन क्लब" चे ते अध्यक्ष होते. तेथें मंडळी जमली आणि त्यांत तेलंग असले म्हणजे संभाषणाचे प्रसंग वरचेवर येत असत. परंतु होतकरू मंडळीला ज्ञानसंपादन करण्याची सवय लागावी, त्यांना त्या कामीं उत्तेजन मिळावें म्हणून काशीनाथपंतांनी सन १८८६ सालापासून हिंदु यूनियन क्लबाच्या आश्रयाखालीं हेमंतोत्सवव्याख्यानमाला सुरू केली. त्या मालेंत दरवर्षी चांगल्या चांगल्या विद्वान् लोकांचीं मराठींत व्याख्यानें होत असत. खुद्द तेलंगांचीं दोन व्याख्यानें झालीं. तीं दोन्ही अत्यंत महत्वाचीं व बोधप्रद अशीं झालीं. त्यांपैकीं एक सन १८८६ मध्यें "शास्त्र व रूढि यांच्या बलाबलाविषयीं विचार" या विषयावर झालें. आजकाल हिंदुलोकांमध्यें सामाजिक बाबतींत बरीच विचारक्रांति झाली आहे, आणि त्यामुळें सुधारणेच्या कामीं आमचें पाऊल पुष्कळ पुढें पडलें आहे व पडत आहे. तेलंगांच्या वेळीं—चाळीस वर्षांपूर्वी—असा प्रकार नव्हता. सामाजिक सुधारणेचा प्रश्न त्या वेळीं अधिक बिकट होता. समाजांत तेव्हां जुना-नवा असे दोन पक्ष झाले होते. हमरी-तुमरी चालत असे. अर्थात् समाज-सुधारकांना त्या वेळीं फारच श्रम पडत असत. नव्या-जुन्या गोष्टींची चांगल्या रीतीनें सांगड घालून समाजास अत्यंत हितकर असा उपदेश करणें हाच उत्तम मार्ग होता. त्या मार्गानें निरनिराळे प्रश्न जनतेपुढें मांडून तिला त्या प्रश्नाविषयीं विचार करावयास लावणें हेंच सुधारकाचें खरें काम होतें. तें काम काशीनाथपंत तेलंग उत्तम रीतीनें करीत असत. जुन्यांतलें चांगलें ठेऊन नवीन परिस्थितींत कसें वागावें हें दाखविणें हेंच त्या वेळीं अत्यंत महत्वाचें काम होतें. तें काम करण्याच्या हेतूनेंच

तेलगानी " शास्त्र व रूढि " हा विषय घेऊन त्यावर व्याख्यान दिले व्याख्यान वरेंच विस्तृत आहे व ते पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाले आहे ते सवड असेल त्यानी मुळातच जरूर वाचावे आम्ही इकडे त्याचा फक्त सक्षिप्त रीतीनें उल्लेख करतो

त्या वेळी लोकात दोन पक्ष होते, हे सागितलेच एकाला शास्त्राविरुद्ध रूढि त्याज्य वाटत असत दुसऱ्याला "शास्त्राद्रूढीर्बलीयसी" हे मत मान्य असे खरा प्रकार म्हणजे असा आहे की, शास्त्र म्हणून जे आहे त्यात वेद, स्मृति, पुराणे या सर्वांचा अतर्भाव होतो तेव्हा सर्व ग्रथाचा मथितार्थ काय आहे ते पाहिले पाहिजे व त्याप्रमाणेच आपण नेहमी वागत आलो आहो की काय तेही पाहिले पाहिजे आणि मग आपण प्रस्तुत कसे वागले पाहिजे हे ठरविले पाहिजे दुसरी गोष्ट अशी की, स्मृती वगैरे ग्रथात जे नियम घालून दिले आहेत ते त्या त्या कालाचे दर्शक आहेत तो काल किंवा तो समाज आता राहिला नाही समाजाची नेहमी उत्क्राति होत असते तेव्हा शिष्टजनाच्या मताने सदरील नियमात योग्य ते फेर-फार करण्यास हरकत नाही उदाहरणार्थ, द्रोणाचार्य, अश्वत्थामा, कृपाचार्य, परशु-राम या ब्राम्हणानी क्षात्रधर्म स्वीकारल्याचे दाखले आहेत त्याचप्रमाणे जनक, विश्वामित्र यानी ब्राह्मणधर्म स्वीकारला होता मधुविद्या, पचाग्निविद्या या ब्राह्म-णानी क्षत्रियापासून घेतल्या असे छादोग्य उपनिषदात सागितले आहे पेशवाईत खुद्द रामशास्त्री प्रभुणे यानी पेशव्याना स्नान-सध्या कमी करण्याचा उपदेश केल्याचे प्रसिद्धच आहे मातुल कन्येशी विवाह करण्यास हरकत नाही हे कृष्णा-र्जुनाच्या उदाहरणावरून स्पष्टच होत आहे द्रौपदीच्या विवाहाचे कुमारिल भट्टाने समर्थन केले आहे, ते असे —

**यौवनस्थैव कृष्णाहि वेदिमध्यात्समुत्थिता ।**
**साच स्त्री श्रीश्च भूयोऽभिभुज्यमाना न दुष्यति ॥**

तात्पर्य,

**"यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरोजनः ॥"**

हे गीतावचन प्रसिद्धच आहे तसेंच आयुधजीवी ( आयुधाचा उपयोग करून उपजीविका करणारे ) आपल्या देशात ब्राम्हण होते असे पाणिनी म्हणतो अशी जात आज पजाबात आहे असे डॉ बुल्हर यानी एके ठिकाणी लिहून ठेविले आहे साराश, शास्त्रे म्हणजे कायम ठशात बसविलेली चौकट आहे, तिच्यात फेरफार करणे रास्त नाही असे म्हणण्यात अर्थ नाही चार शिष्ट लोक ठरवितील ते फेर-

फार त्यात करण्यास हरकत नाही तेलंग म्हणतात की, "माझ्या मते मूळशास्त्र-काराचा हेतु असा असावा की, देश, काल, वर्तमान याकडे लक्ष देऊन धर्मशास्त्र-नियमात वेळोवेळी शिष्टानी विचार करून फेरफार करावे असे केल्याने स्मृतिकाराचा शहाणपणा व दूरदर्शीपणा दिसून येतो जे धर्मनियम एका स्थितीत सोईवार असतात, ते स्थित्यंतर झाल्यावर प्रतिबंधक होऊन असुखास कारणीभूत होतात"

व्याख्यानानंतर बराच वादविवाद झाला आणि शेवटी तेलंगाचे भाषण झाले ते म्हणाले, "जुन्याकडे आपला कल असला पाहिजे हे म्हणणे मला मान्य आहे पण ते जसेचे तसे आम्ही राखणार हे म्हणणे व्यर्थ आहे त्यात कालमानाप्रमाणे फेरफार हा केलाच पाहिजे आपल्या देशात पुनर्विवाहाची पद्धत होती याला दाखले मिळतात

**नैकस्यै बह्वः सहपतयः ।**

असे ऐतरेय ब्राह्मणात वचन आहे असे आणखी आधार मिळतील महाभारतातील दमयंतीची कथा प्रसिद्धच आहे तिने स्वयंवर मांडला होता म्हणूनच ऋतुपर्णराजा त्या हेतूने आला होता या सर्व गोष्टी खऱ्या आहेत परंतु ती पुनर्विवाहाची चाल पुढे काही कारणाने बंद पडली हुएनसँगच्या वेळी ती प्रचारात नव्हती प्राचीनकाळी देखील ती एक गौण प्रकार अशीच मानली जात असे इंग्रज लोकात देखील तो गौण प्रकारच मानीत असत डिकन्सच्या एका प्रसिद्ध कादंबरीत सामवेलरला त्याच्या बापाने "Never marry a widow" असाच उपदेश केला आहे तरी ती चाल हिंदुस्थानात प्रचारात होती हे कबूल केले पाहिजे, आणि हल्लीच्या परिस्थितीमध्ये विवाह करू इच्छिणाऱ्या विधवांना आडकाठी असता कामा नये

"जें चाललें आहे तेंच ठीक आहे आम्ही त्यात फेरफार करणार नाही व करू देणार नाही असे म्हणून आज चालणार नाही सृष्टिनियमाप्रमाणे आमच्या देशाच्या परिस्थितीत फेरफार होत जाणारच जशीची तशी स्थिति कधीही राहणे शक्य नाही याकरिता कालमानाप्रमाणे जे योग्य फेरफार व्हावयाचे त्याला काही तरी वाट दाखवून द्या आणि त्या फेरफाराच्या योगाने प्रथम काही दिवस जी गैरसोय होईल ती सोसण्यास तयार व्हा, आणि ही सर्व व्यवस्था आपल्याच हाती राहील असे करा कालमानाप्रमाणे पूर्ण विचार करून सत्य स्मरून जी सुधारणा करावयाची ती आमच्या आम्हीच करणे चांगले अर्थात् वर जे मी दोन

सिद्धात सागितले—एक, स्मृति म्हणजे त्या त्या कालचे लिहून ठेवलेले रीति रिवाज होत व दुसरा, त्या स्मृतीप्रमाणे शिष्टजनाना त्यात फेरफार करण्याचा अधिकार आहे—त्याबद्दल विचार होऊन त्याचे लोकाकडून ग्रहण व्हावे अशी सूचना आहे तिसरा मार्ग मला दिसत नाही " अशाप्रकारचे न्या तेलगानी वरील विषयावर केलेले अत्यत सुदर विवेचन सर्वानाच–जुन्या व नव्या लोकास –पटल्याचे इदुप्रकाशकर्त्यानी आपल्या ता २५ जानेवारी १८८६ च्या अकात लिहिल्यावरून स्पष्ट दिसते

काशीनाथपतानी सदहू व्याख्यान मालेत दुसरे एक व्याख्यान दिले ते त्यानी सन १८८९ साली, "सामाजिक विषयासबधी तडजोड" या विषयावर दिले ते व्याख्यान त्यानी जॉन मॉर्लेच्या एका ग्रथाच्या आधाराने लिहिलेले असल्यामुळे त्यात आधाराची व दाखल्याची त्यानी रेलचेल उडवून दिली आहे ते व्याख्यान बरेच विस्तृत असल्यामुळे ते सगळे इकडे देता येणे शक्य नाही सबब त्याचा अगदी थोडक्यात साराश देतो

कोणत्याही सामाजिक प्रश्नाविषयी विचार करताना तो विचार, उच्चार व आचार ( thought, word and deed ) या क्रमाने केला पाहिजे त्यापैकी "विचारा" सबधाने तेलग सिद्धात रूपाने असे म्हणतात —" आपली ईश्वरासबधाने, समाजासबधाने व राष्ट्रासबधाने काय कर्तव्यकर्मे आहेत याबद्दल प्रत्येक सुशिक्षित मनुष्याने आपल्या बुद्धीप्रमाणे खोल विचार करून आपली मते, होईल तितक्या अशाने कायम केली पाहिजेत आणि असे ठरविताना "न हि सत्यात्परो धर्म" हेच महावाक्य प्रमाणभूत मानले पाहिजे " दुसरा प्रश्न, वाडवडिलाची मते व त्याची वर्तनपद्धत याकडेही लक्ष दिले पाहिजे आम्ही वाडवडिलाचेच सर्व बाबतीत अनुकरण करू असे म्हणून केव्हाही चालणार नाही तसे करू म्हटल्यास सुधारणा होऊन समाजाचे पाऊल केव्हाही पुढे पडण्याची आशाच नको पण मुख्य गोष्ट लक्षात धरावयाची म्हणजे त्याची जी वर्तन पद्धत सोडून तिच्या जागी दुसरी सुरू करणार, तिच्यापेक्षा, ही अधिक हितकर असली पाहिजे, इतकेच नव्हे तर हिच्या समर्थनार्थ आपल्या जवळ तशी भरपूर प्रमाणे व युक्तिवाद ही असली पाहिजेत असे असल्यास ती नवी वर्तनपद्धत सुरू करण्यास मुळीच हरकत नाही

हल्ली आपण सक्रमण स्थितीत आहो त्यामुळे आपल्या भोवतालच्या स्थितीत व आपल्या समाजाच्या स्थितीत आपोआपच काही फेरफार होत आहेत.

ते कोणासही थांबविता येणार नाहीत अशा स्थितीत आम्ही जुन्यालाच चिकटून बसू किंवा तसे चिकटून बसण्याच्याच दृष्टीने त्याचा आम्ही विचार करू असे कोणी म्हटल्यास ते म्हणणे कोतेपणाचे होईल—किंबहुना आपलपोटेपणाचेही होईल यास्तव तसे काही एक न करता सर्व परिस्थितीचा विचार करून प्रत्येकाने आपल्या कर्तव्याची दिशा ठरवावी हेच श्रेयस्कर होय.

याप्रमाणे आपला "विचार" किंवा मत ठरल्यावर त्याचा "उच्चार" कसा व केव्हा करावयाचा हा प्रश्न आलाच सत्यप्रतिपादन देखील केव्हा केव्हा विवक्षित समाजस्थितीत अति धोक्याचे असते म्हणजे तशा स्थितीत सत्यप्रतिपादन केल्या-पासून फायद्यापेक्षा तोटाच अधिक होण्याचा संभव असतो सबब सत्यप्रतिपादन—स्वमतप्रकाशन—हे सर्व परिस्थितीचा विचार करून करावे हेच चांगले चांगले कृत्य करावे हे खरे, पण तितकेच केव्हा केव्हा पुरे नसते ते चांगल्या रीतीनेही केले पाहिजे याला तेलंगानी एका मेस्त्र्याचे उदाहरण दिले आहे एकादे घर पाडावयाचे असेल तर शहाणा मेस्त्री ते एकदम पाडू लागणार नाही तर घराचे निरनिराळे भाग परस्पर कसे जोडले गेले आहेत ते तपासपूर्वक पाहून मग तो ते घर पाडण्यास सुरवात करील ते अशा रीतीने की, त्यायोगे दुसऱ्या कोणासही इजा पोहोचणार नाही ! याच तत्वाच्या समर्थनार्थ तेलंगानी दुसरे एक उदाहरण दिले आहे त्याच्या वेळी १८८९ मध्ये इंग्लंडात आयर्लंडचा प्रश्न उपस्थित होऊन बरीच जंगी चळवळ चालली होती त्यामुळे तेथील मुत्सद्दी लोकांस दुसरे काही एक सुचेनासे झाले होते अशा वेळी हिंदुस्थानविषयक प्रश्न—तो कितीही महत्वाचा व निकडीचा असला तरी—तिकडे पुढे न आणणेच बरे ! त्याचप्रमाणे हल्ली वर्णसंकर न करता पुनर्विवाहास हळूहळू लोकमत अनुकूल होत चालले आहे त्यातच पुन्हा जातिभेद मोडण्याचे मिश्रण करणे ठीक नव्हे सारांश, सर्व ठिकाणी आपल्याच पायाखाली नुसती दृष्टि ठेवून चालत नाही, तर दूरवर दृष्टि फेकली पाहिजे

आता "आचारा"विषयी थोडेसे सांगू "क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे," हे वचन सत्य आहे व तदनुसार मतप्रतिपादन करणारा वागला तर उत्तमच पण व्यवहारात ते सर्वांनाच नेहमी शक्य नसते म्हणजे तो आपल्या मताप्रमाणे न वागला—कोणत्याही कारणाकरिता असो—तर त्याच्या प्रतिपादनाची किंमत कमी होते असे नाही कोणी एकादा मनुष्य मूर्तिपूजा आपणास मान्य नाही म्हणणारा, एकाद्या वेळी देवळात, कोणत्याही कामाकरिता, गेला म्हणजे काही बिघडते असे नाही तो केवळ साधुच असता तर गोष्ट निराळी तसेच स्त्रीशिक्षणासंबधाने

एकाद्याने पुष्कळ प्रयत्न करूनही घरातल्या बायका शिकत नाहीत, तर त्याने स्त्री-शिक्षणाबद्दलचा उपदेश करू नये असे होत नाही मुख्य मुद्दा हा की, " एकादा मनुष्य म्हणाला की, अमकी अमकी समजूत अज्ञानमूलक आहे अशी माझी खात्री झाली म्हणून ती मी सोडून देणार आणि त्याविषयी मी छपवणूक कधी करणार नाही, तर ही तडजोड रास्त व न्याय्य होईल पण मी जे सत्य समजतो ते तुम्हाला पटले नाही किंवा ते तुम्हास मी पटवू शकत नाही, म्हणून तुम्ही जे असत्य अंगिकारले आहे ते मला मान्य आहे असे मी दाखवीन, ही तडजोड बरोबर होणार नाही ती अन्यायाची होईल " उदाहरणार्थ, पुनर्विवाह हा शास्त्र-विरुद्ध नाही पण लोक जर तसा मानतात तर प्रथम अक्षतयोनि विधवा-विवाह सुरू करणे ही रास्त तडजोड होईल इंग्लडला जाणे हे शास्त्रविरुद्ध आहे, पण कोणी तसा जाऊन आल्यास त्याला प्रायश्चित्त देऊन जातीत घेणे ही तडजोड न्यायाची होईल साराश, समाजसुधारणा करणे ती हळूहळू केली पाहिजे तिला दिनावधि लागेल हे खरे, पण ती दिनावधि लागूनही लोकात सुरू झाली तर ती कायम व पक्की होईल मात्र मध्यतरी प्रयत्न किंवा खटपट सोडता कामा नये

सदर्हू प्रकारचे विचार तेलगानी एका व्याख्यानात प्रकट केलेले इकडे थोड-क्यात दिले आहेत ते आज सर्वांनाच पटतील असे वाटत नाही कित्येकास तर ते अगदीच धरसोडीचे वाटतील परतु ते विचार काशीनाथपतानी चाळीस वर्षा-पूर्वी महाराष्ट्रीय श्रोतृसमाजापुढे माडले होते हे आम्ही लक्षात ठेवले पाहिजे या चाळीस वर्षात सामाजिक सुधारणेच्या दृष्टीने महाराष्टात आम्ही पुष्कळ आघाडी मारली आहे दुसरी गोष्ट अशी की, तेलग स्वत जुन्या वळणाच्या कुटुबात वाढ-लेले असल्यामुळे त्याचा नेहमी कल जुन्या लोकाना घेऊन पुढे जाण्याकडे असे त्यामुळे त्याच्यासारख्या माणसाचे काम अत्यत बिकट झालेले होते याची अल्पशी वाचकाना कल्पना यावी म्हणून तेलगाच्या सदरील व्याख्यानात नमूद असलेल्या एक दोन गोष्टीचा इकडे उल्लेख करतो सन १८८६ साली काही जुनी शास्त्री मडळी त्या वेळचे मुबईचे गव्हर्नर साहेब लॉर्ड रे यास भेटण्याकरिता गेली होती त्याचा उद्देश हा होता की, सरकारने मद्यपाननिषेधाच्या कामी सर्वत्र मनाई ( Prohibition ) करावी परतु तेच शास्त्री बालविवाह बद करण्याचे कामी सरकारने हात घालू नये असे म्हणत होते ! दुसरी गोष्ट--तेलगाचे व एका जुन्या शास्त्रीबुवाचे सामाजिक बाबतीत बोलणे झाले त्यात इग्लडास जाण्याचा प्रश्न निघाला त्याविषयी ते शास्त्रीबुवा म्हणाले, " विलायतेस जाणे आता बद होणार

नाही ते प्रस्तुत फायदेशीरही आहे पण तुम्ही आम्हास विचारू नका तुम्ही विचारले की, आम्ही "शोधितस्याप्यसग्रह" ( शुद्ध झाला तरी त्याला जातीत घेऊ नये ) असेच सागणार तुम्ही विचारले नाही तर आम्ही गप बसणार" तात्पर्य, त्या वेळच्या शास्त्रीबुवाना परिस्थिति कशी बदलत चालली आहे हे स्पष्ट दिसत होते परतु धर्ममर्यादा कशी पाळावी व अधर्म कसा टाळावा या सबधाने मात्र त्याच्या स्पष्ट कल्पना झाल्या नव्हत्या अशा स्थितीत समाजसुधारकाना त्या वेळी काम करावयाचे होते त्यामुळे काम किती अवघड होते व सुधारकाना त्या वेळी किती जपून वागावे लागे याची कोणासही कल्पना होईल

सामाजिक सुधारणेचा तो जवळ जवळ आरभच असल्यामुळे दाभिक लोकाचाही महाराष्ट्रात तोटा नव्हता हल्ली देखील असे लोक नाहीत असे नाही, पण ते त्या वेळी फार होते याबद्दलची काही तेलगानी उदाहरणे दिली आहेत कित्येक सुधारणाद्वेष्टे होते त्याचे स्वत चे वर्तन पाहिल्यास सुधारकाच्याही पलीकडचे असे परतु तरी सुधारकाच्या मताना किवा कृतीना नावे ठेवण्यास मात्र ते नेहमी तत्पर असत ! मद्यपान करणारे लोक त्यासबधाने काही बोलावयाचे नाहीत परतु आपल्या घरच्या बायकाना बरोबर घेऊन कोणी फिरावयास गेल्यास त्यावर ते टीका करीत ! दुसरे उदाहरण, "धर्मच अर्थच" ही धर्माज्ञा गुडाळून एका बाजूला ठेवणारे लोक, पुनर्विवाह हा अनाचार आहे असे म्हणत असत व तो करणाऱ्याना व्यवहारबाह्य मानीत असत ! तिसरे उदाहरण, स्वत विजार घालणारे लोक टोपी किवा रुमाल वापरणाऱ्या लोकास दोष देत असत चवथे उदाहरण, ब्राह्मणानी शूद्राबरोबर बसून जेवावे असे प्रतिपादन करणारे स्वत कमी जातीच्या माणसाबरोबर जेवण्यास मात्र तयार नसत पाचवे उदाहरण, मुलाची शिक्षणाची सोय होऊन त्याना मोठमोठे हुद्दे मिळावे म्हणून शाळा कालेजे पाहिजेत असे म्हणणारे लोक स्त्रियाना मात्र "न स्त्री स्वातत्र्यमर्हति" या महावाक्याच्या आधारावर, कथा पुराणे, स्वयपाकघर याच्या पलीकडे काही नको म्हणत असत तात्पर्य, हे सर्व त्या वेळच्या सुधारणेच्या मार्गातल्या अडचणी दाखविण्याकरिताच लिहिले आहे तेलग स्वत सुधारणेच्छु होते, व त्याकरिता ते तनमनधने करून खटपट करीत असत व ते सर्व ते स्वत जुन्या मताच्या कुटुबात राहून करीत असत अशा स्थितीत त्यानी दिलेले वरील व्याख्यान होय असो

काशीनाथपतानी आपल्या मातृभाषेची आपल्या बुद्धीप्रमाणे कसकशी सेवा चालविली होती हे दाखविण्याकरिताच त्यानी लिहिलेल्या दोन पुस्तकाविषयी व

त्यानी दिलेल्या दोन व्याख्यानाविषयी एथपर्यंत विवेचन केले परतु मराठी भाषेच्या अभिवृद्धीकरिता त्यानी अन्य रीतीनें देखील खटपट चालविली होती सन १८८८ मध्ये मुबई युनिव्हर्सिटीच्या अभ्यासक्रमात मराठीचा प्रवेश करण्याबाबतची सिनेट पुढ सूचना आली होती त्या वेळी जी कमिटी नेमण्यात आली तिनें "बी ए च्या प्रश्नपत्रकात देशीभाषात भाषातर करणे व निबध लिहिणे या गोष्टीचा अतर्भाव झाला पाहिजे" असे ठरविले, व त्याप्रमाणे तेलगानी सिनेटपुढे ठराव माडण्याचे कबूल केले पण अखेर युनिव्हर्सिटीनें ती सर्व योजना त्या वेळी फेटाळून लाविली! असो, पण तेलगानी मराठी भाषेची सेवा करण्याचा अन्य दिशेनें प्रयत्न चालविला हिंदु युनियन क्लबमध्ये बहुधा विद्वान् व सुशिक्षित लोकाचाच भरणा असे त्यापैकी इच्छा व सवड असेल त्यानें मराठी भाषेची काही तरी सेवा करण्यास प्रवृत्त व्हावें म्हणून क्लबात बरेच दिवस याविषयी चर्चा चालली होती, व त्याबद्दलची एक योजना ( scheme ) तयार करण्याचे तेलगानी कबूल केलें होते ती योजना मुकर ठरून सन १८९० साली क्लबमध्ये न्या तेलगाच्या अध्यक्षतेखाली एक बाराजणाची कमिटी नेमण्यात आली तिचे "महाराष्ट्र भाषासवर्धक मडळी" असे नाव ठेवण्यात येऊन तिचा "मराठी भाषेत विशेषेकरून ऐतिहासिक, चरित्रात्मक, बोधपर व इतर उपयुक्त विषयावर सुलभ व मनोरजक ग्रथसमूह वाढवावा" असा हेतु आहे असे जाहीर करण्यात आलें होते याबद्दलचा सर्व खुलासा केसरीच्या ता २५-११-९० च्या अकात मिळेल असो या मडळीत ठरल्याप्रमाणे कित्येक गृहस्थाकडे भाषातर किंवा रूपातर करण्याकरिता म्हणून काही निवडक इग्रजी पुस्तकें वाटण्यात आली होती कै वि को ओक यानी "एब्राहाम लिंकन" याचें सक्षिप्त चरित्र लिहिलें आहे ते त्याच्या प्रस्तावनेत लिहितात -"चरित्र लिहिण्याविषयी आम्हाला प्रथमत आन जस्टिस का त्रि तेलग यानी सुचविलें त्यास आधारभूत म्हणून एक फार उत्तम इंग्लिश पुस्तक पाठवून दिलें आणि आमच्या विनतीस मान देऊन, त्यास इतर मोठमोठी कामे अनेक होती तरी, आमच्या पुस्तकाचा हस्तलेख वाचून पाहिला आणि छापील कच्चे खर्डे तपासून त्यात जागोजाग पुष्कळ चागली भर घातली ती इतकी की, ह्या पुस्तकात रसिकास मान्य, विद्वानास प्रिय, सामान्यास बोधपर आणि मर्मज्ञास मनोरजक असे जर कोठे काही असलें तर ते सगळे ह्या सत्पुरुषाच्या हस्तस्पर्शाचे फळ आहे म्हणून त्याबद्दलचे सगळे यश त्याचे आहे" त्याचप्रमाणे "Max-Muller's Selected Essays" हे पुस्तक भाषा-

तराकरिता कै हरि महादेव पडित ( नागपूर ) याजकडे देण्यात आलें होतें असो परतु दुदवाची गोष्ट ही की, वरील योजनेपासून फळाऱ्या दृष्टीनें पूर्वोक्त ओकाच्या पुस्तकापलीकडे काही एक निष्पन्न झालें नाही ! तेलगाच्या मृत्यूनतर तिकडे हि० यू० क्लबमधील कोणीच प्रमुख सभासदानें लक्ष दिलेलें दिसत नाही

हेमतोत्सव व्याख्यान मालेंतील व्याख्यानानतर वादविवाद होत असे त्यात काशीनाथपत वरचेवर भाग घेत असत वादविवादात भाग घेतेवेळी ते जी भाषणे करीत असत त्यावरून श्रोत्याना बऱ्याच नवीन गोष्टी समजत असत व काही बाबी-सबधानें त्याची मतेही लोकास समजत असत अशा एकदोन प्रसगासबधानें थोडासा उल्लेख करतो सन १८८८ च्या जानेवारीत हेमतोत्सव मालेंत पुण्याचे रा रा काशीनाथ त्रिबक खरे याना मागच्या वर्षाची "मद्रासची राष्ट्रीय सभा" या विषयावर व्याख्यान दिलें ना तेलग हे अध्यक्षस्थानी विराजमान झाले होते एकदरीत व्याख्यान चागलें झालें पण त्यात व्याख्यात्यानी मुबईच्या व पुण्याच्या काही पुढारी मडळीची पुढील प्रमाणे हजेरी घेतली रा खरे म्हणाले, "मद्रासच्या काँग्रेसला मुबई पुण्याची मोठी मडळी गेली नाही, + + मुबईतील प्रेसिडेन्सी असोशिएशन व पुण्यातील सार्वजनिक सभा ह्या आज मुबई इलाख्यात प्रमुख आहेत राजकीय सबधानें प्रजेच्या हिताच्या गोष्टी योग्य प्रसगी करण्याचा या सभानी विडा उचलला असून न्याशनल काँग्रेसच्या प्रसगास ह्या दोनही सभाचे अनेक सेक्रेटरी असून ते फार हुशार व कामास लायक असता त्यापैकी एकही गेले नाहीत तेव्हा ह्या इलाख्याचे दुदवच म्हटलें पाहिजे दुसरे काय ?" मुब-ईतील प्रेसीडेन्सी असोशिएशनचे ना तेलग हे एक सेक्रेटरी होते अर्थात् व्याख्यात्याच्या ( खऱ्याच्या ) भाषणाचा खरा रोख त्याच्यावरच ( तेलगावरच ) होता हे उघडच आहे तरी त्या टीकेनें रुष्ट न होता तेलगानी शातपणे, "पुढा-ऱ्यावर लोकानी जरूर टीका करावी" असे सागितलें ते म्हणाले, "प्रमुखानी आपलें काम वेळच्या वेळी न बजावलें तर मागील मडळीनें त्यास कान धरून उठविलें पाहिजे व त्यास नेहमी टोचणी लाविली पाहिजे या कामाकरिता मागील मडळी नेहमी जागृत असली पाहिजे ×× पुढाऱ्यास दोष देऊन स्वत मात्र पुन अकरा महिने झोप घेता कामा नये पुढाऱ्यास टोचणी लावीत राहिलेंच पाहिजे तरच कार्यसिद्धि होईल" आपल्या समक्ष आपल्यावर टीका झाल्यास तिचा निकाल लावण्याची ही तेलगाची रीत किती समजसपणाची होती बरें ?

सन १८९० साली दुसऱ्या एका व्याख्यानानतर झालेल्या वादविवादात कै प्रोफेसर जिन्सीवाले याचे एक भाषण झाले अध्यक्षस्थानी न्या तेलग हेच होते त्या व्याख्यानाच्या वेळी आम्ही स्वत हजर होतो वादात आमच्या फलज्योतिषाचा प्रश्न निघाला त्याविषयी प्रोफेसर साहेब यानी आपले मत श्रोतृजनास सागितले व ते सागताना ते जरा आधुनिक सुशिक्षित लोकावर घसरले ते म्हणाले, "फलज्योतिष हे एक शास्त्र आहे त्या शास्त्राप्रमाणे गणित बिनचूक रीतीने केलेले असल्यास अमुक गोष्ट अमुक वेळी घडावयाची ती तशी घडलीच पाहिजे त्यात चूक कधीच व्हावयाची नाही हल्लीचे काही सुशिक्षित लोक या शास्त्राचा अभ्यास न करता उगीच "ते खोटे आहे" असे म्हणतात मी ह्या शास्त्राचा अभ्यास केला आहे, आणि ते शास्त्र खरें आहे अशी माझी खात्री झाली आहे याबद्दल मी वाटेल त्याची—तशी त्याची इच्छा असल्यास—खात्री करून देण्यास तयार आहे" वादविवादाच्या शेवटी तेलगाचे भाषण झाले त्यात त्यानी जिन्सीवाल्याच्या वरील मुद्यासबधाने असे म्हटले, "फलज्योतिषासबधी काही ग्रथ मी वाचले आहेत माझा अभ्यास जिन्सीवाल्याच्या इतका नसेल पण मी जे वाचले आहे त्यावरून ते शास्त्र खरे आहे अशी माझी खात्री झाली नाही प्रो जिन्सीवाले तशी खात्री करून देतो असे म्हणतात मी तशी खात्री करून घेण्यास तयार आहे पण "प्रथम तुम्ही काही दिवस त्याचा अभ्यास केला पाहिजे" अशी जर त्यात अट असेल तर ती मात्र मला कबूल नाही" यावर प्रोफेसरसाहेब फक्त "ठीक आहे" इतकेच म्हणाले. पण नतर जिन्सीवाल्यानी तेलगाना कधी पुस्तके दाखविल्याचे अगर त्याची आपल्या प्रतिज्ञेप्रमाणे खात्री केल्याचे आम्ही ऐकलेही नाही व तसे प्रसिद्ध झालेले पाहिलेही नाही ! असो हेमतोत्सव व्याख्यानमालेच्या वेळी असे नेहमी वादविवाद होत असत व त्यात तेलग वरचेवर भाग घेत असत

काशीनाथपत तेलग होते तोपर्यंत हिंदु यूनियन क्लबच्या आश्रयाखाली हेमतोत्सव व्याख्यानमाला चागली चालली नतर तिच्यात राम उरला नाही अखेर थोड्या दिवसानी ती बदच पडली पण ही तिच्या क्षीणतेची चिन्हे सन १८९३ मध्ये तेलग आजारी पडले तेव्हापासूनच दिसू लागली होती याचे कारण काय ? याच विषयावर सन १८९३ मधल्या केसरीच्या ( १४–३–९३ ) एका अकात मुबईच्या एका बातमीदाराचे पत्र प्रसिद्ध झाले आहे त्यावरून त्या वेळच्या वस्तुस्थितीवर बराच प्रकाश पडतो तो बातमीदार थोडक्यात म्हणतो —"हेमतोत्सव अगदी मोडकळीस आला नामदाराची ( तेलगाची ) प्रकृति अस्वस्थ आहे.

व रावसाहेब वा आ मोडक यानी पेनशन घेतल्यामुळे ते बाहेर गावी असतात रा किर्लोसकर व रा वैद्य हे आम्हास सोडून गेले त्याला इलाज नाही पण बाकीचे सर्व आहेत ना? ते का येत नाहीत? माझ्या मते याचे उत्तर एवढेच की, कोणाला असल्या गोष्टीची आस्थाच नाही व कोणाला यात मन घालावयास नको"

काशीनाथपत याची मराठी भाषेच्या दृष्टीने वाङ्मयाची सेवा केवळ दोन पुस्तके लिहून अगर दोन व्याख्याने देऊन किंवा फार तर काही व्याख्यानानतरच्या वाद विवादात भाग घेऊनच सपली असें नसून ते आपल्या वेळी प्रसिद्ध होणाऱ्या मासिक पुस्तकाची सहानुभूति-युक्त परीक्षणे करून अगर नवीन पुस्तकाची गुणदोष विवेचनात्मक चर्चा करूनही ती ( सेवा ) करीत असत याची एक दोन उदाहरणें देतो सन १८७८ च्या सुमारास कै विष्णुशास्त्री चिपळूणकर, कै काशीनाथ नारायण साने व कै बाळाजी जनार्दन मोडक या तीन गृहस्थानी मिळून "काव्येतिहास सग्रह" मासिक पुस्तक सुरू केलं होते, व त्यात त्यानी मराठी व सस्कृत कविता, जुन्या बखरी वगैरे प्रसिद्ध करण्याचा स्तुत्य उपक्रम केला होता काशीनाथपत तेलगानी सन १८८० साली "Indian Antiquary" मध्ये त्या मासिकाचे इग्रजीत गौरवयुक्त परीक्षण करून ते लोकाश्रयास पात्र आहे अशी त्याची शिफारस केली आहे त्याचा थोडक्यात साराश असा —" काही सुशिक्षित लोकास आपल्या मातृभाषेविषयी कळकळ वाटत नाही इतकेच नव्हे, तर कित्येक तिजबद्दल तुच्छाताही दाखवीत असतात पण हा प्रकार आता मागे पडून आपल्या मातृभाषेची अभिवृद्धि करण्याकडे काही सुशिक्षित लोकाचे लक्ष लागत चालले आहे हे सुचिन्ह आहे, व याबद्दल "काव्येतिहास-सग्रह" मासिकाच्या सपादकाचे अभिनदन केले पाहिजे" याच्या पुढे बराच मजकूर लिहून शेवटी तेलग आपला अभिप्राय देतात —"एकदरीत मासिक उत्तम चाललें आहे, आणि ज्याना ज्याना आपल्या मराठी व सस्कृत वाङ्मयाबद्दल कळकळ वाटत असेल व विशेषत ज्याना आपल्या महाराष्ट्राच्या इतिहासाचे महत्व वाटत असेल अशा प्रत्येक गृहस्थाने या मासिकास जरूर आश्रय द्यावा"

सन १८९२ मध्ये मराठीत तीन चरित्रात्मक पुस्तके प्रसिद्ध झाली होती रा राजाराम शास्त्री भागवत यानी लिहिलेले शिवाजीचे चरित्र, रा निगुडकरानी लिहिलेले परशुराम भाऊ पटवर्धन याचे चरित्र व मिरजेचे वासुदेव शास्त्री खरे यानी लिहिलेले नानाफडणविसाचे चरित्र ही ती पुस्तके होत या तिन्ही पुस्तकासबधाने तेलगानी हिंदुयुनियन क्लबमध्यें अत्यत मार्मिक रीतीनें चर्चा करून त्याचे

गुण–दोष–विवेचन केले त्याचा इकडे विस्तार करण्याचे कारण नाही विस्तृत रिपोर्ट केसरीच्या ( २३–८–९२ ) अकात प्रसिद्ध झालाच आहे तेलगाचा मुख्य मुद्दा हा होता की, काही विधाने आधाराशिवाय केली गेली आहेत सबब त्याचे पुस्तककर्त्यांना इतकेच सागणे की, पुरावा गोळा करा व तो प्रसिद्ध करा आधारावाचून लिहू नका ही चर्चा इतकी मनोरजक व माहितीने भरलेली अशी झाली की, त्यासबधाने व काशीनाथपतानी एकदरीत चालविलेल्या मराठी भाषेच्या सेवेसबधाने कै टिळक यानी केसरीत ( २३–८–९२ ) पुढीलप्रमाणे समाधानदर्शक व स्तुतिपर उद्गार काढले आहेत —" ना तेलगानी हिदु यूनियन क्लबात दिलेले व्याख्यान साराश रूपाने आज दुसरीकडे छापले आहे, ते प्रत्येक महाराष्ट्र भाषाहितचितकाने विचार करण्यासारखे आहे काशीनाथपतासारख्या कार्यव्यापृत्वाविषयी प्रख्यात असलेल्या गृहस्थासही मराठी चरित्राचे व बखरीचे परिशीलन करण्यास वेळ सापडतो हे नृपक्रीडनकात व धूम्रपानाच्या झुरक्याबरोबर चकाट्या पिटण्यात दग झालेल्या आधुनिक विद्वानानी व इतर रिकामटेकड्या लोकानी लक्षात बाळगण्यासारखे आहे सरकारी नोकरीत शिरल्यावर उरलेला वेळ व्यर्थ न घालविता तो महाराष्ट्रभाषेच्या सेवेकडे ते लावीत आहेत हे त्यास भूषणास्पद नाही असे कोण म्हणेल ?" महाराष्ट्रभाषेच्या दृष्टीने तेलगानी चालविलेल्या वाङ्मयसेवेबद्दल टिळकानी वर दिलेल्या उदारमनस्कतादर्शक अभिप्रायापेक्षा आणखी दुसरे चागले सर्टिफिकिट काय असावयाचे ?

त्याच्याच थोड्या दिवसापूर्वी मुबईस दुसरा एक तेलगाना मराठी वाङ्मयाविषयी बोलण्याचा प्रसग आला होता पण त्या वेळचे त्याचे भाषण इग्रजीत झाले सन १८९१ च्या डिसेबरमध्ये मुबईच्या एलफिन्स्टन कालेज यूनियनपुढे त्या वेळचे मुबईचे म्युन्सिपल कमिशनर मिस्टर अॅकवर्थ याचे " मराठी कविता" या विषयावर व्याख्यान झाले न्या तेलग हे अध्यक्षस्थानी होते व्याख्यानास मुबईतील फेराजशहा मेथा, दिनशा वाच्छा, वामनराव मोडक वगैरे मोठमोठी मडळी हजर होती त्या सधीचा आम्हालाही लाभ झाला होता असो व्याख्यान ठीक झालें " मराठी कविता " हा विषय घेण्याचे कारण सागताना अॅकवर्थ साहेब म्हणाले की, मराठीत जुने ग्रथ म्हणजे विदुरनीति, वेताळ पचविशी, शुक बहात्तरी व बखरी हेच होत ! त्याविषयी परकीय मनुष्याला महत्व वाटत नाही नवीन सुशिक्षित लोकानी लिहिलेले असे गद्य ग्रथ अद्यापि चागलेसे झाले नाहीत कै राजाराम शास्त्री भागवतानी लिहिलेली " मराठ्याविषयी चार उद्गार " व

" विचार माधुकरी " ही पुस्तके मात्र काहीशी परकीयाच्या दृष्टीने, नवीन व मनोरजक अशी आहेत ( novelty and interest ) कै विष्णु शास्त्री चिपळूणकराची " निबधमाला " हे मासिक पुस्तक इतक्या उच्च दर्जाचे होते असे वाटत नाही असे सागून ॲक्वर्थ साहेबानी शास्त्रीबुवावर टीका केली व्याख्यान सपल्यावर प्रि मोडक याच्या सूचनेवरून व्याख्यात्याचे आभार मानण्यात आले व सभेचे काम सपले असे म्हणून अध्यक्ष आपल्या जागेवरून उठू लागले व लोकही उठू लागले इतक्यात फेरोजशहा मेथा याच्या आग्रहामुळे न्या तेलग हे थोडा वेळ बोलले त्यात त्यानी मराठीतील गद्य लेखकाविषयी बोलताना कृष्णशास्त्री चिपळूणकरासबधाने आदरोद्गार काढले परतु विष्णुशास्त्री याच्या टीकापद्धतीविषयी मात्र त्यानी आपली नापसती दर्शवून त्या पद्धतीच्या योगाने शास्त्रीबुवानी लोकाची बाष्कळ लिहिण्याकडे प्रवृत्ति केली, असे म्हटले हे तेलगाचे बोलणे काही लोकास सचले नाही, व केसरीकर्त्यानी ता २२–१२–९१ च्या केसरीत " विष्णु व तेलग " या मथळ्याखाली एक अत्यत कडक लेख लिहून त्यात काशीनाथपताची बरीच हजेरी घेतली लेखाला सुरवातच "गच्छ शूकर भद्र ते ब्रूहि सिंहो मया हत ।" या अवतरणाने केली गेली होती पण आमच्या मते तेलगाच्या त्या भाषणाला केसरीने इतके महत्व देण्याचे कारण नव्हते शास्त्रीबुवाच्या भाषापद्धतीविषयी अगर टीकापद्धतीविषयी त्याच्या हयातीतच खुद्द त्याच्या गुरुजीनी—बा आ मोडक यानी–अनेकदा त्याची कानउघाडणी केली होती त्याचप्रमाणे शास्त्रीबुवाचे मित्र अण्णासाहेब महाजनी यानी त्याच्या टीकापद्धतीविषयी अनेकदा समक्ष निषेध व्यक्त केला होता ह्या गोष्टी शास्त्रीबुवाच्या चरित्रात नमूद आहेत अशा स्थितीत त्याच गोष्टीविषयी तेलगानी बोलण्याची वेळ आली म्हणून जर नापसती व्यक्त केली तर त्यात विशेष ते काय झाले ? चिपळूणकरानी सुरू केलेल्या " काव्येतिहाससग्रहा"विषयी ज्या गृहस्थानी ( तेलगानी ) उदार मनाने स्तुति केली, त्यानी निबधमालेतील टीकेविषयी नापसती दर्शविली तर यात अयोग्य ते काय झाले ? चागल्याला चागले म्हणणे व वाईटाला वाईट म्हणणे हे सरळच आहे आता केसरी पत्राचे विष्णुशास्त्री हे एक उत्पादक असल्यामुळे वरील प्रकारचे त्याच्या भाषापद्धतीविषयी नापसतीदर्शक तेलगाचे भाषण केसरीकर्त्यास न रुचणे एका दृष्टीने स्वाभाविक होते, व तेवढ्या पुरती त्यानी त्या भाषणावर टीका केली असती तरी हरकत नव्हती पण त्यात केसरीकर्त्यानी अन्य पुष्कळ सबध नसलेल्या गोष्टीचा उल्लेख करून लेखाला जे

अतिकटु स्वरूप आणले तें मात्र आणण्याचे कारण नव्हते असे आम्हास वाटते आता त्याविषयी जास्त विस्तार करण्यात अर्थ नाही पण आमच्या मते खुद्द टिळकानीच सर्व गोष्टीचा शातचित्ताने विचार केला असता तर त्याना देखील कदाचित् आमच्या प्रमाणेच वाटले असते असे मानण्यास जागा आहे कारण सदरहू केसरीतील लेखात इतकी काही विचित्र विधाने केलेली आढळतात की, ती टिळकाच्याच दुसऱ्या वेळच्या लेखानी व कृतीनी खोटी पडतात ! एक विधान असे आहे की, " तेलगाना मराठी भाषा कितपत अवगत आहे हे त्यानी लिहिलेल्या दोन पुस्तकावरूनच दिसते, " व दुसरे विधान असे आहे की, " दहापाच सस्कृत ग्रथाचे वरवर अवलोकन करून व त्यातील काही तरी कोटिक्रम गोड इग्रजी भाषेत भराभर लिहून विद्वत्तेबद्दल फुकट प्रसिद्धि मिळविण्याची हातोटी तेलगात आहे " या दोन विचित्र व हास्यास्पद विधानाबद्दल इकडे जास्त काय लिहावयाचे ? केसरीकर्त्यांचे वरील तेलगाच्या मराठी भाषाज्ञानाबद्दलचे विधान वर नुकतेच दिलेल्या त्याच्याच ( ता २३-८-९२ च्या केसरीतील ) सर्टिफिकिटाने खोटे पडते ! आणखीही केसरीतले तसेच हवे तेवढे दाखले देता येतील तेलगानी केलेल्या सस्कृत वाङ्मयसेवेसबधाने देखील आम्ही जास्त ते काय लिहिणार ? त्यानी "रामायण" व "भगवद्गीता" याच्या काळाविषयी लिहिलेल्या निबधाबद्दल त्याची साऱ्या जगाने स्तुति केली आहे व त्याचा प्रत्येक महाराष्ट्रीय लेखक अद्यापि अभिमानाने उल्लेख करीत असतो शिवाय खुद्द टिळकानीच आपल्या गीतारहस्यात ठिकठिकाणी तेलगाच्या सस्कृतविषयक ग्रथाचा आधार घेतलेला असल्यामुळे, वरील दुसरे विधान आपोआपच खोटे पडते व ते केवळ विकारवशतेचे द्योतक आहे असे स्पष्ट ठरते ! पण वरील सारखी विचित्र विधाने करण्यात, किंबहुना सदरहू सबध लेख लिहिण्यात आपला खरा हेतु काय होता हेही केसरीकर्त्यांनीच शेवटी स्पष्ट शब्दात सूचित केले आहे ! ते म्हणतात की, " तेलग हे रावबहादुराच्या वर्गापैकी असल्यामुळे त्यास शास्त्रीबोवाची मते पसत नसणे हे स्वाभाविकच आहे " म्हणजे रा ब रानडे, रा ब देशमुख वगैरे जी मडळी शास्त्रीबोवाना व टिळकाना, कोणत्याही कारणानें असो, नावडती असे, त्यापैकीच तेलगही एक असल्यामुळें त्याची, वरील सारखी काही तरी हास्यास्पद विधाने करून, केसरीकर्त्यांनी हजेरी घेतली, हें उघडच झाले ! मग असल्या, विकारवश होऊन लिहिलेल्या, लेखाचे महत्त्व कसले ? समाधानाची गोष्ट ही की, टिळकाचे शिष्य रा केळकर याना

देखील सदर्हू लेख पसत नव्हता असे स्पष्ट दिसते कारण त्यानी टिळकाच्या पुनर्मुद्रित केलेल्या केसरीतल्या लेखातून हा गाळला आहे !

हे प्रकरण सपविण्यापूर्वी तेलगाच्या आणखी एका निबधासबधाने चार शब्द लिहितो तो निबध इग्रजीत लिहिलेला असून तो मराठी वाङ्मय, या दृष्टीने लिहिलेला नाही, तरी तो मराठ्याच्या इतिहासाचा एक भाग असल्यामुळे त्याचे आम्हा महाराष्ट्रीयाच्या दृष्टीने महत्त्व विशेष आहे सन १८९२ मध्ये तेलगानी " Gleanings from Maratha Chronicles " या विषयावर एक फार उपयुक्त निबध लिहिलेला असून तो त्याच साली युरोपखडात भरलेल्या प्राच्यभाषाविशारदाच्या परिषदेत वाचण्यात आला तसाच तो " डेक्कन-कॉलेज यूनियन " मध्येही वाचण्यात आला तो विस्तृत निबध न्या रानड्याच्या " Rise of the Maratha power " या पुस्तकाच्या शेवटी जोडलेला आहे त्या निबधाचा थोडासा पूर्वेतिहास आहे त्याचा विचार केला म्हणजे तेलगाची कर्तव्यनिष्ठा व त्याचा विनयशील स्वभाव याबद्दल कोणासही आदरच वाटेल "Epochs of Indian History" या मालेतील " Maratha Period" वर एक पुस्तक लिहिण्याबद्दल तेलगाना जेव्हा प्रथम विनति करण्यात आली तेव्हा त्यानी लागलीच पुण्याच्या रा ब रानड्याकडे बोट दाखविले आणि हे रानड्याना समजताच त्यानी " छे छे, ते काम तेलगच चागले करतील ! " असे उत्तर लिहून आपल्या मनाचा थोरपणा व्यक्त केला ! यात दोघाच्याही—तेलगाच्या व रानड्याच्या—स्वभावाचे चित्र किती तरी हृदयगम रीतीने प्रतिबिबित झालेले दिसते ! अखेर दोघानीही मिळून तो " मराठ्याचा इतिहास " लिहावा असे ठरले होते यासबधाने व विशेषत तेलगाच्या शुद्ध हेतूसबधाने—त्याच्या देशाभिमानासबधानें—न्या रानडे यानी " Rise of the Maratha Power" च्या प्रस्तावनेत पुढीलप्रमाणे गौरव केला आहे —

"He ( Ranade ) would not have undertaken the responsibility connected with it but for the fact that it has been handed over to him as a legacy by a revered friend, since deceased, who ( Telang ) had, jointly with him undertaken the work from a feeling of true patriotism and who would, if he had been spared, have worthily completed what he no doubt

intended to be, the *magnum opus* of his brilliant career"

तेलग सदरील कामाकरिता जुन्या बखरी वगैरे चाळीत आहेत हे वर्तमान समजताच, कै टिळकानी ( २३-८-९२ ) केसरीत पुढीलप्रमाणे लिहून काशीनाथपताचा गौरव केला आहे -" लवकरच मराठ्याचा एक विश्वसनीय इतिहास लिहिण्याचा तेलग साहेबाचा विचार आहे व त्याकरिता जुने लेख, सरकारी दप्तरे वगैरे चाळण्याचा त्यानी उपक्रमही केला आहे असे कळते खरे असल्यास त्यानी आजपर्यंत केलेल्या श्रमापेक्षा अधिक महत्वाची देशसेवा केली असे आम्ही समजू " असो सदहू "Epochs" ही पुस्तकमाला प्रसिद्ध करणारे मिस्टर जॉन ॲडम हेच असून त्यानी ( "India" for October, 1893 ) आपल्या लेखात तेलगाच्या विनयशीलपणासबधाने स्तुति केली आहे तेलगानी रानड्याच्या सहकारितेने सदरील मराठ्याचा इतिहास लिहिण्याचे कबूल केले तरी पुस्तकावर आपले नाव दाखल व्हावे ही गोष्ट काशीनाथपताना रुचेना ! त्याप्रमाणे त्यानी मि ॲडमला कळविले पण मि ॲडम यानी जेव्हा "आपले नाव दाखल झाल्याने सवध मालेचे महत्व वाटणार आहे तरी नाकारू नका " अशी तेलगाना गळ घातली, तेव्हा ते कबूल झाले ! असो दुर्दैव महाराष्ट्राचे की, अशी ही दोन नररत्ने-तेलग व रानडे-मग लवकरच कालवश व्हावी आणि प्रत्येकाच्या हातून मूळ हेतूला अनुसरून एकदोन निबधापलीकडे फलाच्या दृष्टीने काही एक होऊ नये ! त्याच हेतूच्या अन्वये तेलगानी बखरी वगैरे तपासपूर्वक पाहून आपला "Gleanings" हा निबध लिहिला त्यात त्यानी मराठशाहीतील धार्मिक व सामाजिक स्थितीचे वर्णन देऊन खुद्द पेशवे देखील प्रत्यक्ष व परपरा-या सामाजिक सुधारणा कसे घडवून आणीत असत हे उत्तम रीतीने दाखविले आहे इतकेच नव्हे, तर मराठशाहीच्या जागी ब्रिटिश सत्ता आल्यामुळे सदहु बाबतीतील पूर्वीचा एक प्रकारचा लवचीकपणा नष्ट होऊन त्या जागी कसा कृत्रिमपणा आला आहे आणि त्यामुळे सुधारणेचे काम कसे अवघड झाले आहे हे दाखविले आहे यासबधाने आता अधिक विस्तार न करता—जरूर तर पुढील एखाद्या प्रकरणात करू—तेलगाच्या या निबधाविषयी न्या रानड्यानी जें लिहिले आहे त्याचाच थोडक्यात उल्लेख करतो -"हिंदु मनुष्याने आपल्या देशाचा इतिहास कोणत्या दृष्टीने लिहावा, याचा हा निबध एक उत्तम नमुना आहे "

---

## प्रकरण पधरावे.

# शिक्षणविषयक कामगिरी.



इग्लिश लोकानी हिदुस्थानात जी नवीन शिक्षणपद्धत सुरू केली ती सरकारी कचेऱ्यातून कारकूनाचा पुरवठा करण्याच्या हेतूने सुरू केली असा लोकाचा सामान्यत समज आहे, पण तो सर्वांशी खरा नाही इग्लिश शिक्षण इकडे ज्या थोर पुरुषानी सुरू केले त्याचा मुख्य उद्देश हिदुस्थानातील लोकाची बौद्धिक व मानसिक उन्नति करावी हाच होता यासवधाने मेकॉलेच्या शिक्षणविषयक मतपत्रकात स्पष्ट उल्लेख आहे तसेच माऊट स्टुअर्ट एलफिन्स्टन यानी आपल्या मतपत्रकात ( सन १८२४ मध्ये ) असे नि सग्दिग्धरीतीने म्हटले आहे की इग्लिश शिक्षण इकडे सुरू करण्याचा हेतु सरकारी कचेऱ्यात कारकून पुरवावे, हा नसून सर्व लोकात ज्ञान प्रसार करून त्याना युरोपीयन राष्ट्राच्या योग्यतेस पोचवावे हा आहे ( Not to provide clerks for public offices, but to diffuse knowledge among all orders of the people of the country, and to concur with other causes in raising them in time to level with the European nations ) सन १८५२ साली दक्षिणेतील जुडिशियल कमिशनर मिस्टर वॉर्डन ( Mr Warden ) याच्या हस्ते डेक्कन कालेज ( त्या वेळचे Poona College) प्रथमच उघडण्याचा समारभ झाला त्या वेळी त्यानी जे भाषण केले त्यात त्यानी कोर्ट आफ् डायरेक्टर्सचा मद्रास सरकारला जो एक खलिता आला होता त्यातून काही उतारे वाचून दाखविले त्यातला साराश असा की, “ सामान्य जनतेची बौद्धिक व नैतिक उन्नति घडवून आणण्याकरिता प्रथम उच्चवर्णीय लोकाना चागले शिक्षण दिले पाहिजे या वर्गातील लोकाची बौद्धिक उन्नति झाली म्हणजे त्याचा इतर सामान्य जनतेवर सुपरिणाम झाल्याशिवाय राहाणार नाही ” असो याप्रमाणे अत्यत शुद्ध हेतूने सरकारने जी शिक्षणपद्धत सुरू केली व जिची पुढे वाढ होऊन शाळा, कॉलेजे, यूनिव्हर्सिट्या इत्यादि सस्था निर्माण करण्यात आल्या, त्या पद्धतीपासून पदवीधराच्या रूपाने जी काही पहिली पहिली गोड फळे लोकाच्या दृष्टीस पडली त्यात न्या तेलग हे एक होते मरहूम मलबारी शेटच्या

" इडियन स्पेक्टेटर " मधील भाषेत सागावयाचे म्हणजे तेलग हे इग्लिश शिक्षणाचे एक उत्तम फळ होते ( the best product of English education ) इतकेच नव्हे, तर मलबारी पुढे लागलीच म्हणतात की, तेलग हे एक अत्यत श्रेष्ठ प्रकारचे विद्वान् गृहस्थ होते ( He was a Scholar *par excellence* ) ते इतके की, ते जर उत्तम कायदेपडित अगर न्यायनिपुण जज्ज झाले नसते तर ते एक अत्यत श्रेष्ठ प्रकारचे प्रोफेसर सहज शोभले असते !

पण कोणीही गृहस्थ स्वत विद्वान् असला तरी तो लोकशिक्षणाच्या बाबतीत लक्ष घालीत असतो किवा त्या विषयाचा सर्व बाजूनी पूर्ण विचार करून लोकात शिक्षणाचा प्रसार व्हावा एतदर्थ झटून हरएक प्रकारे प्रयत्न करीत असतो असाच काही नेम नाही, पण तेलगाची तशी गोष्ट नव्हती त्यानी शिक्षणाच्या बाबतीत देशाची मोठी कामगिरी केली आहे ती इतकी की सार्वजनिक कामात लक्ष घालणाऱ्या लोकास तिचे केव्हाही विस्मरण होणार नाही कै रा ब गणेश वेकटेश जोशी यानी आपल्या एका निबधात, न्या तेलगाच्या इतका शिक्षणाच्या बाबतीत अधिकाराचा माणूस त्याच्या वेळेस दुसरा नव्हता, असे स्पष्ट म्हटले आहे त्याच प्रमाणे खुद्द न्या रानडे यानी देखील एका प्रसगी, " We cannot cite a better authority in educationol matters than the late Mr Justice Telang in this presidency " असे उद्गार काढले आहेत तेलगाच्या शिक्षणविषयक कामगिरीतला विशेष हा की ती त्यानी सुमारे पन्नास वर्षापूर्वी बजाविली होती वस्तुत हल्लीच्या दिवसात शिक्षणाचे महत्व जाणणारे बरेच सुशिक्षित लोक पुढे येत आहेत व ते अधिकारी लोकाशी भाडून देशातील शिक्षणविषयक गरजा त्याच्याकडून भागवून घेण्याचा अहर्निश प्रयत्न करीत आहेत परतु ज्या वेळी—अर्धशतकापूर्वी—एवढी लोकजागृति झाली नव्हती व सरकारचे शिक्षणविषयक—विशेषत उच्च प्रकारच्या शिक्षणाबाबतचे--धोरण ज्या वेळी धरसोडीचे, किबहुना पिछेहाटीचे होते अशा वेळी खुद्द मुबई यूनिव्हर्सिटीत व सन १८८२ सालातल्या " एज्युकेशन कमिशन"चे एक सभासद या नात्याने वरिष्ठ प्रकारच्या शिक्षणाची बाजू मोठ्या बाणेदारपणाने उचलून धरून तेलंगानी जी देशाची कामगिरी केली, ती केवळ बिनमोल होती अर्थात् त्याच्या शिक्षणविषयक अधिकाराविषयी रा ब जोशी किवा न्या रानडे याच्या सारख्या सर्वमान्य पुढाऱ्यानी सादर उल्लेख करावा यात आश्चर्य नाही

तेलगानी शिक्षणविषयक जी कामगिरी केली त्यात त्याची दोन तत्वावर मुख्य नजर होती ते स्वत उत्तम सस्कृतज्ञ असल्यामुळे त्यानी आमच्या प्राचीन वाङ्मयाचे बरेच परिशीलन केलेले होते त्यामुळे त्या वाङ्मयाविषयी व एकदरीत आमच्या प्राचीन आर्यपूर्वजाबद्दल त्याना अत्यत आदर व अभिमान वाटत असे अर्थात् आपल्या लोकानी—विशेषत विद्यार्थीवर्गाने—आमच्या प्राचीन वाङ्मयाचा जरूर अभ्यास केला पाहिजे असे काशीनाथपताना वाटणे अगदी साहजिक होते परतु त्या वाङ्मयात सर्व ज्ञान भरले आहे व आपल्या लोकास बाहेरच्या ज्ञानाची काही जरूरी नाही असें मात्र त्याना कधी वाटत नसे तेलगानी आमच्या प्राचीन वाङ्मयाबरोबरच इग्लिश वाङ्मयाचाही उत्तम परिचय करून घेतलेला असल्यामुळे त्यात जास्त व महत्वाचे काय आहे याची त्याना पूर्ण कल्पना आलेली होती व त्याचा आमच्या लोकानी जरूर फायदा घेतला पाहिजे असे त्याचे ठाम मत झाले होते आमच्या जुन्या वाङ्मयात चागली तत्वे, चागल्या कल्पना याचा पुष्कळ भरणा आहे, हे त्याना कबूल होते परतु आमच्या लोकाच्या विचारसरणीस व आचारक्रमास कैक शतकाच्या अभ्यासाने निराळ्याच प्रकारचे वळण लागल्यामुळें आमच्या वाङ्मयातील तत्वाची व कल्पनाची पुढे वाढ झाली नाही—किबहुना ती उदात्त तत्वे पुस्तकातील पुस्तकातच राहिली—व देशाची प्रगति खुटली ! अशा स्थितीत जनतेच्या दृष्टीतच—outlook मध्येच–फरक पडल्याशिवाय देशाचे पाऊल पुढे पडणे शक्य नाही हे तेलगाच्या पुरे लक्षात आले होते लोकामध्ये चिकित्साबुद्धि—critical spirit—उत्पन्न करून व त्याना उदार शिक्षण देऊन त्याच्यात कार्यक्षमता आणण्याचे इग्लिश शिक्षणात सामर्थ्य आहे हे काशीनाथपतानी पक्कें जाणले होते त्यामुळे आमच्या लोकानी शक्य तेवढे ते शिक्षण घेतल्याशिवाय तरणोपाय नाही असे त्याचे ठाम मत झाले होते तात्पर्य, जुन्यापैकी चागल्या गोष्टी राखणे व इग्लिश शिक्षणाच्या योगाने मिळालेल्या सधीचा फायदा घेऊन नवीन चागल्या गोष्टी शिकणे या दोन तत्वाच्या अनुरोधानेच तेलगाचे सर्व शिक्षणविषयक प्रयत्न चालत असत

तेलगानी शिक्षणाच्या बाबतीत जी महत्वाची कामगिरी केली ती मुबई युनिव्हर्सिटीत व एजुकेशन कमिशनमध्ये केली हे वर सागितलेच तेलगाचा मुबई युनिव्हर्सिटीशी ते बहुतेक धद्यास लागल्या दिवसापासूनच सबध येऊ लागला होता सन १८७४ साली त्याना बी ए परिक्षेत सस्कृतचे एक परीक्षक नेमले होते त्याचप्रमाणे ते पुढे चार वर्षे सस्कृतमध्ये परीक्षक होते सन १८७७ मध्ये

त्याना सरकारने युनिव्हर्सिटीचे फेलो—सदस्य—नेमले पुढे सन १८८२ मध्ये जेव्हा डॉ भाडारकर याची एल्फिन्स्टन कालेजातून पुण्यास डेक्कन कालेजात बदली झाली तेव्हा त्यानी सिंडिकेटमधील आपल्या जागेचा राजीनामा दिला व त्याच्या जागी तेलगाची निवड झाली काशीनाथपत पुढे बरोबर दहा वर्षे सिडीक होते मग त्याची सन १८९२ साली व्हाइस चॅन्सेलरच्या जागी नेमणूक झाली सन १८८२ ते १८९२ या दहा वर्षात युनिव्हर्सिटीत अनेक महत्वाच्या घडामोडी झाल्या, व त्यात तेलगाचेच मुख्यत अग होते त्या मुदतीत बी. ए. च्या अभ्यासक्रमात महत्वाचे फेरफार करण्यात आले एलएल बी चा अभ्यासक्रम ठरविण्यात आला शेतकी खात्याचा अभ्यासक्रम मुक्रर करण्यात येऊन शेवटच्या परीक्षेनतर पास झालेल्या विद्यार्थ्यास डिप्लोमा देण्याचे ठरले त्याच मुदतीत युनिव्हर्सिटीची सुधारणा करून तिचे काही अधिकार वाढविण्याबाबतचा विचार घाटत असून त्यासबधाचे एक बिलही तयार झाले होते त्या बिलाचे त्या वेळी इतके महत्व मानण्यात आले होते की लॉर्ड रे साहेबानी सन १८८९ सालच्या कॉन्व्होकेशनच्या वेळी जे भाषण केले त्यात त्याचा उल्लेख आला होता, ते बिल नतर काही कारणाने पुढे आले नाही परतु तत्सबधाने युनिव्हर्सिटीत बरेच दिवसपर्यंत सारखा खल चालला होता यात शका नाही असो सदहू सर्व प्रकारच्या ।वादविवादात तेलगानी प्रमुखत्वाने भाग घेतला असून काही प्रसगी त्यानी केलेली भाषणे तर अति उत्तम होती असे नमूद आहे टाइम्सने म्हटले आहे की, "His speeches in connection with the University bill were weightiest" "Also he delivered weightiest speeches in connection with the LL. B course and the diploma in agriculture" तेलगानी आरभिलेल्या काही फेरफारासबधाने सीनेटमध्ये विरोध होताच तरी देखील आपल्या वक्तृत्वाच्या जोरावर तेलगानी आपण सुचविलेल्या फेरफाराच्या कामी यश सपादन केले ! यासबधी टाइम्स म्हणतो की, "As Syndic he (Mr Telang) carried out certain measures in face of strong opposition"

वरीलपैकी तेलगानी बी ए च्या अभ्यासक्रमात जे फेरफार घडवून आणले ते फार महत्वाचे असल्यामुळे त्यासबधाने चार शब्द लिहितो त्या फेरफाराचा पूर्वेतिहास असा. युनिव्हर्सिटीच्या ( १८५७ ) सुरवातीपासून सन १८९० पर्यंतच्या कालात बी ए च्या अभ्यासक्रमात दोन वेळ फेरफार करण्यात आलेले होते.

प्रथम त्या अभ्यासक्रमात सस्कृत, लॅटिन, ग्रीक वगैरे प्राचीन भाषाचा आवश्यक विषयात समावेश झालेला नव्हता तो सन १८७० मध्ये सर अॅलेग्झँडर ग्रॅट (हे एकदा युनिव्हर्सिटीचे व्हाइस चॅन्सेलर होते) याच्या आग्रहामुळे झाला पण त्यामुळे युनिव्हर्सिटीचा व लोकाचा एकदरीत फायदाच झाला वरील योजनेमुळे आमच्या इलाख्यात सस्कृत भाषेचा अभ्यास झपाट्यानें सुरू होऊन युनिव्हर्सिटी-तून बरेच नवीन प्रकारचे सस्कृतज्ञ पडित थोड्या दिवसानी तयार होऊन बाहेर पडू लागले व त्यायोगाने हिंदुस्थान देशात मुबई युनिव्हर्सिटीला एक प्रकारचे वैशिष्टय प्राप्त झाले असो तदनतर सन १८७९ मध्ये बी ए च्या अभ्यासक्र-मात आणखी फेरफार करण्यात आले ! त्या सालपर्यंत सबध कालेजातला अभ्यास-क्रम तीन वर्षाचा असून मॅट्रिक नतर बी ए पर्यंत फक्त दोनच परीक्षा द्याव्या लागत असत एक दुसऱ्या वर्षी "Little go "ची परीक्षा असे व शेवटी बी ए ची सन १८७९ पासून पुढे मॅट्रिक नतरच्या अभ्यासक्रमात "Science" ( विज्ञान ) हा एक नवीन विषय समाविष्ट करण्यात येऊन परीक्षा दोनच्या तीन करण्यात आल्या, व बी एस ची एक नवी डिग्री निर्माण करण्यात येऊन पी ई च्या पुढे तिचा निराळा अभ्यासक्रम ( दोन वर्षाचा ) ठरविण्यात आला व शेवटी परीक्षा होऊन ती डिग्री मिळावी अशी योजना मुक्रर झाली ही सर्व योजना त्या वेळचे मुबईचे गव्हर्नर सर रिचर्ड टेपल याच्या आग्रहामुळे युनि-व्हर्सिटीने पास केली असली तरी तिच्यापासून गव्हर्नरसाहेबाच्या मूळ हेतूप्रमाणें इष्ट–सिद्धि मुळीच झाली नाही या इलाख्यात शास्त्रीय विषयाचा अभ्यास वाढावा हा जरी साहेबाचा हेतु असला तरी त्यायोगें तरुण मडळीचे शास्त्रीय ज्ञान वाढून त्यापासून जसें इतर देशात उद्योगधद्यास उत्तेजन मिळते तसा प्रकार आमच्या इलख्यात झाला नाही अर्थात् तो अभ्यासक्रम विद्यार्थी वर्गात केव्हाच लोकप्रिय झाला नाही म्हणजे त्या अभ्यासक्रमापासून शास्त्रीय ज्ञानाची वाढ तर झालीच नाही, पण वाङ्मयात्मक विषय घेऊन बी ए ला जाणाऱ्या विद्यार्थ्याची मात्र काही अशी कुचबणा झाली ! शिवाय दरवर्षी विद्यार्थ्यांच्या मागे युनिव्हर्सिटीची एक परीक्षा असे झाल्यामुळे त्याना विश्रातीकरिता म्हणून फुरसत नसल्याकारणाने शारीरिक दृष्टीनेही त्याचे फार नुकसान झाले, ते निराळेच असो हा अभ्यासक्रम व तीन वर्षात तीन परीक्षा या गोष्टी पुष्कळाना पसत पडल्या नव्हत्याच तशाच त्या तेलगानाही पसत नव्हत्या सन १८८८–८९ च्या सुमारास हा विषय पुन्हा सिनेटपुढे आला, व त्यासबधाने बरेच दिवस चर्चा चालली होती.

त्यावेळी आणखी एक महत्वाची गोष्ट घडली होती सन १८८५ मध्ये राष्ट्रीयसभेची स्थापना झाल्यामुळे लोकात जागृति बरीच झाली होती व वर्तमानपत्रातून व व्याख्यानातून मोठमोठ्या राजकीय, सामाजिक वगैरे विषयासबधाने चर्चा चालत असे अशा वेळी लोकास इतिहासाचे ज्ञान असणे जरूर होते, व ते ज्ञान पायाशुद्ध असले पाहिजे त्यामुळे बी ए च्या अभ्यासक्रमात इतिहास व अर्थशास्त्र हे आवश्यक विषयात घालण्याचे ठरविण्यात आले एकादा मनुष्य बी ए झाला म्हणजे त्याचे कोणत्याही एका विषयात पूर्ण ज्ञान झाले असे समजता कामा नये, तर तशा एकाद्या विषयाचे विशेष प्रकारचे ज्ञान प्राप्त करून घेण्याला जो सामान्य शिक्षणरूप मजबूत पाया लागतो तो बी ए झालेल्या मनुष्यामध्ये जरूर असला पाहिजे ते सामान्य प्रकारचे शिक्षण तेलगाच्या शब्दात सागावयाचे म्हणजे हे —

"He should know English and a classical language, should have the discipline which mathematics gives, should know the elements of logic and of political economy and physical sciences and have a general knowledge of history of England and India"

या अभ्यासक्रमात इग्लिश व दुसरी भाषा याच्या बरोबर इतिहास व अर्थशास्त्र या विषयाना महत्व देण्यात आले होते याचे कारण उघडच आहे आमच्या तरुण पदवीधराना आपल्या देशाच्या इतिहासाचे ज्ञान असणे तर जरूर आहेच, परतु ज्या इग्लड देशाशी आमचा निकट सबध जडलेला आहे त्या देशाच्या इतिहासाची आम्हास माहिती असणे अत्यत आवश्यक आहे इग्लड देशाच्या इतिहासाचे एका गोष्टीत वैशिष्टय आहे एकाद्या मोठ्या देशात रक्तपाताशिवाय किवा दग्याधोप्याशिवाय राज्यक्राति कशी होऊ शकते हे इग्लडात सन १६८८ साली घडलेल्या हकीकतीवरुन शिकण्यासारखे आहे याचकरिता इग्लडच्या (constitutional history) चे म्हणजे त्या देशाच्या इतिहासाचे राजकीय दृष्टीने महत्व फार मोठे आहे त्यामुळें आमच्या तरुणमडळीनी इग्लडच्या इतिहासाचा लक्षपूर्वक अभ्यास करणे जरूर आहे

तोच प्रकार "अर्थशास्त्र" विषयाच्या अध्ययनाविषयी आमच्या देशात ब्रिटिश सत्ता स्थापित झाल्यापासून आमच्या आर्थिक स्थितीवर जो विलक्षण परिणाम झाला आहे तसा पूर्वी कधीही झाला नव्हता अर्थात् त्या स्थितीत

सुधारणा करावयाची असेल—व ती सुधारणा करणे अत्यत जरूर आहे–तर अर्थशास्त्राचे आमच्या देशहिताच्या दृष्टीने अभ्ययन करणे अगदी अगत्याचे आहे असो अशा अनेक गोष्टीचा विचार करून तेलगानी बी ए चा अभ्यासक्रम ठरविला होता तो अभ्यासक्रम ठरविण्याकरिता सिनेटची १८८९ साली जी कमिटी नेमण्यात आली होती त्यात या इलाख्यातील मोठमोठी शिक्षणविषयक तज्ज्ञ मडळी होती प्रिन्सिपॉल ऑग्झेनहॅम, नामदार बर्डवुड, डॉ मॅकिकन, प्रि मोडक, फादर मेयर्स, डॉ भाडारकर, प्रि वर्डस्वर्थ, रा ब (नतरचे न्या) रानडे, मिस्टर (नतरचे सर) फेरोजशहा मेथा इत्यादि सर्व मडळीना तो अभ्यासक्रम पसत पडला होता कित्येक आक्षेपकास अभ्यासक्रम तीन वर्षाच्या ऐवजी चार वर्षाचा करण्यात आला हे पसत नव्हते परतु एक वर्ष वाढविण्यात तेलगाचा मुख्य उद्देश हा होता की, विद्यार्थ्याच्या मागचा निदान एक वर्षापुरता तरी परीक्षेचा हुसका चुकून त्याना अमळ विश्राति मिळावी व अधिक माहिती करिता पुष्कळसे वाङ्मय वाचण्यास सवड मिळावी हा तेलगाचा हेतु स्तुत्य होता यात शका नाही सदहू अभ्यासक्रमाच्या योजनेत बी ए च्या परीक्षेत देशी भाषेत भाषातर करणे व निबध लिहिणे या गोष्टीचाही समावेश करण्यात आला होता परतु तो भाग सिनेटने पास केला नाही त्यामुळे देशी भाषा-सबधाचा प्रश्न आणखी काही वर्षेपर्यत तेथेच थबकून राहिला असो वर लिहिल्याप्रमाणे बी ए चा चार वर्षाचा जो अभ्यासक्रम बहुतेक सर्व मुख्य विद्वान् गृहस्थाच्या पसतीने ठरला होता तो तेलगाच्या सूचनेवरून सन १८९० च्या एप्रिलमध्ये सिनेटने पास केला त्या अभ्यासक्रमासबधाने जरी कित्येकाचा प्रथम विरोध होता तरी, तो पुढे लोकप्रिय होऊन सुमारे वीस वर्षाच्या सवयीने विद्यार्थीवर्ग व अध्यापक याच्या पचनी पडला होता परतु सन १९१० च्या सुमारास तो अभ्यासक्रम काही बड्या लोकाना पसत न वाटून त्यात उलथा पालथ करण्याची त्याना दुर्बुद्धि झाली! सन १९०५ मध्ये लॉर्ड कर्झन साहेबानी बगालची, तिकडील लोकाच्या म्हणण्याकडे अगदीं दुर्लक्ष करून, फाळणी केल्यामुळे बगाल प्रातात व परपरेने–या सर्व देशभर चाल-लेल्या राजकीय चळवळीला अति उग्र स्वरूप प्राप्त झाले होते व स्वदेशी, बहि-ष्कार, राष्ट्रीय शिक्षण वगैरे अधिकारी वर्गाला सामान्यत न रुचणाऱ्या विषया-सबधाने सर्व देशभर उघड उघड ऊहापोह चालू राहून लोकाची मने बिथरून गेली होती इतकेच नव्हे, तर हिंदुस्थान देशात पूर्वी कधी माहीतही नसलेल्या

बॉबचा नवीन प्रकार सुरू होऊन काही माथेफिरु तरुण लोकानी खून, मारामाऱ्या वगैरे अत्याचारही केले अशा परिस्थितीत लोकाचे जीवित रक्षण करणे हे सरकारचे काम होते, व तत्सबधाने अधिकारी वर्गाने बदोबस्ताची तयारी चालविली होती ती ठीकच होती परतु कित्येक अधिकाऱ्यानी भ्रातचित्त होऊन लोकाच्या असतोषाची खरी कारणे शोधून ती दूर न करता अविचाराने भलत्याच ठिकाणी "साप साप" म्हणून जो जमीन बडविण्याचा प्रकार चालविला होता तो मात्र हास्यास्पद होता अशाच विचारसरणीची छाया आमच्या मुबई इलाख्यावर पडून तरुण मडळीचा अनिष्ट कल्पनापासून बचाव करण्याकरिता युनिव्हर्सिटीच्या काही अभ्यासक्रमात फेरफार केले पाहिजेत असे आमच्या त्या वेळच्या गव्हर्नरसाहेबास—लॉर्ड सिडनहॅम याना—वाटले! इग्लडच्या राजकीय इतिहासाच्या अभ्यासाने हिंदुस्थानात अनर्थ होत असतात सबब इतिहास व अर्थशास्त्र हे विषय बी ए च्या आवश्यक अभ्यासक्रमातून काढून ऐच्छिक विषयात घालावे असे त्यानी ठरविले व त्याप्रमाणे मिस्टर शार्प—हे त्या वेळी शिक्षण खात्याचे डायरेक्टर होते—याना सागून व सरकार नियुक्त फेलोजना—सदस्याना—भीड घालून साहेब बहादुरानी आपला हेतु सिद्धीस नेला! हा जरा इकडे विस्तार करण्याचे कारण एवढेच की, जो बी ए चा अभ्यासक्रम तयार करण्यात सन १८९० मध्ये न्या तेलगासारख्या सर्वमान्य विद्वान् व कर्त्या पुरुषाने मन घातले होते, ज्यासबधाची चर्चा करण्यात सिनेटचे कित्येक महिने खर्च झाले होते व ज्यासबधाने सर्व युरोपीयन व हिंदी तज्ज्ञ मडळीमध्ये एकवाक्यता झाली होती; तो अभ्याक्रम वीस वर्षानतर लार्ड सिडनहॅम साहेबाच्या कारवाईमुळे सिनेटने एका चुटकीसरसा बदलून टाकला! असा युनिव्हर्सिटी-परीक्षेच्या अभ्यासक्रमात फेरबदल केल्याने लोकाचा असतोष नष्ट होत असतो काय? प्रजेची मने बिथरून जाण्यास परकीय सत्ता व त्याच्या आनुषगिक दुसरी कारणे इतक्याच गोष्टी बस्स आहेत ही कारणे निर्मूल करण्यास अधिकारी वर्गात खरा मुत्सद्दीपणा व वर्तनात सहानुभूतीचा ओलावा या गुणाचे वास्तव्य असावे लागते या गुणाचा प्रभाव कसा असतो हे लॉर्ड रे याच्या (१८८९) भाषणातील एकाच वाक्यावरून व्यक्त होईल —

"But in Mr. Wordsworth we have had a brilliant instance of real academic influence. He did not find it an impossible task to guide the aspirations

of the educated youth of India to a higher plane ” दुर्दैव मुबई इलाख्याचे की असले उदारमनस्क गव्हर्नर त्याला वरचेवर लाभत नाहीत ! असो वर सागितलेल्या सद्गुणाचे अभावी अदूरदर्शीपणा व लोकमतास कस्पटाप्रमाणे मानण्याची प्रवृत्ति याचाच प्रादुर्भाव चालू राहिल्यास लोकात असतोष पसरणार नाही तर काय होईल ? पण याचा विचार करतो कोण ? असो. सदर्हू अभ्यासक्रम बदलण्याची जेव्हा सिनेटपुढे सूचना आली तेव्हा (१९१०-११) न्या तेलग हयात नव्हते व न्या रानडेही नव्हते परतु सर फेरोजशहा मेथा हजर होते व डॉ भाडारकर होते त्याना व इतर काही मडळीना सदर्हू फेरफार बिलकूल पसत नव्हता वरील सारख्या अरेरावीला सर फेरोजशहा हे केव्हाही नमणारे नव्हते त्यानी सिनेटमधील वादाच्या वेळी लॉर्ड सिडनहॅम साहेबावर कडक टीका करून त्याची बरीच हजेरी घेतली हा मेथाचा निर्भीडपणा डॉ भाडाकरानादेखील पसत पडला पण सत्तेपुढे शहाणपण काय उपयोगी ? असो. युनिव्हर्सिटीतील अभ्यासक्रमात व परीक्षाच्या पद्धतीत काही वर्षानतर आणखीही काही फेरफार करण्यात आले पण त्याचा विस्तार आता इकडे नको

तात्पर्य, न्या तेलगानी एकदरीत शिक्षणप्रसाराच्या दृष्टीने व विद्यार्थीवर्गाच्या हितैक-दृष्टीने सिडिकेटमध्ये दहा वर्ष पर्यत उत्तम रीतीने काम केले यात सशय नाही तेलगाच्या कामाच्या पद्धतीसबधाने प्रत्यक्ष ज्याना माहिती होती अशा दोन तज्ज्ञ गृहस्थाचे दाखले देण्यासारखे आहेत त्याचा इकडे थोडक्यात उल्लेख करतो रेव्हरड डॉ मॅकिकन हे काही काळपर्यत युनिव्हर्सिटीचे व्हाइस चॅन्सेलर होते ते म्हणतात की तेलग हे सिडिकेटच्या सभामधून कधीच गैरहजर राहात नसत तसेच सिडिकेटपुढे येणाऱ्या प्रत्येक प्रश्नाविषयी काळजीपूर्वक बारीक चौकशी करून त्यासबधाने पूर्ण माहिती मिळविण्याचा ते प्रयत्न केल्याशिवाय राहात नसत व अभ्यासक्रमाच्या कामात त्याचे विद्यार्थ्याच्या गरजाकडे नेहमी लक्ष असे. अशा तयारीने फार थोडे सिंडिक लोक कामे करीत असतात

दुसरा दाखला सर रेमड वेस्ट साहेबाचा हेही मागे काही दिवस व्हाइस चॅन्सेलर होते. त्याचा दाखला तेलगानी चालविलेल्या वरिष्ठ प्रकारच्या शिक्षणाच्या तरफदारीच्या दृष्टीनें—तर फारच महत्त्वाचा आहे ते म्हणतात, “तेलगानी आपल्या सबध कारकीर्दीतून जो उच्च प्रकारच्या शिक्षणाचा पुरस्कार केला होता तो अत्यत सस्मरणीय होता त्याची शिक्षणविषयक व्याख्याने, त्याचे निबध,

त्यानी अनेक कमिट्यामधून केलेली कामे, त्याचे मुबई मुन्सिपालिटीमधले स्कूल कमिटीतले काम, त्याचे कायदेकौसिलमधले काम वगैरे गोष्टी पाहिल्या म्हणजे ते वरिष्ठ प्रकारच्या शिक्षणाचा देशात प्रसार व्हावा एतदर्थ कसे कसून प्रयत्न करीत असत ह्याची सहज खात्री पटते ''

अशा सर्व दृष्टीनी लायक व शिक्षणविषयक उत्तम कामगिरी केलेल्या गृहस्थाची—न्या तेलगाची—व्हाइस-चॅन्सेलरच्या जागी नेमणूक व्हावी हे योग्यच होते मोठ्या जाग्यावर बहुधा लायक माणसाचीच नेमणूक होत असते परतु सरकाराच्या दृष्टीने जो मनुष्य लायक असतो तो लौकिक दृष्टीनेही लायक ठरतो असे फारच थोड्या वेळा घडते तो योग काशीनाथपत तेलगाच्या वरील नेमणुकीच्या वेळी जमून आला होता तेलगाची व्हाइस-चॅन्सेलरच्या जागी सन १८९२ मध्ये लॉर्ड हॅरिस यानी नेमणूक केली ती सर्व लोकाना पसत पडली. ती नेमणूक करण्यात जसा खुद्द तेलगाचा सन्मान झाला होता, तसाच त्याच्यासारखा लायक माणूस व्हाइस-चॅन्सेलर झाले या गोष्टीत युनिव्हर्सिटीचाही सन्मानच झाला होता ! सन १८९३ सालच्या पदवीदानसमारभाच्या वेळी खुद्द लॉर्ड हॅरिस यानी असेच उद्गार काढले —

" So far as one is justified in estimating the public appreciation of an appointment from general feeling and from remarks in the press, I Judge that the appointment of Mr K T Telang to the Vice-chancellorship is regarded as a good selection, one Conferring an honour on him in recognition of his distinguished career as a scholar, and honouring the University in the honour it does the recipient "

पुण्याच्या केसरीनेही ( कै टिळकानी ) आपल्या ता. २३-८-९२ च्या अकात सदरील नेमणूकीविषयी असेच उद्गार काढले " नामदार बर्डवुड याच्या जागी नामदार काशीनाथ त्रिंबक तेलग याची नेमणूक झाली. आमच्या इलाख्यात नेटिव्हास हा मान मिळाल्याचा हा पहिलाच प्रसग असल्यामुळे व त्या पहिल्याच प्रसगी काशीनाथपतासारख्याची योग्य निवड झाल्याचे हे वर्तमान ऐकून सर्वास आनद होईल यात सदेह नाही फेलो व सिंडिक या नात्याने युनि-

व्हर्सिटीच्या कारभारात त्याचा आज बरेच वर्षे हात आहे व युनिव्हर्सिटी बिल, नवीन आर्टस् कोर्स वगैरे महत्त्वाच्या प्रकरणात स्वमतस्थापनार्थ त्यानी फार मेहनत घेतली तेव्हा त्याच्यासारख्या अनुभवी मनुष्याची युनिव्हर्सिटीच्या मुख्य स्थानी सरकाराने नेमणूक केली ते ठीक झाले एकदरीत त्याच्या नेमणुकीने त्याना मान मिळाला इतकेच नाही तर युनिव्हर्सिटीसही फायदा होईल."

काशीनाथपत हे व्हाइस-चॅन्सेलरच्या जागी फक्त एक वर्ष राहिले तितक्या अवधीत युनिव्हर्सिटीचा पदवीदानसमारभ एकदाच झाला त्या वेळी तेलग आजारी होते ते समारभास हजर होते. परतु व्हाइस-चॅन्सेलर या नात्याने ते भाषण करू शकले नाहीत पुढील वर्षाचा समारभ व्हावयाच्या पूर्वीच ते दिवगत झाले ! असो

---

## प्रकरण सोळावे.

# एज्युकेशन कमिशन.

सन १८८० ते १८८४ या मुदतीत लॉर्ड रिपन हे हिंदुस्थानचे व्हाइसरॉय होते ते लिबरल म्हणजे विलायतेतील उदार मतवादी असून ग्लॅडस्टन साहेबाचे अनुयायी होते त्यानी आपल्या कारकीर्दीत हिदुस्थान देशाची जी कामगिरी केली आहे ती हिदवासी जनाच्या चिरतन हिताची असल्यामुळे ती आम्हास केव्हाही विसरता येणे शक्य नाही. पन्नास वर्षापूर्वी देशात शिक्षणाचा प्रसार फार झाला नव्हता सुशिक्षित लोकाची सख्या अगदी अल्प होती अशा वेळी देखील लॉड रिपन साहेबाचे हिदुस्थानच्या लोकाविषयी किती थोरपणाचे विचार होते हे त्याच्या एका भाषणातील पुढील लहानशा उताऱ्यावरून चागले व्यक्त होईल —

"It seems to me, I must confess, that it is little short of folly that we should throw open to increasing numbers the rich stores of Western learning; that we should inspire them with European ideas and bring them into the closest contact with English thought and that then we should, as it were, pay no heed to the growth of those aspirations which we have ourselves created, and the pride of those ambitions

we have ourselves called forth. To my mind, one of the most important, if it be also one of the most difficult, problems of the Indian Government in these days is how to afford such satisfaction to those aspirations and to those ambitions as to render the men who are animated by them the hearty advocates of the loyal supporters of the British Government.

साराश, इग्लिश शिक्षणाच्या योगानें हिंदी लोकाच्या मनात ज्या साहजिकच आकाक्षा उद्भूत झाल्या आहेत त्या पूर्ण न करणे अगर त्याकडे लक्ष न पुरविणे हे मूर्खपणाचे होईल असो अशा उदात्त हेतूने प्रेरित होऊन जे गृहस्थ—लॉर्ड रिपन—हिदुस्थानची राज्यसूत्रे हाती धरण्यास सिद्ध झाले होते त्याचे या देशात आल्याबरोबर इकडील लोकाच्या काही हिताच्या प्रश्नाकडे लक्ष गेल्यास आश्चर्य नाही असे महत्वाचे प्रश्न त्या वेळी पुष्कळच होते परतु त्यापैकी स्थानिक स्वराज्या-बद्दलचा ठराव व देशातील शिक्षणविषयक झालेल्या प्रगतीविषयी चौकशी करण्या-करिता नेमलेलें एजुकेशन कमिशन या दोन गोष्टीचा प्रथम उल्लेख केला पाहिजे त्यापैकी एजुकेशन कमिशनची सन १८८२ मध्ये नेमणूक करण्यात येऊन त्यात एकवीस सभासद नेमलेले होते त्यापैकी सात सभासद हिंदी असून मुबई इला-ख्यातर्फे काशीनाथपत तेलग याची नेमणूक झाली होती अध्यक्षाचे जागी नाम-दार सर विल्यम हटर याची योजना झाली होती कमिशनचे काम सुमारे दीड वर्ष चालून सन १८८३ च्या अखेरीस त्याचा रिपोर्ट बाहेर पडला

ह्या कमिशनचा थोडासा पूर्वेतिहास आहे व तो फार मनोरजक आहे यासब-धाची पुण्याच्या सार्वजनिक सभेच्या १८८२ जुलैमध्ये निघालेल्या त्रैमासिकाच्या अकात सविस्तर हकीकत प्रसिद्ध झाली आहे. त्यातून इकडे अगदी थोडक्यात साराश देतो. सदहू कमिशन नेमले गेले त्याच्या पूर्वी सुमारे चार वर्षे इग्लडात रेव्हरड जेम्स जॉन्स्टन, रेव्हरड मॅकिकन वगैरे मिशनरी लोकानी मोठी चळवळ चालविली होती तिचा मुख्य कटाक्ष "हिदुस्थान देशात सरकारी खर्चाने जें वरिष्ठ प्रकारचे शिक्षण देण्यात येते त्यात धर्मशिक्षणाचा मुळीच अतर्भाव होत नसतो" या गोष्टीवर असून सरकारकडून होता होईल तों शिकस्तीची खटपट करून वरिष्ठ प्रकारचे शिक्षण खासगी—म्हणजे मिशनरी—सस्थाच्या ताब्यात

घ्यावे असा त्या चळवळीच्या बुडाशी हेतु होता या कामी त्या मिशनरी लोकाना इग्लडातील लॉर्ड हॅलिफॅक्स ( १८५४ सालच्या शिक्षणविषयक खलित्याचे जनक ), ड्यूक आफ आर्गाइल वगैरे मोठमोठ्या लोकाची पूर्ण सहानुभूति व सहाय्य होते असे होते तरी हिदुस्थान सरकारने मिशनरी लोकानी वर सागितल्या-प्रमाणे धर्मशिक्षणविषयक पसरलेल्या जाळयात न सापडता, इकडील प्रजेला—धर्म-शिक्षणाच्या भानगडीत न शिरता—व्यावहारिक ( secular ) शिक्षणच देण्या-बाबतचे आपले पूर्वीचे धोरण चालू ठेवण्याचे ठरविले इतकेच की, सदर्हू चळ-वळीतील दुसऱ्या मुद्याकडे सरकारने लक्ष देऊन वरिष्ठशिक्षणाचे ओझे खासगी सस्थाच्या अगावर टाकून आपण फक्त प्राथमिक शिक्षणाच्या प्रसाराच्या कामी जास्त खर्च करणार असा आपला उद्देश पर्यायाने जाहीर केला याला त्यानी सन १८५४ सालच्या खलित्याचाच आधार दाखविला त्या खलित्यात एके ठिकाणी असें म्हटले आहे —"The resources of the state ought to be so applied as to assist those who cannot help themselves and the richer classes of the people should gradually be induced to provide for their own education"

याप्रमाणे सरकारच्या मनातला हेतु व मिशनरी लोकानी—आपल्या मनाने मानलेल्या—धर्मविरहित लोकशिक्षणाविरुद्ध केलेली तक्रार या गोष्टी प्रसिद्ध होताच आमच्या इकडील पुढाऱ्यानी व काही सस्थानी उलट दिशेने चळवळ करून निषेध प्रदर्शक अर्ज सरकारकडे पाठविले या चळवळीत भाग घेणारे मोठमोठे लोक होते त्रावणकोरचे ( त्या वेळचे ) महाराज, राजा सर टी माधवराव, दिवाण रगाचार्लू, न्यायमूर्ति मुत्तुस्वामी आयर, नामदार क्रिस्टोदास पाल व पुण्याचे त्या वेळचे रा ब रानडे यानी वरिष्ठ शिक्षणाच्या दृष्टीने सरकाराने योजिलेले पिछेहाटीचे धोरण सोडण्याविषयी आपापल्याकडून शिकस्तीची खटपट चाल-विली होती यासबधाचे रानड्याच्या नजरेखालून गेलेले व सार्वजनिक सभेच्या ( जुलै १८८२ ) त्रैमासिकात प्रसिद्ध झालेले दोन लेख अत्यत वाचनीय आहेत, ते ज्याना सवड असेल त्यानी जरूर वाचावे असो

कमिशन नेमण्याचा सरकारचा मुख्य उद्देश सरकारी ठरावात असा होता —

"To ascertain the present state of elementary education throughout the Empire, and the means

by which this can everywhere be extended and improved "

याबद्दल चौकशी करून रिपोर्ट करणे कमिशनचे सुमारे दीड वर्ष काम चालू होते हे मागे सागितलेच. त्या अवधीत अनेक सरकारी, व बिन सरकारी शिक्षणविषयक तज्ज्ञ लोकाच्या साक्षी घेण्यात आल्या कारणाने कमिशनपुढे बरीच महत्वाची माहिती गोळा झाली या साक्षी झाल्या त्यात आपल्या मुबई इलाख्यातील भाडारकर, बद्रुद्दीन तय्यबजी, वेडरबर्न, प्रि वर्डस्वर्थ, चीफ जस्टिस सार्जट याच्याही महत्वाच्या साक्षी झाल्या पण त्यासबधाचा इकडे विस्तार करण्याची आवश्यकता नाही. असो सदहू माहितीचा पूर्ण विचार करून मग रिपोर्ट तयार करण्यात आला कामाच्या सोईसाठी व सर्व प्रातातील स्थानिक गरजा असतील त्याचीही आपल्या पुढील सामुग्रीत नोद व्हावी म्हणून मुख्य कमिशन कडून निरनिराळया प्रातातून पोट कमिट्या नेमण्यात आल्या होत्या त्यापैकी मुबई इलाख्याच्या कमिटीत काशीनाथपत तेलग हे होतेच पोट कमिट्याचे सर्व रिपोर्ट सकलित करून मग कमिशनने आपला रिपोर्ट तयार केला

रिपोर्टाच्या आरभी अगदी प्राचीन काळापासून ब्रिटिशसत्ता स्थापन होईपर्यत हिंदुस्थानदेशात शिक्षणाचा प्रसार कसकसा होत आला होता याचा त्रोटक इतिहास दिला आहे मेगॅस्थनीसच्या वेळी ( ख्रिस्त पूर्व चवथ्याशतकात) देशात शिक्षणाची कशी व्यवस्था होती, पुढे त्याची बौद्ध काळात कशी वाढ झाली हे थोडक्यात सागण्यात येऊन इसवीसनाच्या सातव्या शतकात नालदची प्रसिद्ध युनिव्हर्सिटि —विद्यापीठ—ही कशी मध्ययुगातील युरोपीय युनिव्हर्सिटीच्या तोडीची होऊन राहिली होती हे दाखविले आहे पुढे या देशात मुसलमान लोक आल्यानतर त्याच्या मशिदीतून कसकशा शाळा घालण्यात येऊन मुलाना शिक्षण देण्यात येत असे हे निर्दिष्ट केलेले आहे तात्पर्य, ईस्ट इडिया कपनी आल्यानतर तिला इकडे शिक्षणप्रसार चार प्रकारानी किवा चार प्रकारच्या सस्थाच्या द्वारें होत असे असे आढळून आले ब्राह्मण लोक आपल्या शिष्यवर्गाला खासगी रीतीनें शिक्षण देत असत, तोळ किंवा पाठशाळा होत्या त्याच्या द्वारें सस्कृत शिक्षण देण्यात येत असे, मुसलमान लोकाच्या मकताब व मद्रेसा या शिक्षणसस्था असत त्यातून अरबी व पार्शीयन भाषाचें शिक्षण मिळण्याची व्यवस्था होई, व लहान लहान खेड्यातून खासगी शाळा असत त्यामधून सुखवस्तु जमीनदार अगर व्यापारधदा करणारे लोक याच्या मुलाची शिक्षणाची सोय होत असे

याप्रमाणे देशात ईस्ट इडिया कपनी आली, त्या वेळी शिक्षणाची व्यवस्था होती ती तशीच काही वर्षे चालली पण पुढे काही काळाने शिक्षणकार्याला नवीन दिशा लागण्याची चिन्हे दिसू लागली याला तीन गोष्टी मुख्यत कारणीभूत झाल्या ज्या मुख्य मुख्य ठिकाणी कपनी सरकारच्या कचेऱ्या होत्या, तिकडील काही लोकाना एक उदरनिर्वाहाचे साधन या दृष्टीने इग्लिश शिक्षणाची फार गरज भासू लागली त्यामुळे इग्लिश शिक्षणाला साहजिकपणे मागणी उत्पन्न झाली दुसरी गोष्ट, मुसलमानी सत्तेच्या नाशाबरोबरच पर्शियन भाषेचे महत्व मागे पडले व तिच्या जागी देशी भाषाच्या शिक्षणाकरिता ठिकठिकाणी मागणी सुरू झाली आणि तिसरे कारण, लोकशिक्षणाच्या बाबतीत झटून खटपट करण्याकरिता युरोप खडात तशीच इकडे देखील सरकारच्या पाठीमागे मिशनरी लोक व इतर धर्मार्थ काम करणाऱ्या सस्था याची सारखी जोराची टोचणी सुरू झाली या कारणत्रयी-मुळे जुनी शिक्षणपद्धत मागे पडून तिची जागा हळू हळू नवीन ( इग्लिश )पद्धत घेऊ लागली हा जो परिणाम झाला तो काही अगदी शातपणे अगर झटापटी-शिवाय झाला, असे नाही जुने शिक्षण ( सस्कृत, पर्शियन वगैरे भाषातलेच शिक्षण ) व नवे इग्लिश शिक्षण यासबधाने मोठमोठ्या लोकामध्ये बरेच दिवस वाद चालला होता फार काय, पण पुष्कळसे सरकारी कामगार "नवे शिक्षण नको, जुनेच द्या " असे म्हणणारे होते आणि साहजिकपणे त्याच्याच बाजूने सरकारी धोरण झुकू लागले होते पण पुढे पुढे उलट ( अल्पसख्याक ) पक्षाचा जोर वाढून दोन्ही पक्ष तुल्यबल झाले इतक्यात मेकॉले साहेब पुढे आले व त्याच्या तरफदारीने इग्लिश शिक्षणाच्या पुरस्कर्त्याचा जय झाला व त्याप्रमाणे सरकारी ठराव प्रसिद्ध होऊन नवीन शिक्षणपद्धत सुरू करण्याचे नक्की ठरले ! तरी देखील दुसऱ्या ( विरुद्ध ) पक्षाचे लोक स्वस्थ बसले नाहीत त्यानी फिरून काही दिवसानी उचल घेतली व मागील सरकारी ठराव रद्द करण्याबद्दलची खटपट चालविली ! पण या कामी त्याना यश आले नाही कारण सन १८३९ मध्ये खुद्द लॉर्ड ऑकलड यानी आपले मत—मिनिट—इग्लिश शिक्षणाच्या तर्फेच दिल्यामुळे तो वाद कायमचा मिटला ऑकलड साहेबाच्या मिनिटचे तात्पर्य असे —

" That although English was to be retained as the medium of the higher instruction in Eropean literature, philosophy and science, the existing Oriental

Institutions were to be kept up in full efficiency, and were to receive the same encouragement as might be given to the students at English institutions. Vernacular instruction was to be combined with English, full choice being allowed to the pupils to attend whichever tution they might individually prefer."

असो तेव्हापासून इंग्लिश शिक्षणाचा जोराने प्रसार होऊं लागला सन १८५४ सालातल्या खलित्याच्या योगाने मग नव्या शिक्षणपद्धतीस व्यवस्थित स्वरूप प्राप्त झाले व सन १८५७ मध्ये कलकत्ता, मुबई व मद्रास या तीन ठिकाणी मुख्य युनिव्हर्सिट्या स्थापन होऊन त्या पद्धतीची पूर्ण अमलबजावणी सुरू झाली

याप्रमाणे कमिशनच्या रिपोर्टाच्या आरभीच सक्षिप्त रीतीने पूर्वीचा इतिहास देण्यात येऊन पुढे सन १८५४ पासून १८८२ पर्यंतचे आकडे देऊन शिक्षणा-बाबतची खरी वस्तुस्थिति काय होती हे दाखविण्यात आले आहे व त्याच्या पुढे कमिशनने आपल्या शिफारशी केल्या आहेत या शिफारशी रिपोर्टाच्या तेराव्या प्रकरणात सर्व नमूद झाल्या आहेत शिफारशी पुष्कळच आहेत पण त्यासब-धाचा इकडे विस्तार करण्याचे कारण दिसत नाही मुख्य मुख्य शिफारशीचे स्वरूप काय होते हे पुढे तेलगाच्या मताविषयी जे विवेचन केले आहे त्यावरून स्पष्ट होईल असो रिपोर्टास काहीं सभासदानी मतभेदपत्रिका जोडलेल्या आहेत या सर्व भिन्नमतपत्रिका पाच असून त्यात महत्वाची पत्रिका म्हणजे काशीनाथपत तेलग यानी जोडलेली हीच होय कमिशनने केलेल्या काही शिफा-रशी तेलगाना पूर्ण रीतीने पसत नसून काहीसबधाने तर कमिशनशी त्याचा तीव्र मतभेद होता त्यामुळेच त्यानीं आपले भिन्नमतपत्रक रिपोर्टास जोडले त्या पत्रकाने रिपोर्टाची चवदा पृष्ठे घेतली आहेत

तेलगानी कमिशनमध्ये केलेल्या कामासबधाने सर दिनशा वाच्छा असे म्हणतात —

"The most memorable public service which Mr. Telang rendered during the period was in connection with the Education Commission of 1883–84, of which

he was a member. It was there that his remarkable powers, not only of analysis and criticism, but of searching cross-examination were to be seen at his best ××× As an independent non-official member of the Commission, Mr. Telang has rendered yeoman's service to the cause of education, and his views on that subject as expressed in his "Minute of dissent"×× may be read with the greatest profit and instruction They are, in a sense, his education evangel which he was not slow to propagate in, and out of his *Alma mater*, of which he was such a prominent and invaluable member and of which also he had the honour to be the first Indian Vice-Chancellor "

तेलगानी प्रथम रिपोर्टातील काही विधानासबधाने आक्षेप घेतला आहे नुसत्या त्या विधानाचाच विचार केला तर ती काही फारशी महत्वाची नव्हती. परतु त्याविषयी त्यानी एक दोन शब्दात मतभेद दर्शवून मग ते महत्त्वाच्या शिफारशीकडे वळले आहेत मुबई इलाख्यात लोक जी "लोकलफड पट्टी भरतात, ती मुळी अगदी ऐच्छिक ( Voluntary ) होती " व "या इलाख्यातील जमीनधाऱ्याची पद्धत फार उदार धोरणाने ( liberal ) बसविलेली आहे " अशी रिपोर्टात एक दोन ठिकाणी विधानें आहेत. ती तेलगाना कबूल नव्हतीं त्यानी म्हटले की सदरील विधाने शिक्षणाशिवाय दुसऱ्याच विषयासबधानें असल्यामुळे तीं जशीची तशीं कबूल करण्यास आपण तयार नाही ! रिपोर्टात दुसऱ्या एका ठिकाणीं म्हटले आहे की, " काशीच्या पाठशाळेंतील जुनी सस्कृत शिक्षणाची पद्धत अगदी क्षुल्लक असून त्यात चिकित्सक बुद्धीच्या ( frivolous and uncritical ) विकासाला मुळीच वाव नाहीं " हे म्हणणे तेलगाना कबूल नव्हते ! रिपोर्टात तिसऱ्या एका जागी म्हटले होते कीं, मुबई इलाख्यातील कॉलेजात सरकाराने शिष्यवृत्त्यासबधाने पुष्कळच ( large ) तजवीज केली आहे. हे म्हणणे काशीनाथपताना अतिशयोक्तीचे वाटले ! रिपोर्टाच्या सहाव्या प्रकरणात "उच्च प्रकारच्या शिक्षणापासून ( collegiate instruction ) हिंदी लोकाच्या मनावर झालेला परिणाम" असा मथळा देऊन

एक प्यारा घातलेला आहे त्यात नवीन सुशिक्षित लोक व इंग्लिश लोक ( ruling race ) यामधील दळणवळणासबंधाचा उल्लेख करून इंग्लिश लोकांच्या बाजूचे एक दोन दोष असतील ते जरा हलक्या हाताने हळूच दाखवून हिंदी लोकांचे दोष मात्र बरेच रंगवून चांगले भडक दिसतील अशा प्रकारचे चित्र काढले आहे या भागाचा रिपोर्टातील मुख्य प्रतिपाद्य विषयाशी अगदी थोडा संबंध असल्यामुळे तेलंगांनी त्याविषयी आपल्या मतपत्रकात अधिक विस्ताराने न लिहिता चार शब्दातच आपला मतभेद नमूद केला आहे रिपोर्टात एके ठिकाणी " Unwise enthusiasts flatter him with hopes and prophecies " असे एक वाक्य आहे म्हणजे काही तरुण व उत्साही—पण शहाणपणा नसलेले—इंग्लिश लोक मोठमोठ्या आशा दाखवून नवीन सुशिक्षित लोकांमध्ये उगीच भलत्याच आकांक्षा उत्पन्न करीत असतात! दुसऱ्या एका ठिकाणी इंग्लिशलोकांच्या संबंधाने " the chill courtesies of English reserve " ( ते सभ्य नसतात असे नव्हे, पण इंग्लिश लोकांना फार बोलावयाला नको असते! ) असे म्हटले आहे याविषयी तेलंगांनी एवढेच म्हटले आहे की, इंग्लिश लोकांच्या बाजूचे इतकेच फक्त दोष नसून आणखीही दुसरे पुष्कळ आहेत! त्यातूनही " Unwise enthusiasts " हा त्यांचा केवळ दोषच आहे असे म्हणता येत नाही दोषच मानला तर तो अगदीच क्षुल्लक ठरेल! परंतु नवीन सुशिक्षित लोकांच्या बाजूचे म्हणून जे रिपोर्टात दोष दाखविण्यात आले आहेत ते मात्र अतिशयोक्तीचे आहेत असे तेलंगांनी स्पष्ट म्हटले आहे " pretensious self-assertion " (जिकडे तिकडे पुढे पुढे करणे ) व " absence of lofty motive " ( उच्च किंवा शुद्ध हेतूचा अभाव ) हे हिंदीलोकांच्या बाजूचे रिपोर्टात दोन मोठे दोष दाखविण्यात आले आहेत पण ते ( considerably overstated ) अतिशयोक्तिपूर्ण आहेत असे तेलंगांनी आपले मत नमूद केले आहे असो पण हा मतभेद रिपोर्टातील क्षुल्लक बाबींसंबंधाने झाला आता काही महत्वाच्या बाबी संबंधाने तेलंगांचे काय म्हणणे होते ते पाहू

कमिशनची एक अशी शिफारस होती की, सरकारी ग्रँट घेणाऱ्या सर्व (खासगी) शाळांतून विद्यार्थ्यांकडून फी किती घ्यावी व किती मुलांपासून ती घेऊ नये हे ठरविण्याचा अधिकार डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन याला असावा! ही शिफारस काशीनाथपंत तेलंगांना बिलकूल कबूल नव्हती! यासंबंधाने तेलंगांनीं

केलेले विवेचन अत्यत स्वतत्र वाण्याचे असून त्याने अडीच पाने भरली आहेत त्या सर्व भागाचा इकडे अनुवाद देता येणे शक्य नाही सबब फक्त काही महत्वाच्या मुद्याचाच तेवढा इकडे उल्लेख करतो मूळ सन १८५४ सालच्या खलित्यातील "some fee, however small" असल्या शब्दाचा इतर (कमिशनच्या) सभासदानी आधार घेऊन वरील शिफारस केली होती पण तेलगानी (आपल्या मतपत्रकात) स्पष्ट सागितले की, मूळ खलित्याचा वरीलप्रमाणें (strained) ओढून ताणून केलेला अर्थ आपणास कबूल नाही! दुसरे असे की, विद्यादान हे मोबदला घेऊन करावे ही मुळी हिदु, मुसलमान किवा पारशी यापैकी कोणाचीच परपरा नसल्यामुळें वरील प्रकारचा नियम करण्याचा डायरेक्टरला दिलेला अधिकार कोणत्याही हिदी समाजास पसत पडणार नाही शिवाय प्रस्तुत विषयासबधानें युरोपीयन राष्ट्रात देखील जो अनुभव आल्याचे प्रसिद्ध झाले आहे, तो अनुभवही वरील नियमाला अनुकूल नाही ! साराश, मूळ १८५४ सालच्या खलित्यानें आम्ही केवळ बाधले गेलो आहो असे समजण्याचे कारण नाही. सदहू खलिता मुळी सर्व हिदी समाजाच्या कल्याणाच्या दृष्टीने लिहिलेला होता व तो लिहिताना त्याच्या जनकानी युरोपियन राष्ट्रातील अनुभव काय आहे हे लक्षात आणूनच तो (खलिता) तयार केला होता. अशा स्थितीत त्यातील काही भागाचा ओढाताणीने अर्थ करून अनुदारपणा पदरी घेणे व सर्व हिदी—हिदु, पारशी, मुसलमान—समाजाच्या आजवर चालत आलेल्या परपरेकडे दुर्लक्ष करणे हे कोणत्याही दृष्टीने योग्य नाही, असे तेलगानी नमूद केले आहे

कित्येकाचे म्हणणे असे होते की डायरेक्टरने एकदा नियमाने (अमुक) फी किती घ्यावी हे ठरविले म्हणजे त्यायोगे बिनसरकारी शाळाना एक प्रकारची मदत मिळून चालकाच्या प्रयत्नाना बळकटी येईल व एका खासगी शाळेने दुसरीशी चढाओढ करण्याला वाव मिळणार नाही ! तेलग म्हणतात की, वरील प्रतिपादनाचा स्पष्ट अर्थ इतकाच की काही पूर्वीच अस्तित्वात असलेल्या सरकारी पुढ्यातील शाळानाच (favoured institutions)—अर्थात् मिशनरी शाळाना सरकारी ग्रँट मिळण्याची सवड राहावी आणि त्याच्याशी चढाओढ करण्याऱ्या दुसऱ्या खासगी शाळा निघू नयेत ! "वरील नियमाचा असा परिणाम होणे हे मला पसत वाटत नाही," असे तेलगानी आपले स्पष्ट मत दिले आहे

दुसरे कित्येक लोक असे गृहीत धरून चालले होते की, डायरेक्टरने ठरविलेल्या फीपेक्षा खासगी शाळातून कमी फी घेण्याची सवड ठेविली तर शिस्तीचा

भग होईल अगर दुसरा असाच कोणता तरी खोडसाळपणा त्यापासून उत्पन्न होईल ! तेलगानी असे स्पष्ट सागितले की, असली भीति बाळगण्याला मुळीच आधार नाही ! नवीन शाळा काढण्यात हिदु लोकाचा आपल्या परपरेला अनुसरून सामान्यत कसा—कमी खर्चात शिक्षण देण्याचा—शुद्ध हेतु असतो हे दाखवून तेलगानी आपल्या मतपत्रकात त्या वेळी पुण्यास नुकत्याच ( १८८० ) निघालेल्या न्यू इग्लिश स्कूलचा अभिमानाने उल्लेख केला आहे तेलगाचे मूळात म्हणणे असे आहे —" One great inducement in the past to the opening of schools by my countrymen has been the opportunity thus afforded them for spreading education *cheaply* I may cite the case of the New English School in Poona as an illustration with which I am most familiar I hope and believe that the same inducement will continue to be a potent one in future"

अशाच शुद्ध हेतुने पुढेदेखील आपले देशबाधव नवीन शाळा काढण्यास प्रवृत्त होतील अशी तेलगानी या वेळी आशा प्रदर्शित केली होती ती आशा फलद्रूप होऊन खुद्द मुबई इलाख्यातच गेल्या चाळीस वर्षांत हिंदी लोकानी काढलेल्या व उत्तम रीतीने चाललेल्या अशा असख्य इग्रजी शाळा आज दृष्टीस पडत आहेत असो वरील प्रकारचा खासगी—पण सरकारी ग्रॅट घेणाऱ्या—शाळातून फीचे दर ठरविण्याचा डायरेक्टरला अधिकार देण्याबाबतच्या शिफारशीला इतका कसून विरोध करण्यातला तेलगाचा मुख्य हेतु हाच की, सरकारने पुढे नवीन शाळा काढणाऱ्या आपल्या देशबाधवाच्या मार्गात भलत्याच अडचणी उत्पन्न करून त्याचा उत्साहभग करू नये त्याचे शब्द असे आहेत —" I am concerned for those ( Schools ) which shall *not* aim at making secondary and higher education as costly as possible, but which shall be started by men who will, within certain limits, act on the traditions to which I have already alluded " खासगी शिक्षणसस्था काढणाऱ्या देशाभिमानी लोकाना भलत्याच अटी घालण्याच्या सरकारच्या या प्रवृत्तीचा तेलगाच्याप्रमाणेच पुढे लॉर्ड कर्झन यानी सन १९०४ मध्ये

नेमलेल्या "युनिव्हर्सिटी कमिशन" च्या वेळी सर गुरुदास बानर्जी यानीही सभासद या नात्यानें असाच जोराचा निषेध केला होता हें सर्व-विश्रुत आहे. खासगी शिक्षणसस्था काढणाऱ्या लोकाच्या मार्गांत काटे पसरण्याची सरकारची ही प्रवृत्ति प्राय. आमच्या देशात नेहमीच असते याप्रमाणें भलत्याच अटी घालून खासगी संस्थाच्या मालकास नाडणाऱ्या सरकारी धोरणाचा सर फेरोजशाह मेथा यानी देखील सन १९०५ मध्ये त्याना एल्फिन्स्टन कालेजात एकदा पार्टी देण्यात आली होती त्या वेळी आपल्या नेहमीच्या नि स्पृह बाण्यानें स्पष्ट शब्दात निषेध केला होता. रा ब. रानड्याच्या एतद्विषयक लेखाचा तर मागें उल्लेख आलाच आहे. तात्पर्य, सरकारनें शिक्षणविषयक धोरण अनिष्ट प्रकारचे स्वीकारल्याबद्दल निषेध व्यक्त करण्याच्या बाबतीत देशातील—तेलग, बानर्जी, मेथा, रानडे वगैरे सर्व पुढाऱ्यामध्ये एकवाक्यता होती असो.

सदर्हू कमिशनची नेमणूक झाली त्या वेळी काही मिशनरी लोकानी स्वार्थबुद्धीने चळवळ चालविल्याचा व वरिष्ट शिक्षणावरील खर्चाच्या कामी हात आखडता घेऊन प्राथमिक शिक्षणाकडे जास्त खर्च करावा असा हिंदुस्थानसरकारचा कल होऊ लागला होता या गोष्टीचा मागें उल्लेख आलाच आहे परतु सदर्हू चळवळीचा सुदैवानें काही उपयोग न होता आमच्या लोकानी ( मागें सागितल्याप्रमाणे ) केलेल्या खटपटीमुळें कमिशनवर चागला परिणाम झाला व त्याप्रमाणें ज्या ज्या प्रातात ज्यास्त कॉलेजें ( स्थानिक गरजानुसार ) निघण्यासारखी असतील त्या त्या ठिकाणी ती काढण्याच्या कामी सरकाराने जरूर शक्य ती मदत करावी अशी सर्वानुमते कमिशनने शिफारस केली ही शिफारस तेलगाना पूर्णपणें मान्य होती हे सागावयाला नकोच. पण ही आपली मान्यता दर्शविताना त्या वेळी जो "प्राथमिक शिक्षण विरुद्ध उच्च प्रकारचे शिक्षण" अशा प्रकारचा देशभर वाद चालला होता, त्याविषयी भिन्नमतपत्रकाची सधि साधून तेलगानी आपले मत नि सदिग्ध रीतीने नमूद केले आहे प्राथमिक शिक्षणाचा पुष्कळ प्रसार होऊन जनतेचे साक्षरतेचे प्रमाण वाढल्याशिवाय देशाला ऊर्जितदशा येणार नाही हे तेलगाना पूर्णपणें मान्य होते पण त्याबरोबरच वरिष्ट प्रकारच्या शिक्षणाचीही वाढ झाली पाहिजे असेंही त्याचे स्पष्ट मत होते. नुसते मनुष्याला हातच असून काम भागत नाही त्याला डोकेही पण पाहिजे तद्वत् वरिष्ट प्रकारचे शिक्षण वाढल्याशिवाय देशात नुसत्या प्राथमिक शिक्षणाचा प्रसार होऊन आपणास उन्नतावस्था केव्हाही प्राप्त होणार नाही. तेलग म्हणतात की "I hold an equally strong

opinion that, without the higher education, mass education cannot be of much avail, even if it can be secured."

वरिष्ठ प्रकारच्या शिक्षणासबधाने तेलगाच्या सारखेच विचार फेरोजशाह मेथा यानीही एका भाषणात प्रकट केले होते.—

"Now I make bold to say that there cannot be a greater misappreciation of the problem of Indian education, and one more fraught with disastrous consequences, and more opposed to every consideration of sound policy than to hold that primary education is the question of the day in India. It may be, and it is the question of the day in England and Europe, where centuries have laid up a munificent provision for higher education But in India, in the peculiar circumstances in which she finds herself, it is not primary, but higher education is the question of the day." असो.

कित्येक म्हणत होते की, एका विद्यार्थ्याला वरिष्ठ प्रकारचे शिक्षण देण्यास जो खर्च लागेल तेवढयात शभर मुलाना प्राथमिक शिक्षण देता येईल! तेलगानी म्हटले की असल्या हास्यास्पद कोटीचा विचार करीत बसणे म्हणजे व्यर्थ कालक्षेप करणे होय! युरोपीयन राष्ट्राविषयी मॅथ्यू अर्नाल्डने जे निष्कर्षरूपाने म्हटलें आहे तेच हिंदुस्थानला लागू करणें हेंच श्रेयस्कर आहे तो म्हणतो की "In all these countries the idea of a sound civil organisation of modern society has been found to involve the idea of an organisation of secondary and superior instruction by public authority or by the State." सुधारलेल्या राष्ट्रात लोकस्थिति सुखमय करावयाची असेल तर तेथील सरकारानें दुय्यम व उच्च शिक्षणाची जरूर व्यवस्था केली पाहिजे हिंदुस्थानातील ब्रिटिश सरकारचें शिक्षणविषयक धोरण वरील तत्त्वाबरहुकूमच सामान्यत असते व तेच

त्या सरकाराने निश्चयपूर्वक पुढेही चालू ठेवले तरच या देशाची सर्व दृष्टीने—राजकीय, सामाजिक, औद्योगिक वगैरे दृष्टीनी—प्रगति होईल तेलग म्हणतात —

"( I ) will merely say that in my opinion the whole religious, social, political and industrial advance of the country depends on the steady adhesion to that enlightened policy as regards high education, which has probably been the most generally approved portion of British Indian policy in the past"

दुय्यम व वरिष्ट प्रकारच्या शिक्षणावरील सरकारी खर्च कमी करावा असें जे लोक सुचवीत असत, त्याच्या सूचनासबधाने तेलगाचे काय स्पष्ट मत होते याचा वर उल्लेख आलाच आहे त्याचप्रमाणे सरकारी शाळातील व कालेजातील जें माफी विद्यार्थ्यांचे प्रमाण ठरविण्यात आले होते तेही तेलगाना पसत नव्हते ' तें प्रमाण सामान्यत शेकडा पाच असे. तेलगाना ते अगदीच थोडे वाटले, व त्याबद्दल त्यानी आपली स्पष्ट नापसती दर्शविली होती गरीब विद्यार्थ्यांना शिक्षणाच्या कामी उत्तेजन देण्याच्या हेतूनेच फी माफ करण्याची योजना असते आणि हिंदुस्थानातील शिक्षणसस्थामधून गरीब विद्यार्थ्यांचाच जास्त भरणा असतो हे गरीब विद्यार्थी सामान्यत. होतकरू असतात आणि अशा विद्यार्थ्यांना शिक्षण देण्याच्या कामी सरकारची उदारवृत्ति असणे जरूर आहे. तेलग म्हणतात की,

" The poor boys are the very salt of our colleges and schools, and I would earnestly plead for a fairly ample provision for them " फी माफ करून गरीब विद्यार्थ्यांना उत्तेजन देण्याबाबतचे तत्व विलायतेत देखील मान्य झालेले आहे तेव्हा त्यासबधाने जास्त विवेचन करण्याची गरज नाही.

कमिशनची एक अशी शिफारस होती की, इकडील शाळातून व कालेजातून नैतिक व धार्मिक शिक्षण सुरू करावे कित्येकाच्या मते नैतिक विषयावर कालेजात व शाळात व्याख्यानमाला सुरू करून विद्यार्थ्यांना " मनुष्याची कर्तव्ये " व " नागरिकाची कर्तव्ये " याविषयी माहिती द्यावी दुसरे कोणी म्हणत की, सदरील विषयावर कालेजात एकादे पुस्तक नेमावे तेलगानी आपल्या मतपत्रकात सदरील सूचनातील तत्त्व आपणास पूर्ण मान्य आहे असे कबूल केले आहे. परंतु

त्या शिफारशीची अमलबजावणी केल्यास तेलगाच्या मते, त्यापासून कदाचित् काही फायदा होईल, व तोटाही होईल ! पण मुद्याचा प्रश्न असा की, आमच्या शिक्षणसस्थातून ही नवीन योजना सुरू करण्यासारखी काय कारणे घडली आहेत ? कित्येकाच्या मते अशी महत्वाची कोणतीच कारणे घडली नाहीत दुसऱ्या कित्येकांच्या मते, आजपर्यंतच्या तटस्थ वृत्तीच्या पद्धतीपासून सरकारी कालेजातील विद्यार्थ्यांच्या नैतिक वर्तनावर अति अनिष्ट प्रकारचा ( disastrous ) परिणाम झाला आहे. तेलग म्हणतात की या दुसऱ्या लोकानी वस्तुस्थितीचे केवळ घाईनें व वरवर अवलोकन करून आपले अतिशयोक्तीचे व अशत चुकीचे मत बनविले आहे या विषयावर ( " Our Educational Policy in India " ) या नावाचे रे० मिस्टर जॉनस्टन या मिशनरी गृहस्थानी एक लहान पुस्तक प्रसिद्ध केले आहे त्यात त्यानी इग्लिश शिक्षण पद्धतीच्या योगाने ( त्यानी नैतिक व धार्मिक शिक्षणाची काही व्यवस्था केलेली नसल्यामुळें ) हिदुस्थानच्या तरुण लोकावर वाईट परिणाम झाल्याचे अगदी भेसुर चित्र रेखाटले आहे ! त्याचप्रमाणे त्या साहेबाच्याच दुसऱ्या पाच साथीदारानी खुद्द प्रस्तुत कमिशनपुढेच एक अर्ज सादर करून त्यात ( अर्जदारानी ) असे एक सरसकट सामान्य विधान केले होते की, " The result of Government so-called neutrality has been *by common consent* decidedly injurious from a moral and religious point of view "

म्हणजे सरकारच्या ( नैतिक व धार्मिक शिक्षणाच्या दृष्टीने ) तटस्थ वृत्तीने अतिभयकर परिणाम झाला आहे, असे सामान्यत सर्व लोक कबूल करतात तेलग यावर विचारतात की " सर्व लोक " म्हणजे कोण ? कमिशनपुढे जो प्रस्तुत बाबीसबधाने भरपूर पुरावा गोळा झाला आहे त्याचा विचार करता वरील विधान तर खोटे ठरतेंच, पण त्याच्या उलट प्रकार मात्र चागल्या रीतीनें सिद्ध होतो ! इतकेंच नव्हे, तर सरकारच्या सुमारें तीस वर्षें चालू असलेल्या शिक्षणपद्धतीवर सदरहू गृहस्थानी आपल्या अर्जद्वारे निष्कारण हल्ला केल्यामुळें त्याच्या कृतीचा जितका निषेध करावा तितका थोडाच आहे असे म्हणून तेलगानी त्याचा पूर्ण निषेध केला आहे ज्या शिक्षणपद्धतीवर तो निराधार हल्ला केला गेला होता त्या पद्धतीप्रमाणेंच आपले व आपल्या दुसऱ्या पुष्कळ मित्राचे शिक्षण झालेले असल्यामुळे तशा हल्लयाचा ( आपल्या ) मतपत्रकात निषेध करणे आपले कर्तव्य आहे असे म्हणून त्यानी तसा स्पष्ट निषेध केला. न्या रानडे यानी देखील मिशनरी

लोकाच्या ( वरीलप्रमाणें ) बरळण्याविरुद्ध जोराचा निषेध केला. तो भाग असाः—

"It is a gross calumny on the part of missionary advocates to say that the Government system of education in India has produced a race of unbelievers and atheists. The Brahma Samaj Church, the Prarthana Samaj Church, the Arya Samaj Church with their numerous branches, founded and supported wholly by natives educated at the Government Colleges, show how false the accusation is, and are plain evidence that the Christian Missionaries are not the only religious people on the face of the earth." असो

परतु वर सागितलेली नैतिक विषयावर (मनुष्याच्या कर्तव्यावर) व्याख्यानमाला सुरू केली किंवा एखादें पुस्तक नेमले तरी—ती एक नवीन टूम यापलीकडे—त्यापासून खराखुरा कितीसा फायदा होण्याचा सभव आहे ? असे तेलगानीं विचारलें आहे मनुष्याच्या सर्व आयुष्याची पारख त्याच्या आचरणावर अवलबून असते हें अगदीं सत्य आहे पण ते आचरण चागले बनविण्याच्या कामी वरील सारख्या व्याख्यानाचा काय उपयोग होणार आहे ? तसल्या व्याख्यानाचा कदाचित् प्राथमिक शाळामध्ये काही उपयोग होईल दुय्यम शाळातून ती फार तर निरुपद्रवी ( innocuous ) म्हणून खपतील. पण कॉलेजात तसल्या व्याख्यानाचा उपयोगही होणार नाही व ती निरुपद्रवी म्हणून खपणारही नाहीत. शिक्षणक्रम चालू असता मुलास प्रथम प्रथम काही गोष्टीचे ज्ञान नसते पुढे ते ज्ञान प्राप्त झालें तरी मुलाची विचारशक्ति जागृत झालेली नसते ती शक्ति प्राप्त झाली म्हणजे मग ( कालेजात ) त्याच्यामध्ये चिकित्साबुद्धि उत्पन्न होते व ते भावनाप्रधान बनू लागतात. अशा स्थितीत नुसत्या व्याख्यानाचा काही एक उपयोग होत नसतो तशा उदयोन्मुख काळात विद्यार्थ्यांच्या भावना जागृत करून त्याच्यामध्ये सद्वासना उत्पन्न करण्याची उत्तम साधनें म्हणजे मोठमोठ्या चळवळींचे इतिहास, थोर लोकांची स्फूर्तिदायक चरित्रें व इतर चागलीं वाङ्मयात्मक पुस्तकें वाचणें आणि सुवृत्त अशा प्रोफेसर लोकाचा व सहाध्यायांचा सहवास हींच होत. अशा साधनाचा विद्यार्थ्यांच्या फायद्याच्या दृष्टीनें शक्य तितका भरपूर पुरवठा करण्याची

व्यवस्था झाल्यास सबध कालेजचें वातावरणच निर्मल बनल्याशिवाय राहणार नाही व अशा शिक्षणसस्थामधून चागले सद्वृत्त पदवीधर बाहेर पडण्याच्या कामी याची मदत झाल्याशिवाय राहाणार नाही. खरें नीतिशिक्षण हेच व यालाच आपण अधिक महत्त्व देतो असे तेलगानी सागितले व त्यानी आपल्या म्हणण्याच्या समर्थनार्थ स्कॉटलडमधील त्या वेळचे एक प्रोफेसर मिस्टर काल्डरवुड यांच्या एका ग्रथातून उतारा दिला

त्याचप्रमाणे "नागरिकाची कर्तव्ये" या विषयावर व्याख्याने देण्याच्या बाबतींतही काही अडचणी उत्पन्न होण्यासारख्या आहेत असे तेलगाचे मत होते एरव्हीच्या काळात तशा व्याख्यानापासून गैरसमज किंवा तोटा होण्याचा सभव नाही, ही गोष्ट खरी, पण धामधुमीच्या दिवसात (times of excitement) सरस्वतीमदिरासारख्या शात स्थळी तशा व्याख्यानाला राजकीय स्वरूप प्राप्त होऊन त्यापासून त्रास उत्पन्न झाल्याशिवाय राहणार नाही उदाहरणार्थ, व्याख्यात्यानी, प्रत्येक मनुष्यानें सरकारी हुकूम "हू की चू" केल्यावाचून मानला पाहिजे, असे विद्यार्थ्यास शिकविण्याचा उपक्रम केल्यास एकादा जहाल उदारमतवादी ( Liberal ) लागलीच उठून "तुम्ही विद्यार्थ्यांना परप्रत्ययनेय-बुद्धि करीत आहा किंवा तुम्ही त्याना गुलाम होऊन राहण्याचा उपदेश करता" असे म्हणेल वरें, व्याख्यात्याने सरकारी हुकूम मानू नयेत असे विद्यार्थ्यांना शिकविल्यास एकादा जहाल पुराणमतवादी ( conservative ) म्हणेल की, "तुम्ही त्याना राजद्रोही होण्यास सागता" साराश, व्याख्यानाची योजना सुरू झाल्यास वरील सारख्या भानगडी उत्पन्न झाल्याशिवाय राहणार नाहीत प्रस्तुत देखील कालेजातील प्रोफेसर लोकाना विद्यार्थ्यांना आपली राजकीय दृष्टीने खासगी मते व्यक्त करण्याची मनाई आहे, असें नाही परतु अशी सामान्यत अध्यापकाना मुभा ठेवणें निराळें आणि मुद्दाम प्रोफेसराची नेमणूक करून वरील सारख्या विषयावर त्याच्याकडून विद्यार्थ्यांपुढे व्याख्यानें देवविणें निराळे सबब, अशी नवीन योजना करणें आपणास पसत नाही असे तेलगानी आपले मत दिले

नीतिशिक्षणासबधाने एकादें पुस्तक नेमावे या सूचनेविषयी देखील काशीनाथ-पतांनी आपले प्रतिकूलच मत दिले, आणि त्याच्या समर्थनार्थ त्यानी आयर्लेण्डच्या उदाहरणाचा दाखला दिला. आयर्लण्डमध्ये देखील या नीति-शिक्षणाविषयी बरीच खटपट करण्यात आली होती. व त्यात मोठमोठे लोक सामील झाले होते पण तो प्रयोग अखेर यशस्वी झाला नाही.

अर्थात् तसा प्रयत्न इकडे करण्यात अर्थ नाही, असे तेलगानी आपल्या मतपत्र-कात सुचविलें

धार्मिक शिक्षणासबधानें देखील तेलगानीं असेच मत दिले आहे विद्यार्थ्याना धर्मशिक्षण असणें जरूर आहे पण ते प्रस्तुतच्या स्थितीत शिक्षणसस्थामधून देण्याची व्यवस्था करता येणें शक्य नाही मुलाना शिक्षण द्यावयाचे ते एक सर्व धर्माना साधारणत मान्य असे शिक्षण तरी दिले पाहिजे, किंवा ज्या धर्मात त्याचे आईबाप वाढले असतील त्या धर्माचे तरी दिले पाहिजे पण यापैकी कोणतीही व्यवस्था केली तरी त्यात अडचणी उत्पन्न झाल्याशिवाय राहणार नाहीत इग्लडपेक्षा या देशात वस्तुतः धर्म किंवा धर्मपथ किती तरी अधिक आहेत. पण इग्लडमध्ये देखील जर अशा प्रकारच्या प्रयोगात यश आले नाही, तर तसाच प्रयोग इकडे करून पाहण्यात अर्थ काय ? प्रस्तुतच्या स्थितीत सरकारी शाळातून व कॉलेजातून सर्व धर्माना साधारण असेंच विद्यार्थ्याना शिक्षण देता येणें शक्य आहे व तसेंच ते देण्यात यावें, व ज्या विशेष धर्माच्या लोकाना आपल्या मुलास आपल्या धर्माचेच शिक्षण मिळावे अशी इच्छा असेल त्यानी त्याबद्दलची व्यक्तिश· किंवा सामुदायिक रीतीने निराळी व्यवस्था करावी याशिवाय दुसरा उपाय नाही सदहू रिपोर्ट प्रसिद्ध होऊन आज चाळीस पेक्षाही अधिक वर्षे झाली इतक्या काळात हिंदु-मुसलमान वगैरे निरनिराळ्या ( धर्माच्या ) लोकानी आपआपल्यापरी अनेक शाळा, कॉलेजें, युनिव्हर्सिट्या अशा शिक्षणसस्था काढल्या आहेत त्यातून आपल्या विशेष धर्माच्या शिक्षणाच्या सोयी त्यानी केलेल्याच आहेत. अर्थात् आता धर्मशिक्षणाच्या प्रश्नाचे महत्त्व पूर्वीच्या इतके मुळीच राहिले नाही, हें उघड आहे

काशीनाथपत तेलग यानी आपल्या भिन्नमतपत्रकात आणखी एक दोन किरकोळ बाबीसबधाने ऊहापोह केला आहे त्यासबधाचा थोडक्यात उल्लेख करतो. एका बाबतीत तेलगानी केलेल्या शिफारशीची अलीकडे अमलबजावणी होत आहे हें कबूल केले पाहिजे. प्रस्तुत रिपोर्ट लिहिला गेला तेव्हा शाळाखात्यातील एजुकेशनल इन्स्पेक्टरच्या जागी हिंदी माणसाच्या नेमणुका होत नसत त्या कामीं सरकारकडून होत असलेल्या अन्यायाबद्दल तेलगानी आपल्या मतपत्रकात जोराची तक्रार केली आहे यासबधात त्यानी जॉन ब्राइटच्या एका ( हिंदुस्थानविषयक ) भाषणांतील मोठ्या गमतीचा दृष्टांत दिला आहे. तो असा —

"To borrow a figure from John Bright, we have have had a feast with a very small quantity of meat, and a very large quantity of table-cloth." ( म्हणजे–नांव मेजवानी ! रांगोळ्या, सोन्याचीं ताटे, वाट्या वगैरे दिखाऊ जिन-साची रेलचेल पण पक्काने वाढावयाचीं ती मात्र चिमुट चिमुट भर ! ) पण प्रस्तुत काळी इन्पेक्टरच्या जागी हिंदी माणसाच्या नेमणुका होत असल्यामुळें वरील तक्रारीला आता जागा राहिली नाही.

दुसरी तेलगानी एक सूचना केली होती, तिची अमलबजावणी मात्र मुळीच झाली नाही ती सूचना म्हणजे ( Consultative Boards of Education ) शिक्षणविषयक सल्लागारमंडळे नेमण्यासंबधाची होय ही सूचना करण्यात तेलगाचा मुख्य हेतु इतकाच होता की, शिक्षणासारख्या कामात त्या खात्यातील अमलदार लोकाना इष्ट प्रकारच्या सूचना करण्याची लोकाच्या प्रतिनिधीना सवड मिळावी. पण ही हितकर सूचना शिक्षण कामगाराच्या ( कमिशन मधील ) पुरस्कर्त्यांना पसत पडली नाही कमिशनच्या सभासदामध्ये याविषयी पूर्वी बरीच चर्चा झाली होती. त्या वेळी तेलगानी आपल्या सूचनेच्या समर्थनार्थ समर्पक कारणें पुढे माडलीं होतीं. पण तीं नोकरशाहीच्या ( Bureaucratic ) मडळीच्या गळी उतरलीं नाहीत ! तेलगानी मि. मॅथ्यू अर्नोल्ड याच्या आधाराने असें प्रतिपादन केले कीं, शिक्षण खात्यातील अधिकारी कितीही हुशार व कर्तबगार असले तरी शिक्षणा-सारख्या लोकहिताच्या कामात त्यानी खात्याबाहेरील काहीं समजस लोकाचा सल्ला घेतल्यास शिक्षणाच्या दृष्टीनें फायदा झाल्याशिवाय राहणार नाहीं. पण हा सरळ मार्ग नोकरशाहीच्या प्रतिनिधींना कबूल कसा होणार ? त्यांची समजूतच मुळीं अशी की खुद्द नोकरशाहीतच वरपासून खालपर्यंत इतकें शहाणपण तुडुब भरलें आहे की, त्याना बाहेरच्या उपदेशाची जरूरच नाही ! त्यामुळें कमिशन मधील काहीं युरोपीयन सभासदानी तेलगाना उत्तर दिलें कीं, खात्यातील अधिकारी लोकाकडून जनतेच्या दृष्टीनें काहीं चूक झाल्यास ती चूक दुरुस्त करण्यास वरिष्ठ सरकारचे अधिकारी जवळ हजर आहेतच तेलगांनीं त्यावर चटकन् प्रत्युत्तर दिलें कीं, खात्यातील कामगाराविरुद्ध सरकारकडे तक्रार केल्यास लोकांना सरकारचें ठरीव उत्तर—we see no cause to interfere—"आम्हास त्यांत हात घाल-ण्याचें कारण दिसत नाहीं," असें मिळतें ! मग सरकारच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांचा असल्या कामीं उपयोग काय ? म्हणूनच सदहू सल्लागार मडळांची सूचना होती.

असो. या गोष्टीचें महत्व एवढेंच कीं, तेलग हे अधिकारी मडळीमध्यें लोकहिताच्या दृष्टीनें कसे स्वतत्र बाण्यानें वागत असत, हें वाचकांस समजावें. वस्तुत· हल्लीं शिक्षणखातें लोकशाहीच्या—मिनिस्टरच्या—ताब्यांत आलेलें असल्यामुळे त्या खात्यांत लोकहिताच्या दृष्टीनें इष्ट त्या सुधारणा घडवून आणण्याचा मार्ग आपणास मोकळा झालेलाच आहे. अर्थात् आता त्या बाबतीत काय करावयाचें असेल तें खुद्द कौन्सिलमध्येंच करतां येतें असो.

तेलगानी आपल्या मतपत्रकात निराश्रित किंवा अस्पृश्य लोकाच्या शिक्षणाबाबतचाही थोडक्यात विचार केला आहे या वर्गातील लोकाच्या शिक्षणाचा प्रश्न हल्लीच्या इतका पन्नास वर्षांपूर्वी निकरानें पुढे आला नव्हता. व त्याबद्दल त्या लोकाची चळवळही नव्हती. अशा वेळीदेखील तेलगानी त्या प्रश्नाचा सहानुभूतिपूर्वकच विचार केला होता. सर्व मागसलेल्या लोकाकरिता सरकारने शिक्षणाची जरूर सोय केली पाहिजे असेंच त्याचें म्हणणें होतें. त्या कामी काहीं स्पृश्य वर्गाकडून पूर्वग्रहामुळें अस्पृश्यवर्गाच्या बाबतीत कदाचित् काही अडचणी उत्पन्न होतील. परतु ते पूर्वग्रह देखील थोड्या दिवसात आपोआप नष्ट होतील व मग तर अडचणी मुळींच राहणार नाहींत तशी वेळ आता बहुतेक आलीच आहे असे म्हणण्यास हरकत नाही. त्यामुळें सदरील वर्गातीलच लोक आपल्या उन्नतीकरितां आज झटून प्रयत्न करीत आहेत. अशा वेळी त्याना सहानुभूतिपूर्वक शक्य ती मदत करणें हें पुढे गेलेल्या लोकाचे एक महत्वाचे कर्तव्य आहे. व देशहिताच्या दृष्टीनें त्यानी तें मन पूर्वक केले पाहिजे.

आणखी दुसऱ्या एक दोन गोष्टीविषयी तेलगांनीं आपल्या मतपत्रकांत उल्लेख केला आहे. पण त्याचें हल्लीच्या काळात फारसे महत्व नसल्यामुळें त्याविषयीं इकडे आम्ही अनुवाद करीत नाहीं तरी काशीनाथपतानी शिक्षणविषयक बहुतेक सर्व बाबींविषयी आपल्या भिन्नमतपत्रकात आपले विचार थोडक्यात एके ठिकाणीं नमूद केलेले असल्यामुळें तें पत्रक म्हणजे त्याची शिक्षणविषयक कैफियत अगर manifesto म्हणावयास हरकत नाही. पण शिक्षणाच्या कामात मुख्य प्रश्न—men and money—लायक माणसें व द्रव्यसहाय्य याविषयीच असतो. त्यातूनही इग्लिश शिक्षणपद्धत खुद्द इग्लडनेंच या देशांत सुरू केलेली असल्यामुळें ती चांगली फलद्रूप होण्याबाबतची जबाबदारी बऱ्याच अशानें इग्लिश लोकांवरच आहे. यासंबधानें सन १८८९ सालीं मुबईचे त्या वेळचे गव्हर्नर लॉर्ड रे यांनीं

पदवीदान समारभाच्या वेळी आपल्या भाषणात जे उद्गार काढले आहेत ते चिरसस्मरणीय आहेत ते असे.—

" This University should impress on those who in Europe select the men to be sent out, the enormous responsibility which rests on them. Unless the men who undertake a mission, which I do not hesitate to call sacred, are imbued with the magnitude of the work they are undertaking, higher education, instead of being the greatest blessing England has conferred on India, will be its greatest curse "

तात्पर्य, शिक्षण देणारी माणसे उच्चभावना-प्रेरित होऊन आपले काम करणारी नसली, तर उच्च प्रकारचे इंग्लिश शिक्षण ही एक मोठी देणगी न ठरता इग्लडनें हिदुस्थानच्या गळ्यात एक मोठी धोड बाधिली असें होईल ! अर्थात् शिक्षणाच्या कामी लायक माणसाची तर जरूर आहेच, पण त्याहीपेक्षा पैशाची जरूर अधिक असते त्यामुळे तेलगानीं लॉर्ड रिपन साहेबाच्या कारकीर्दीतील लोकहिताच्या गोष्टीचा सामान्यत गौरवयुक्त उल्लेख करून त्यानी शिक्षणाच्या बाबतीतही " sinews of war " ची ( तडुला प्रस्थमूला ) सढळ हाताने तजवीज करावी अशी त्याना विनती केली आहे ते तेलगाचे उद्गार लक्षात ठेवण्यासारखे आहेत सबब ते इकडे देतो —

"I hope that the Government of Lord Ripon, which has already done so much for the country, will add the educational to its many laurels and achieve, directly or indirectly the credit which Mr. M. Arnold gives to the Government of France on the Restoration after the battle of Waterloo " To the Restoration, " he says, " is due the credit of having first perceived that in order to carry on the war with ignorance, the sinews of war were necessary. Other Governments had decreed systems of education for the people-the Government of the

Restoration decreed funds." The question of popular education is now mainly a question of funds. What is wanted and what we must trust to is not the shortsighted economies in the expenditure on higher education, which have been suggested by some irresponsible reformers of our system, almost without exception *not* natives of the country, but what is wanted is an effort on the part of the British Indian Governments to follow, at however great a distance, the Imperial Government, which has in ten years, increased its grant to education from £ 1,940,000 to £ 4,290,000 sterling, and a like effort on the part of the leaders of the people to help the Government in spreading the benefits of education far and wide in this great country."

ब्रिटिश सरकारने आपल्या देशातील शिक्षणाप्रोत्यर्थ दहा वर्षात जर सालीना २० लक्ष पौंडाच्या ठिकाणी ४२ लक्ष पौंड खर्च करण्याचे ठरविलें तर हिंदुस्थान सरकारने त्याच कामाकडे या देशात खर्च करण्याच्या बाबतीत विलायत सरकारचे थोडेतरी अनुकरण का करू नये ? तसें आमच्या सरकारने जरूर अनुकरण करावे अशी लॉर्ड रिपन साहेबास विनति करून तेलगानी आमच्या देशातील लोकनायकानीही सरकारला यथाशक्ति साहाय्य करावे असे सुचविलें आहे

असो. काशीनाथपत तेलगानी वरीलप्रमाणें भिन्नमतपत्रकाच्या द्वारे नमूद केलेले शिक्षणविषयक विचार इतके मुद्देसूद व समजसपणाचे होते की ते बहुतेक सर्वानाच पसत पडले मिस्तर जॉन अॅडम यानी "इंडिया" ( October 1893 ) मध्ये म्हटलें आहे की —

"As a member of the Education Commission, he applied himself so thoroughly to the task that he embodied his views in a separate minute, which the President of the Commission has declared to be most valuable."

तेलगाचे विचार कमिशनच्या अध्यक्षाना (सर वि हटर याना) अत्यत मूल्यवान् वाटले त्याचप्रमाणें ते हिंदुस्थान सरकारालाही पसत पडून त्याचा सरकारी ठरावात प्रामुख्याने उल्लेख व्हावा व त्या सरकारच्या शिफारशीवरून महाराणीसाहेबांकडून तेलगाना C I E. ( सी. आय. ई. ) हा किताब अर्पण करण्यात यावा यात आश्चर्य नाही यासबधानें टाइम्स ऑफ इडियामध्ये असें नमूद झालें आहे.

"He devoted to it unremitting labours for six months and for his work he got C I. E. His labours are recorded in a G R. and will be long remembered."

तेलगाच्या मिनिटाचा व एकदर आमच्या लोकानी त्या वेळी केलेल्या चळवळीचा असा परिणाम झाला की वरिष्ठ शिक्षणावरील खर्च कमी करून प्राथमिक शिक्षणावरचा खर्च वाढवावा, असे जे स्वार्थबुद्धि लोक म्हणत होते त्याचे तें म्हणणें मागें पडले व उच्च शिक्षणावरील खर्च तसाच चालू ठेवण्याचे अखेर ठरलें. या अर्थाचे खुद्द लॉर्ड रिपनचेच पुढीलप्रमाणें उद्गार होते —

"For my own part, I can truly say that the more I have studied this question in India itself, the more convinced I have become that it would be a very serious mistake to do anything which could interfere with the onward progress of higher culture or which could tend to place it beyond the reach of youths of limited means"

मिशनरी लोकाच्या व इतर काही लोकाच्या चळवळीमुळें हिंदुस्थान सरकारचा वरिष्ठ शिक्षणाची उपासमार करून प्राथमिक शिक्षणाचा प्रसार करण्याकडे कल होईल अशी जेव्हा भीति उत्पन्न झाली तेव्हा आमच्या लोकानी सभा, अर्जे वगैरे साधनाचा उपयोग करून उलट दिशेनें शिकस्तीची खटपट केली हे मागे सागितलेच आहे. त्या खटपटीत पुण्याच्या सार्वजनिक सभेचें—म्हणजे रा. ब. रानड्याचे प्रमुखत्वाने अग होतें अर्थात् सदरील सभेनें जें अर्जानें किंवा त्रैमासिकाच्याद्वारें काम चालविलें होतें तें काम काशीनाथपत तेलगानीं ( एका महाराष्ट्रीय गृहस्थांनीं ) खुद्द कमिशनमध्येंच राहून चोख रीतीनें केलें व तें स्वतः सरकारला

प्रसंत पडलें असें पाहतांच सार्वजनिक सभेला एक प्रकारचा अभिमान वाटावा यांत नवल नाही. सन १८८४ च्या जून महिन्यात सार्वजनिक सभेच्या आश्रया-खाली पुण्यास नागरिकाची जाहीर सभा भरविण्यात येऊन काशीनाथपत तेलगाना सी आय ई हा किताब मिळाल्याबद्दल त्याचे लोकाच्या तर्फे अभिनदन करण्यात आले त्या वेळी रा ब. रानडे, रा माधवराव कुटे, रा म्हस्के वगैरे गृहस्थाची तेलगासबधाने गुणवर्णनपर भाषणें झाली.

पुण्याच्या केसरीने (ता. ३–६–८४) तेलगाच्या सबधाने पुढील प्रमाणें उद्गार काढले आहेत —" ऑनरेबल मिस्टर काशीनाथपत तेलग यानी आजपर्यंत जी बुद्धिमत्ता प्रदर्शित केली आहे तीबद्दल त्याना मिळालेला सी आय ई हा मानाचा किताब योग्य पात्री पडला असे कोणीहि कबूल करील एजुकेशन कमिशनचे मेबर या नात्याने मि तेलग यानीं प्रशसनीय कुशाग्रबुद्धि, विचारशैली, कोटिक्रम व वक्तृत्वशक्ति ही प्रकट केली हे आम्ही मागेच सागितले आहे तेव्हा त्याना हा किताब मिळाला हे ऐकून सर्व महाराष्ट्रीयास सतोष व समाधान होणार आहे यात बिलकुल सशय नाही."

त्याच महिन्याच्या (जून) तारीख १० रोजी पुण्याच्या न्यू इग्लिश स्कूलमध्ये ना. तेलग याना पानसुपारी करण्यात आली त्यासबधाचा केसरीच्या (१७–६–८४) अकात पुढीलप्रमाणें उल्लेख आहे —"गेल्या मगळवारी येथील न्यू इग्लिश स्कूलच्या लोकानी ऑनरेबल मि काशीनाथ त्रिंबक तेलग यास शाळेंत पानसुपा-रीस बोलावून त्याना सी आय ई हा किताब मिळाल्याबद्दल मोठा आनद प्रदर्शित केला व मानपत्र दिले मानपत्रात विशेषेकरून मि तेलग यानी विद्याप्रसाराच्या व विद्योत्कर्षाच्या सबधाने जे परिश्रम केले आहेत त्याचा उल्लेख केला होता मानपत्रावर उत्तर देताना मि तेलग यानी जे भाषण केले ते लहान होते तरी फार गोड असून शाळेच्या उत्पादकास व विद्यार्थ्यास उत्तेजन देणारे होते "

उच्च प्रकारचे इग्रजी शिक्षण या देशात सुरू केले व त्याचा इकडे झपाट्याने प्रसार होऊ लागला या गोष्टी कित्येक अदूरदृष्टि युरोपियन अधिकाऱ्यास पसत नव्हत्या व अद्यापि कित्येक लोक ती इग्लडने चूक केली म्हणून मेकॉलेला व त्याच्या साथीदाराना दोष देताना आढळतात त्यामुळे उच्च शिक्षणाच्या दृष्टीने सदर्हू हटर कमिशनचा रिपोर्ट व न्या. तेलगाचे मतपत्रक, त्याचप्रमाणे लॉर्ड रिपन साहे-बाचे उद्गार, या सर्व गोष्टी जरी समाधानकारक वाटल्या तरी ते उच्च शिक्षणाबाब-

तचे ओझे आपल्या डोक्यावरचे काढून कोणत्यानाकोणत्या तरी कारणाकरिता खासगी सस्थाच्या स्वाधीन करावयाचे हे वेड काही सरकारी अमलदाराच्या डोक्यातून पूर्ण नष्ट झाले नव्हते त्यामुळे त्याचा प्रताप केव्हा केव्हा दृष्टीस पडे सन १८८६ साली काटकसरीच्या सबबीवर पुण्याचे डेक्कन कॉलेज बद करून ते डेक्कन एजुकेशन सोसायटीच्या स्वाधीन करावे याबद्दलचें सरकारतर्फे सोसायटीच्या लोकाशी बोलणे सुरू झाले सदरील गोष्ट मुबईच्या व पुण्याच्या कोणत्याच पुढाऱ्याना पसत नव्हती याबद्दल तेलग, रानडे व भाडारकर यानी शिकस्तीचे प्रयत्न चालविले होते रानड्यानी तर सार्वजनिक सभेच्या आश्रयाखाली पुण्याच्या लोकाची सभा बोलावून सदर्हू बाबतीत सरकारला एक खुलासेवार अर्ज पाठविण्याचीही तयारी केली डेक्कन कॉलेजचा खर्च मुख्यत पेशव्याच्या दक्षणाफडातून चालत असल्यामुळें त्याबद्दलचे खर्चाचे ओझे सरकारच्या अगावर मुळीच पडत नाही व त्यामुळे काटकसरीचा प्रश्नही उत्पन्न होत नाही, असे त्या अर्जात दाखविण्यात आले होते अर्थात् सरकारचा विचार काही वेळ तहकूब राहिला. परतु तशा प्रकारचा प्रश्न 'येन केन प्रकारेण' पुन्हा केव्हा तरी डोके वर करीत होताच त्या त्या वेळी आमचे पुढारीही स्वस्थ बसत नसत. एकदा तर फेरोजशहा मेथा यानी सन १८९२ मध्ये आपल्या एका भाषणात सदर्हू प्रकरणी सरकारची चागली सणसणीत रीतीने हजेरी घेतली ! तो भाग असा —

" It is sought to take advantage of what are called our patriotic feelings, to cover the withdrawal of the State from the control and management of High Schools and Colleges under the pretended guise of anxiety to retire in favour of private enterprise The recommendations of the Education Commission are thrust in our face in justification of this policy. We know that the devil can cite scripture for his purpose, but of one thing I am sure, that the distinguished Indian member of the Commission, now Vice-Chancellor of our University ( Mr Telang ), never dreamed that the recommendations on that score

could be turned to such uses as those to which they are now sought to be applied. It is entirely premature to talk of retiring in favour of private enterprise with our present Schools and Colleges incompletely and imperfectly equipped and endowed as they now are."

सहहूं प्रकरणी डेक्कन कॉलेज डे ए सोसायटीच्या ताब्यात न देण्याच्या कामी रानडे व मेथा याच्याच प्रमाणे तेलग व भाडारकर याचाही आग्रह होता पण या दोघाच्या वर्तनक्रमात कित्येकास "जातिद्वेष" दिसला ! यासबधाचा ता० ७-१२-८६ च्या केसरीत स्पष्ट उल्लेख आहे त्यातून काही उतारे देतो—"युरोपातील सुधारणा इतकी जोमदार का व आमच्याकडील इतकी रडकी का याची कारणे सागताना डॉ भाडारकरानी हिंदु युनियन क्लबमध्ये जातिद्वेषाबद्दल जो उल्लेख केला तो, आमच्या मते, योग्य स्थळी व योग्य काळी झाला" "भाडारकर व तज्जातीय मि तेलग याचा डेक्कन कॉलेज डे ए सोसायटीकडे न देण्याबद्दल जो आग्रह होता त्याचे तरी कारण काही लोकाच्या मते ज्ञातिद्वेषच" इतके लिहून पुढे केसरी म्हणतो, "पहिल्या पहिल्यानें हा जात्यभिमान खाणेपिणें, स्नानसंध्या, वेदपठण, एवढ्यावरच होता, पण त्याची छाया आता राजकीय विषयावरही पडू लागली आहे" "करिता आता पुढाऱ्यानी त्याचा बीमोड करण्याचा प्रयत्न करावा !" केसरीनें जिकडे तिकडे "जातिद्वेष" पाहात बसणाऱ्याना दोष दिला आहे हे उघडच आहे

---

## प्रकरण सतरावे.

# इतर कामगिरी.



काशीनाथपत तेलग याच्या मनाचा ओढाच प्रथमपासून वाङ्मयाच्या बाजूस असल्यामुळे व त्याना आपल्या हातून काही तरी लोकहित व्हावे अशी हौस असल्यामुळे शिक्षणाच्या बाबतीत त्याचे मन रमत असे व त्या बाबतीत ते कोणतेही होण्यासारखें असेल ते आनदानें काम करीत असत. सन १८६२ सालच्या

युनिव्हर्सिटीतील पदवी दान समारभाच्या वेळीं सर बार्टल फ्रेअर यानी चॅन्सेलर या नात्यानें केलेल्या आपल्या भाषणात नवीन पदवीधराना उद्देशून असें म्हटलें की, "तुम्हास येथे जे शिक्षण देण्यात आले आहे तो तुमच्याजवळ तुमच्या देशबांधवाच्या फायद्याकरिता म्हणून एक ठेवा दिला आहे हे लक्षात ठेवा!" म्हणजे मनुष्य जितका जास्त सुशिक्षित होईल तितकी त्याची दृष्टि जास्त फाकते व तितकी त्याची जबाबदारी वाढते ती जबाबदारी सभाळून आपले कर्तव्य करणें हेंच सुशिक्षित मनुष्याचे खरे लक्षण होय. ते लक्षण तेलग याच्यामध्ये पूर्ण रीतीनें भरले होते. म्हणूनच ते शिक्षणाच्या बाबतीत देखील अनेक प्रकारची कामे करू शकत असत. त्यानीं मुबई युनिव्हर्सिटीत व एजुकेशन कमिशनचे एक सभासद या नात्याने केलेल्या कामगिरीचा मागील दोन प्रकरणात उल्लेख आलेलाच आहे. पण प्रसग येईल तेव्हा शिकविण्याचे काम करण्यास तयार असणें, निबध, लेख, व्याख्याने इत्यादि द्वारानी लोकशिक्षणाचे काम करणें, शिक्षणाच्या कामी जे अहर्निश झटत असतील त्याना सहानुभूतिपूर्वक सहाय करणें वगैरे सर्व गोष्टी शिक्षणाच्या सदरातच मोडतात. यापैकी बहुतेक प्रत्येक दिशेने तेलग शिक्षणकार्याला मदत करीत असत

तेलग बी. ए झाल्याबरोबरच त्याना शिकविण्याचे काम करण्याची सधि मिळाली होती त्या वेळी त्यानी प्रथमच एल्फिन्स्टन हायस्कुलात सस्कृत शिक्षकाचें १–२ महिने काम केले होते हे मागें सागितलेच आहे तदनतर ते सन १८६७ ते १८७२ पर्यंत एल्फिन्स्टन कॉलेजात फेलो या नात्याने शिकविण्याचे काम करीत होते पुढे सन १८८१ मध्ये त्याची मुबईस लॉ प्रोफेसरच्या जागी नेमणूक झाली लॉ स्कूलमध्ये पहिले हिंदी प्रोफेसर तेलग हेच झाले होते त्याच्या पूर्वी त्या जागेवर नेहमी युरोपियनाचीच नेमणूक होत असे तेलगाची प्रथम नेमणूक झाली ती ॲक्टिंग प्रमाणें झाली होती. पुढे सन १८८८ मध्ये मिस्टर टिरेल लीथ हे विलायतेस निघून गेल्यावर त्याच्या जागी तेलगाची कायमप्रमाणें नेमणूक झाली त्या वेळी लॉर्ड रे हे मुबईचे गव्हर्नर होते. सन १८८९ सालच्या कॉनव्होकेशनच्या वेळच्या आपल्या भाषणात लॉर्ड रे यानी तेलगासबधाने असे उद्गार काढले.—

"The Law Faculty may be congratulated on having received a great accession of strength in the person of Mr. Telang, a born professor himself, a

constant student and therefore–what every professor should be—the guide and the friend of the students." तेलग हे जणू उपजतच प्रोफेसर व आजन्म विद्यार्थी असल्यामुळें ते सर्वतोपरी लायक असे विद्यार्थ्यांचे मित्र व मार्गदर्शक होते असो.

तेलग याचा मुबईच्या स्टुडट्स लिटररी आणि सायटिफिक सोसायटीशी सन १८७२ पासून जो सेक्रेटरी या नात्यानें सबध जुळला तो पुढें अठरा वर्षेपर्यंत टिकला. त्याच्या कार्यक्षेत्रात मुलीच्या शाळांची देखरेख करण्याच्या कामाचा अतर्भाव होत असे. त्यांतच त्याना कित्येक वेळा शाळेंत शिकवावें लागत असे.

पण तेलग हे अत्यत व्यवहारज्ञ असल्यामुळें आपल्या देशाच्या तूर्त गरजा काय आहेत हें त्याच्या पूर्ण लक्षात आले होतें. ब्रिटिश सत्तेचा हिंदुस्थान देशावर एक मुख्य परिणाम झाला आहे, तो लोकास आपल्या स्थितीचे ज्ञान झालें आहे, हा होय त्यामुळे वाङ्मय शिक्षणाबरोबरच देशात औद्योगिक शिक्षणाची सोय झाल्याशिवाय आमच्या लोकाचा निभाव लागणार नाही ही गोष्ट तेलगाच्या लक्षात आली होती इतकेच नव्हे तर औद्योगिक शिक्षणाच्या आवश्यकतेविषयीं त्याची इतकी ठाम समजूत झाली होती की त्यानी एजुकेशन कमिशन मधील सर्व सभासदाची व अध्यक्ष सर विल्यम हटर ग्राची त्यासबधानें खात्री करून दिली. याविषयी सर दिनशा वाच्छा हे आपल्या एका लेखात पुढीलप्रमाणें लिहितात —

" Mr. Telang who held strong convictions on the subject had urged the expediency of imparting such ( technical ) instruction on his colleagues on the Education Commission including its learned and sympathetic president "

या महत्वाच्या विषयाकडे काशीनाथपत तेलग व सर फेरोजशहा मेथा या उभयता पुढाऱ्याचे पुष्कळ दिवस लक्ष लागलेले होते त्याप्रमाणें त्यानी सन १८८५ मध्ये लॉर्ड रे मुबईस आल्याबरोबर काही दिवसानी ही गोष्ट त्याच्या नजरेस आणली लॉर्ड रे हे स्वत एक अति उत्तम शिक्षणविषयक तज्ज्ञ असल्यामुळें व त्यानी खुद्द इग्लडमध्ये सर्व प्रकारच्या शिक्षणाच्या बाबतीत कित्येक दिवस काम केलेलें असल्यामुळे सदर्हू कामी त्याच्या अनुभवाची चागलीच मदत झाली व लॉर्ड रेच्या सहानुभूतीने तेलग व मेथा यानीं धदेशिक्षणाच्या संस्थेची एक

योजना तयार केली त्यासंबधाची हकीकत अंमळ मनोरंजक असल्यामुळें सर दिनशा वाच्छा याच्या एका लेखाच्या आधारानें ती इकडे थोडक्यात देतों.

सन १८७०–७५ च्या सुमारापासूनच मुबईच्या पुढाऱ्याच्या ही गोष्ट लक्षात आली होती की, देशाच्या राजकीय व सामाजिक सुधारणेबरोबरच आमची औद्योगिक सुधारणाही झाली पाहिजे. पुढाऱ्यांची अशी खात्री एकदा झाल्याबरोबर त्याबद्दलच्या उपाययोजनेलाही पण आपण लवकर लागलें पाहिजे असे त्याच्या मनाने घेतलें. यासबधाने स्वत. काशीनाथपत तेलंगांनीं एजुकेशन कमिशनमधील मडळीची सहानुभूती मिळविली होती हे वर सागितलेंच आहे पुढें सन १८८४ च्या अखेरीस लॉर्ड रिपन साहेबाना उत्साहपूर्वक प्रेमाचा निरोप जेव्हा मुबईकराकडून देण्यात आला तेव्हा त्याचें स्मारक करण्याच्या निमित्तानें बरीच मोठी रक्कम ( अडीच लाख ) जमा झाली होती तिचा उपयोग एकादा पुतळा अगर स्कालरशिपा स्थापन करण्याकडे न करता धदेशिक्षणाची सोय करण्याकरिता सरकारने एकादी सस्था निर्माण करण्याचे कबूल केल्यास त्या कामाकडे त्या रकमेचा विनियोग करण्याचे ठरले इतकी तयारी होताच लॉर्ड रे साहेबानी मुबईच्या पुढारी लोकास सेक्रेटेरियटमध्ये बोलावून धदेशिक्षणाच्या सस्थेची योजना तयार करण्यास आरभ केला इतक्यात सन १८८७ साली महाराणी (व्हिक्टोरिया) साहेबाच्या जुबिलीचा उत्सव नजीक आला. त्याबद्दलचे एकादें स्मारक उभारणें जरूर होतेच. पुढे सर दिनशा माणकजी पेटिट यानी काही अटीवर एल्फिन्स्टन कॉलेज कोटात आणल्यास त्याच्या योग्य अशी इमारत बाधून देण्याचें कबूल केले पण कालेजची जुनी इमारत बाधण्याकरिता ( परळ येथे ) पहिले कावसजी जहागीर रेडीमनी यानी दोन लाख रुपये दिले होते तेव्हा तोड अशी निघाली की सर दिनशा पेटिट यानी कबूल केलेल्या रकमेने कोटातले कॉलेज बाधून इमारतीला रेडीमनी याचे नाव द्यावे व परळ येथील जुन्या कालेज इमारतीला सर दिनशा पेटिटचे नाव द्यावे. आणि ही ( परळ येथील ) इमारत धदेशिक्षणाच्या शाळेकरिता वापरावी याप्रमाणे सर्व योजनेला इतके स्वरूप येण्याला तेलग व मेथा याचेच केवळ श्रम कारणीभूत झाले त्यातूनही लॉर्ड रे साहेबाची पूर्ण सहानुभूति या कामी नसती तर ते काम इतक्या लवकर हातावेगळे झालें नसते पुढे ती धदेसस्था कायमप्रमाणें चालावी याकरिता बोर्डाची व्यवस्था करण्यात आली व त्यात जितक्या फडाचा सबध आला तितक्याचे प्रतिनिधि व सरकारचे काही प्रतिनिधि याची बोर्डावर नेमणूक करण्यात आली. कायम खर्चाची

तजवीज करण्याकरिता रिपन मेमोरियल फड, सर जमशेटजी जिजीभाई याचा व नवरोजी फर्दुनजी याचा असे दोन स्मारक फड–इतके फड एकत्र करण्यात येऊन मुबई सरकारने वार्षिक खर्चाकरिता काहीं सालीना रक्कम देण्याचे ठरविलें. याप्रमाणें सर्व तयारी होताच परळ येथे " व्हिक्टोरिया जुबिली टेक्निकल इन-स्टिट्यूट " या नावानें धदेशिक्षणाचे कॉलेज उघडण्यात आले, व ते आज सुमारें चाळीस वर्षे उत्तम रीतीने चाललें आहे ही सस्था स्थापन करण्याच्या कामात तेलगाच्या अगचे अनेक अमोलिक गुण तसेच फेरोजशहा मेथा याचेही कसे कामास आले हे सर दिनशा वाच्छा याच्याच शब्दात सागतो —

" Nothing gave so much pleasure to Mr. Telang as the establishment of the Institution on which he had, for years, set his heart and for which he had worked so hard. It was a second best instance of the consummate statesmanship in matters of higher scientific education of himself and of his eminent co-worker, the late Sir Phirozesha Mehta." " The establishment of the V. J T Institute may truly be said to be the coping stone of all the public activities of Mr Telang just before his elvation to the Bench in 1889 "

तेलगाच्या मनाचा ओढा वाङ्मयाकडे असला तरी उद्योगधद्याच्या दृष्टीनें देशाची उन्नति व्हावी एतदर्थ ते कसे कसून तनमनधनेकरून खटपट करीत असत हे वरील हकीकतीवरून स्पष्ट झालेच आहे त्यासबधाने दुसरे एक उदाह-रण देतो त्यात तर तेलगाचा हजारो रुपये तोटा झाला होता तरी त्यानी तो व्यवहार केवळ देशहिताच्या—स्वदेशी धद्याच्या—दृष्टीने केला होता हेंच लक्षात ठेवण्यासारखें आहे. सन १९०२ साली अहमदाबादेस औद्योगिक प्रदर्शन भर-विण्यात आले होते. त्याप्रसगी सर फेरोजशहा मेथा यानी स्वदेशी उद्योगध-द्यासबधानें एक अत्यत कळकळीचे भाषण केले त्या वेळी मोठमोठे सरकारी अधिकारी हजर होते. त्या भाषणात मेथा शेटनी आपण व तेलग यानी स्वदे-शीच्या पायी एकदा कसा अल्पसा स्वार्थत्याग केला होता हे सागितलें तो भाग असा.–

" In the seventies, in conjunction with some of my friends like the late lamented Mr. Justice K T. Telang, I and others, who were keen in our new-born enthusiasm to promote the industries and arts of India, started a soap-factory. We scrupulously attended every meeting of the Board of Directors, for we were on the board, to see that the concern was successful. Well, it is only as a case of self-sacrifice, that I mention it before Mr Lely, that we lost every pie of our money."

ही साबणाच्या कारखान्याची गोष्ट झाली नतर काही दिवसानी दुसऱ्या एका स्वदेशीधद्याची तेलगानी तयारी चालविल्याचा त्याच्या सन १८८६ मधल्या एका लेखात उल्लेख सापडतो असो

हें थोडेसे विषयातर झाले पण त्याचा धदेशिक्षणाच्या दृष्टीने व देशाच्या औद्योगिक प्रगतीच्या दृष्टीने थोडासा सबध आला म्हणून हे विवरण केले असो.

शिक्षणाचा कोणताही प्रकार असो, त्याचा प्रसार करण्याच्या कामी ते विद्यादान आहे या भावनेने तेलग हे शक्य ती मदत करण्यास केव्हाही कसूर करीत नसत ते विद्यार्थ्याना कितपत प्रत्यक्ष मदत करीत असत याची बातमी ते हयात होते तोपर्यंत त्याच्याकडून किंवा त्याच्या जवळच्या आप्ताकडून कोणास लागणे शक्य नव्हते ते दिवगत झाल्यावर मात्र त्याबद्दलची माहिती हळुहळू बाहेर पडू लागली डॉ मॅकिकन यानी आपल्या एका भाषणात तेलग हे शेकडो विद्यार्थ्याना द्रव्यद्वारा मदत करीत असत असे त्याना प्रत्यक्ष विद्यार्थ्याकडून मिळालेल्या माहितीवरून सागितले आहे तेलगाकडून मदत घेऊन व आपला विद्याभ्यास सपवून उद्योगास लागले—काही नोकरीवर असलेले व कांही पेनशनमध्ये गेलेले—लोक अद्यापि हयात आहेत त्यापैकी काहीनी आपण तेलगाकडून मदत घेऊन शिकल्याचे हल्लीच आम्हास सागितले पण इदुप्रकाशकर्त्यानें तेलगाच्या मृत्युलेखात ( सन १८९३ ) त्याच्याकडून मदत घेणाऱ्या अशा गरीब विद्यार्थ्याची सख्या २५० ते ३०० होती असे लिहिले आहे! ही मदत मुबईत राहणाऱ्या गरीब विद्यार्थ्यांना फी अगर पुस्तकाचा खर्च किंवा खाणावळीचे पैसे अशा रूपानें तेल-

गाकडून मिळत असे. ही तेलगाकडून विद्यादानाचे कामी प्रत्यक्ष मदत होत असे. त्याच्याकडून शिक्षणाच्या कामी प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीने आणखी किती मदत होत असे हें नक्की समजण्यास मार्ग नाही आम्हास जी काही अशा प्रकारची उदाहरणें समजली ती पुढे दिलीं आहेत

सन १८९०-९१ च्या सुमारास मुबईस कै रा रा. बळवत भाऊ नगरकर यांनी "शिवाजी हायस्कूल" नावाची शाळा काही वर्षें चांगल्या रीतीने चालविली होती ह्या शाळेचा एकदा एक बक्षिससमारंभ धोबी तलावावरील फ्रामजी कावसजी हॉलमध्यें होता त्या वेळी आम्ही हजर होतों अध्यक्षस्थानी न्या. तेलग हेच होते. शाळेसंबधाचा रिपोर्ट वाचून दाखवितांना रा नगरकरानी शाळेस तेलगसाहेबाची बरीच महत्वाची मदत असल्याचे सभेस कळविलें

मुबई नजीक दादर येथे सन १८९२ च्या एप्रिल ता २४ रोजी "धी जनरल एजुकेशन इन्स्टिट्यूट" The General Education Institute of Dadar ) नावाची शिक्षणसस्था स्थापन झाली तिच्या मूळ प्रस्थापकापैकीं न्या तेलग हे एक होते त्या सस्थेकडून आज कित्येक शाळा चागल्या रीतीनें चालविल्या जात आहेत.

मुबई येथे कोटात प्रसिद्ध सावकार शेट दामोदरदास गोवर्धनदास यानी एक सार्वजनिक वाचनालय ( People's Free Reading Room ) स्थापन केले आहे ते उघडण्याचा समारंभ सन १८९२ त नवबरमध्यें न्या तेलग याच्या हस्ते झाला

सन १८८० साली कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यानी पुण्यास न्यु इग्लिश स्कूल काढल्याचे व आरभापासूनच कै आगरकर व के टिळक हे उभयता त्याना येऊन मिळाल्याचे सर्वास माहीतच आहे दुसऱ्याच वर्षी ( १८८१ ) शाळेस काही सामान, पुस्तके वगैरे जिनसाची जरूर लागली व त्याबद्दल शाळेस वर्गणीच्या व पुस्तकाच्या रूपाने सुमारें ३५० रुपयाची मदत मिळाली त्यात रसायनशास्त्रीय उपकरणे विकत घेण्याकरिता म्हणून ( for purchasing Chemical apparatus ) तेलगाकडून आलेले ५० रुपये शाळेच्या दप्तरात दाखल झालेले आहेत. पुढे सन १८८४ मध्ये शाळेला नियमबद्ध स्वरूप देण्याकरिता डेक्कन एजुकेशन सोसायटी स्थापन करण्यात आली तेव्हां काशीनाथपत तेलग हे १००० रुपये भरून त्या सोसायटीचे पेट्रन झाले. लागलींच तेलगांची सोसायटीच्या कौन्सि-

लमध्ये निवडणूक झाली कौन्सिलर या नात्याने तेलग पुढे सोसायटी तर्फे होणाऱ्या बहुतेक सर्व महत्वाच्या समारभाचे वेळी हजर रहात असत व कौन्सिलर या नात्यानें त्याची सोसायटीच्या ( १८९० मध्ये तयार झालेल्या ) ट्रस्ट डीडवर सही आहे या सर्व गोष्टी व त्यानी शाळेला अनेकदा दिलेल्या भेटी शाळेच्या त्या त्या सालच्या रिपोर्टात नमूद आहेत साराश, सदरील सोसायटीचे तेलग जे एकदा कौन्सिलर झाले ते अखेरपर्यत—१८९३ पर्यंत—होते ते वारल्यावर त्याच्या जागी सर फेरोजशहा मेथा याची निवड झाली. असो कौन्सिलर झाल्यावर तेलगानी शाळेला अनेक वेळा भेट दिली होती व त्या त्या वेळी ते अध्यापक वर्गासबधानें सहानुभूतिपूर्वक चार गोड शब्द बोलून त्याना उत्तेजन देत असत. एकदा तर ( १८८४ जून १० रोजी ) अध्यापक वर्गानें तेलगाना मानपत्र देऊन त्याना सी आय ई हा मानाचा किताब मिळाल्याबद्दल त्याचे अभिनदन केले होतें, व त्यावर त्यानी ह्या मडळीच्या स्तुत्य उपक्रमाबद्दल उत्तेजनपर उद्गार काढले होते याबद्दलचे केसरीतले उतारे मागील प्रकरणात दिलेच आहेत. साराश, सदरील शाळा निघाल्या दिवसापासून त्याच्या अतकालपर्यत तिच्याशी तेलगाचा अत्यत सहानुभूतिपूर्ण सबध असून त्यानी एजुकेशन कमिशनच्या रिपोर्टास जोडलेल्या आपल्या भिन्नमतपत्रकात देखील त्या नमुनेदार शाळेसबधानें अमळ अभिमानाचे उद्गार काढले आहेत

परंतु रा. रा नरसिंह चितामण केळकर यानीं आपल्या टिळक चरित्रात ( पृ १६५ ) असे लिहिलें आहे—

" चिपळूणकर वारण्याच्या पूर्वी ( १८८१ मध्ये ) काशीनाथपत तेलग हे न्यू इंग्लिश स्कूल पाहावयास आले होते व त्यानी हें दणदणीत हायस्कूल व त्याचे ते तरतरीत शिक्षक पाहून मोठे कौतुक केले आणि त्यांनी मडळीत बोलूनही दाखविलें कीं, हायकोर्टात वकिली करण्यापेक्षा या शाळेंत शिक्षक म्हणून येऊन राहिलों तर मला किती तरी आनद होईल पण हें घडून न येण्याला त्याच्या मार्गात काय ती एकच नड होती. त्यानी मिळविलेल्या रुपयाचा पहिला लक्ष पूर्वीच भरून गेला होता दुसऱ्याची तेवढी भरती व्हावयाची होती ! "

या कथेला आधार काय तें केळकरानीं सागितले नाही. पण त्यांनी हीच गोष्ट अन्य ठिकाणी ( Vide, " Indian Worthies " vol. I, p. 149, Manoranjan Press, 1906 ) पूर्वी एकदां सांगितली होती पण तेथें त्यांनीं " असें म्हणतात " ( it is said ) व " असे ऐकतों " (reported)

असे लिहिलें आहे म्हणजे केळकरांनी आपण सदरील गोष्ट ऐकीव बातमीच्या आधारावर लिहिली असे पर्यायानें कबूल केले आहे. पण ती ऐकीव माहिती केळकराना लक्ष्मण कृष्ण चिपळूणकरकृत वि. कृ. चिपळूणकराच्या चरित्रात मिळाली असे उघड दिसतें या चरित्रात सदहू तेलगाच्या भेटीची हकीकत कर्त्याने आपणास शास्त्रीबोवाकडून समजली असे पृ. २६६ ते २६८ वर बऱ्याच विस्तारानें लिहिले आहे परंतु सन १८८१ सालाचा न्यू इग्लिश स्कूलचा रिपोर्ट पाहिला तर असे स्पष्ट दिसून येतें कीं तेलगानी त्या साली शाळेला मुळी भेटच दिली नाही ! फक्त तेलगाकडून रसायनशास्त्रीय उपकरणाकरिता म्हणून ५० रुपयाची देणगी आल्याचे मात्र त्या रिपोर्टात ( १८८१ ) दाखल आहे पण तशा निरनिराळ्या कामाकरिता दुसऱ्या पाच चार गृहस्थाकडून देणग्या आल्याचेंही त्याच रिपोर्टात नमूद आहे अर्थात् शास्त्रीबोवाच्या चरित्रलेखकाने तेलगाच्या भेटीची हकीकत आपल्या पुस्तकात देण्यापूर्वी शाळेचा रिपोर्ट मुळी पाहिलाच नव्हता हें उघड झालें ! पण हे तरी कशाला ? सदरील चरित्र लेखकानें ( लक्ष्मणराव चिपळूणकरानीं ) शास्त्रीबोवा स्वर्गस्थ होऊन तब्बल बारा वर्षे होऊन गेल्यावर "**आठवणीनें**" त्याचे चरित्र आपण लिहिल्याचे प्रस्तावनेत कबूल केलें आहे प्रश्न इतकाच की, शाळेचा "**रिपोर्ट**" विश्वसनीय की लक्ष्मणरावाची बारा वर्षानीं झालेली **आठवण** विश्वसनीय ? तेलगानी सन १८८१ च्या आगष्टात शाळेस भेट दिल्याचे केळकर ( "Indian Worthies" मध्ये ) सागतात. शाळेचा ( या सालचा ) रिपोर्ट ता २७ डिसेबर १८८१ रोजी म्हणजे फक्त चारच महिन्यानी लिहिला गेला होता हे स्पष्ट दिसते शास्त्रीबोवा त्या वेळी हयात होते व रिपोर्टात सर्व गोष्टी स्वत त्यानीच दाखल केल्या होत्या हे उघडच आहे. प्रश्न इतकाच की, शास्त्रीबोवाच्या हयातीत त्यानीच समक्ष रिपोर्टात दाखल केलेली हकीकत खरी की लक्ष्मणरावाना त्यानतर बारा वर्षानी आठवलेली हकीकत खरी ? ह्याचे उत्तर सूज्ञ वाचकानीच द्यावे !

पण शास्त्रीबोवाच्या चरित्रलेखकास दुसऱ्या एक दोन बाबतीत देखील त्याच्या आठवणीनें असेंच फसविलेलें दिसते न्या रानड्याच्यासबधानें त्यानें केलेलें एक महत्वाचें विधान अगदी चुकीचें होतें असें रानड्याच्या चरित्रकर्त्यानें कधीच सप्रमाण सिद्ध केलें आहे त्याचप्रमाणें प्रि मोडक हे रत्नागिरीस हेड मास्तर होते त्या मुदतींत त्यांच्या घरीं दर रविवारीं असिस्टट मास्तर लोक जमून सोगट्या वगैरे खेळत असत असें विष्णुशास्त्री यांच्या चरित्रांत जें वर्णन आलेलें आहे तें

सगळें खोटे आहे असें मोडकाचे आप्त कै. रामचद्र भिकाजी जोशी यांनीं ( त्याच्या निधानापूर्वी थोडे दिवस ) समक्ष आम्हास सागितलें. रामभाऊ जोशी हे त्या वेळीं मोडकाच्या घरींच राहात असत अशा स्थितींत कोणासही शास्त्री-बोवांच्या चरित्राचा आधार काय उपयोगी ?

त्या चरित्रलेखकाच्या बाबतीत दुसरा एक प्रश्न उत्पन्न होतो त्यासबधाने दोन शब्द लिहिणें जरूर आहे तेलगाचा किवा रानड्याचा लोभ सुटला नव्हता असें 'येन केन प्रकारेण' निराधार व खोट्या गोष्टी लिहून दाखविणाऱ्या लक्ष्मणराव चिप-ळूणकरानीं स्वत लोभ सोडला होता काय ? त्यानी काही स्वार्थत्याग केला होता काय ? विधिवशात् शास्त्रीबोवा मृत झाल्यावर त्याच्या सस्था त्याच्या धाकट्या बधूनीच—लक्ष्मणरावानीच—चालवाव्या हेंच अधिक स्वाभाविक व अधिक योग्य नव्हते काय ? तसे न करता उमरावतीस आपल्या चागल्या पगाराच्या नोकरी-लाच चिकटून राहण्यात शास्त्रीबोवाच्या चरित्रलेखकाचा लोभ होता कीं स्वार्थत्याग ?

असो पुण्याच्या न्यू इग्लिश स्कूलच्या बाबतीत तेलगाचे वर्तन प्रथमपासूनच अत्यत सहानुभूतिपूर्ण व आपलेपणाचे दर्शक असे होते त्यामुळें ते शाळेला आरंभापासूनच शक्य ती मदत करीत असत इतकेच नव्हे तर शाळेच्या—व पुढें कॉलेजाच्या—महत्वाच्या समारभाच्या वेळी ते जातीने हजर राहात असत. फार काय, पण मागे एकदा सागितल्याप्रमाणें एजुकेशन कमिशनच्या रिपोर्टास जोडलेल्या आपल्या भिन्नमतपत्रकांत देखील तेलगानी सदरील शाळेचा अभिमान-पूर्वक उल्लेख केला आहे ! अशा कर्तव्यदक्ष व थोर गृहस्थाविषयी समजस व सुशिक्षित म्हणविणाऱ्या महाराष्ट्रीय लोकाची मनोवृत्ति कशी असावी बरे ? व लक्ष्मणराव चिपळूणकराची कशी होती ? आणि नरसोपत केळकराची कशी आहे ? या सर्व गोष्टीचा सुज्ञ वाचकानीच कृपा करून आपल्या मनाशी विचार करावा.

---

## प्रकरण अठरावें.

# सामाजिक सुधारणा.



काशीनाथपत तेलग हे सन १८७२ मध्यें आपल्या बॅरिस्टरीच्या धद्यास लागल्या दिवसापासूनच सार्वजनिक कामांत पडू लागले. सार्वजनिक कामाच्या

अर्थात् अनेक बाबी होत्या, राजकीय, सामाजिक, औद्योगिक, शिक्षणविषयक वगैरे. त्यापैकी बहुतेक बाबतींत तेलगानीं काम केलें आहे शिक्षणाच्या बाबतीत त्यांनीं काय काय कामें केली याचा मागील तीन प्रकरणात उल्लेख आलेलाच आहे त्यातच धदेविषयक शिक्षणाकडेही लक्ष पुरवून त्या दिशेनें त्यानी काय कामगिरी केली याचाही थोडासा उल्लेख आला आहे आतां त्यांच्या दुसऱ्या म्हणजे सामाजिक क्षेत्रातील कामगिरीविषयीं लिहावयाचें आहे

सामाजिक सुधारणेचा गेल्या सुमारें शभर वर्षाचा इतिहास अत्यत बोधप्रद आहे सामाजिक सुधारणेच्या बऱ्याच बाबी हल्ली लोकाच्या आचरणात उतरल्या आहेत त्यामुळें कित्येकास मागील इतिहास तेवढा कदाचित् मनोरजक वाटणार नाही परंतु सामाजिक सुधारणेचे कार्य अद्यापि पुरें झाले नाही ते चालू राहावयाचेच आहे त्यामुळें ज्या लोकानी ते प्रस्तुत आपल्या अगावर घेतले आहे, त्याना मागचा थोडासा इतिहास समजल्यास त्यापासून बोध झाल्यावाचून राहणार नाही इतकेंच नव्हे तर, त्यायोगे त्याना आपल्या कामी उत्तेजनच मिळेल अशी खात्री वाटते सबब तो इतिहास थोडक्यात देतो.

सामाजिक सुधारणेची–आधुनिक दृष्टीनें–लोकास खरी कल्पना गेल्या शतकाच्या पूर्वार्धात–म्हणजे बरोबर शभर वर्षापूर्वी–झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. मुबईच्या एल्फिन्स्टन इन्स्टिट्यूशन मधून तयार झालेले पहिले सुशिक्षित–महाराष्ट्रीय–गृहस्थ म्हणजे कै बाळ गगाधर शास्त्री जाभेकर हे होत ते चागले विद्वान् असून त्याचे इग्लिशभाषेवर उत्तम प्रभुत्व असे त्यानीं इतिहाससशोधनाचे बरेंच कार्य केलेलें असून ते त्या वेळच्या मुबईतील एशियाटिक सोसायटीच्या त्रैमासिकात वरचेवर विद्वत्त्वपूर्ण असे लेख लिहीत असत पुढें त्याची एल्फिन्स्टन कॉलेजात गणिताचे असिस्टट प्रोफेसर या हुद्यावर नेमणूक झाली ते फार थोर मनाचे गृहस्थ असून त्याची विचारसरणी अत्यत उदात्त असे ते सर्व जातीच्या व सर्व धर्माच्या लोकाबरोबर बधुभावानें वागत असत. व ही गोष्ट हिंदुसमाजाच्या तत्कालीन स्थितीचा विचार केल्यास लक्षात ठेवण्यासारखी आहे त्याच्या शिष्यवर्गात पारशी, मुसलमान, ख्रिस्ती, हिंदु असे सर्व जातीचे लोक होते त्यांत शेट दादाभाई नवरोजी हे एक होते. त्यांपैकीं सर्वजण शास्त्रीबोवासंबधानें नेहमीं आदराने बोलत असत बाळशास्त्री हे आपल्या हिंदु लोकापैकीं पहिले समाजसुधारक म्हणण्यास हरकत नाहीं एकोणि-

साव्या शतकाच्या तिशीमध्ये—in the thirties—एक श्रीपत शेषाद्रि नांवाचा ब्राह्मण बाटून ख्रिस्ती झाला होता पण त्याला पुढे पश्चात्ताप होऊन परत हिंदुधर्मांत येण्याची इच्छा झाली पण या गोष्टीला हिंदुसमाज कबूल होईना. इतकेंच नव्हे, तर धाकजी दादाजी याच्या नेतृत्वाखाली सबध हिंदु समाजानें त्या प्रकाराला जोराचा विरोध केला अशा वेळी बाळशास्त्री यानी सदहू प्रकरणी मोठ्या धैर्यानें पुढाकार घेऊन त्या वेळचे मुबईतील सर्व हिंदु लोकाचे प्रसिद्ध पुढारी नामदार जगन्नाथ शकर शेट याचे सहाय्य मिळविले व श्रीपत शेषाद्रीला प्रायश्चित्त देऊन हिंदुधर्मांत परत घेतलें ! अर्थात् सबध हिंदुसमाज त्या वेळी खवळून गेला होता यासबधाने न्या तेलग आपल्या एका लेखात म्हणतात —

" A similar question (of taking back a Christian convert into the Hindu fold) arose long afterwards in connection with the case of Shripat Sheshadri—a brother of the late Rev Narayan Sheshadri—in which the late enlightened Prof. Bal Gangadhar Shastri is understood to have taken a prominent part which mortally offended the orthodoxy of his day "

मुबई इलाख्यात हिंदु सुशिक्षित गृहस्थानें एक शतकापूर्वी समाजसुधारणेच्या मार्गावर पहिलें पाऊल टाकलें ते हेंच होय तदनतर मुलीच्या शाळा स्थापन झाल्या विधवा पुनर्विवाहाची चळवळ सुरू झाली व त्यात कै विष्णुशास्त्री पडित यानी पुढाकार घेतला हे प्रसिद्धच आहे

पण त्या वेळच्या सर्व समाजसुधारणेच्या कामांत एक महत्वाची गोष्ट घडली होती तिचा प्रथम उल्लेख पाहिजे. सदरील कामी आमच्या लोकास त्या वेळच्या अधिकारी व बिन अधिकारी अशा युरोपियन लोकाची फार सहानुभूति व मदत मिळत असे. पण यासबधानें पुढे जरूर तसा योग्य स्थळी विस्तृत उल्लेख येईल. त्याचा या ठिकाणी नुसता निर्देश केला असो इग्लिश शिक्षण घेऊन (युनिव्हर्सिटीच्या स्थापनेपूर्वीच ) जी पहिली सुशिक्षिताची पिढी तयार झाली तिला आमच्या समाजातील जी गोष्ट ठळकपणें प्रथम नजरेस पडली ती आमच्या स्त्रीवर्गाची दुःस्थिति होय. त्यामुळें स्त्रियांची स्थिति सुधारण्याबाबतचे प्रयत्न प्रथम झाले पाहिजेत असें त्याच्या मनानें घेतलें व त्याप्रमाणें त्यांची खटपट सुरू झाली.

त्यानीं—त्यात एल्फिन्स्टन इन्स्टिट्यूशनमधले काही विद्यार्थी होते--प्रथम सन १८४८ साली प्रोफेसर लोकाच्या—त्यात शेट दादाभाई नवरोजी होते—साह्यानें “स्टुडट्स लिटररी अँड सायटिफिक सोसायटी” नांवाची सस्था स्थापन केली व तिच्या आश्रयाखाली एक मुलीची शाळा उघडली यावियी डॉ भाडारकर यांनी एके प्रसगी असे उद्गार काढले आहेत —

“In the year 1848 was established the first Girls' School ın Bombay by the members of the Students' Lıterary and Scıentıfic Socıety. At that tıme there was no sort of polıtıcal agıtatıon, × × × × so that socıal reform ıs prıor to polıtıcal reform, and the object of the socıal reformers was to endeavour to elevate the condıtıon and the degraded posıtıon of woman.”

यात प्रो पॅटन, प्रो रीड, प्रो दादाभाई याचेकडून महत्वाचे सहाय झाले या प्रमाणें सुमारें शभर वर्षापूर्वी मुबईत जें स्त्रीशिक्षणाचे बीज—किंबहुना समाजसुधारणेचा “श्रीगणेशा” सुरू करण्यात आला—त्याची पुढें हळू हळू वाढ होऊन प्रस्तुत काळी त्याचा मोठा वृक्ष झालेला आहे व त्याची काही मधुर फळेही आपणास प्रत्यक्ष पहावयास मिळत आहेत

या गोष्टी जरी सत्य असल्या तरी खऱ्या सामाजिक सुधारणेचा आरभ देशात ब्रिटिश सत्तेची स्थापना झाल्या दिवसापासूनच झाला हे विसरता कामा नये. इग्लिश लोकानी देशाची सर्व राज्यसूत्रे आपल्या हातात घेतल्यामुळे पूर्वीची आपापसातील यादवी मोडली, जनतेला अधिक सुरक्षितपणा वाटू लागला, व एकदरीत देशात शातता नादू लागली या गोष्टी खऱ्या आहेत त्याचप्रमाणें त्यांनीं इकडे नवीन इग्लिश शिक्षणाची पद्धत सुरू केल्यामुळें लोकास बऱ्याचशा नवीन गोष्टीचे ज्ञान होऊ लागले हेंही काही खोटे नाही परतु याहीपेक्षा महत्वाची गोष्ट म्हटली म्हणजे ब्रिटिश सत्तेबरोबर देशात—पोस्ट, तारायत्र, आगगाड्या, आगबोटी वगैरे—ज्या दुसऱ्या काही गोष्टी सुरू झाल्या त्यायोगेकरून लोकाच्या दृष्टीतच आपोआप हरएक प्रकारें फरक पडू लागला, ही होय. आगगाड्या, आगबोटी सुरू झाल्यामुळें लोकांच्या प्रवासाची चांगली सोय झाली, हें खरें, परंतु

आगगाडीतून किंवा आगबोटीवरून प्रवास करणाऱ्या लोकाकडून स्पर्शास्पर्शी-सबधाचे निर्बंध पूर्वीसारखेच कसे पाळले जाणार ? त्याचप्रमाणें लांबच्या प्रवासात गाड्यातून किंवा बोटीवरून खाण्यापिण्याचे प्रसंग येणारच त्या वेळी सोंवळ्या-ओवळ्याचे नियम पूर्वीप्रमाणेंच कसे पाळता येणार ? रेल्वेच्या स्टेशनावर किंवा बदरावर सोटावॉटरची दुकाने झाली प्रवासी लोकास उन्हाच्या वेळी तहानही लागणारच व त्याना जवळच तयार मिळणारें सोडावॉटर घेण्याची इच्छा होणारच अशा वेळी अमक्याच्या हातचे पाणी घ्यावयाचे व तमक्याच्या हातचे घ्यावयाचे नाही अशा प्रकारचे नियम पाळता येणार कसे ? " खरा समाजसुधारक—म्हणजे सुधारणा घडवून आणणारा—सोडा वॉटर विकणारा इराणी हाच होय " असें जें काही वर्षांपूर्वी एका इग्रजी वर्तमानकर्त्यानें म्हटले होते ते जरी थोडेसे विनोदात्मक असलें तरी अगदी सत्य होय सारांश, याप्रमाणें बदललेल्या परिस्थितीमुळें काही काही बाबतीत लोकाच्या आचारविचारात नकळतच फरक पडू लागला. म्हणजे ब्रिटिश सत्तेची स्थापना हे एक आमच्या देशात सामाजिक दृष्टीने नवीन मन्वतरच सुरू झाले असे म्हणण्यास मुळीच हरकत नाही

ब्रिटिश सत्ता या देशात सुरू झाल्यापासून आणखी एका मार्गानें सामाजिक सुधारणेला मदत होऊ लागली तो मार्ग म्हणजे सरकारच्या हातातली कायदे करण्याची सत्ता होय हा अधिकार कोणत्याही देशातल्या सरकारास असतोच. तसा या देशात इग्लिश सरकारचा अमल सुरू झाल्यापासून त्यालाही तो प्राप्त झाला या अधिकाराचा उपयोग करून आमच्या सरकाराने इकडील लोकात प्रचलित असलेल्या अनेक सामाजिक अगर धार्मिक (पण केवळ अन्यायाच्या व अमानुषपणाच्या) चाली बद केल्या आहेत सतीची चाल, गुलामगिरी, बालहत्या, ठगी, वगैरे प्रकार ब्रिटिश सरकाराने कायद्याने बद केले आहेत आणखी अशाच काही गोष्टीचा उल्लेख करता येईल तात्पर्य, इग्लिश सरकारनेंच देशात आल्यापासून सामाजिक सुधारणा पुष्कळ अशाने घडवून आणली यात शका नाही

त्याचप्रमाणें देशात स्थापित झालेल्या न्याय कोर्टानी देखील सामाजिक सुधारणेच्या कामी महत्वाची मदत केली आहे आमच्या धर्मशास्त्राप्रमाणें हिंदु कुटुबातील मालमिळकतीवर स्त्रियाना फक्त पोटगीपलीकडे स्वतत्र असे हक्क मुळीच नव्हते पण तो अन्याय आमच्या न्यायकोर्टानीं—निदान मुबई इलाख्यापुरतें बोलावयाचे असल्यास—पुष्कळच अशाने दूर केला आहे. फार काय, पण मुलीला बापाच्या मिळकतीवर-त्याला मुलगा नसेल तेव्हा—आता पूर्ण वारसा हक्क प्राप्त झाला आहे.

तशीच इतर बाबतीतही कोर्टानी न्यायदृष्टीने बरीच सुधारणा केली आहे त्याचे काही मासले दिल्यास वाचकाची सहज खात्री होईल सन १८८०–८१ च्या सुमारास मुबई हायकोर्टात न्यायमूर्ति मेलव्हिल याजसमोर एक खटला आला होता त्यात अविभक्त कुटुबातील एका मनुष्याने जर परिश्रमपूर्वक विशेष प्रकारचे शिक्षण घेऊन चागले पैसे मिळविले तर त्याच्या मिळकतीवर हक्क कोणाचा—त्याच्या विधवा स्त्रीचा कीं त्या कुटुबातील इतर बाधवाचा—असा मुख्य प्रश्न होता. हायकोर्टानें ठरविले की, मयत मनुष्यानें ते विशेष प्रकारचे शिक्षण ( अविभक्त ) कुटुबाच्या खर्चाने घेतले नसेल तर त्याच्या सर्व मिळकतीला त्याची विधवा स्त्रीच हक्काने पात्र होईल, इतर मनुष्याचा त्यावर हक्क पोचू शकत नाही त्याचप्रमाणें दुसऱ्या एका खटल्यात कोर्टाने ठरविले की, एकाद्या हिदु स्त्रीवर तिच्या कर्जा-बाबत जर कोर्टाचा हुकूमनामा झाला तर त्याला अनुसरून तिला तुरुगात पाठविता येत नाही ! तिसरे वेळी एकदा न्या वेस्टसाहेबापुढे एक खटला होता त्यात एका नायकिणीने आपल्या दत्तक आईवर तिच्या ताब्यात असलेल्या मिळकतीच्या विभागणीकरिता फिर्याद केली होती तसली फिर्याद सार्वजनिक हिताच्या व नीतीच्या दृष्टीने चालू शकत नाही असा कोर्टाने निकाल दिला ! हायकोर्टापुढे सन १८८६ च्या सुमारास आणखी एक खटला आला होता तो त्याहीपेक्षा अधिक महत्त्वाचा होता एका हिदु मुलीचे आईबाप तिच्या बालपणीच मयत झाले होते. त्या वेळी तिच्या बापाच्या बाजूच्या आप्तानी—चुलत्यानी—तिची नुसती चौकशी देखील केली नाही पण त्या मुलीच्या मामानी तिला आपल्या घरी नेऊन तिचे सर्व प्रकारे लालनपालन केले पुढे ती मोठी झाल्यावर तिच्याकरिता योग्य स्थळ पाहून मामानी तिच्या लग्नाची तयारी केली इतक्यात त्या मुलीचे चुलते जागे होऊन त्यानी त्या कामात " खो " घालण्याच्या इराद्याने कोर्टात फिर्याद माडली आणि " आम्ही पाहू त्या वराला मुलगी दिली पाहिजे व हा आमचा हक्क आहे" असे मागणें केले ! फिर्याद डिस्ट्रिक्ट कोर्टात प्रथम होऊन सर्व प्रकरण शेवटीं हायकोर्टात आले न्या वेस्ट आणि न्या बर्डवुड यानीं असा निकाल दिला — " मुलीच्या चुलत्यानी वराची निवड करावी, पण तो एखाद्या सस्थानातील रहि-वाशी नसावा कारण तिकडील रहिवाशी मनुष्यावर मुलीच्या हिताच्या दृष्टीने या कोर्टाचा अधिकार बजावता येणार नाही सबब ब्रिटिश हद्दीतील वर निवडावा व ती निवड डिस्ट्रिक्ट जज्जानें कायम करावी परतु कोणताही वर मुलीच्या इच्छे-विरुद्ध तिजवर लादता उपयोगी नाही. " ठरावातले मूळ शब्द असे आहेत —

"Under no circumstances should the Judge force him ( a candidate selected by the girl's paternal relations ) or any other man on the girl whose views were to be consulted before the final selection was made."

तात्पर्य, स्त्रियाच्या हक्काच्या दृष्टीनें सामाजिक सुधारणेला आमच्या न्याय कोर्टानी किती महत्वाचे सहाय केलें आहे, हे वरील विस्तारावरून स्पष्ट होतें त्याच मार्गाचे मग न्या तेलग, न्या रानडे, न्या सर ना चदावरकर व न्या शहा यानी अनुकरण करून मुबई इलाख्यात स्त्रीवर्गाचे जीवित कायद्याच्या दृष्टीने सुखमय करण्याचे कसे प्रयत्न केले आहेत हे सर्वविश्रुतच आहे

याप्रमाणे ब्रिटिश सत्तेच्या आगमनाने प्रत्यक्ष व परपर–या सामाजिक सुधारणेला महत्वाची मदत झाली, हे खरे परतु समाजसुधारणेसारखे जबाबदारीचे काम सरकारी मदतीच्या पागुळगाड्याने केव्हाही पूर्ण होत नसते ते समाजाच्या पुढाऱ्यानी आपल्या अगावर घेतलेच पाहिजे त्याप्रमाणे कै बाळशास्त्री जाभेकरानी ते काम सुरू केल्याचे वर सागितलेंच आहे पुढे त्याचे शिष्य शेट दादाभाई व इतर मुबईतील प्रोफेसर मडळी यानी मिळून स्टु लि सा सोसायटी स्थापन केली हेही आलेंच आहे त्या सोसायटीसबधाने इकडे विशेष काही न लिहिता इतकेच सागितल्यास बस्स होईल की सदरील सोसायटीत त्या वेळचे व नतरचे मुबईतील बहुतेक सर्व सुशिक्षित पुढारी सामील झाले होते व पुढें जनतेत ज्ञान प्रसार करण्याबाबतचे व सामाजिक सुधारणेसबधाचे जे प्रयत्न झाले ते काहीं वर्षेपर्यत त्या सस्थेमार्फतच झाले

सामाजिक सुधारणेचे जे प्रश्न त्या वेळी पुढे आले होते त्यापैकी बहुतेक सर्व प्रश्नात स्त्रीवर्गाच्या स्थितीचा सबध येत असल्यामुळें व स्त्रीवर्गाची त्या वेळची स्थिति—डॉ भाडारकराच्या भाषेंत सागावयाचे म्हणजे "degraded"—अत्यत शोचनीय प्रकारची असल्यामुळें, खऱ्या समाजसुधारणेला सुरवात स्त्रियाची स्थिति सुधारण्यापासूनच झाली पाहिजे हे उघड आहे याच कारणामुळें स्टुडट्स सोसायटीने प्रथम मुलीची शाळा सुरू केली स्त्री-वर्ग जसजसा शिक्षित होत जाईल तसतशी त्याला आपल्या कर्तव्याची व हक्काची जाणीव उत्पन्न होईल व बाल विवाह, विधवा पुनर्विवाह वगैरे सामाजिक प्रश्न आपोआप सुद्र लागतील असे त्या वेळच्या सुशिक्षित पुढाऱ्याना स्पष्ट दिसून आलें

सुशिक्षित पुढाऱ्यांच्या आणखी एक गोष्ट पूर्णपणें लक्षात भरली होती ती ही कीं, सामाजिक सुधारणेचे जे त्या वेळी महत्वाचे प्रश्न त्याचेपुढे होते ते पूर्वीच आमच्या आर्यपूर्वजानी सोडविले होते कारण प्राचीन काळी हिंदु समाजाची सामाजिक दृष्टीने स्थिति अत्यत स्पृहणीय प्रकारची होती. पुढे देशात एकामागून एक अशीं अनेक कारणें घडून ती स्थिति हळुहळु बदलत गेली व अखेर प्रस्तुतची स्थिति प्राप्त झाली अर्थात् आता आपले काम एवढेच की, हरएक प्रयत्नाने आपल्या हिंदुसमाजास शक्य तितकी पूर्वीची स्थिति प्राप्त होईल असे धोरण ठेवावयाचे कोणत्याही देशातील समाजास वस्तुत हजारो वर्षापूर्वीची स्थिति जशीची तशी प्राप्त होणें शक्य नसते त्यात परिस्थितीप्रमाणे थोडाबहुत फेरबदल होतोच होतो तरी पूर्वीची सुस्थिति प्राप्त होईल असे धोरण ठेवणे हें केव्हाही इष्टच आहे.

आमचे समाजसुधारक जी सामाजिक सुधारणा घडवून आणण्याचे आज सुमारे एक शतकभर प्रयत्न करीत आहेत तिची मुख्यत दोन गोष्टीतच व्याप्ति होऊ शकते एक स्त्रीवर्गाची स्थिति सुधारणे व दुसरी जातिभेदातील शल्य कमी करणे. या गोष्टी घडल्या म्हणजे बाकीच्या सर्व सामाजिक सुधारणा त्यात येऊन जातात. बालविवाह बद करणें, विधवाविवाह सुरू करणे, जरठ कुमारी विवाह बद करणें, बहुपत्नीकत्व, बहुभर्तृकत्व, सती, या सर्व चालीना आळा घालणे, या गोष्टी एका स्त्रीशिक्षणाच्या योगाने सुकर होऊ शकतील यामुळेच स्त्रीशिक्षणाचे महत्व फार आहे न्या तेलग एके ठिकाणी म्हणतात की,

But I look forward more particularly to female education as our greatest help in the solution of all these Social problems. It is to the spread of education among our girls × × × × that I am inclined to look for the remedies of existing evils."

यात लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट ही की, वरील बहुतेक प्रकार आमच्या लोकात प्राचीन काळी चालू होते आमच्या समाजात विद्वान् स्त्रिया होत्या, मुलामुलीची लग्नें मोठेपणी होत असल्यामुळें बालविवाहाचे कारणच नव्हते, विधवाना विवाह करण्याची मुभा असे, सतीची चाल नव्हती, म्हणजे प्रस्तुत काळी बायकाच्या मागें जी अनेक बधनें उत्पन्न केली जाऊन त्याच्या जीवाची किंमत जवळजवळ शून्य समजली जाते, तसा प्रकार पूर्वी नव्हता. म्हणूनच आमच्या समाजास

पूर्वकाळची स्थिति प्राप्त होईल अशी खटपट करावयाची हेंच आपल्या समाज-सुधारकानी प्रथमपासून धोरण ठेवले आहे स्टुडट्स सोसायटीचे एका वेळचे अध्यक्ष व प्रसिद्ध पुराणवस्तुसशोधक डॉ भाऊ दाजी यानी तर एकदा स्त्रीशिक्षणासबधाने असे उद्गार काढले होते —

" Although indigenous to the country, female education had by long neglect become so nearly extinct as to demand for its restoration the care, the anxiety and the patronage needful for an exotic."

जातिभेदाची स्थिति जवळजवळ अशीच आहे. पूर्वी हिंदुसमाजात फक्त चारच जाती होत्या व त्यात अन्नव्यवहार चालत असे इतकेच नव्हे तर शरीर-सबधही भिन्न भिन्न जातींत होत असत पुढे देशात अनेक राजकीय व सामाजिक क्रात्या झाल्या व त्यायोगे समाजाच्या स्थितीत बरीच उलथापालथ होऊन प्रस्तुत काळी प्रातावरून, धर्मपथावरून, धद्यावरून, स्थानभेदावरून अशा हिदुलोकाच्या चार हजार जाति झाल्या आहेत त्या पुन्हा अशा की बहुतेक सर्व जवळजवळच्या जातीमध्ये—रोबीबेटी व्यवहार तर नाहीतच—प्रायः छत्तीसाचा आकडा आढळून येतो ! अशा स्थितीत हिदुलोकाच्या एकीची किंवा एकराष्ट्रीयत्वाची भाषा वापरणे म्हणजे व्यर्थ शब्दच्छल करणे होय तथापि एकादें राष्ट्रीय सकट अगर सर्व लोकाना भासणारी अडचण उत्पन्न झाली म्हणजे माणसे आपल्यामधील भेदभाव विसरत असतात, असा साधारण सृष्टिनियम आहे त्या नियमाला अनुसरून हिदुस्थान देशातील सर्व जातीच्या व सर्व धर्माच्या लोकाना एका दावणीत आणून त्याच्यात एकराष्ट्रीयत्वाची भावना उत्पन्न करणारी अशी गेल्या दीड दोनशे वर्षात एक गोष्ट घडली आहे ती म्हणजे या देशावरील ब्रिटिश सत्ता होय ! तिच्या योगाने इकडे एक नवीन मन्वतर सुरू होऊन नव्या परिस्थितीचा सर्व लोकाच्या आचार-विचारावर विलक्षण परिणाम झाला आहे व होत आहे त्यामुळे सुशिक्षित लोकाच्या मनात नवीन आशा उत्पन्न होऊन भिन्न भिन्न जातीतील भेदाचे खरे स्वरूप ओळखून ते शक्य तितके नष्ट करता येणें शक्य आहे, हे त्याच्या लक्षात पक्के बाणले आहे, व तदनुसार त्याचे यत्न चालले आहेत या बाबतीत प्रस्तुत पिढीचे विचार बरेच पुढे गेले आहेत व त्याप्रमाणें भिन्न भिन्न समाजात ऐक्य घडवून आणण्याचे प्रयत्नही होत आहेत परतु अर्धशतकापूर्वीच्या स्थितीचा विचार केला तरी समाजसुधारकाच्या लक्षात जातिभेदाची तीव्रता नि सशय आलेली असून ती

कमी करून निरनिराळ्या जातीत प्रेम उत्पन्न करण्याचे त्याचे प्रयत्न चाललेच होते तेलगाचे मत असे होते की, गुणकर्मावरून मनुष्या–मनुष्यामध्ये भेद राखा-वयाचे तर गीतेत सागितल्याप्रमाणें हिदु लोकाच्या फक्त चार जाति असणेंच रास्त आहे, व ह्याप्रमाणें चार जाति राहिल्या तरी त्यानी एकमेकाचा द्वेष करण्याचें कारण नसून सर्वानी प्रेमभावाने वागण्यातच सर्व हिंदुसमाजाचें कल्याण आहे असे त्याचें म्हणणे होते याप्रमाणे त्याचे सामान्यत विचार असल्यामुळें तदनुसार हिंदु यूनियन क्लबमध्ये व इतरत्र ते सर्व जातीच्या लोकाशी स्नेहभावाने वागत असत व सर्वानीही तसेच वागावे असे ते प्रयत्न करीत असत

सन १८४८ साली स्टु लि सा सोसायटी स्थापन झाली हें वर सांगितलेंच. त्या सस्थेसबधाने विस्तृत रीतीने विवेचन पुढील प्रकरणात यावयाचेंच आहे तेव्हा त्याविषयी इकडे काही विशेष लिहीत नाही त्या सोसायटीच्या आश्रयाखाली मुबईस पहिली मुलीची शाळा निघून समाज सुधारणेचा पाया व्यवस्थितपणें घालण्यात आला त्या सस्थेमार्फत ज्ञानप्रसाराचे काम व सामाजिक सुधारणा अशी दुहेरी कामगिरी काही वर्षे चालली होती सन १८७२–७३ साली काशीनाथपत तेलग हे त्या सस्थेचे सेक्रेटरी झाले ते सन १८८९ साल-पर्यंत सेक्रेटरीच होते व नतर ते त्या सोसायटीचे अध्यक्ष झाले काशीनाथपतानी प्रथमच कोणती नवीन चळवळ सुरू केली असे नाही तशी नवीन चळवळ सुरू करणें त्या वेळी शक्य नव्हते व त्याची जरूरही नव्हती खऱ्या सुधारकाला नवीन काम उत्पन्न करावयाचे नसते, तर पूर्वीचे अपुरें राहिलेले पुरें करावयाचे असतें. हेच तत्व न्या. रानड्यानी पुढीलप्रमाणें एकदा आपल्या अर्थपूर्ण भाषेंत सुदर रीतीने गोंवले आहे —

"The true reformer has not to write upon a clean slate. His work is more often to complete the half-written sentence We cannot break with the past altogether. For it is a rich inheritance and we have no reason to be ashamed of it. But wh[illegible] respecting the past, we must ever seek to [illegible] the parasitical growths that have encrust[illegible]

तेलगानी स्टुडट्स सोसायटीचे सेक्रेटरी या नात्यानें व [illegible]णाच्या प्रसाराकरिता अत्यत सस्मरणीय कामगिरी केली आ[illegible]

सामाजिक सुधारणेच्या दुसऱ्या बाबीसबधाचा विस्तार पुढील काही प्रकरणात येईलच पण थोडक्यात सागावयाचे म्हणजे सन १८७२ पासून सन १८९३ पर्यंत मुबईत असा कोणताही सामाजिक सुधारणेचा प्रश्न निघाला नाही की, ज्यात तेलगाचे प्रमुखत्वाने अग नव्हतें प्रत्येक वेळची त्याची कृति लोकास आवडेल अशीच असे असें मात्र म्हणता येत नाहीं परंतु ते उत्तम प्रकारचे सुशिक्षित व सुसस्कृतमनाचे असल्यामुळें त्याच्यात उदार भावना जागृत झाल्या होत्या. त्यामुळें सामाजिक सुधारणेच्या—किंबहुना कोणत्याही सुधारणेच्या—साधनाने हळू हळू असले तरी निश्चितपणें उन्नतीच्या मार्गावर देशाचे पुढे पाऊल पडेल असा त्याचा यत्न असे.

काशीनाथपत तेलग याच्या समाजसुधारणाविषयक मतासबधाने व त्याच्या वर्तनासबधाने त्याच्या हयातीत लोकाचे बरेच गैरसमज होते त्यांविषयीचा जरूर तो खुलासा पुढील काहीं प्रकरणात येईलच परतु थोडक्यात सागावयाचें म्हणजे त्याची सामाजिक बाबीसबधाने मते काय होती हे त्याच्या काही व्याख्यानां-वरून व लेखावरून कोणासही सहज समजण्यासारखी आहेत त्याची "शास्त्र व रूढि" व "सामाजिक बाबतीतील तडजोड" या विषयावरील हेमत व्याख्या-नमालेतील व्याख्यानें, त्यानी मिस्टर मलबारी यास लिहिलेल्या "बाल-विवाह" व "असमत वैधव्य" या दोन विषयावरील पत्रकास दिलेले उत्तर, व त्यानीं समतिवयासबधाच्या वादात प्रमुखत्वाने भाग घेऊन जे लेख लिहिले ते, इतक्यावरून तेलगाची सामाजिक विषयावरील मतें एकदरीत काय होतीं याची कल्पना सहज होऊ शकते. चार शब्दात सागावयाचे म्हणजे प्राचीन संस्कृत वाङ्मय व इग्लिश वाङ्मय याचे त्यानी उत्तम प्रकारें परिशीलन केलेले असल्यामुळें त्याचें असे मत झाले होते की, आपल्या प्राचीन संस्कृतीचा आधार न सोडतां नव्या ( पाश्चात्य ) सस्कृतीच्या दृष्टीनें आपल्या देशाची शक्य तितकी प्रगति व्हावी असे यत्न केले पाहिजेत. व त्याप्रमाणें ते प्रतिपादन करीत असत प्राचीन सस्कृतीकडे दुर्लक्ष करून पुढें दृष्टि ठेवून वागणें त्याना पसत नसे, व केवळ जुन्यालाच धरून बसावे असेंही त्याना वाटत नसे. या त्याच्या धोरणामुळें त्याच्यावर या बाजूनें किंवा त्या बाजूनें बऱ्याच वेळा टीका होत असे. पण ते ती सहन करीत असत. उत्तर देण्याच्या भरीस ते सहसा कधींच पडत नसत, व तसें करीत बसण्याला त्यांच्या प्रसिद्ध कार्यव्यापृत्वामुळें त्यांना वेळही सापडत नसे.

त्याचप्रमाणें आधीं आपण आपलें राजकीय ध्येय साधून घेऊ या; मग सामा-जिक बाबी पाहू—असल्या कोत्या व एकदेशीय विचारास त्यानीं केव्हाही थारा

दिला नाही राष्ट्राच्या प्रगतीकरिता अनेक दिशांनी चळवळ करणें हें राष्ट्रदेहाचें पोषण करण्यासारखे आहे, असे त्याचे ठाम मत होते. त्या देहाच्या अवयवापैकीं आपण प्रथम हात आणि पाय याचेच पोषण करू आणि ते लठ्ठ झाल्यावर मग डोके, छाती वगैरे भागाचे पाहू असें म्हणून कसे चालेल ? तेलगानी एकदा स्पष्ट म्हटलें आहे की,

" I consider religious, moral, social and political reforms and all other reforms whatever to form one integral system."

त्यामुळे देशाच्या हितैक दृष्टीने सर्व बाजूनी राजकीय, सामाजिक, औद्योगिक वगैरे दिशानी—एकाच वेळी चळवळी चालू राहिल्या पाहिजेत असें त्याचे स्पष्ट मत असे

दुसरी एक हीन प्रकारची आकाक्षा असते, तिलाही तेलगानी आपल्या सबध सार्वजनिक कारकीर्दीत कधीच आसरा दिला नाही आपली सामाजिक बाबतीतलीं मते कशीही असोत, पण " मी तुमच्याच मताप्रमाणें वागतो " असा नुसता लोकापुढे बहाणा करून त्याची प्रीति सपादन करावयाची व त्यातच क्षणभर कृतकृत्यता मानावयाची ! असली आकाक्षा तेलगाच्या कधी गावीही नसे देश-हिताकरिता उद्योग करावयाचा हे त्याचे व्रत होते परतु तो उद्योग करीत अस-ताना आपली प्रतिष्ठा वाढावी असा अतस्थ हेतु ठेवावयाचा किंवा त्यात काही आपला स्वार्थ साधून घ्यावयाचा असली क्षुद्र कल्पना त्याच्या अष्टागींही शिवली नव्हती ! याबद्दल मोठमोठ्या हिदु, पारशी, युरोपीयन लोक याचे दाखले आहेत

साराश, वरीलप्रमाणें तेलगाचे एकदरीत विचार होते, व त्याला अनुसरूनच त्यानी आरभापासून अखेरपर्यंत सार्वजनिक कामे केली म्हणूनच त्याची प्रमुख सामाजिक सुधारकामध्ये गणना असे.

---

## प्रकरण एकोणिसावे.

# स्टु. लि. अँड सा. सोसायटी.



" स्टुडट्स लिटररी अँड सायटिफिक सोसायटी " या प्रसिद्ध सस्थेचा मागें अनेकदा उल्लेख आलाच आहे. पण ह्या संस्थेशी काशीनाथपंत तेलग यांचा सुमारें

वीस वर्षांपेक्षाही अधिक कालपर्यंत संबंध असल्यामुळें व त्या साधनानेंच त्यानीं महत्वाचे वाङ्मयात्मक व सामाजिक काम केलेले असल्यामुळें इकडे त्या संस्थेचा थोडासा इतिहास देणे इष्ट वाटते प्रसिद्ध सर दिनशा वाच्छा हे यासंबधाने असे म्हणतात —

" Tracing his ( Mr Telang ) writing from 1869 by which time he had finished his academic career with honours, it would seem that his earliest activities, were in connection with that admirable institution which bears the name of " The Students Literary and Scientific Society " one of the founders or early pioneers of which were Mr ( now Dr. in 1916 ) Dadabhai Naoroji and the late Messrs V N. Mandlik ann Naoroji Fardunji I know as a tatter of fact, how dearly Mr. Telang loved that Society and how his heart was full to render it every service possible with a view to making it a power and an influence for good in matters educational and literary in the city of Bombay."

म्हणजे शिक्षणाच्या दृष्टीनें व वाङ्मयात्मक दृष्टीने मुबईत सार्वजनिक महत्त्वाचे पुष्कळच काम करण्यास सदरील सोसायटी हे एक अत्यंत उपयुक्त साधन आहे अशी तेलगाची भावना होती व त्या मार्गाने त्या सोसायटीचा उपयोग करण्याच्या कामीं ते आपल्याकडून प्रयत्नाची शिकस्त करीत असत. अर्थात् ज्ञानप्रसाराच्या व स्त्रीशिक्षणाच्या दृष्टीने सदहू सोसायटीच्या हातून बहुमोल कामगिरी झालेली असल्यामुळें त्यासबधाने थोडासा तरी उल्लेख झाल्याशिवाय मुबईतील सामाजिक सुधारणेचा इतिहास पुरा व्हावयाचा नाही

स्टुडट्स सोसायटीच्या स्थापनेच्या सबधानें काही गोष्टी लक्षांत ठेवण्यासारख्या आहेत ती सोसायटी स्थापन करण्याची स्फूर्ति तत्कालीन मुबईतील काहीं विद्यार्थ्यांमध्यें उत्पन्न झाली. त्या कामी त्याना त्या वेळच्या कॉलेज-प्रोफेसरा-कडून प्रोत्साहन मिळालें, व पुढे सोसायटीच्या कामाची जसजशी वाढ होऊ

लागली, तसतशी सस्थेच्या प्रवर्तकास मुबईतील मोठमोठ्या युरोपियन, पारशी, हिंदु वगैरे वजनदार मडळीची सहानुभूति व मदत मिळू लागली

पण याच्याहीपेक्षा विशेष लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे सदहू सोसायटी स्थापन करणाऱ्या मडळीला प्रथमत बऱ्याच अडचणी सोसाव्या लागल्या मूळ इग्रजी शिक्षणाचे त्या वेळी ( १८४८ च्या सुमारास ) जनतेस महत्व वाटत नव्हतें. लोकास वाटत असे की इग्लिश शिक्षण घेऊन आम्हास करावयाचे काय ? या अडचणीत फिरून काही मिशनरी मडळीच्या विलक्षण चळवळीने भर पडत असे. मिशनरीनी ओरड चालविली होती की सरकारी सस्थातून दिले जाणारें शिक्षण हें धर्मरहित असल्यामुळें ते घेऊन बाहेर पडणारे विद्यार्थी नास्तिक होतात ! यासबधी एका पारशी तरुण मनुष्याने लिहिलेलं व त्या वेळच्या "The Oriental *Christian Spectator*" नावाच्या मासिकात ( जून १८४८ ) प्रसिद्ध झालेलं पत्र मोठे मासलेवाईक आहे ते पत्र लाबलचक असल्यामुळे ते सगळे न देता इकडे त्यातून काही थोडी वाक्यरत्ने मात्र देतो हे पारशी तरुण म्हणतात.

"I allude to the mischief which the Government system of education (unaccompanied as it is by the salutary *panacea* of religion) has been the means of producing × × × How many are there of my own individual acquaintances (Ho! most sadful to relate some of them my bosom friends) who are tainted with the former vice. (The hot spirit of youth prone to repudiate every institution having the sanction of hoary antiquity.) They can spout Shakespeare, expound Bacon and read Milton to the very soul × × × They can supply you with a code of excellent maxims for the guidance of your conduct in critical junctures. But what after all? What effect has all this trash of education on their individual self? What could it be but that of setting them like *pariah dogs* against all the Institutions—the heirlooms bequeathed them by their ancestors."

हें मिशनरी मडळीच्या दृष्टीनें सरकारी शिक्षणपद्धतीच्या अनुपयुक्ततेचें चित्र झालें पण इग्लिश शिकवून कारकून तयार करण्याच्या पलीकडे नव्या शिक्षणपद्धतीचा उपयोग काय असे विचारणारे लोक त्या वेळी खुद्द युरोपीयन मंडळीमध्येच होते त्याचा एक मासला पाहा त्या वेळच्या "बॉबे टाइम्स"मध्ये—म्हणजे हल्लीचे "टाइम्स ऑफ इडिया—" या विषयावर एक सारखे वरचेवर लेख प्रसिद्ध होत असत त्यात एकदा इग्लिश शिक्षणपद्धतीला निरुपयोगी म्हणून पुढे असे लिहिले होते

"Useless system of education which by bribing with scholarships youths to continue at College after they had learnt all that they wanted (namely the qualifications necessary for a writing clerk) was giving an artificial stimulus to the formation of a class of men that were not wanted."

हिंदी लोकाना कारकून तयार करण्यापेक्षा अधिक इग्लिश शिकविण्यापासून हें एक तर नुकसान झालेंच, पण बिचाऱ्या अर्धपोटी जेवून राहणाऱ्या रयतेचे त्यापासून केवढे नुकसान होते ते काय सागावे? त्याबद्दलची "**बॉबे टाइम्स**"नें एकदां मुबईच्या प्रोफेसर लोकानाही आठवण करून देण्याचा यत्न केला आहे ते प्रोफेसर लोक,

"To be reminded of the half-starved ryots who were made to pay for imparting information to those who have no use for it, and then again to saddle them (ryots) with payment of a servant of Government of a kind not desired by them."

नवीन इग्लिश शिक्षणाच्या प्रसारासबधानेंच जेथे युरोपीयन, एतद्देशीय, मिशनरी लोकाचे असे प्रतिकूल ग्रह झालेले होते, तेथे आशेला किंवा उमेदीला जागा कितीशी असणार? आमच्या देशाची सामाजिक दृष्टीनेंही त्या वेळी अशी शोचनीय स्थिति झाली होती की, तिचा प्रस्तुत काळी उल्लेख केला तर कित्येकास हसूच येईल व दुसऱ्या कित्येकास तर तें खरेंही वाटणार नाही सन १८७०–७१ च्या सुमारास त्या वेळचे जस्टिस गिब्स यानीं सदर्हू सोसायटी तर्फे झालेल्या एका समारंभाचे वेळीं केलेल्या भाषणांत पुढील उद्गार काढले होते —

"I can well remember the time (1848) when none but females of the lower orders were ever seen in the streets of Bombay, and when even the Parsee ladies never went out except in closed carriages, separated from their husbands, brothers and sons. Such a thing as a native gentleman and his wife driving together, much less walking together, was unheard of, and the Hindu ladies were kept even more secluded than their Parsee sisters."

सुमारें शभर वर्षापूर्वी आमच्या देशातील पारशी स्त्रिया देखील मुसलमान भगिनीप्रमाणें पडदे लावून बद केलेल्या गाड्यामधून बाहेर फिरत असत हें ऐकून प्रस्तुत पिढीतील लोकास खरोखरीच आश्चर्य वाटेल! हिंदुस्त्रियाची स्थिति त्याही-पेक्षा–स्वतन्त्रतेच्या दृष्टीने अधिक शोचनीय असली पाहिजे, हे न सागताही वाचकाच्या लक्षात येणार आहे सर दिनशा वाच्छा यानी आपल्या एका लेखात म्हटलें आहे की —

"In the fifties (1850–59) caste and customs among the Hindus and Mahomedans were a great deal sterner in social matters than they are to-day." (Bom. Chron· 24-9-15.)

लग्नसमारंभाचे वेळीं नायकिणीचे नाच वगैरे हे प्रकार चालू होतेच असो

हा इतका प्रथमच विस्तार करण्याचे कारण एवढेंच की, गेल्या शतकाच्या मध्यास लोकात ज्ञानप्रसार व सामाजिक सुधारणा करण्यास जे थोडे त्या वेळचे सुशिक्षित लोक तयार झाले त्याना प्रथम प्रथम कशा अडचणी सोसाव्या लागल्या व तरी त्या पाहून न डगमगता त्यानी आपण हाती घेतलेलें काम कसें धैर्यानें पुढें रेटीत नेलें हे वाचकास स्पष्ट समजावें असो स्टुडटस लिटररी अँड सायटिफिक सोसायटी या सस्थेची मुबईस सन १८४८ सालीं स्थापना झाली. त्यांत मुख्य अग त्या वेळच्या "एल्फिन्स्टन इन्स्टिटयूशन" मधील काही विद्यार्थ्यांचें होतें व त्यांना प्रोफेसर पॅटन व प्रो रीड यांचें सहाय्य होतें त्याच्याही पूर्वी प्रो हेंडरसन यानी एक अशीच विद्यार्थ्यांची–स्वत.ची सुधारणा करण्या-

करिता म्हणून—संस्था स्थापन केली होती तिचें मग प्रो बाळ गगाधर शास्त्री याच्या सहाय्यानें व तदनतर पुन्हा प्रो मॅक्डूगल याच्या सहाय्याने पुनरुज्जीवनही झालें होतें परतु सस्थेतील मडळीच्या पुढे—स्वत च्या सुधारणेबाबतचेच केवळ नव्हे तर—आपल्या देशबाधवानाही शक्यतर उपयोगी पडण्याबाबतचे उच्चतर ध्येय प्रो पॅटन व प्रो रीड या दोन गृहस्थानीच ठेविले व त्याना देशसेवेचा पहिला धडा शिकविला ! सन १८५३ मध्यें प्रो रीड याना स्टुडटस सोसायटी-कडून—ते बॅरिस्टरीच्या धद्याकरिता जाण्यापूर्वी—एक मानपत्र देण्यात आले, त्यात सदरील गोष्टीचा स्पष्ट उल्लेख केलेला सापडतो तो असा —

" We feel that we have been peculiarly fortunate in having had for the past five years, the disinterested and warm exertions of two such gentlemen as the very much lamented Prof Patton and yourself in the cause of improvement and enlightenment. Some years ago there was a Society formed by Prof. Henderson, revived under Assistant Prof. Bal Gangadhar Shastri, and again under Prof. Mc. Dougal. Its object, however, was the self-improvement of the members, and it never did more. It was you, together with Prof. Patton, who gave it that impetus which caused the members to aspire, not only to be useful to themselves, but if possible, to their countrymen also."

त्या मानपत्रावर ज्या सह्या केलेल्या आढळतात त्यात शेट दादाभाई नवरोजी याचीही आहे असो. सदरील सस्थेत जे लोक सामील झाले होते त्यात फार तो विद्यार्थ्यांचाच भरणा होता व काही शाळेंतील शिक्षक होते पहिल्या वर्षी ( १८४८ ) सभासदाची सख्य २४ होती त्यापैकी १८ विद्यार्थी होते पुढें चार वर्षांनी—१८५२ मध्ये—सभासदाची सख्या १०६ झाली त्यात विद्यार्थी २६ होते. परंतु बाकीच्यापैकीं बरेचसे सभासद नुकतेच कॉलेज सोडून गेलेले विद्यार्थी होते. यापैकीं पुन्हा कांहींचा अभ्यासक्रम पुरा झाला होता व कांहीं

अभ्यासक्रम पुरा न करताच दुसऱ्या धद्यास लागण्याकरिता किवा नोकरीवर जाण्याकरितां कॉलेज सोडून गेले होते अशा नव्या व जुन्या विद्यार्थ्याना हाताशी धरून त्याच्यात प्रो. रीड आदिकरून काही अध्यापकानी जे आळस टाकून उद्योग करण्याचे, ज्ञान सपादन करून स्वत ची सुधारणा करून घेण्याचे व देश-बाधवानाही शक्य तितके उपयोगी पडून देशसेवा करण्याचे बीज पेरले त्याबद्दल त्याची स्तुति करावी तेवढी थोडीच होईल ! ईमर्सनने एके ठिकाणी म्हटले आहे की, कॉलेज सारख्या सस्थाचे शिकविणे हे काम तर आहेच, पण त्याचे खरें कार्य म्हणजे बुद्धिवान् विद्यार्थ्यांच्या मनात उच्च प्रकारच्या आकाक्षा उत्पन्न करून त्याच्या अगी स्वभावत च असलेल्या उत्साहाला चागले वळण लावणे हे आहे. यासबधानें प्रो रीड ह्यानी त्याना वर सागितल्याप्रमाणें मानपत्र दिल्यावर, जें एक लहानसे भाषण केले, त्यात चागला खुलासा केला आहे ते उद्गार अध्याप-काचा धदा करणाऱ्या प्रत्येक मनुष्याने लक्षात बाळगण्यासारखे आहेत ते असे —

"You have kindly alluded to my exertions as an instructor Had I, from indolence or from neglect, failed in performing the sacred duties of so responsible a charge, I should consider myself morally degraded in the eyes of all But I have also endeavoured to keep in view another end collateral to that of direct instruction, namely, to keep alive and to supply with fuel that ardent enthusiasm which burns in the breasts of generous youths"

प्रोफेसर लोक इतके उदारमनस्क असल्यावर त्याच्या शिकविण्याचा व त्याच्या सहवासाचा विद्यार्थ्यांच्या मनावर सुपरिणाम झाल्याशिवाय कदापि राहणार नाही

याप्रमाणें स्टुडटस सोसायटीची स्थापना झाल्यावर तिच्या कामाची मग हळू-हळू वाढ होऊ लागली स्वत ची सुधारणा व समाजाची सुधारणा असा त्या सस्थेचा दुहेरी हेतु असल्यामुळे त्या हेतूच्या सिद्धयर्थ सभासदानी जरूर तशी उपाययोजना आरंभली प्रथम व्याख्याने, निबधवाचन, विविधविषयावर चर्चा इत्यादि प्रकार त्यानी सुरू केले मग कामाच्या सोयीसाठी त्या संस्थेच्या पोटातून मराठी व गुजराथी—अशा दोन ज्ञानप्रसारक सभा निर्माण करण्यात आल्या, व त्यातून महाराष्ट्रातील मडळी व पारशी असे आपआपल्या देशी भाषेतून व्याख्यानें वगैरे देऊ लागले. पुढे मग

गुजराथी हिंदूंच्या सोयीसाठी "बुद्धिवर्धक हिंदु सभा" म्हणून एक निराळी संस्था स्थापन करण्यात आली, व तिजमधून गुजराथी हिंदु लोक कामे करू लागले यांप्रमाणें आठवड्यातून निरनिराळ्या मडळ्यातर्फे व्याख्याने, निबधवाचन, व सामाजिक विषयांवर चर्चा वगैरे कामे नियमितपणे होऊ लागली या वादविवादातून धार्मिक व राजकीय या दोन बाबी मात्र वगळल्या जात असत याप्रमाणे व्याख्याने, निबधवाचन, वगैरेंचा क्रम चालला असता सन १८४९ मधील व्याख्यानमालेत मि. बहिरामजी खरशेटजी या गृहस्थानी "Female Education" (स्त्रीशिक्षण) या विषयावर एक उत्कृष्ट निबध वाचला त्यात त्यानी आपल्या श्रोत्याना अशी कळकळीची विनति केली की, प्रत्येकाने आपल्या कुटुबामधून निदान एक तरी मुलगी शाळेत शिकण्याकरिता पाठवावी त्याप्रमाणें सगळे——त्यात विद्यार्थीच जास्त होते—कबूल झाले इतकेच नव्हे तर मुलीच्या शाळातून स्वसतोषाने शिकविण्यास देखील काही तयार झाले! याप्रमाणें पहिल्या वर्षी ज्यानी केवळ हौस म्हणून—Volunteers—मुलीच्या मराठी शाळातून शिकविण्याचे काम केले त्याची नावे १ भास्कर दामोदर, २ सखाराम दीक्षित; ३. धोंडदेव त्रिंबक, ४ नारायण विष्णु, ५ महादेव गोविंद, ६ शामराव तात्या.

याप्रमाणें स्टुडटस सोसायटीच्या शाळा सुरू झाल्या व त्या चागल्या रीतीनें चालल्या प्रथम काही वर्षे मुलीकडून फी मुळीच घेण्यात येत नसे पुढे मुली जास्त येऊ लागून शाळाची स्थिति सुधारली व खर्च वाढू लागला तेव्हापासून थोडथोडी फी घेण्यात येऊ लागली.

सोसायटीच्या सभासदाच्या फायद्याकरिता मराठी व गुजराथी भाषातून मासिके चालविण्यात येत असत व त्यात चागले चागले लेख प्रसिद्ध होत असत. असो सोसायटीच्या कामाचा यापेक्षा जास्त विस्तार करीत नाही झाला तेवढा बस्स झाला.

सन १८५५ मध्ये मुबईचे गव्हर्नर साहेब बक्षिससमारंभास आले होते. तेव्हा अध्यक्ष या नात्यानें मि रीड, बॅरिस्टर, यानी शाळेची व सोसायटीची रिपोर्टद्वारा सगळी हकीकत वाचून शेवटी म्हटलें —

"All the results of leisure-hour labour, cheerfully devoted to their country by a voluntary association of educated young men; a result, I will venture to

assert unprecedented in the history of education in this or in any other country.

म्हणजे हे सगळें काम विद्यार्थ्यांनी आपल्या खुषीनें स्वार्थत्यागपूर्वक देशाकरिता केले असा प्रकार लोकशिक्षणाच्या इतिहासात—या देशात असो किंवा इतरत्र असो—अश्रुतपूर्व आहे!

सोसायटीच्या ताब्यांत मुलींच्या आठ शाळा होत्या त्यापैकी गुजराथी चार शाळा पारशी लोकानी एक नवीन संस्था काढून, आपल्या ताब्यात घेतल्या ही व्यवस्था सन १८५७ साली करण्यात आली नंतर काही वर्षांनी म्हणजे सन १८६६ मध्ये—सर मंगळदास नथुभाई यानी गुजराथी हिंदु मुलींची एक शाळा आपल्या ताब्यात घेऊन ती चालविण्याची निराळी व्यवस्था केली बाकी तीन मराठी मुलींच्या शाळा राहिल्या त्या सोसायटीनें चालविल्या त्यापैकी "भाऊदाजी गर्ल्स स्कूल" ही लोहारचाळीत असे, "जगन्नाथ शंकरशेट गर्ल्स स्कूल" ही पालवाच्या रस्त्यावर असे, व "भगवानदास पुरुषोत्तमदास गर्ल्स स्कूल" ही शाळा काळबादेवी रस्त्यावर असे पहिली शाळा ही प्रसिद्ध डॉ भाऊ दाजी हे काही वर्षे पदरच्या खर्चानें चालवीत असत. दुसऱ्या शाळेला त्या वेळचे मुंबईतील एक प्रख्यात पुढारी नामदार जगन्नाथ शंकरशेट यानी भाडें न घेता काही वर्षेपर्यंत जागा दिली, इतकेंच नव्हे तर त्यानी त्या शाळेचा काही खर्चेही दिला तिसरी शाळा भगवानदास हे बरेच दिवस चालवीत असत असो ह्या तिन्ही शाळांचे काम अत्यंत समाधानकारक रीतीने चाले त्यात एरव्हींचे विषय तर चांगले शिकविले जात असतच, परंतु पुढे मुलींना शिवण काम व गाणे शिकविण्याचीही तजवीज करण्यात आली.

सोसायटीचे काम उत्तम रीतीने चाललेले पाहून युरोपीयन—अधिकारी व बिन अधिकारी—लोक तिजविषयी सहानुभूति दाखवू लागले त्यामुळे त्यांच्यापैकी काही वजनदार मंडळीच्या खटपटीमुळे बाहेरगावी देखील मुलींच्या शाळा निघू लागल्या सन १८५१ साली प्रो ग्रीन याच्या प्रयत्नानी पुण्यास पहिली मुलींची शाळा निघाली व सन १८५२ मध्ये तेथे आणखी दोन मुलींच्या शाळा व एक अस्पृश्य जातीच्या मुलांकरिता, अशा तीन शाळा उघडण्यात आल्या त्याच साली ठाण्यास देखील तीन शाळा निघाल्या पण त्या काही दिवस चालून पुढें आश्रयाच्या अभावी बंद पडल्या तात्पर्य, सदहूप्रमाणें युरोपीयन व काही सधन पारशी लोक वगैरे यांची मदत मिळून सोसायटीच्या शाळा व तिने चाल-

विलेले ज्ञानप्रसाराचे काम उत्तम रीतीने चालू लागले मधून मधून मग शाळेचे बक्षिससमारभ व इतर समारभ होऊ लागले व त्यात गव्हर्नर, कौन्सिलर, हायकोर्टचे जज्ज असे मोठमोठे अधिकारी लोक भाग घेऊ लागले एकदा तर बक्षिससमारभाचे वेळी खुद्द व्हॉइसरायसाहेब—व्हायकौंट कॅनिंग—सहकुटुब हजर राहिले असून त्या वेळची बक्षिसे व्हाइकौंटेस कॅनिंग याच्या हातून मुलीना वाटण्यात आली ! दुसऱ्या एका समारभाच्या प्रसगी (सन १८६२ मध्ये) मुबईचे त्या वेळचे गव्हर्नरसाहेब सर बार्टल फ्रेअर यानी सोसायटीतल्या मडळीनीं चालविलेल्या कामाची योग्य स्तुति करून त्याचा अत्यत गौरव केला इतकेच नव्हे तर, ज्या मडळीनी, लोकाचा त्याच्या कामाला प्रथम विरोध असताना व त्याविषयी सरकारचीही उघड रीतीची मदत नसताना नेटाने व धैर्याने आपले देशहिताचे कार्य चालविले होते त्यानाच खरे शूर व लोकहितकर्ते म्हटले पाहिजे असे गव्हर्नरसाहेबानी उद्गार काढले ! त्यातून इकडे फक्त काही वाक्ये देतो —

"But the chief value of the successful exertions of the Society was to be found in the high and pure motives, which had actuated those who took the leading part in this important work. They had been moved by no desire to secure the approval of Government, for Government was necessarily passive in the matter: they had been actuated by no desire for popular applause, for they had too often met with apathy, misrepresentation and even active 'opposition' He believed they had been successful mainly owing to the purity of their motive, a single-hearted desire to extend to the daughters of their race, the same advantages of education which they themselves had enjoyed and so highly valued. Whether we look to the difficulties they have overcome or the progress they have achieved, His Excellency felt assured that Dr Bhau Daji and his associates had established their title to be enrolled among the real heroes and benefactors of their race."

त्या वेळी सोसायटीचे अध्यक्ष डॉ. भाऊ दाजी होते, व सेक्रेटरीच्या जागी रावसाहेब वि ना मडलीक हे होते

सोसायटीच्या सभासदाना उत्तेजन देण्याच्या हेतूने गव्हर्नरसाहेब म्हणाले की, स्त्रीशिक्षण पूर्वीच्या हिदु लोकात होतेच, इतकेच नव्हे तर हल्लीच्या काळात देखील, राणी अहल्याबाई होळकर व भोपाळच्या बेगम याच्यासारख्या कर्तृत्ववान् स्त्रियाही या देशात झाल्या आहेत त्याचे ते उद्गार असे —

"Sir Bartle appealed to Dr. Bhau Daji's antiquarian researches to confirm his assertion, that the non-education of females was a modern innovation, totally repugnant to the ancient tradition of the Hindus, and he instanced Ahalyabai Holkar and the present Begum of Bhopal as proving that the native ladies of modern days are in no respect inferior to those of ancient days in capacity filling with distinction the highest and most difficult positions in life"

स्त्रीशिक्षणाच्या बाबतीत मुबईतील सुशिक्षित मडळीनी चालविलेली स्तुत्य कामगिरी पाहून मोठमोठ्या युरोपीयन लोकास कौतुक वाटे व आश्चर्यही वाटे. कारण तसा प्रकार त्याना देशाच्या इतर भागात दिसत नसे एकदा वरील प्रकारच्या एका बक्षिससमारभाच्या वेळी कलकत्त्याचे लॉर्ड बिशप हजर होते. त्यानी तो मुबईतील सर्व प्रकार पाहून असे उद्गार काढले —

"His Lordship was of opinion that female education has reached a higher level in Bombay than any other part of India. There are more girls thoroughly well educated in Bombay, certainly more than in Calcutta and his Lordship trusted that the Society would go on and prosper."

नतर काही दिवसानी विलायतेंतील प्रसिद्ध मिस मेरी कार्पेंटर याना सोसायटीकडून मानपत्र देण्याचा समारभ झाला त्या वेळी त्या बाईनी असे उद्गार काढले —

"She was very glad to perceive that the educated natives of Bombay intended not to rest in this

matter; and in this respect, Bombay would be in advance of other places." असो.

याप्रमाणे एल्फिन्स्टन कॉलेजच्या विद्यार्थ्यांनी काही प्रोफेसर लोकाच्या सहानुभूतीने व प्रोत्साहनाने जी सस्था प्रथम स्थापन केली व जिच्या कामाची व्याप्ति मग पुष्कळच वाढली, त्या सस्थेत मुबईतील त्या वेळचे—व नतरचे देखील बहुतेक सर्व सुशिक्षित पुढारी सामील झाले होते. त्यामुळे सोसायटीची उत्तरोत्तर भरभराट होऊन त्याचे हल्ली ( मुलीचे ) हायस्कूल उत्तम रीतीने चालले आहे. सोसायटीच्या कामात लक्ष घालून काम करणाऱ्या मडळीत मुख्यत्वे करून ज्याचीं नावे सागितली पाहिजेत त्यापैकी थोड्याचा इकडे उल्लेख करतो —दादाभाई नवरोजी, नवरोजी फर्दुनजी, डॉ भाऊ दाजी, जव्हेरिलाल उमिया शकर, रा सा. मडलीक, नारायणभाई दाडेकर, भास्कर दामोदर, त्रिंबकराव मायदेव, मामा परमानद, बाळ मगेश वागळे, डॉ भाडारकर, महादेव, गोविद रानडे, वा आ. मोडक, ख चि बेदरकर, वगैरे वगैरे यापैकी बहुतेक सर्व निरनिराळ्या वेळीं विविध विषयावर व्याख्याने देत असत, निबध वाचीत असत व नतरच्या वाद-विवादात भाग घेत असत त्याबद्दलचा तपशील येथे देत नाही.

सदरील सोसायटीचे काशीनाथपत तेलग हे सन १८७२–७३ मध्ये सेक्रेटरी झाले त्या वेळीं डॉ भाऊ दाजी हे अध्यक्ष होते व रा सा मडलीक हे सेक्रेटरी असून त्याना दुसरे जोडीदार म्हणून का त्रिं. तेलग याची निवड झाली पुढे सन १८७४ साली डॉ. भाऊ हे स्वर्गस्थ झाल्यावर मडलीक हे अध्यक्ष झाले व तेलग हे सेक्रेटरीच होते दुसरे जोडीदार सेक्रेटरी कै यशवत वासुदेव आठल्ये हे होते असो सन १८८९ सालीं मडलीक वारले तेव्हा तेलग अध्यक्ष झाले. ते त्या जागेवर अखेरपर्यंत होते. म्हणजे सदहू सस्थेशी तेलगाचा जो प्रथम सबध सेक्रेटरी या नात्याने १८७२ मध्ये आला तो पुढे बावीस वर्षेपर्यंत—सन १८९३ पर्यंत—होता. पैकीं पहिलीं १८ वर्षे ते सेक्रेटरी होते व नतरची ४ वर्षे ते अध्यक्ष होते त्या बावीस वर्षात स्टुडटस सोसायटीतर्फे तेलगानी केलेली देश-सेवा चिरसस्मरणीय होती. ती इतकी की, सर दिनशा वाच्छा याच्या भाषेत सागावयाचें म्हणजे:—

"For that period Mr. Telang seems to have surpassed many of his colleagues in public life by the good literary and social work he achieved."

सर वाच्छा याचे असे स्पष्ट मत आहे की स्टुडटस सोसायटीतर्फे तेलगानी अनेक दृष्टींनी जी अत्यत मूल्यवान् कामगिरी केली आहे तशी आमच्या मुबई यूनिव्ह-र्सिटीमधून बाहेर पडलेल्या पहिल्या पदवीधरापैकी फारच थोड्यानीं केली असेल. त्यानी वाचलेल्या अनेक निबधापैकी काही उत्तमोत्तम निबध त्यानी सदहू सोसा-यटी पुढेच वाचले होते त्यानी वाचलेला रामायणावरचा निबध, भगवद्गीतेवरील निबध, शकराचार्यांचे चरित्र ही सर्व तेलगानी स्टुडटस सोसायटीपुढेच वाचलीं होती पहिली दोन तर डॉ वेबर व डॉ लॉरिन्सर या दोन जर्मन पडितानी लिहि-लेल्या लेखास उत्तरें असल्यामुळें त्यायोगे तेलगाची सस्कृतज्ञ पडित म्हणून कीर्ति युरोप–अमेरिकाखडापर्यंत पोचून त्याची विश्वपडितात गणना होऊ लागली या तिन्ही निबधासबधाची साराश रूपाने माहिती मागें एक दोन प्रकरणातून दिलेली असल्यामुळें, त्याची येथे पुनरुक्ति करीत नाही फक्त सर दिनशा वाच्छा—ह्याना तेलगासबधाने पूर्ण माहिती आहे—याच्या मताचा अनुवाद करतो, डॉ वेबरला दिलेल्या तेलगाच्या उत्तराविषयी वाच्छा म्हणतात —

"The paper which Mr. Telang read in 1873 in reply to some fantastic theories of Professor Weber, was a marked evidence of the analytical cast of mind and the historical spirit of the young scholar. The principal point which he so successfully contro-verted was the ridiculous assertion of the German Scholar that the *Ramayana* was copied from Homer. The paper should be read by modern students with the greatest interest, if not for the subject of the controversy itself so much as for the logic and the reasoning apart from the laborious research brought to bear upon it by the analytical and critical mind of Mr. Telang."

तेलगानीं रामायणावरील निबधांत जे गुण व्यक्त केले आहेत त्याचें वाच्छांनीं वर केलेलें वर्णन अगदीं बरोबर आहे. शकराचार्यांचें जें तेलंगानीं आपल्या वयाच्या विसावे वर्षी चरित्र लिहून वाचलें त्याविषयीं वाच्छा म्हणतातः—

"To write at the young age of twenty a life of Shri Shankaracharya is in itself no mean a literary effort It shows the ardour and the scholastic instinct of the genuine student of history at that early age"

तेलगानी लिहिलेले सर्वच लेख अत्यत महत्वाचे व उपयुक्त असून हल्लीच्या कॉलेजातील विद्यार्थ्यांनी तर ते जरूर वाचावे या दृष्टीने वाच्छा म्हणतात·—

"Other essays also bear a similar stamp of resuscitation which ought to be a model of the most instructive character to such of the rising generation of our University-men as would prefer to follow in the literary wake of the distinguished Elphinstonian."

याशिवाय तेलगानी स्टुडटस सोसायटीपुढे दुसरी पुष्कळ व्याख्याने दिली. पण त्यासबधाची माहिती उपलब्ध नाही याचे वाईट वाटतें व्याख्यानापैकी एक व्याख्यान काशीनाथपत यानी सन १८८६ मध्ये "Must social reform precede political reform in India?" या विषयावर दिलें होते त्या वेळीं शेट दादाभाई नवरोजी हे अध्यक्षस्थानीं विराजमान झाले होते व व्याख्यानाच्या विषयावर बरेच दिवस वादविवाद चालला होता, त्या व्याख्यानाचा साराश पुढील एका प्रकरणात—राजकीय सदराखाली—द्यावयाचा असल्यामुळे, त्यासबधाने इकडे काहीं लिहीत नाही. परतु तेलगानी सोसायटीपुढे ते व्याख्यान देण्याचे कारण व प्रसंग काय होता हें सागितलें पाहिजे तेलग सोसायटीचे सेक्रेटरी असल्यामुळें सन १८८५–८६ सालातल्या व्याख्यानमालेची व्यवस्था करण्याचें काम त्याचें होतें. परंतु पाच सहा महिनेपर्यंत वाट पाहून व खटपट करूनही त्याना कोणी एकादा व्याख्याता किंवा निबध वाचणारा मिळाला नाही ! अर्थात् सोसायटीचें तें वर्ष व्याख्यानावांचून व्यर्थ चालले ही गोष्ट सेक्रेटरी या नात्यानें तेलगांना श्रेयस्कर वाटली नाही सबब त्या वेळी वर्तमानपत्रातून सर्वांच्या नजरेपुढे असलेला विषय घेऊन त्यानीं घाईघाईनें व्याख्यानाची तयारी केली व सदहू व्याख्यान दिलें त्यांपैकीं इकडे फक्त त्यांचे प्रास्ताविक चार शब्द देतों त्यावरून त्यांची कर्तव्यनिष्ठा, सार्वजनिक कामाविषयीं सुशिक्षित लोकांमध्यें सामान्यत. दिसून येणारी

अनास्था व खुद्द तेलगाना आपल्यावरील जबाबदारीची वाटत असलेली जाणीव या गोष्टी स्पष्ट नजरेपुढे येऊन उभ्या राहतात. ते प्रास्ताविक शब्द हे —

"In opening the address which I have undertaken to deliver this evening, I am afraid I must begin with a word of apology for the imperfections which I am certain must be found in it. And as I am not in a position to plead the excuse of having been asked to deliver the address by any one other than myself, I must say a few words in explanation of my appearance before you this evening. Well, as one of the Secretaries of the S. L & S. Society, it is part of my duty to see that the Society's session does not remain quite barren of essays and lectures. But in consequence of circumstances, which need not now be dwelt on, although this session of the Society began as far back as October last, no essays have in fact been read or lectures delivered as yet before the Society. And when, I endeavoured to make arrangements to avert any reflection upon us in consequence of this circumstance and began to ask friends to prepare lectures and addresses, it occurred to me that the fairest course would be for me to begin by putting my own shoulders to the wheel. And accordingly it was only at the beginning of last week, that I determined to prepare myself for the address which I am now about to deliver."

सोसायटीच्या सेक्रेटरीला व्याख्यानाकरिता इतरांना देखील विनति करावी लागत असे त्याप्रमाणें मि. ली वॉर्नर यांचें "Public Criticism" या विषयावर, रेव्हरंड गोल्ड वायर लुई यांचें "Education" या विषयावर, व

मुबईचे लॉर्ड बिशप डॉ मिलने याचे "Temperance" या विषयावर, अशी सदहू सोसायटीतर्फे फ्रामजी कावसजी हॉलमध्ये त्याच सुमारास व्याख्यानें झाली होतीं

---

## प्रकरण विसावे.

# हिंदु यूनियन क्लब.



काशीनाथपत तेलग याचा दुसऱ्या एका ज्या सस्थेशीं दिर्घ कालपर्यंत सबध होता व जिच्या योगाने त्यानी मुबईत महत्वाची सामाजिक आणि वाङ्मयात्मक दृष्टीने कामगिरी केली ती सस्था म्हणजे हिदु यूनियन क्लब होय त्याची स्वत ची वागणूक, कै चदावरकराच्या भाषेंत सागावयाचें म्हणजे "a life of culture and rectitude" सन्मार्ग व उदात्त विचारसरणी याला अनुरूप अशी असेच परतु त्यात महत्वाची गोष्ट ही कीं, लोकानी देखील तसेच वागावे असा त्याचा उपदेश व प्रयत्न असे तेलग नेहमी म्हणत असत कीं, विद्या, पुस्तके किंवा शिक्षण याचा मनुष्याच्या मनावर सुसस्कार घडून त्याच्यात विचारशीलता जर जागृत झाली नाही, तर त्या विद्येचा किंवा पुस्तकाचा काहीं उपयोग नाही. त्यामुळें तेलग हे आपल्या परिचित मडळीमध्ये अगर क्लबमध्ये असले म्हणजे जमलेल्या मडळींपैकीं कोणीतरी असा एकादा चागला विषय काढीत असे व त्यासबधीं चर्चा चालली म्हणजे तेलगाच्या सहवासाची खरी किंमत काय हें प्रत्येक मनुष्यास सहज कळून येत असे व तसा आपणांस लाभ मिळत आहे याबद्दल त्यास अत्यत समाधान वाटत असे तेलगाची बुद्धि तर विशाल व उदार अशी असेच, पण त्याचा व्यासग दाडगा व विविध विषयक असल्यामुळें व त्याची माहिती भरपूर असल्यामुळें त्यांचे सभाषण हें नेहमीच उदात्त विचारानीं भरलेलें व बोधप्रद असे. चदावरकर म्हणतात की,

His talk with his friends was always of this edifying kind. There was not a topic of even the most trifling character, which he did not illuminate as it were, with the light of his varied reading and the

“ हिंदु युनिअन क्लब,” मुंबई ( १८८८ ).



खुर्चीवर बसलेले—डावीकडून—(६) मि विष्णुपत भाटवडेकर. (७) मि. कृष्णराव तेलग (८) नामदार का. त्रिं तेलंग. (९) डॉ जी बी प्रभाकर

[ पृ १९४

enunciation of some clear and defined moral principle."

कोणताही विषय असो, त्यासबधीं तेलगानी काही तरी नवीन माहिती सागितली नाही अगर त्याविषयी सुदर रीतीने तत्वबोध करून जमलेल्या मडळीत थोडीशी तरी विचारजागृति उत्पन्न केली नाही, असे सहसा घडत नसे असे सभाषणाचे प्रसग हिंदु यूनियन क्लबमध्ये वरचेवर येत असत, व अशा प्रसगी चाललेल्या वाद-विवादात जमलेल्या मडळीपैकी पुष्कळ लोक भाग घेत असत तेलगाच्या वेळच्या "हिंदु यूनियन क्लब"चे एका लेखकाने असे वर्णन केले आहे —

"या ठिकाणी सध्याकाळच्या वेळी, ऑफिस सुटल्यावर, पुष्कळ विद्वान् व विद्वा-नाच्या सहवासाचे शोकी लोक जमत. जमणाऱ्या मडळीत सर्व जातीच्या लोकाचा समावेश असे तेलग हे सर्वास केद्रस्थानी असत ते नेमाने सध्याकाळी क्लबात येत, आणि त्याच्या गोड व हितकर भाषणाचा लाभ घडावा म्हणूनच पुष्कळसे मेबर हजर असत तेथे राजकीय, धार्मिक, सामाजिक वगैरे विषयाची चर्चा चाले सध्या-काळी थकून भागून आलेली काही मडळी चणे कुरमुऱ्यांवर आणि स्वच्छ पाण्यावर आपली तहान भूक भागवीत तात्पर्य, 'plain living and high think-ing' या साधुवचनाचे तेलगाच्या वेळी हा क्लब उत्कृष्ट उदाहरण असे." साराश, या उताऱ्यात म्हटल्याप्रमाणे तेलग हयात होते त्या वेळी हिंदु यूनियन क्लब म्हणजे मुबईतील सुशिक्षित मडळी—विशेषेकरून महाराष्ट्रीय मडळी—एके ठिकाणी जम-ण्याचे, एकमेकाशी अनेक विषयावर विचारविनिमय करून व स्नेहाने वागून खरेंखुरे प्रेमसवर्धन करण्याचे व या मार्गाने सर्व जातीच्या सुजाण हिदुलोकामध्ये ऐक्यभाव उत्पन्न करण्याचे एक उत्तम साधन होऊन राहिले होते याविषयी शका नाही.

हिंदु यूनियन क्लबसंबधाने "टाइम्स आफ इडिया" च्या कॅलेडरमध्ये जी माहिती दिली आहे तिजवरून पाहिल्यास असे दिसते की, सदहू क्लबाची सन १८७५ च्या आक्टोबरमध्ये स्थापना झाली त्याचा मूळ हेतु असा होता—

"Promotion of social union by interchange of ideas and sympathies by meeting at gatherings for intellectual and social improvement."

म्हणजे सर्वांनी एके ठिकाणी जमून विचारविनिमय करणें व एकमेकाशी स्नेहभा-वाने वागून ऐक्य वाढविणे, हा क्लबाचा मूळ हेतु होता के रा ब शिवरामभाऊ

नाडकर्णी हे काही दिवस मुबईस डेपुटी एजुकेशनल इनस्पेक्टर होते. त्यानी हिं यू क्लबाविषयी आम्हास जी काही वर्षापूर्वी माहिती सागितली त्यावरून असे दिसते कीं, सुमारें पन्नास साठ वर्षापूर्वी मुबईतील गिरगावच्या बाजूचे काही विद्यार्थी लोक यानी दररोज शाळेंतील मधल्या सुटीत एके ठिकाणी जमून चणेकुरमुरे खावयाचे व एकमेकामध्ये प्रेमसवर्धन करावयाचे, या हेतूने क्लबाची प्रथम कल्पना काढली होती, व मग त्याला "हिंदु यूनियन क्लब"चे स्वरूप प्राप्त झाले. असे सागतात की, आरभाला काशीनाथपत क्लबात नव्हते त्यांत कै रामभाऊ गुजीकर वगैरे मडळी होती तेलग हे पुढे सभासद झाले असावे असो सन १८८४ सालच्या फेब्रुवारीमध्ये मुबईचे गव्हर्नर सर जेम्स फर्ग्युसन यानी काशीनाथपत तेलग याची जेव्हा प्रथमच लेजिस्लेटिव्ह कौन्सिलमध्यें नेमणूक केली तेव्हा त्याच्या सन्मानार्थ क्लबनें मोठा उत्सव केला व त्याबद्दलची केसरीच्या ता २५ मार्च सन १८८४ च्या अकात "मुबईच्या हिदु यूनियन क्लबनें अहोरात्र मित्रोत्सव केला" अशी हकीकत प्रसिद्ध झाली आहे पुढच्याच वर्षी मग तेलगाच्याच पुरस्कर्तृत्वामुळे क्लबच्या आश्रयाखाली मोठ्या प्रमाणावर काही तरी वाङ्मयसेवा करावी या उद्देशानें "हेमतोत्सव व्याख्यानमालेची" योजना ठरली व त्यासाठी कै. गणेश रामचद्र किर्लोसकर, रा वासुदेव गोपाळ भाडारकर वगैरे सात आठ सभासदाची एक कमिटी नेमण्यात आली याप्रमाणें सर्व व्यवस्था झाल्यावर सन १८८६ सालच्या नोव्हेबर महिन्यापासूनच व्याख्यानमालेस आरभ झाला व्याख्यानमालेत दरवर्षी निदान दहापधरा तरी व्याख्याने होत असत, व ती सर्व विद्वान् सुशिक्षित लोकाची असत त्यात जुन्या पद्धतीच्या विद्वान् शास्त्री लोकाचीही व्याख्याने मधून मधून होत असत उदाहरणार्थ, महामहोपाध्याय भीमाचार्य झळकीकर व महामहोपाध्याय राजारामशास्त्री बोडस याची देखील व्याख्याने झालीं आहेत आधुनिक विद्वान् मडळीची तर होतच असत कै गणपतराव किर्लोसकर, डॉ भालचद्र व त्याचे विद्वान् बधु विष्णुपत भाटवडेकर, रा वासुदेवराव भाडारकर, रा सा नारायण विष्णु बापट, प्रि वामन आबाजी मोडक इत्यादि अनेक विद्वान् माणसाची व्याख्याने झाली आहेत ही व्याख्यानमाला दरवर्षी आक्टोबरपासून मार्चपर्यत चालू असे हे ज्ञानसत्र तेलग हयात होते तोपर्यंत उत्तम चालले पुढे त्याला उतरती कळा लागली याचे कारण, एका मुबईच्या बातमीदाराने ता १४ मार्च १८९३ च्या केसरीत लिहिल्याप्रमाणें, "कोणाला असल्या गोष्टीची आस्थाच नाही व कोणाला यात मन घालावयास

नको" पुढे न्या रानडे मुबईस आल्यावर सदहू व्याख्यानमालेचें पुनरुज्जीवन झाले, पण ते नतर फार दिवस टिकलें नाहीं. असो

हेमतोत्सव व्याख्यानमालेंत स्वत काशीनाथपत तेलग हे व्याख्यानें देऊन व नंतर होणाऱ्या वादविवादात भाग घेऊन त्या ज्ञानसत्रांत महत्वाचे सहाय्य करीत असत. त्या ज्ञानसत्रातले तेलग हे कसे खरे सूत्रधार असत व ते तरुण व होतकरु मडळीच्या कृतीचे कौतुक करून कसे त्याना उत्तेजन देत असत याविषयीचा नाशिकचे रा ब पाध्ये यानी थोड्या दिवसापूर्वी आम्हास थोडासा आपला अनुभव सागितला तो आम्हास फार मनोरजक वाटला सन १८८६ मध्ये पाध्ये याची नुकतीच परिक्षा झालेली होती व विद्यार्थी म्हणूनच ते टोपी घालून हि यू. क्लबात व्याख्यानमाला चालू होती तेथे एके दिवशी गेले. रा रा ना वि बापट हे अध्यक्ष होते पण शेजारच्याच खुर्चीवर न्या तेलग बसले होते व व्याख्यानावर चाललेल्या वादविवादावर देखरेख त्याचीच असे वादात भाग घेण्याची पाध्ये याची फार इच्छा होती व एक दोन वेळा उठण्याचा त्यानी प्रयत्नही केला. पण इतर मोठ्या वक्त्याच्या गर्दीमुळे पाध्याना अवसर मिळेना पण या गोष्टीकडे तेलगाचे लक्ष होते एकदोन वक्त्याची भाषणें झाल्यावर तिसरे गृहस्थ येऊं लागले तो त्याना "जरा थाबा" असे सागून तेलगानीं पाध्ये यास येण्यास खूण केली पाध्ये पुढे जाऊन पाचच मिनिटे बोलले व त्यानी एकच प्रश्न केला. सर्वाची भाषणें झाल्यावर शेवटी तेलगानीच समारोप करून प्रश्नाची उत्तरें दिलीं. पाध्ये म्हणाले की आपण विद्यार्थी व जें आपण बोललों तें काही इतक्या महत्वाचें नव्हते तरी आपला प्रश्न घेऊन तेलगानी त्याचे उत्तर दिलेलें पाहून आपणास आश्चर्य वाटलें व आभारही वाटले असो

सन १८८६ साली तेलगाचे "शास्त्र व रूढि" या विषयावर एक व सन १८८९ मध्ये "सामाजिक बाबतीतील तडजोड" या विषयावर एक अशी दोन व्याख्याने झाली पण त्या व्याख्यानासबधाचें व त्यानी वेळोवेळ वादविवादात भाग घेतल्याचें विवेचन मागे एका प्रकरणात आलेले असल्यामुळें त्याची इकडे पुनरुक्ति करीत नाही एकदरींत तेलगांच्या नेतृत्वाखाली त्याच्या हयातीत हिंदु यूनियन क्लबचा सारखा उत्कर्ष होत चाललेला पाहून काहीं देशहितैकदृष्टि लोकाना समाधान वाटावे व त्यांच्या तोंडून तसे उद्गार निघावे यात आश्चर्य नाहीं. ता. ४ जून सन १८८९ च्या केसरीनें "हिंदु यूनियन क्लबची हकीकत" या लेखांत पुढीलप्रमाणें उद्गार काढले आहेत.—"आज आमच्या समाजास असल्य

सस्थाची फार जरूर आहे आमच्यात अजून ऐक्यभाव चागला जोरावला नाही. किंबहुना असलेला ऐक्यभाव जातो की काय अशी भीति उत्पन्न झाली आहे सुशिक्षित म्हणविणाऱ्या व सुधारणेवर अत्यत आसक्ति दाखविणाऱ्या आणि देशहिताची चिंता वाहणाऱ्या लोकात देखील एकमेकाविषयी उदारता व निरभिमानता दिसून येत नाहीत जिकडे तिकडे फाजील स्वमताभिमान व एकलकोंडेपणा हे वाढत चाललेले दिसतात ऐक्य राहिले एकीकडे, नुसती मैत्री व शत्रुत्वाचा अभाव इतके जरी असते तरी पतकरते पण तसेंदेखील आमच्याने होत नाही. ज्याला त्याला वाटते की आपल्याहून अन्यतर मत प्रतिपादणाऱ्या मनुष्यास चीत करावें ! अशा या अभिमानामुळें आज कित्येक चागल्या हितकारक सस्था शून्यवत् होऊन बसल्या आहेत अशा स्थितीत हिंदु यूनियन क्लबाची भरभराट चाललेली पाहून त्यातील प्रमुख लोकाच्या अगी काही चागले गुण असावेत असें स्पष्ट दिसतें ! आमच्या पुण्यात मात्र पोकळ बडबडीखेरीज कशाचेच बी रुजत नाही ! ”

तेलगाची क्लबमध्यें दररोज सध्याकाळी येऊन चारघटका मडळीशीं बोलत बसण्याची वहिवाट असे रविवारी एक तासभर ते लवकर येत असत अशा दिवशी सध्याकाळीं चार—पाचच्या सुमारास तेलगाना घरून क्लबकडे घाई घाईनें जाताना आम्ही पुष्कळ वेळा पाहिलें आहे क्लबमधलें काम सपल्यावर ते आठ साडे आठला घरी जात असत असो असल्या सामाजिक स्वरूपाच्या निरुपद्रवी कार्यात वास्तविक मतभेदाला फारसे कारण नसावें, परतु आमच्या हिंदुसमाजात काही तरी कल्पना निघून दोनच्या तीन जाति किंवा तीनच्या चार सस्था व्हावयाला वेळच लागत नाही, व त्याला कारणही पण अगदी अल्प पुरतें ! अशी आमची परपरा चालत आली आहे दृष्टि सकुचित ठेवावयाची, आपल्यापेक्षा भिन्न-मतप्रतिपादन खपावयाचें नाहीं व सार्वजनिक कामाकरिता आपले मत किंवा दुराग्रह सोडण्यास अगर जरा सैल करण्यास तर बिलकूल तयार व्हावयाचे नाही ! ह्याचा केसरीनेच एकदा ( ता. ११–३–८९ ) उल्लेख केला आहे त्यातला एक लहानसा उतारा देतो —“ जोपर्यंत आमच्या लोकात फुकाचा जात्यभिमान जागरूक आहे, तोपर्यंत आमच्या हातून कोणत्याहीं प्रकारचे महत्कृत्य व्हावयाचें नाही ” “ ब्राम्हणानी प्रभूचा, प्रभूनी ब्राह्मणाचा, कुणब्यानीं अगर मराठ्यानी त्याहून उच्च मानलेल्या वर्णाचा द्वेष करून एकाने दुसऱ्यास खाली पाडण्यास पाहावें हेच जोपर्यंत जात्यभिमानाचें स्वरूप आहे, तोपर्यंत आमची खरी मानसिक उन्नति झाली असें बिलकुल म्हणता येत नाही ” असो सागावयाचा मुद्दा हा की

"हिंदु यूनियन क्लबमधील" कांहीं मडळीनीं मग (१८८६ च्या सुमारास) "ब्राम्हण सभा" नावाची निराळी सस्था काढली तिच्यामध्येही पुढें कांहीं मतभेद उत्पन्न झाले परंतु तिचेही दोन तुकडे पडले नाहींत, हे नशीब! हल्लीं काही तरुण मडळीच्या खटपटीने ब्राम्हण सभा नीट चालली आहे असें ऐकतो. आनदाची गोष्ट आहे हिंदु यूनियन क्लबचे स्वरूप मात्र पार बदलून गेलें आहे!

काशीनाथपत तेलग याच्यासारख्या माणसाचा सहवासच—मग तो अल्प का असेना—नेहमी उन्नतिकारक असतो सर नारायण चदावरकरानीं यासबधाच्या ज्या आठवणी तेलगाच्या मृत्यूनतर चारच दिवसांनीं प्रसिद्ध केल्या, त्या अत्यत वाचनीय आहेत चदावरकराची उत्तम लेखनशैली तर प्रसिद्धच होती, पण त्यांत वाङ्मय किंवा आध्यात्म विषय असला म्हणजे त्याच्या अगदीं सोप्या इंग्लिश भाषेंत वर्णन करण्याच्या करामतीची इतकी बहार उडून जात असे की, कांहीं पुसू नका! तशा सदरात चदावरकराच्या तेलगाविषयीच्या आठवणी व न्या. रानड्याच्या मृत्यूनतर चारच दिवसानी त्यानी प्रार्थनासमाजात चालविलेल्या उपासनेच्या वेळीं केलेले भाषण, ही येतात. हीं दोन प्रकरणें व त्यातून व्यक्त झालेली चदावरकराची अत्यत उदात्त व निर्मळ विचारसरणी, हीं इतकीं हृदय-स्पर्शी आहेत की, ती आम्ही कितीही वेळा वाचलीं तरी आमच्या मनाची तृप्तिच होत नाहीं! चदावरकराच्या त्या आठवणींचा या चरित्रात ठिकठिकाणी उल्लेख यावयाचाच आहे असो. तेलग, रानडे वगैरे सज्जनाच्या सहवासाचा आपणास अनेकदा लाभ झाला असल्याची परवा दुसऱ्या एका गृहस्थानी जी हकीकत सांगितली ती आम्हास अत्यत मनोरंजक व श्रवणीय वाटली पुण्याचे प्रसिद्ध सर महादेव चौबळ यानी काहीं दिवसापूर्वी आपली व न्या रानडे यांची ओळख कशी झाली हें एका सार्वजनिक प्रसगीं सागितलें रानडे हे हायकोर्टात जज्ज असल्यामुळें त्यांचे पुढें वकील या नात्यानें त्याना नेहमी कामाला जावें लागत असेच, पण ते व तेलग, भाडारकर, मोडक वगैरे मडळी मे–अक्टोबरच्या सुटींत लोणावळ्यास जमत असत व त्या वेळीं सगळी मडळी सध्याकाळी एके ठिकाणीं जमून त्यात त्याचीं सभाषणें होत असत तशा सधीचा आपणास अनेकदा लाभ झाल्याचे चौबळ यांनीं सांगितलें वरीलपैकी सर्व मडळी विद्वान्, थोर आणि सारख्या विचाराची असल्यामुळें जिज्ञासु मनुष्याला त्यांचा सहवास हितकारक वाटल्यावांचून राहात नसे सभाषणात राजकीय, सामाजिक, वाङ्मयात्मक वगैरे अनेक विषय निघत असत व त्यांवर सदरील विद्वान् मडळीचे संभाषणप्रसगानें

सुविचार व्यक्त होऊन त्यापासून हजर राहणाऱ्या मनुष्याला सहज त्यांचा लाभ होत असे. सदरील मडळीला सुटीच्या दिवसात लोणावळ्यास एके ठिकाणीं जमविण्याचें एक साधन उत्पन्न करण्याचें श्रेय मुख्यत. काशीनाथपत तेलगाचे होतें, असें चौबळांनीं सागितलें तेलगानीं लोणवळ्यास काहीं एकर जमीन विकत घेऊन तेथें प्रथम आपला एक बगला बांधला मग रानडे, वागळे, भाडारकर, मोडक वगैरे मडळींनीं शेजारीं शेजारीं आपले बगले बांधले. याप्रमाणें सर्व मडळीनीं मेच्या सुटींत व आक्टोबरच्या सुटींत एके ठिकाणीं जमण्याचें आपापल्यापरी साधन केल्यामुळें सगळ्याचेंच वर्षांतून दोन तीन महिने लोणावळ्यास राहाणें होत असे व एकमेकामध्यें अनेक विषयांवर त्या अवधीत विचार-विनिमय व सभाषणें होत असल्यामुळें त्या ठिकाणचें सबध वातावरणच उन्नतिकारक व्हावे व तशा वातावरणाचा आपणास अनेकदा लाभ झाल्याबद्दल चौबळ याना आनद व समाधान वाटावें व तसे त्यानी उद्गार काढावे यात आश्चर्य नाही. असो. चदावरकर व चौबळ याच्याचप्रमाणें इतर कांहीं गृहस्थाना देखील तेलगाच्या सहवासाचा बऱ्याच वेळा लाभ झाला असला पाहिजे, पण त्यासबधाचा आता विस्तार नको. मुद्याची गोष्ट ही की, काशीनाथपत तेलग हे अंशत. त्याच्या स्वभावगुणामुळें व अशत. नव्याजुन्या पद्धतीच्या शिक्षणाचा त्याच्या मनावर सुसस्कार झाल्यामुळें सर्व लोकाना आपल्या सरळ वर्तनाने कसे आकर्षित असत व त्याच्यात विचारजागृति करून त्याना कसें चागले वळण लावीत असत हेंच इकडे लक्षात ठेवण्यासारखे आहे हें एक प्रकारचे सामाजिक दृष्टीनें कर्तव्य असतें व ते तेलग उत्तम रीतीने करीत असत. हिंदु यूनियन क्लबमध्यें संमेलनें, सभाषणाचे प्रसग वगैरे वरचेवर येत असत. त्या मार्गाने सर्व मडळीशीं स्नेहभावाने वागून सर्व जातीमध्यें प्रेमसवर्धन करण्याचे आपले व्रत तेलग अखेरपर्यत चालवीत असत.

---

## प्रकरण एकविसावें.

# मिस्टर मलबारी यांची चळवळ.



सन १८८४ सालपर्यंत समाजसुधारकांचें लक्ष मुख्यत्वेंकरून स्त्रीशिक्षणाच्या प्रसाराकडेच होतें; इतर सुधारणा त्याना हव्या होत्या, पण त्यासंबधानें जोराची

खटपट करण्यासारखी परिस्थिति उत्पन्न झाली नव्हती स्त्रीशिक्षणाला देखील लोकमत प्रथम प्रथम फारसें अनुकूल नव्हतें. परंतु मुबईमध्यें त्या सुधारणेच्या पुरस्कर्त्यांमध्यें रा. सा मडलीकासारखे पुराणमताचे अभिमानी लोक असल्यामुळें स्त्रीशिक्षणाला करण्यात येत असलेल्या विरोधाचा जोर फार दिवस टिकणें शक्य नव्हतें. अर्थात् १८८४ सालपर्यंत स्त्रीशिक्षणाची सुधारणा लोकाच्या बरीच पचनीं पडली होती असें म्हणण्यास हरकत नाहीं.

त्या सालीं मुबईचे प्रसिद्ध मिस्टर मलबारी यानी आपली "बालविवाह" व "असंमत वैधव्य" यासबधाची दोन पत्रकें ( notes ) प्रसिद्ध केलीं या विषयांसबधीं लोकात वादविवाद सुरू करण्याचें मलबारी शेटजीना सुचण्याचे एक कारण म्हणजे त्या वेळची परिस्थिति ! त्या वेळी लॉर्ड रिपन आमचे व्हाइसराय होते. ते अत्यत उदारमनस्क अधिकारी असून हिंदी लोकाचें कल्याण व्हावें, त्यांचें प्रगतीच्या मार्गांत सारखें पुढेंच पाऊल पडावें अशी त्याची सदिच्छा होती, व त्याच्या अनुरोधानें त्याची कारकीर्द मुख्यत चालली होती. त्यानीं काढलेल्या स्थानिक स्वराज्याच्या ठरावासंबधानें व नेमलेल्या एज्युकेशन कमिशन-संबधानें मागें उल्लेख आलाच आहे त्याच्या उदारमनस्कतेचें दर्शक असे तिसरें कृत्य म्हणजे त्याच्या कायदेकौन्सिलमध्ये सन १८८३ साली पुढें आलेले "इल्बर्ट बिल" होय त्यासबधानें आमच्या देशातील युरोपियन लोकानी बरीच जोराची चळवळ केली व त्या बिलाचें स्वरूप जरी अखेर बरेंच सौम्य करण्यात आले तरी त्यांतील मुख्य तत्व जें—नेटिव्ह मॅजिस्ट्रेट किंवा सेशन जज्ज याजपुढे युरोपियन मनुष्याच्या गुन्ह्याची चौकशी होण्यास हरकत नाहीं—तें अशत राखण्यात आलें आहे. हें तत्व म्हणजे युरोपियन व नेटिव्ह यांच्या समान ( राजकीय ) हक्का-संबधानें होतें हें उघडच आहे. या तत्वाकरितांच सदरील इल्बर्ट बिलाची मूळ उभारणी होती, व तें तत्व सरकारनें कायद्याच्या रूपानें कबूल करणें म्हणजेच आम्हाला युरोपियन मनुष्याच्या बरोबरीचे हक्क देणें होय त्या हक्काकरिताच आमची चळवळ होती व तो हक्क आम्हांला तत्वत मिळालाही. राजकीय दृष्टीनें समान हक्काविषयीं जर आम्ही इतके आकाशपाताळ एक करण्यास प्रवृत्त होतों तर सामाजिक दृष्टीनें आमच्या स्त्रीवर्गाला देखील कांहीं समान हक्क देण्यास आम्ही का तयार होऊ नये ! हा विचार मनांत आणून मलबारी शेटजीनीं आपलीं पत्रकें अथवा टिपणें प्रसिद्ध केलीं असावीं. "बालविवाह" व "असमत वैधव्य" या दुष्ट चाली हिंदुलोकात रूढ आहेत व त्या बद केल्या पाहिजेत—निदान त्यांतील अन्यायाचा भाग तरी

काढून टाकला पाहिजे, या गोष्टी सर्व समजस सुशिक्षित लोकास मान्य होत्या, परंतु त्या कामीं सरकारकडे एकदम कायद्याची मागणी करावी असें मात्र सर्वांनाच वाटणें सभवनीय नव्हतें त्यामुळें तशी मागणी करण्यात मलबारी शेटजीनीं जरा घाई केली असे म्हणणें प्राप्त आहे. लोकमताला आपल्या बाजूला वळविण्याची हातोटी जी मलबारी शेटजीच्या नतरच्या लिखाणातून दृष्टीस पडते ती सदरील दोन टिपणात दिसून आली नाहीं हेंच मत त्याच्या एका मित्रानी एके ठिकाणी व्यक्त केलें आहे. तें असे —

"Mr. Malabari denounced the customs with his usual vigour and earnestness but not with that winning tact which characterises his later writings."

त्यापेक्षा आपण पारशी आहो, हिंदु नाहीं आहों, ही गोष्ट लक्षात आणून मलबारी शेटजीनीं, टिपणें प्रसिद्ध करण्यापूर्वी, काहीं प्रमुख हिंदु पुढारी लोकांना भेटून प्रस्तुत विषयाची त्याच्याशी चर्चा करून मग काय तें ठरविलें असतें किंवा पत्रकें प्रसिद्ध केली असती तर तें अधिक रीतसर झालें असतें आमच्या मतें प वा सर फेरोजशहा मेथा यांनी एकदा अशाच विषयावर बोलताना जें एक तत्व प्रतिपादन केलें आहे ते अत्यत समजसपणाचें आहे. ते म्हणतात —

"I am not one of those who believe in the utility of meddling with so peculiar and complex a system of social life and religion as Hinduism, especially from outside, and I should go with those who hold that whatever reforms may be desirable and necessary should be left to be developed by the action of time and education."

मलबारी शेटजीनीं सदहु आपल्या दोन टिपणात वर सागितलेल्या दोन्ही चालीचे व त्यापासून होणाऱ्या परिणामाचें चागलें वर्णन करून ह्या चाली कोणत्या उपायानी बद करतां येतील हें दर्शविलें होतें जरूर तर सरकारानें कायदा करूनही त्या चालीतील अन्याय दूर करावा असे शेटजींनीं सुचविलें होतें. सदरील दोन्ही चालीमध्यें सामाजिक व धार्मिक तत्वांचा सबध येत असल्यामुळें

टिपणें प्रसिद्ध होताच सर्व हिंदुसमाजात जबरदस्त चळवळ सुरू झाली प्रस्तुत पिढीचे सामाजिक बाबतीतले विचार बरेच पुढे गेलेले असल्यामुळे पूर्वोक्त दोन चालींसबधाने केलेले विवेचन कित्येकास चर्वितचर्वणासारखे वाटेल परंतु सुमारें अर्धशतकापूर्वी वरील बाबतीत साधारण लोकमत काय होते, सुशिक्षित पुढाऱ्याचे विचार काय होते व तेलगानीं त्यात कोणती बाजू घेतली होती हे वाचकास समजले पाहिजे त्यामुळें तत्सबधाच्या विवेचनास ऐतिहासिक दृष्टीने महत्व आहे म्हणूनच त्याचा तेलगाच्या चरित्रात थोडक्यात उल्लेख करणे जरूर आहे

सदहू दोन टिपणें मलबारीनीं इतराबरोबर तेलगानाही पाठविली होती, व त्याला काशीनाथपतानीं सन १८८४ सप्टेबर १६ चे उत्तर पाठविले आहे मलबारींनीं आपल्या टिपणात सरकारनें ताबडतोब कायदा करावा असे जरी स्पष्ट म्हटले नव्हते, तरी त्याच्या लिहिण्याचा लोकानी तसाच अर्थ केला होता, व त्याच्या दृष्टीने तो बरोबर होता अखेर सरकारने–लॉर्ड डफरीन हे त्या वेळीं व्हाइसरॉय होते—सन १८८६ मध्ये आपला ठराव प्रसिद्ध करून सदरील प्रकरणीं कायदा करण्याचे नाकारले त्या ठरावात गोवण्यात आलेले तत्व फार महत्वाचें होते सबब त्यातील मुद्याचा भाग तेवढा इकडे देतो —

"When caste or custom lays down a rule which is by its nature enforceable in the Civil Courts, but is clearly opposed to morality or public policy the state will decline to enforce it. When caste or custom lays down a rule which deals with such matters as are usually left to the option of citizens, and which does not need the aid of civil or criminal courts for its enforcement, state interference is not considered either desirable or expedient." "In the competition of influence between legislation on the one hand, and caste or custom on the other, the condition of success on the part of the former is that the legislature should keep within its natural bound-

aries, and should not, by overstepping those boundaries, place itself in direct antagonism to social opinion."

कायदा करण्याचा अधिकार ही सरकारच्या हातात एक शक्ति आहे. सबब तो अधिकार रास्त मर्यादेच्या आत वापरला पाहिजे; आणि तो अधिकार, मर्यादेबाहेर जाऊन बजावण्याने जर लोकमत क्षुब्ध होत असेल तर तो अधिकार बजावू नये असो. याप्रमाणें सरकारनें कायदा करण्याचे जरी नाकारले, तरी मलबारी शेटजीच्या टिपणाच्या योगाने अशेष हिंदुस्थान देशातील पुराणमतवादी व समाजसुधारक याजमध्ये प्रकृत विषयासंबधाने बरीच खडाजगी माजून दोन्ही बाजूचे म्हणणे काय होतें ते स्पष्टपणें बाहेर पडलें हे तरी चागलेच झाले. असो.

मलबारीनी ज्याच्याकडे आपलीं टिपणें पाठविलीं, त्यापैकी काहींनी अनुकूल उत्तरें दिलीं दुसऱ्या कित्येकानी प्रतिकूल उत्तरें पाठविलीं अनुकूल उत्तरें देणाऱ्यामध्ये रा व रानडे हे एक होते पण त्यानी लिहिलेलें उत्तर मात्र त्या वेळीं प्रसिद्ध झालें नाही तेलगानी प्रस्तुत प्रकरणी सरकारनें कायदा करावा या म्हणण्यास कबुली दिली नाही मलबारींच्या म्हणण्याप्रमाणें "बाल विवाह" व "असमत वैधव्य" या दोन अनिष्ट प्रकारच्या चाली हिंदुलोकामध्ये प्रचलित आहेत व त्या वद केल्या पाहिजेत या गोष्टी तेलगास कबूल होत्या, परतु त्याकरितां सरकारकडे एकदम कायदा मागण्याची तूर्त घाई करू नका इतकेंच त्याचे म्हणणें होते, आणि त्याप्रमाणें त्यानी मलबारींना कळविलेंही

तेलगाच्या विचारसरणीसबधानें मुख्य सागण्याची गोष्ट अशी होती की, ते एक अगदी जुन्या मताच्या कुटुंबात वाढलेले होते त्याच्या कुटुबात नवीन पद्धतीने शिकलेले असे फक्त त्याच्या बधूशिवाय कोणी नव्हते खरेखुरे सुशिक्षित असे स्वत तेच होते शिवाय ते स्वभावाचे फार शात व मनानें कोमल होते. त्यामुळें वडील माणसाच्या ज्या भावना असतील त्यांच्याविरुद्ध उघड रीतीनें प्रतिपादन करणें अगर वर्तन ठेवणें हें त्यांना अगदीं अवघड वाटत असे नवीन विद्येचा त्याच्या मनावर सुसस्कार झालेला असल्यामुळें व ते फार विचारी असल्यामुळें आमच्या समाजव्यवस्थेंत काय दोष आहेत हें त्याना स्पष्ट समजत असे, व ते घालविल्याशिवाय समाजाला सुस्थिति प्राप्त होणार नाही असेंही त्याचें मत असे परतु उलटपक्षीं अशी स्थिति होती कीं, समाजव्यवस्थेंत जे अनेक दोष

अगर अनिष्ट चाली आहेत असें नवीन सुशिक्षित लोकाना वाटत असे, ते **दोष** आहेत—**अनिष्ट दोष** आहेत—असें जुन्या मडळीस मुळीच वाटत नसे हें त्याचे अज्ञान, किंवा अज्ञानमूलक समजूत असें हवें तर म्हणा, पण वस्तुस्थिति तशी होती, यात मात्र शका नाहीं. तेव्हा ज्या चाली किंवा ज्या कल्पना शेकडो वर्षाच्या सवयीनें लोकाच्या अगदी अगवळणीं पडल्या होत्या व ज्यात काही एक वाईट नाही अशी त्यांची भावना होती, त्या कल्पना किंवा त्या चाली, एकदम कायद्याच्या योगानें नष्ट करू पाहण्याच्या भरीस पडण्यापेक्षा, त्या अनिष्ट आहेत, वाईट आहेत, घातक आहेत अशी लोकाची प्रथम समजूत केली पाहिजे आणि त्याला अगदी रामबाण उपाय म्हणजे लोकात शिक्षणप्रसार करणे व त्यातही स्त्रीशिक्षणाचा प्रसार करणें हाच होय असे तेलगाचें म्हणणें होते आमच्या बहुतेक सामाजिक सुधारणाच्या बाबतीत स्त्रियाचाच सबध येत असल्यामुळे रूढ चालीच्या अनिष्टत्वाविषयी अगर सुधारणेच्या आवश्यकतेविषयी त्याचीच प्रथम खात्री होईल अशी योजना करणें हेंच अत्यत जरूर आहे त्यामुळें न्या तेलग हे प्रथमपासूनच स्त्रीशिक्षणावर जोर देत असत, व त्या कार्याला ते तन मन धनेकरून शक्य ती मदत करीत असत, असे म्हणण्यास मुळीच हरकत नाही जे कोणी अत्यत उत्साही सुधारक होते, त्याना काही काही सुधारणा ताबडतोब अमलात याव्या असे वाटणें साहजिक होते परंतु अज्ञ समाजाशी—व तोही प्रामाणिक अज्ञ-समाज त्याच्याशी—सबध असल्यामुळें सुधारणेचे काम आमच्याच इच्छेप्रमाणें—आणि तेही कायद्याच्या साहाय्याने करून घेणें इष्ट नव्हते सबब वर सागितलेल्या चालीच्या अनिष्टत्वाविषयी प्रथम जनतेची मनोभूमिका तयार करणें हाच उत्तम उपाय होय असो. याप्रमाणें तेलगाची विचारसरणी असल्यामुळें त्यानी मलबारीना तसे कळवून आपण तूर्त सरकारी मदतीच्या विरुद्ध आहो असे स्पष्ट सागितले

मलबारी शेटजीनी आपल्या पहिल्या टिपणात बालविवाहाच्या चालीपासून होणाऱ्या दुष्परिणामाचे वर्णन करून ती चाल बद करण्याबाबतचे काही उपाय सुचविले होते मलबारीनी लिहिलेल्या टिपणासबधाने व त्याला तेलगानी दिलेल्या उत्तरासबधाने प्रथम एका गोष्टीचा उल्लेख केला पाहिजे असे वाटते लहान मुला-मुलीचे म्हणजे आठ वर्षाच्या किंवा त्याहीपेक्षा कमी वयाच्या मुलाचेच विवाह सुमारें पन्नास वर्षापूर्वी झाले तरी ते महाराष्ट्रातील उच्च वर्णीय व विशेषेंकरून शहरात राहाणाऱ्या हिंदु लोकात मोठ्या प्रमाणावर प्रचलित होते असे वाटत नाही काहीं खालच्या, अशिक्षित जातीत किंवा खेड्यापाड्यात राहणाऱ्या लोकात ते

प्रचलित असतील; परतु गुजराथेत मात्र असल्या अल्पवयात मुलामुलींचे विवाह फार मोठ्या प्रमाणात होत असतात असे समजते, आणि मलबारी शेटजीना महाराष्ट्रातील हिदु लोकाच्या चालीरीतीच्या माहितीपेक्षां गुजराथेतील रीतिरिवाजाची साहजिकच अधिक माहिती असल्यामुळें त्यानी आपल्या टिपणातील वर्णन करताना गुजराथेतील वस्तुस्थितीच बहुधा आपल्या दृष्टीपुढे ठेविली असावी महाराष्ट्रातील वर्तमानपत्रकारांनी मलबारीवर त्या वेळीं जी कडक टीका केली, ती सदरील गोष्ट त्या लेखकाच्या लक्षात आली असती तर, तितकी कडक कदाचित् झाली नसती असो तेलगानी जें मलबारींना उत्तर लिहिले ते मात्र महाराष्ट्रातील —विशेषत उच्च वर्णीय किवा पाढरपेशा जातीतील—वस्तुस्थितीच्या दृष्टीने लिहिले असलें पाहिजे हे उघडच आहे

बालविवाहाची चाल ही कोणत्याही दृष्टीने पाहिले तरी अगदी अनिष्ट आहे हे कोणीही समजस माणूस कबूल करील ती आमच्या देशात का व केव्हा सुरू झाली याचा इकडे विचार करीत बसण्याचे कारण नाही परतु ती एकदर देशाच्या हिताच्या दृष्टीने—व विशेषेकरून भावी पिढयाच्या हितैक दृष्टीने—अगदी वाईट आहे याबद्दल शकाच नाही वैवाहिक स्थिति ही एक फार जबाबदारीची गोष्ट आहे, व ती जबाबदारी केवळ वधूवराची गाठ घालून देणाऱ्या वडिलानाच पार पाडावयाची नसते ती जबाबदारी खुद्द त्या वधूवरावरच येऊन पडणारी असते व ती त्यानाच चागल्या रीतीने पार पाडावयाची असते. अर्थात् ती जबाबदारी समजण्याइतकें तरी त्याचे—निदान पधरा ते पचवीस वर्षाचे—वय असले पाहिजे हें उघडच आहे यासबधाने तेलग म्हणतात,

"It is theoretically absurd no doubt that a boy and girl should be tied up in wedlock at a time of life, when they are probably unable to understand, certainly unable to appreciate to the full, the responsibilities of the status on which they are about to enter."

दुसरी गोष्ट, विवाहविधि हा एक आमच्या हिदुधर्माप्रमाणे धार्मिक विधि मानलेला आहे. कालिदासाने सुद्धा रघुवशीय राजे हे आपला वश पुढं चालविण्याक-

रितां पुत्रसतान व्हावें, म्हणूनच गृहस्थाश्रमी होत असत असे स्पष्ट म्हटलें आहेः–
“ प्रजायै गृहमेधिनाम् । ” त्या विधीचा हेतु, त्यानें जोडले जाणाऱ्या पति-पत्नीचा जीवनक्रम त्याना पुत्रसतान होऊन सुखाचा व्हावा व त्याचें इहामुत्र कल्याण व्हावे, असा असतो. ही धर्मदृष्टि सोडून दिली तरी, विवाहाने बद्ध झालेल्या जोडप्याचा संसार सुखाचा होऊन त्यांच्यापासून सुदृढ व कर्तृत्वशील प्रजा उत्पन्न व्हावी व तिच्या हातून परिस्थितीप्रमाणें आपल्या देशाची काही तरी सेवा व्हावी, हा हेतु विवाहाचा तर असतोच असतो मग अशा प्रकारची प्रजा उत्पन्न व्हावयाला स्वत आईबाप चागले सशक्त, ज्याच्या शरीराची चागली वाढ झाली आहे, असे असले पाहिजेत हे ओघानेंच प्राप्त झाले हा उद्दिष्ट हेतु, बालविवाहाची—म्हणजे लहान लहान मुलामुलीची लग्ने लावण्याची चाल चालू राहिल्यास साध्य कसा होणार ?

मलबारी शेटजीचे म्हणणें असे होते की, बारा वर्षाच्या पूर्वी मुलीचे लग्न झालेच पाहिजे अशी शास्त्र सक्ति करीत नाही तेलग म्हणतात की, तशी सक्ति शास्त्रही करीत नाही व जातही करीत नाही मग चूक होते कोठे ? तेलगाच्या मतें ती चूक मुलीला ऋतु प्राप्त झाल्याबरोबर गर्भाधान करून तिची व तिच्या नवऱ्याची लवकर गाठ घालून देण्याबाबतच्या घाईत होत असते तेलगानीं लग्नाच्या बाबतीतले दोन भेद दाखविले आहेत. ते भेद प्रस्तुत पिढीतील लोकास कितीसे पसत पडतील किंवा तसे भेद आचरणात पाळण्याचे प्रसग किती जणांवर हल्लीच्या काळात येत असतील ते सागता येत नाही परतु मलबारी-तेलग यांजमधील वादाचा आम्ही प्रस्तुत चालू वस्तुस्थितीच्या दृष्टीनें विचार करीत नसून तो पन्नास वर्षापूर्वीच्या सामाजिक परिस्थितीच्या दृष्टीने करीत आहों, हें आम्ही एकवार सागितलेच आहे तेव्हा तेलगानी दाखविलेल्या दोन भेदाना हल्ली फारसे महत्व नसलें तरी तें पूर्वी होतें म्हणूनच तेलगानी त्याचा आपल्या उत्तरात उल्लेख केला तेलग म्हणतात की, खरें लग्न म्हणजे लोकसमजुतीप्रमाणें “ शुभ मगल सावधान ” करणें हें नसून पुढें “ गर्भाधान ” विधि करून पति-पत्नीचा समागम घडवून आणणें, हे होय ! पहिल्या विधीला फार तर “ first marriage ” म्हणता येईल व दुसऱ्याला “ second marriage” किंवा “ consummation of marriage ” म्हणता येईल हे बारीकसारीक भेद कदाचित् मलबारींच्या लक्षात येणे शक्य नसेल तेल-गानीं म्हटलें की, गर्भाधानविधि पुढें लोटण्याची सुधारणा प्रथम करा. मुलीला

ऋतु प्राप्त झाल्याबरोबर ताबडतोब पधरा दिवसात हा विधि झालाच पाहिजे हें ठरूनच गेलें आहे तसे न करितां, जरी ऋतु प्राप्त झाला तरी, मुलाचें किंवा मुलीचें शिक्षण पुरें होण्याकरितां अगर दुसऱ्या काहीं कारणांकरिता, गर्भाधानविधि पुढें ढकलला तर मलबारींच्या इच्छेप्रमाणें सुधारणा सहज होणार आहे. याला शास्त्र आड येत नाहीं व जातही आड येत नाही. अर्थात् ही सुधारणा फार आयासाशिवाय घडून येणार आहे. ही गोष्ट मलबारीच्या लक्षात आली नसावी. तेलग स्पष्ट म्हणतात की,

"Now I cannot help thinking that this true centre (of mischief) is missed, if we keep hammering away as is some times done, at the custom of celebrating what is called the 'first marriage,' when the bride and bridegroom are of very tender years."

बालविवाहाची चाल वाईट आहे हे तेलगाना कबूल होते हे मागे सागितलेच आहे त्यात सुधारणा झाली पाहिजे हेही त्याना कबूल होते सुधारणा सुरू करावयाची कुठे व कशी इतकाच काय तो प्रश्न होता त्याचा नीट विचार न करता, नुसते "बालविवाह वाईट आहे तर तो कायद्याने बद करा" असे जोरानें प्रतिपादन करून जनतेंत प्रक्षुब्धता उत्पन्न केल्यापासून फायदा काय ? लोकात खळबळ उत्पन्न न करता जर तुमचा कार्यभाग अन्य मार्गानें होण्यासारखा आहे तर त्या मार्गाचे अवलबन का करू नये ? असे तेलगांनीं मलबारीनाच पर्यायानें विचारले ? अर्थात् तेलगांनी कायद्याबद्दल घाई करू नका असे मलबारीस उत्तर दिले, आणि इष्ट सुधारणा कोठून व कशी करता येईल याबद्दलची त्यानी दिशा दाखविली

लोकाच्या समजुतीप्रमाणें शास्त्र इतकेंच सांगतें की मुलगी ऋतुप्राप्तीनतर अविवाहित राहू नये. गर्भाधान विधीसंबधानें तें काहींच म्हणत नाही. तेव्हा खरी सुधारणा लग्नाच्या—लाजाहोम, सप्तपदी वगैरेंच्या—बाबतीत करू पाहण्यापेक्षा ती गर्भाधानाच्या बाबतीत करण्यास मुळीच हरकत नाहीं, आणि अशी गर्भाधान पुढें लोटल्याची बरीच उदाहरणें त्या वेळी घडलीं होतीं त्याला शास्त्र आड आलें नाही की जात आड आली नाही अशा कामाला फक्त कुटुबांतील माणसे व जवळची नातलग मडळी हींच आड येत असतात याचीं कारणेंही शोधण्याकरिता फार लाब जावयाला नको.

या जवळच्या मडळीना ही सुधारणा म्हणजे एक नवीन टूम वाटते, म्हणूनच ती नको असे ते म्हणतात दुसरें, ती सुधारणा केल्यानें पुत्रप्राप्तीपासून होणारा जो आनद तो पुढे ढकलल्याप्रमाणें होतो याकरिता ती सुधारणा त्याना नको असते थोडक्यांत सांगावयाचे म्हणजे, या अगदी अनुपद्रवी सुधारणेला देखील जवळची मडळी आड येते त्या मडळीवर, मलबारीच्या म्हणण्याप्रमाणे कायदा झाला तरी, त्याचा परिणाम काय होणार ?

आता बालविवाहापासून अनिष्ट परिणाम होतात ते बद करण्याकरिता अगर टाळण्याकरिता मलबारी शेटजीनी काय उपाय सुचविले होते त्याचा विचार करू. त्यानी पहिला उपाय असा सुचविला की, अमकी तारीख ठरविल्यावर नतर जे विवाहित विद्यार्थी युनिव्हर्सिटीच्या कोणत्याही परीक्षेस येतील त्या परीक्षेस त्याना बसू देता कामा नये ! तेलगानी म्हटले की, उपाय ठीक आहे पण तो योजल्यापासून परिणाम काय होईल, किवा तो परिणाम किती दूरवर पोंचेल याचा मात्र आताच अदाज करता येत नाही ! सदहू उपाय योजिल्यापासून आमच्या कॉलेजात किंवा युनिव्हर्सिटीच्या निरनिराळ्या परीक्षाकरिता येणाऱ्या विद्यार्थ्यांची सख्या कमी होईल, ही पहिली गोष्ट म्हणजे त्या उपायाची अमलबजावणी केल्याने "मूले कुठार" असाच प्रकार होत नाही काय ? आमच्या समाजातील दुष्ट चाली बद करण्याच्या कामी अत्यत उपयुक्त साधन म्हणजे देशात शिक्षणाचा शक्य तितका जास्त प्रसार करणें हें होय याबद्दल कोणाचाच मतभेद नाही अशा स्थितीत सदरील उपाययोजनेच्या योगानें लोकात शिक्षणाची प्रगति व्हावयाच्या ऐवजी पिछेहाट होणार नाही काय ? अर्थात् असें करणें म्हणजे इसापनीतीतल्या एका गोष्टीत सागितल्याप्रमाणें सोनेरी अडी प्रसवणाऱ्या हसीसच ठार करण्यासारखें आहे, यात शकाच नाही दुसरी गोष्ट अशी की, हिंदु लोकात मुलाची लग्ने बहुधा त्याचे आईबापच ठरवीत असतात त्यात खुद्द त्या मुलाचा सबध अगदींच थोडा असतो. किंबहुना मुळीच नसतो, असें म्हणण्यासही हरकत नाही निदान चाळीस-पन्नास वर्षापूर्वी तरी अशी स्थिति खास होती. तेलग विचारतात की, अशा स्थितीत वरील उपाययोजनेनें आईबापाच्या पापाबद्दल मुलाना शिक्षा केल्याप्रमाणे होणार नाही काय ? बरें, असें समजा की, आईबापानीं रीतीप्रमाणें मुलाचे बालपणांत लग्न केले आणि त्याना त्या मुलाच्या शिक्षणाचें—तें पुढें चालू ठेवण्याइतकें—महत्त्व वाटत नाही, तर मग सदहू उपाययोजनेपासून त्या मुलाचें, शिक्षणाचे द्वार बद केलें गेल्यामुळें, केवढें नुकसान होईल ? व अशी बरींचशीं उदाहरणें होऊ लागल्यास देशाचें पाऊल,

शिक्षणाच्या बाबतीत पुढें पडेल कीं मागे? वरील सूचनेचा उगम वास्तविक बगालकडचे प्रसिद्ध पुढारी मिस्टर मनमोहन घोस याजपासून झाला होता व तिला आपले रा. ब रानडे याचे मत अनुकूल होते, ही गोष्ट खरी तरी आपलें मन त्या बाजूला वळत नाही असे तेलगानी स्पष्ट कळविलें ते मलबारींना लिहिलेल्या उत्तरात म्हणतात —

With the most unfeigned respect for my excellent friend, Mr M. Ghose, who, I believe, originally made the suggestion, and for my revered friend and teacher, Mr. Madhavrao Ranade, who seems to be inclined to adopt it at once, I own that I cannot persuade myself to give my voice in favour of it."

वरील सूचनेपेक्षा तेलग म्हणणात, आपली एक सूचना आहे ती कदाचित् अधिक सयुक्तिक ठरेल युनिव्हर्सिटी किंवा सरकारचे शिक्षणखाते या सस्था विद्यार्थ्याना एकादी पदवी मिळेपर्यंत काही स्कालरशिपा व बक्षिसे देत असतात त्या शिष्यवृत्या व बक्षिसे ही फक्त अविवाहित विद्यार्थ्यांनाच मिळतील असा नियम करण्यास हरकत नाही या ठिकाणीं लग्नाचा पहिला विधि की पुढचा यासबधीं उल्लेख करण्याचें अर्थात् कारण नाही येथपर्यंत येण्याची आपली तयारी आहे असें तेलगानी मलबारीना कळविलें.

मलबारीशेटजीची दुसरी सूचना अशी होती कीं, सरकारनें आपल्या निरनिराळ्या खात्यात विवाहित मनुष्याला जागा मिळणार नाही असा नियम करावा. तेलगाच्या मते ही सूचनाही न्याय्य नव्हती व तिच्यापासून एकदरीत देशाचा फायदा होईल असेंही त्याना वाटत नव्हतें. सरकारी खात्याच्या दृष्टीनें पाहिल्यास तेलगाच्या मतें अविवाहित राहून दुर्वृत्त असणाऱ्या नोकरांपेक्षा बायकामुलात राहणारा इसम अधिक स्थिर, अधिक उद्योगी व अधिक प्रामाणिक नोकर ठरेल. शिवाय सामाजिक सुधारणेचा आणि सरकारी नोकरीचा सबध कितीसा? एकाद्या सरकारी खात्याच्या वरिष्ठ अमलदाराला कचेरींत कारकून ठेवावयाचा तो जरूर तेवढे शिक्षण घेतलेला व चागल्या चालचालणुकीचा असा मनुष्य तो ठेवील तो अविवाहित की विवाहित हें पाहण्याचें त्याला तादृश कारण काय? शिष्यवृत्त्या व बक्षिसे याच्या बाबतींतली गोष्ट निराळी. कौटुबिक जबाबदारी ही विद्यार्थ्यांना चागल्या संवयी लागून त्याच्यांत

कार्यक्षमता उत्पन्न करण्याच्या कामी आड येत असते तशा सवयी लागणें किंवा तशी कार्यक्षमता अगी येणें या शिक्षणाच्याच अगभूत गोष्टी आहेत त्यामुळें बक्षिसे किंवा शिष्यवृत्त्या याच्या बाबतीत वरील प्रकारचा—विद्यार्थी अविवाहित असावा असा—नियम सुसबद्ध तरी होईल परतु कलेक्टरच्या किंवा अकौउटट-जनरलच्या कचेरीत काम करू पाहणाऱ्या उमेदवाराला हा नियम लावू पाहणें समजसपणाचे कसे होईल ?

मलबारी शेटचे मत की मुख्य अमलदाराने विवाहित मनुष्यापेक्षा अविवाहिताची निवड करावी कारण तो काम अधिक चागले करील तेलगाचे मत त्याच्या अगदीं उलट होते. विवाहित मनुष्यच त्याच्या मते अधिक चागले काम करू शकेल. शिवाय, आणखी एक याच्या समर्थनार्थ कारण आहे अविवाहित मनुष्याला काम दिल्यापासून त्याचा एकाचाच फायदा होईल. विवाहिताला नेमल्यापासून एका-पेक्षा अधिक माणसाचे सरक्षण केल्यासारखे होईल पण याहीपेक्षा एक महत्वाची गोष्ट लक्षात ठेविली पाहिजे कोणत्याही गोष्टीची किवा सस्थेची नैसर्गिक व सरळ रीतीने वाढ होऊ देणेंच हितकर असते त्या वाढीला कृत्रिम बाध घालून योपवू पाहणे अगर तिचा ओघ बदलण्याचा प्रयत्न करणे हे केव्हाही हितकर नव्हे केव्हा केव्हा तर ते कृत्रिम नियम घालणाऱ्याचे सद्धेतु देखील निष्फळ होतात इतकेच नव्हे तर पुढे काही अनपेक्षित अडचणी उपस्थित होऊन अखेर नैतिक अध पतन मात्र त्याच्या पदरात पडते शिवाय या सगळ्या कृत्रिम नियमाचा अखेर शिक्षण-प्रसारावर काय परिणाम होईल याचा अदाज करता येणेंही शक्य नाही. सामाजिक सुधारणेच्या कामी शिक्षणाचाच पुष्कळ उपयोग होणार आहे अर्थात् त्या शिक्ष-णाच्या प्रसाराला विघातक होतील अशा कोणत्याही सूचना करणे देशहिताच्या दृष्टीने इष्ट नव्हे, असेच तेलगाचे एकदरीत मत होते.

मलबारीशेटजीची तिसरी सूचना अशी होती की, एक नवीन सस्था "Association" स्थापन करावी व तिच्या सभासदानी "अमके वय झाल्या-शिवाय मी लग्न करणार नाही" असे प्रथमच लेखी वचन "Pledge" द्यावें किंवा शपथ घ्यावी तेलगाच्या मते ही सूचना अगदी अव्यवहार्य होती आधीं ज्याच्या असल्या लेखी वचनाला किंमत देता येईल असे सस्थेत फार सभासद येण्याचा सभवच कमी. कारण जे सभासद होतील त्यापैकी बरेचसे पूर्वीच विवाहित झालेले असतील ! शिवाय अशी प्रथमच लेखी शपथ घेतली पाहिजे ही अट ठेवि-

त्यास सभासद होऊ इच्छिणाऱ्या लोकाची मने सस्थेकडे आकर्षित होण्यापेक्षा तिजपासून परावृत्तच होण्याचा अधिक सभव ! असली अव्यवहार्य अट ठेवण्यापेक्षा लोकाची चालू रूढीपासून काय दुष्परिणाम होतात याबद्दल हर प्रयत्नाने समजूत करणे व जे त्या रूढी विरुद्ध वागण्यास तयार होतील त्याना उत्तेजन व सहाय्य करणे असे त्या सस्थेचे उद्देश जाहीर केल्यास त्यापासून अधिक फायदा होईल असे तेलगाचे म्हणणे होते शिवाय असल्या शपथावर व लेखी वचनावर आपला फारसा विश्वास नाही असे तेलगानी स्पष्ट सागितले

चवथी सूचना अशी होती की, कोणीही सुशिक्षित मनुष्याने आपल्यापेक्षा वयाने फारच लहान मुलीशी—A girl too much under his age—लग्न करू नये तेलगानी म्हटले की, सूचना ठीक आहे पण ती त्यावेळच्या परिस्थितीत अमलात आणणे कितीसें शक्य कोटीतले होते ? आधी उच्चवर्णीय लोकात अद्यापि विधवा विवाह मान्य झाला नव्हता मुलीचे लग्न—तिचे तेरा वर्षाचे वय होण्यापूर्वी—उरकून टाकण्याची चाल अगदी सार्वत्रिक होती अशा स्थितीत वरील शिफारशीप्रमाणे सुशिक्षित मनुष्याचे लग्न जमणार कसे व ते जमविणार कोण ? ही गोष्ट जर शक्य नाही, तर त्या मनुष्याने सक्तीचे ब्रह्मचर्यच पतकरले पाहिजे असे होत नाही काय ? या असल्या सक्तीचे दुष्परिणाम काय होतील हे कोण सागू शकेल ? तेलग म्हणतात की, ही शिफारस आणि मागील शिफारस—मी अमके वय होईपर्यंत लग्न करणार नाही असे वचन देणे—या माजराच्या गळ्यात घाट बाधावी ह्या शिफारशीच्याच तोडीच्या दिसतात !

प्रस्तुत सामाजिक विषयावर लिहिलेले धडे ज्यात आहेत अशी पुस्तके शाळातून सुरू करावीत ही मलबारीची सूचना तेलगाना मान्य होती सामाजिक विषयासबधी असा ऊहापोह करण्याच्या हेतूने ठिकठिकाणी सस्था स्थापन करणे, तसल्या विषयावर वरचेवर व्याख्याने देण्याची व लहान लहान पुस्तके प्रसिद्ध करून लोकात वाटण्याची तजवीज करणे या मलबारीच्या सूचना तेलगाना अगदीं मान्य होत्या मोठमोठ्या सरकारी अधिकारी लोकानी या विषयात मुद्दाम लक्ष घालून या समाजकार्याला जरूर मदत करावी ही मलबारीनी केलेली सूचना देखील तेलगाना पसत होती. त्याला पुन्हा त्यानी अशी एक पुस्ती जोडली की अशा अधिकारी लोकानी लहान लहान बालकाच्या लग्नसमारभाच्या निमित्ताने होणाऱ्या तमाशामध्ये हजर राहाण्याचे साफ नाकारावे ! बालविवाहाच्या चालीला विरोध

दाखविण्याचा हा एक साधा, पण खात्रीचा मार्ग आहे त्या मार्गाचे अधिकारी लोकानी अवलबन केल्यास त्याचा चागला परिणाम झाल्याशिवाय राहणार नाही

प्रस्तुत बालविवाहाच्या एकदर प्रकरणावर तेलगानी मलबारी शेटजीना स्पष्ट कळविले की, तुम्ही या कामात घाई करू नका आणखी काही दिवसपर्यंत आहे हीच स्थिति राहू द्यावी असे आपणास वाटते मी " Let-alonist " म्हणजे काही एक करू नये अशा मताचा आहे असे तुम्हास वाटेल पण तशी गोष्ट नाही शिक्षणप्रसार व त्यायोगे लोकमत जागृत करणे या उपायावर माझा पूर्ण विश्वास आहे या उपायापासून होणारे परिणाम तुम्ही सुचविलेल्या उपायापासून होणाऱ्या परिणामापेक्षा अधिक हितकर व अधिक टिकाऊ होतील तुम्ही म्हणता जनतेत अद्यापि प्राथमिक शिक्षणाचा व्हावा तितका प्रसार झाला नाही ही गोष्ट खरी आहे. परतु त्यालादेखील तुम्ही देता तितके महत्व मी देत नाही शिक्षणाचे काम चालू आहे व ते चालूच राहणार त्याचा इष्ट परिणाम झाल्याशिवाय राहणार नाही उच्चवर्गीय लोकामध्ये शिक्षणाचा बराच प्रसार झाला आहे, व त्याचा त्याच्या आचारविचारावर सुपरिणाम झाला आहे—होत आहे त्याच्याच सामाजिक बाबतीतल्या कल्पना खालच्या वर्गात उतरत आहेत पण मी स्त्रीशिक्षणाला सर्वापेक्षा जास्त महत्व देतों युनिव्हर्सिटीच्या शिष्यवृत्त्या किवा बक्षिसे जे काम करू शकणार नाहीत, किवा जें काम सरकारी नोकरीच्या लालुचीनेही होणार नाही ते स्त्रीशिक्षणाने खात्रीने होईल असे मला वाटते प्रस्तुत प्रचलित असलेली बालविवाहाची चाल शेकडो वर्षाच्या सवयीने हिंदुसमाजात अगदी दृढमूल होऊन गेली आहे व त्या चालीत काही वाईट आहे ही कल्पनादेखील लोकाच्या गावी नाही. ही लोकाची मनोवृत्ति बदलणें हेच आपले मुख्य काम आहे, आणि ते काम करावयास शिक्षणप्रसार हाच खरा मार्ग आहे या उपायाने सुधारणा मद गतीने होईल हे खरे, पण दुसऱ्या सुचविलेल्या उपायानी तरी ती अगदी जलद होणार आहे अशी हमी कोणाला थोडीच घेता येणार आहे ! तरी तो शिक्षणप्रसार जारीने करणे व त्याच्या जोरावर समाजातील दुष्ट चालीसबधाने लोकाच्या मनोभावना बदलणे हे काम सारखे करीत राहिले पाहिजे त्यात कसूर होता कामा नये तेलग म्हणतात —

" We must work as ardently as if our efforts were to be crowned with success at once. But on the

other hand we must be content to take the fruits as they come in the fulness of time, and not be impatient or despondent if the customs which have stood for several centuries do not at once fall of a heap at the blast of our trumpets."

हे काशीनाथपत तेलगानी सुमारें पन्नास वर्षापूर्वी केलेले भविष्य आज अक्षरश खरे ठरले आहे असें म्हणण्यास हरकत नाही गेल्या अर्ध शतकाच्या अवधीत जनतेत शिक्षणाचा प्रसार बराच झाला आहे स्त्रीशिक्षणाचेही पाऊल एकसारखे पुढेच पडत चालले आहे आणि त्यायोगाने महाराष्ट्रात सामाजिक दृष्टीने मोठी क्राति झाली आहे असे म्हटल्यास अतिशयोक्ति होईल असे वाटत नाही. बालविवाहाची चाल स्त्रीशिक्षणाच्या प्रसाराबरोबर आपोआपच बद पडत चालली आहे शिकलेल्या मुलीची लग्ने निदान उच्चवर्णीय लोकात हल्ली पधरा वर्षांच्या वयापूर्वी बहुधा होतच नाहीत काही मुली त्याहीपेक्षा मोठ्या वाढलेल्या व काही तर शिकत असलेल्या सहज दृष्टीस पडतात तरुण विधवा मुलीची पूर्वीच्या सारखी कष्टमय स्थिति—मुबई पुण्यासारख्या शहरातून तरी—आता फारशी राहिली नाही कित्येक विधवा मुली मास्तरणी, डॉक्टरणी व नर्सेस होऊन आपला अब्रूने व मानाने चरितार्थ चालवीत आहेत विधवाविवाहाची सख्याही हळू हळू वाढतच आहे तात्पर्य, समाजसुधारकानी ज्या ज्या सुधारणाना प्रथम हात घातला होता त्यापैकी बहुतेक सगळ्या आज अमलात आल्या आहेत बाकी राहिलेल्या थोड्या सुधारणा अमलात यावयाच्या मार्गात आहेत. या सगळ्या क्रातीला कारण बदललेली परिस्थिति, जनतेत शिक्षणाचा प्रसार—विशेषेकरून स्त्रीशिक्षणाचा प्रसार याशिवाय दुसरें काय असू शकणार ?

येथपर्यंत तेलगानी बालविवाहावरील मलबारीच्या टिपणासबधाने विचार करून त्यात सुचविलेल्या उपाययोजनेविषयी आपला मतभेद व्यक्त केला पुढे त्यानी "असमत वैधव्य यासबधाने मलबारीनी लिहिलेल्या टिपणाविषयी आपले विचार थोडक्यात प्रदर्शित केले आहेत त्याचा तात्पर्यार्थ थोडक्यात इतकाच की, मलबारीनी केलेल्या कोणत्याच सूचना तेलगाना पसत नव्हत्या मलबारींनीं प्रस्तुत विषयक आपल्या सबध विवेचनात मुख्य एक चूक केली होती ती मात्र तेलगानी स्पष्ट दाखविली आहे त्यामुळें शेटजीनी सुचविलेले उपाय बऱ्याच

अशानें गैरसमजुतीनें दूषित ठरतात. उच्चवर्णीय हिंदुजातीतल्या विधवा ज्या संन्यस्त वृत्तीने राहातात त्या तशा स्वखुषीनें नसून नातलगाच्या जुलमामुळें राहतात असे मलबारीनी गृहीत धरलें होतें, तो त्याचा भ्रम होता, असे तेलगानी स्पष्ट सागितलें.

मलबारीची एक सूचना अशी होती की, एकादी सस्था काढून तिच्या मार्फत सन १८५६ चा ॲक्ट १५ ( पुनर्विवाह केलेल्या विधवाच्या मार्गातील कायद्याच्या दृष्टीनें वाटणाऱ्या अडचणी दूर करण्याबाबतचा ) हा विधवा बायकाच्या फायद्याचा आहे हें त्याना समजून देण्याची व त्या कायद्याची त्या बायाच्या तर्फे सक्तीने अमलबजावणी करण्याची तजवीज करावी. तेलगाचे म्हणणें असे होते की अशी सस्था फारशी यशस्वी होणार नाही. हिंदुलोकात विधवा बायका पुनर्विवाह करण्यास अगदी उत्सुक असतात व त्याना त्याच्या आप्तमडळीच्या आग्रहामुळें किवा वजनामुळेंच तसे आपल्या इच्छे-प्रमाणे वागण्यास धैर्य होत नाही अशी जी मलबारी शेटजीची समजूत होती ती चुकीची होती. ज्या समाजात किवा ज्या लोकात त्या दुर्दैवी स्त्रिया गहतात त्या समाजाच्या व स्वत· त्या विधवा स्त्रियांच्या अशा ठाम समजुती झाल्या आहेत की, विधवानी पुनर्विवाह करणें हे एक धर्मविरुद्ध व अपवित्र कृत्य आहे त्यामुळें वर सागितल्याप्रमाणे एकादी सस्था काढून जे कोणी अगदी सद्धेतूने प्रेरित होऊन पूर्वोक्त रीतीनें त्या दुर्दैवी प्राण्याच्या तर्फे म्हणून झटण्याकरिता पुढे येतील त्याना स्वत त्या बाया आपले मित्र न समजता खात्रीनें शत्रु समजतील !

मलबारीची अशी एक सूचना होती की, पुनर्विवाहात सामील झालेल्या माण-साना भट किवा जात जें बहिष्कृत समजतात ते बद झाले पाहिजे ही सूचना करताना देखील मलबारींना काही गोष्टीची बरोबर माहिती नसावी असे स्पष्ट दिसत होते वास्तविक कोणाला बहिष्कार घालण्याचा भटाला—(priest)—अधिकार मुळीच नाही तो अधिकार जातीला आहे पण तो काढून घेतल्याने न्याय होत नाही कारण तो एक जातीचा जुलूम आहे असें जर म्हणणें असेल आणि तो जुलूम कायद्यानें बद करावा असा हेतु असेल तर, एक जुलूम—जातीचा—जाऊन दुसरा—कायद्याचा—आला असे मात्र होईल. तसे होणें इष्ट नाही तेल-गानी प्रसिद्ध आगाखानच्या खटल्याच्या निकालात जें एक जातिविषयक तत्व गोंवले गेलें आहे त्याचा उल्लेख करून तेंच प्रस्तुत काळच्या परिस्थितीत न्याय

दृष्टीनें बरोबर आहे असे आपले मत दिलें. कोणतीही जात किंवा समाज म्हटला की त्याचे काही तरी नियम म्हणून असतात, किंवा त्यासबधाची समाजातील प्रत्येक इसमाची काही कर्तव्ये म्हणून असतातच ती कर्तव्यें त्याने बजावलीच पाहिजेत त्यात तो चुकला तर त्याला योग्य शिक्षा करण्याचा अधिकार त्या जातीला किंवा समाजाला असला पाहिजे. तेलगानी सदहू खटल्याच्या ठरावातील तत्व सागितले ते असे —

"In every community ××× there must, as requisite for the preservation of a community, necessarily exist a power ××× of depriving of the privileges of membership those who persistently refuse, after due notice and warning, to comply with those ascertained conditions of membership to which by the very fact of being members of the community, they must be held to have given an implied, if not an express, consent."

तथापि जात या सस्थेचा, प्रस्तुत बदललेल्या परिस्थितीत प्रगतीला असलेला विरोध दिवसेदिवस कमी कमीच होत जाणार आहे अशा स्थितीत मलबारीनी सुचविलेले उपाय तूर्त व्यवहार्य दिसत नाहींत असे तेलगानी आपले एकदरीत मत दिलें

मलबारीच्या दोन टिपणाना—पत्रकाना—ज्यानी उत्तरे पाठविली त्यात त्या वेळी हिंदुस्थान सरकारच्या कार्यकारी कौन्सिलामधले एक अधिकारी सर ऑकलड कॉल्व्हिन हे होते त्यानी राजकीय बाबतींत लक्ष घालणाऱ्या सुशिक्षित लोकाना अशी इशारत देऊन सागितले की "तुम्ही राज्यकर्त्यांना राज्य कसे करावें हें शिकविण्यापूर्वी तुम्ही प्रथम आपले घर सुधारा; अर्थात् सामाजिक सुधारणा करा." तेलग म्हणतात की, "आमचे पुराणमतवादी लोक उलट दिशेने आम्हास अशीच इशारत देत असतात की 'तुम्ही आपलें राजकारण पहा, समाज किवा धर्म यासबधात तुम्ही ढवळाढवळ करू नका'" कॉल्व्हिन साहेब किंवा त्याचे जातबधु म्हणतात की, "राजकारण हें आमचें काम, तुम्हांस त्यांतलें काही कळत नाही." पुराणमतवादी म्हणतात की "समाज किंवा धर्म यांपैकी तुम्हांला काही समजत नाही ते आमचें काम आणि आम्ही पाहून घेऊ." तेलग विचारतात की यांपैकीं

कोणाचा उपदेश ऐकावयाचा ? आणि कोणाचा नाहीं ? त्यापेक्षा दोन्ही पक्षाचें न ऐकता देशाच्या हितैक दृष्टीनें राजकीय तसेच सामाजिक दोन्ही क्षेत्रात आपल्या सामर्थ्याप्रमाणें काम करणें हेंच अधिक हितावह होणार नाही काय ? सुशिक्षित लोकात एकदा जागृति उत्पन्न झाल्यावर तिचा प्रभाव जसा राजकीय क्षेत्रात दृष्टीस पडेल तसाच सामाजिक क्षेत्रातही दृग्गोचर झाल्याशिवाय कसा राहील ? आणि तसे झाले तर एका बाजूनें सर ऑकलड कॉल्विन—राजकीय बाबतीतील चळवळ पाहून—रागावले किंवा दुसऱ्या बाजूनें सामाजिक क्षेत्रातील चळवळ पाहून आमचे पुराणमतवादी चरफडले तर त्याचा उपयोग काय ? लोकसमाज जागा झाल्यावर त्याला " एकाच क्षेत्रात तुमची जळवळ चालू द्या, दुसरीकडे पाहू देखील नका " असे म्हणणें व्यर्थ आहे दोन्ही बाजूच्या इशारतीचा उल्लेख करून तेलग म्हणतात,

" Which of these guides shall we follow ? or shall we not, in all humility, decline to follow either exclusively, and say that both politics and social reform are proper fields for us to work in ? Shall we not hold that the same spirit, the outgoings of which in politics rouse the ire of Sir Aucland Colvin, must manifest itself and is manifesting itself, in social and religious matters, to the utter disgust of our orthodox friends ? And shall we not hold, further, that it is vain to say to it, ' Thus far shall thou go, and no further—' whether at the one point or at the other ? "

असो वास्तविक पाहिल्यास ज्या सुधारणासबधाने मलबारी शेटजीनी सुमारें पन्नास वर्षांपूर्वी इतकी खटपट चालविली होती व ज्याच्या उपाययोजनेसबधाने काशीनाथपत तेलग यानी आपला मतभेद व्यक्त केला होता, त्या सुधारणा महाराष्ट्रात पुष्कळ अशानें आज लोकाच्या अमलात आल्या आहेत अर्थात् त्यासबधाचें विवेचन कित्येकास चर्वितचर्वणच वाटेल पण तो त्या वेळचा अल्पसा इतिहास आहे, म्हणून त्याचें महत्त्व आहे व इतक्याच करिता या प्रकरणातलें विवेचन केले आहे.

प्रकरण बाविसावे.

## लघुतम प्रतिकार.



काशीनाथपत तेलग यानी शेट मलबारीनी सामाजिक बाबतीत चळवळ करून सरकारची मदत मागण्याबाबत जी खटपट चालविली होती तिच्या विरुद्ध आपले स्पष्ट मत दिले हे मागील प्रकरणात सागितलेच आहे त्याच सुमारास मुबईच्या एल्फिनस्टन कालेजचे प्रिन्सिपाल प्रो वर्डस्वर्थ यानीही एक लहान पुस्तक प्रसिद्ध करून मलबारीना जास्त गाजावाजा न करण्याबद्दल उपदेश केला होता ते वर्डस्वर्थ साहेबाचे पुस्तक व तेलगानी दिलेले विरुद्धमत अशी दोन चागली हत्यारे मिळताच सुधारणाद्वेष्टयानी त्याचा मनमुराद उपयोग करून जास्त जोराची चळवळ चालविली. मागे एकदा सागितलेच आहे की, तेलगाना हिंदुसमाजातील काही अनिष्ट चाली चालू राहाव्यात अगर त्यात सुधारणा होऊ नयेत असे वाटत होते, असे नव्हे, पण त्या चाली बद करण्याबाबतचे प्रयत्न समाजाकडूनच झाले पाहिजेत असे त्याचे म्हणणे होते सरकारची त्यात कायद्याने किंवा हुकुमाने सक्ती नसावी इतकेच त्याचें मत होते, आणि त्याच दृष्टीने वर्डस्वर्थ साहेबानी मलबारीना जास्त गाजावाजा न करण्याविषयी उपदेश केला होता

पण सर्व हिंदुसमाज बिथरून जाण्याला कारण एवढेंच झाले कीं मलबारी शेटनी आपली दोन पत्रके प्रसिद्ध करून एकदम सरकारची मदत मागण्याचा उपक्रम केला हिदु समाजात काही वाईट चाली आहेत व त्या बद केल्या पाहिजेत, या गोष्टी कोणालाच नाकबूल नव्हत्या परतु त्या कामी सरकारची मदत मागण्यापूर्वी मलबारीनी काही हिंदु पुढाऱ्याबरोबर प्रथम त्यासबधीं वाटघाट केली असती व मग आपल्या सूचना प्रसिद्ध केल्या असत्या तर बरे झाले असते एकाद्या कायदेपडिताला अगर राजकारणी पुरुषाला कदाचित् आपली बाजू बळकट करण्याबाबतची ही कल्पना प्रथम सुचली असती पण मलबारी शेट हे कायदेपडित म्हणूनही प्रसिद्ध नव्हते व राजकारणी पुरुष म्हणूनही प्रसिद्ध नव्हते ते फक्त एक समाजसुधारक म्हणून प्रसिद्ध असून ते "इडियन स्पेक्टेटर" नावाचे वर्तमानपत्र चागले चालवीत असत असो अशाच एका प्रकरणात सन १८९५ सालीं प वा सर फेरोजशहा मेथा हे किती जपून व पूर्ण विचार करून—इतकेच नव्हे

तर आपल्यावरची जबाबदारी पूर्णपणे ओळखून—वागले ते पहा याचा थोडासा ओझरता उल्लेख मागील एकदोन प्रकरणात आलाच आहे पण तोही हिंदुलोकाच्या सामाजिक सुधारणेच्या बाबतीत पारशी गृहस्थालाच पडावे लागल्याचा प्रकार असल्यामुळें, त्याचा इकडे जरा अधिक विस्तार करावा हे इष्ट वाटते. वस्तुत आमच्या सामाजिक सुधारणेच्या बाबतीत पारशी अगर युरोपियन लोकाची सहानुभूति किंवा सहाय मिळाले तर ते आम्हास हवेच असते पण त्याबद्दलचा—Initiative—उपक्रम किंवा आरभ हिंदूकडूनच झाला तर बरे तशी स्थिति नसल्यामुळें वर सागितल्याप्रमाणे एकदा सर फेरोजशाह मेथा याना जेव्हा अशा कामी पडावे लागले, तेव्हा त्यानी कसे अत्यत समजसपणाने आपल्या बाजूचें समर्थन केले हे खरोखरीच विचार करण्यासारखे आहे म्हणूनच त्याचा येथे उल्लेख करतो.

सन १८९५ साली वरिष्ठ कायदे कौन्सिलमध्ये सिव्हिल प्रोसीजर कोडमधील काही कलमाच्या दुरुस्तीचे बिल सरकारकडून पुढे माडण्यात आले कलम २६० याची शब्दयोजना अशी होती की, त्याचा कायद्याच्या दृष्टीने अर्थ केल्यास असा होई की एकाद्या हिंदूची बायको त्याच्या जवळ राहाण्यास कबूल नसता त्याने आपल्या वैवाहिक हक्काची अमलबजावणी करण्याकरिता ( Suit for restitution of conjugal rights ) जर कोर्टांत फिर्याद माडली व कोर्टानें त्याच्या तर्फे हुकूम दिला तर बायकोने नवऱ्याकडे राहाण्यास गेले पाहिजे, न गेल्यास तिला तुरुगात पाठविले जाईल हा कायदा हिदुलोकाच्या धर्मशास्त्राच्या दृष्टीने बरोबर नव्हता म्हणून कौन्सिलात सदहू बिल येताच फेरोजशहा मेथा यानी कलम २६० यास एक पोटकलम जोडावे अशी उपसूचना पुढे आणून असे सागितले की, हिदु स्त्रीला तुरुगात पाठविण्याची शिक्षा जी कायद्याने ठरविली आहे ती कोर्टाच्या मर्जीवर राहावी. कोर्टाला वाटले तर त्याने त्या स्त्रीला तुरुगात पाठवू नये मेथा शेट यानी आपल्या उपसूचनेच्या समर्थनार्थ इतके मुद्देसूद भाषण केले की, त्याला खुद्द हिदुस्थान सरकारचे त्या वेळचे कायदेपडित व कौन्सिलर सर ॲलेग्झँडर मिलर यानीच दुजारा दिला ! सदहू बिल कौसिलात आले तेव्हा तेथे मुबईचा किंवा मद्रासचा हिदु किंवा मुसलमान प्रतिनिधि कोणीच हजर नव्हता. अशा स्थितींत अन्यायाचा कायदा होऊ नये म्हणून आपण—पारशी असून हिंदूच्या तर्फे—उपसूचना आणीत आहों असें मेथा शेट यानी सागितले. त्या वेळीं

त्यानी जें भाषण केले तें प्रस्तुत ( सामाजिक सुधारणेच्या ) प्रकरणांत महत्वाचें वाटत असल्यामुळें त्यातून आरभीची काहीं वाक्ये इकडे देतों —

" But I find that, while, the subject affects all India alike, the Select Committee whose report we are considering × × × comprises within it representatives only of the provinces of Bengal and the Panjab, while Bombay and Madras had no voice in it. I should probably have even then remained silent, if this Council contained a Hindu or Muhammadan member from Bombay or Madras, who would have voiced the best Hindu view of either of these Presidencies In the absence of any such member, I think it a duty to represent what, I believe, would have been the views put forward if, for instance, there was sitting at this Council a Hindu like my late friend Mr. Justice K T Telang, a true and sincere Hindu of Hindus, from whom I, as well as many others, have learned to respect and appreciate many valuable aspects of Hindu social and religious life, and many valuable lessons of Hindu social and religious philosophy. "

असो त्या वेळचे सर फेरोजशहा याचें वर्तन सुधारणाप्रियतेचें दर्शक होतें, इतकेंच नव्हे तर ते अत्यत समजसपणाचें होतें कारण कौन्सिलमध्यें त्या वेळीं मुबईचा किवा मद्रासचा हिंदु प्रतिनिधि नव्हता, म्हणूनच आपण आपली उपसूचना पुढे आणली हे त्यानी स्पष्ट केलेच आहे मलबारी शेट यांनी याच मार्गाचे अवलबन करून प्रथम काही हिंदु पुढाऱ्याशी चर्चा केली असती तर फार चागले होतें असो.

काशीनाथपत तेलग व प्रो वर्डस्वर्थ या दोन गृहस्थानी मलबारीच्या चळवळीविरुद्ध मते दिली हे वर सांगितलेच. मलबारीच्या दोन पत्रकामुळें मुबई व पुणें

येथील हिंदु लोकांत फारच चळवळ सुरू झाली त्यामुळे मुंबईस माधवबागेत सन १८८६ साली के रा. सा मंडलीक याच्या अध्यक्षतेखाली हिंदु लोकांची जंगी जाहीरसभा होऊन मलबारीच्या खटपटीचा निषेध करण्याबाबतचा एक अर्ज सरकारकडे पाठविण्यात आला या सभेस तेलंग हजर राहिले होते मुख्य ठरावास त्याच्या मनातून एक उपसूचना—बालविवाह व असमंत वैधव्य या चाली अनिष्ट प्रकारच्या आहेत, याबद्दलची हिंदु समाजास पूर्ण जाणीव आहे व त्या चाली बंद करण्याबाबतच्या उपाययोजनेस स्वत तो समाज लागेल, सरकारने त्या कामी कायदा करू नये—अशा अर्थाची आणावयाची होती पण ती आणावयास त्याना परवानगी मिळाली याही. मंडलीक पक्ष एका टोकास तर मलबारी शेट दुसऱ्या टोकास, अशामधून सामाजिक सुधारणा घडवून आणण्याच्या हेतूने तेलंगानी अत्यंत समंजसपणाचा मधला मार्ग सुचविला होता, पण तो सभेस पसंत वाटला नाही असो

त्याच साली (१८८६ मध्ये) काशीनाथपंत तेलंग याचे मुंबईस एक " Must Social Reform precede Political Reform in India " या विषयावर फ्रामजी कावसजी हॉलमध्ये व्याख्यान झाले ते त्यानी सर ऑक्लंड कॉलव्हिन याना उत्तर म्हणून दिलेले असल्यामुळे त्या व्याख्यानाचे राजकीय दृष्टीनेच महत्व विशेष होते. त्यातील सामाजिक बाबींचा उल्लेख केवळ गौण प्रकारचा होता अर्थात् त्यातील शब्दयोजना होती तिचा ते व्याख्यान राजकीय स्वरूपाचे होते या दृष्टीने अर्थ केला पाहिजे, हे उघडच आहे पण जी मंडळी सामाजिक सुधारणेच्याच विरुद्ध होती, तिचे हेच धोरण कसे राहणार? त्यानी समाजसुधारणेविरुद्ध आपली लेखणी व वाणी चालविताना तेलंगाच्या व्याख्यानातील काही शब्दांचा व वाक्यरचनेचा व्याख्यात्याच्या मूळ हेतूकडे लक्ष न देता, आपल्याला वाटेल त्या रीतीने उपयोग केला व आपली बाजू सजविली ! तेलंगाच्या सदरील व्याख्यानात " Reform ought to go along the line of least resistance " असे एके ठिकाणी शब्द आले होते. ते वापरण्यात तेलंगाचा हेतु एवढाच होता की, सर ऑकलंड कॉल्व्हिन साहेब म्हणतात त्याप्रमाणे हिंदुस्थानात राजकीय सुधारणेस हात घालण्यापूर्वी आम्ही सामाजिक सुधारणाच हाती घेतल्या पाहिजेत, असा खरा प्रकार नसून आम्ही दोन्ही प्रकारच्या सुधारणांना हात घातला पाहिजे. इतकेच नव्हे तर सामाजिक सुधारणेच्या मार्गात ज्या अडचणी भासण्याचा संभव अधिक असतो, त्या राजकीय सुधारणेच्या

बाबतीत मुळीच येणाऱ्या नमल्यामुळें तेवढयापुरते राजकीय सुधारणेकडे आम्ही जास्त लक्ष देण्यासही हरकत नाही खरा प्रकार म्हणजे आम्ही दोन्ही सुधारणा एकदमच हाती घेतल्या पाहिजेत तेलग स्पष्ट म्हणतात की,

"I venture to reiterate the opinion which I stated many months ago, that it is not possible to sever political from social reforms altogether that the two must go hand in hand, although the march may not in the case of both be with absolutely equal celerity"

सामाजिक सुधारणेच्या दृष्टीने सदहू व्याख्यानाचा इतकाच उल्लेख इकडे बस्स आहे. त्या व्याख्यानाचा अधिक विस्तार पुढे एका प्रकरणात यावयाचाच आहे असो.

महाराष्ट्रात सार्वजनिक कामात पडणारा असा त्या वेळी एक वर्ग होता की, त्याना राजकीय चळवळीशिवाय सामान्यत दुसरे काही गोड वाटत नसे सामाजिक सुधारणेस या वर्गाचा नेहमी विरोध असे अमक्या सामाजिक सुधारणेसबधाने या वर्गातील पुढाऱ्यानी काही अनुकूल लिहिले अगर सहानुभूति दाखविली असे क्वचितच घडले असेल स्वत. त्याचे वर्तन खुद्द सुधारकापेक्षाही पलीकडे गेलेले असे असे केव्हा केव्हा वेळ येईल तसे आपण समाजसुधारणेला अनुकूलच आहो असे ते प्रतिपादन करण्यासही कमी करीत नसत. आता तर त्याचे शिष्य किवा अनुयायी राजरोसपणें लोकास सागत असतात की, आपले गुरुजी सामाजिक सुधारणेला पूर्वीपासूनच अनुकूल होते ! त्यानी आपल्या मुलीना फीमेल हायस्कूलमध्ये—नाइलाज म्हणून का असेना—पाठविलें होते, त्यानी आपल्या मुलीची लग्ने मोठ्या झाल्यावर केली वगैरे गोष्टीचे सदहू अनुयायी मडळी केव्हा केव्हा रसभरीत वर्णनही करीत असताना आढळतात तें सर्व ठीक आहे प्रस्तुत काळी सामाजिक सुधारणा या राजकीय सुधारणाइतक्याच आवश्यक आहेत व दोन्ही प्रकार बरोबरच चालू ठेवले पाहिजेत हें तत्व सर्वमान्य झालेलें आहे. तें इतके की राजकीय सुधारणा आधीं व सामाजिक सुधारणा मग असे म्हणणारा किंवा ही आधी आणि ती मग असें म्हणणारा बहुधा वेड्यात गणला जाईल ! अशा स्थितीत आमचे गुरुजी पूर्वीपासूनच सामाजिक सुधारणेला अनुकूल होते असे—खरें खोटे पाहण्याला जातो कोण ?—लोकांस सागावयाला हरकत कोणती ? असा प्रकार कित्येक लेखकाकडून चालला आहे की नाहीं हें वाचकानीं बारीक

नजरेनें पाहून घ्यावे असो खरा प्रकार म्हणजे वर जो एक सार्वजनिक कामे करणारा विशिष्ट प्रकारचा वर्ग सांगितला, त्या वर्गांतील पुढाऱ्यांनी—त्यांची खरी मते किंवा वर्तन कसेही असेल तरी गेल्या चाळीस पन्नास वर्षांत ज्या काही समाज-सुधारकांनी लोकहिताच्या दृष्टीने चळवळी चालविल्या होत्या त्यांना बहुधा न चुकता नेहमी विरोध केलेला आहे याच वर्गांतील लेखकांनीं—सुधारणाविरोधकांनी—तेलंगांनी मागे सांगितल्याप्रमाणें दिलेलें मलबारी शेटच्या पत्रकास उत्तर व त्यांनीं वर निर्दिष्ट केलेल्या आपल्या व्याख्यानांत योजलेले—along the line of least resistance—हे शब्द यांचा आपल्या सोयीप्रमाणे उपयोग करून सुधारक मंडळीमध्ये थोडीशी गडबड उडवून दिली महाराष्ट्रांतील सुधारणाद्वेष्ट्यांचा न्या रानड्यांना चांगला अनुभव होता. त्यांना तेलंगांची—least resistance शब्दयोजना बरोबर वाटली नाही तेलंगांचे वर सांगितलेले व्याख्यान व त्यांतील त्या शब्दयोजनेचा संदर्भ या गोष्टी रानड्यांच्या लक्षांत आल्या होत्या, परंतु त्या शब्दांचा अर्थ भलताच करून सुधारणाद्वेष्टे आपले काम केल्याशिवाय कधीही राह-णार नाहीत, हे रानड्यांना पक्के माहीत होते, आणि अखेर त्यांचाच तर्क खरा ठरला ! पुण्याच्या विरोधकांना सुधारणाविषयक चळवळच नको होती सबब ती टाळण्याकरिता किंवा दृष्टीआड सारण्याकरिता ते वाटेल तो कोटिक्रम पुढे करीत असत. आपोआप सुधारणा होतील त्या होतील, त्याबद्दल चळवळ कशास ? अशी एक त्या वर्गाची कोटि असे. त्याला न्या रानड्यांनी एकदा उत्तर दिलें आहे, ते असे —

"काळ हे स्वतंत्र साधन नाहीं ज्याला आपण कालप्रभाव किंवा कालमहिमा म्हणतो तो वस्तुत व्यक्तीच्याच प्रयत्नाचा एक परिणाम आहे मनुष्य हा कालाचा प्रतिनिधि आहे त्याच्या उद्योगामध्ये कालाचे प्रतिबिंब दिसते मागल्या पिढ्या म्हणजे गतकाल, सध्याच्या पिढ्या म्हणजे वर्तमानकाळ आणि पुढल्या पिढ्या म्हणजे भविष्यकाळ अशा काळाच्या तिन्ही अवस्था माणसाच्या योगानेच ठरविल्या जातात. म्हणून माणसांनी सतत इष्ट दिशेने उद्योग चालू ठेविला पाहिजे. काळावर विसंबून स्वस्थ राहाण्यानें मनाचा दुबळेपणा व कर्तव्याचें खेदावह अज्ञान, हे दोन दोष उघडकीस येतात."

सदर्हू वर्गांतील लोकांना फक्त राजकीय बाबींकडे लक्ष द्यावयाचें होतें कारण तें काम फार श्रमाचे नसतें, व सरकारी अधिकाऱ्यांवर टीका केली कीं लोक अनायासेंच यांना देशाभिमानी म्हणून यांची स्तुति करतात व यांना आपोआपसकी

देतात सामाजिक सुधारणा घेतली की थोडाबहुत लोकाशी विरोध करावा लागतो. तो करून लोकप्रियता कशी साधणार ? अशा माणसाना तेलगासारख्या वजनदार पुढाऱ्याच्या " least resistance " ( लघुतम प्रतिकारा ) चा आधार मिळाल्यावर आणखी काय पाहिजे ? त्रासाशिवाय—कोणत्याही प्रकारची गैरसोय सोसल्याशिवाय सुधारणा होईल ती करावी असें खुद्द तेलगच जर म्हणतात तर ही सगळी सामाजिक चळवळ हवी कशास ? असे उघड उघड प्रतिपादन करून वरील मडळीनी उलट दिशेने जोराची चळवळ चालविली यासबधानें न्या रानड्यानी एकदा ( १८८७ मध्ये ) केलेलें वर्णन अगदी समर्पक होते " लघुतम प्रतिकाराचा सोइस्कर मुद्दा साप्रत सर्वाना मोठा प्रिय होऊन बसला आहे लोकाना राजकारणात भाग घेण्याची मोठी हौस वाटत असते जबाबदार राज्यपद्धतीबद्दल सारखी वाचाळता सुरू आहे, पण सामाजिक सुधारणेचा प्रश्न निघाला की, सगळें गाडे फिरते राजकारणाविषयीचा दिसणारा ताव मावळून सामाजिक सुधारणेचे नाव निघालें की, अगदी थडगार मामला अनुभवास येतो राजकारणातल्या वाचाळाची सामाजिकसुधारणेच्या दर्शनानें दातखीळ बसते ते या विषयाला नाकें मुरडतात,आणि फार पाठीस लागले तर नानाप्रकारचे बहाणे लढवून " हा प्रश्न जाऊ द्या, आपोआप जे होईल ते होईल, " असे म्हणतात. ही झाली राजकारणाच्या आवडीची सामान्य स्थिति लोकाच्या प्रवृत्तीतही असाच विचित्र विसगतपणा पसरला आहे राजकारणात कोणाला यश मिळाले की—मग तें लवमात्र अगर कितीही क्षुद्र असो—ताबडतोब अशा यशस्वी माणसाला लोक डोक्यावर घेऊन नाचतात, त्याचे देव्हारे माजावयाला उशीर लागत नाही राजकारणातल्या माणसाला वाटेल त्या सवलती द्यावयाला आणि त्याच्या लहानमोठ्या सर्व दोषाकडे शक्य तितकी डोळेझाक करावयाला लोकाची तयारी आहे सुधारकाला मात्र अगदी क्षुल्लक बाबतीतसुद्धा गय करावयाला त्याची तयारी नाही. त्याच्या तोंडातून निघणाऱ्या व हातून घडणाऱ्या प्रत्येक गोष्टीची कसून परीक्षा केली जाते ढोगी, स्वार्थी, धर्मबुडव्या अशा नानाविध कुशब्दाची त्याच्यावर वृष्टि करण्याला लोक तत्पर आहेत. कोठेही जा, " मेहेरबानी करून सामाजिक प्रश्न उपस्थित करू नका, जी स्थिति आहे ती सर्वथैव योग्य आहे " असेच बहुतेक सर्वजण तुम्हाला कळवळ्याने सागतील. "

तेलगाच्या काहीं उद्गाराचा व कृतीचा भलताच अर्थ करून आपल्यासारखेच ते होते असें लोकास भासविण्याचा जो सुधारणाद्वेष्ट्यांनीं प्रकार मांडला होता तो

अनुचित असून अन्यायमूलक होता काशीनाथपत तेलग हे सुधारक मडळी-पैकीच एक असून सर्व सुधारणाचे मूळ जे स्त्रीशिक्षण त्याच्या प्रसारासाठी तर ते परिश्रमपूर्वक झटत असत सर नारायण चदावरकर याच्या म्हणण्याप्रमाणे सुधा-रकामध्ये तीन प्रकार होते

" Many of us avoid the conflict by stifling the 'still small voice within' that raises it, some few there are who lead the conflict and come out triumphant, but others there are who feel it, let it rage, but cannot summon courage to command it. Telang was of this class "

काही लोक असे असतात की त्याना मनातून सुधारणा हवी असते पण ते ती कल्पना—कोणत्याही कारणास्तव असो—मनातल्या मनात दाबून टाकतात दुसरे असे असतात की ते धैर्याने पुढे सरसावून सुधारणेचें काम यशस्वी करून दाख-वितात, आणि तिसरे काही असे असतात की ते सुधारणेला लागतात, ते काम पुढे चालवितात, गर्दीत शिरतात, त्यात सामील होतात, पण काही वावटळ उप-स्थित झाली कीं तिला तोड देण्याचे त्याच्या ठिकाणी धैर्य नसते तेलग हे या तिसऱ्या वर्गात मोडत असत त्याचे मन सुधारणेच्या बाजूला असे त्याचे हेतु व वर्तन ही अगदी शुद्ध असत ते सुधारणापक्षास शक्य तेवढे सहाय करीत असत; व ते अत्यत प्रामाणिक व सरळ मनाचे असल्यामुळें, कौटुबिक परिस्थितीने आप-ल्यात आलेला कमकुवतपणा त्याना स्पष्ट दिसत असे, व तो ते कबूल करीत असत त्यावर सफेती चढविण्याचा प्रयत्न ते कधीच करीत नसत. अशा स्थितीत तेलग हे लघुतम प्रतिकाराच्या मार्गाने सुधारणा करणारे असून आपणही त्याचेच अनुकरण करतों असें जे लोक म्हणत असत ते खऱ्या वस्तुस्थितीचा विपर्यास करीत असत 'चदावरकर म्हणतात,

" His ( Telang's ) instincts were sound; his life was of the purest pure; there was a desire to support reform; he was honest and frank. He never justified his weakness, but plainly condemned it. When men put it to his account that he preached and

practised "the principle of reform along the line of least resistance," and that, therefore, they must go and do likewise, let them bear in mind that they are misrepresenting him."

काशीनाथपंत तेलंग हे खरेखुरे सुधारकच होते हें सांगितलें आणि जे लोक त्यांचे कांही उद्गार किंवा कृति घेऊन, सुधारणेच्या विरुद्ध तेलंग होते असें भासवीत असत, त्यांचे डोळे लवकरच उघडले. सन १८८७ साली मुंबईस प्रसिद्ध "रखमाबाई कमिटी" जेव्हां नेमण्यांत आली तेव्हां तिचे प्रो. वर्डस्वर्थ हे अध्यक्ष झाले व तेलंग हे एक सभासद झाले! त्याचप्रमाणें पुढे सन १८९१ मध्यें संमतिवयाचा वाद उत्पन्न झाला तेव्हां तेलंगांनी त्यांत प्रमुखत्वानें भाग घेतल्यामुळें कायदेवाल्यांना त्यांचें महत्वाचें सहाय झालें. त्याच सालीं डॉ. भांडारकरांच्या कुटुंबांत त्यांच्या एका मुलीचा पुनर्विवाह झाला त्या वेळीं तेलंग हजर असून जेवावयास राहिले नाहींत म्हणून कित्येक वर्तमानपत्रकर्त्यांनी टीका सुरू केली. परंतु पुढें थोड्याच दिवसांनी तेलंगांनी पुनर्विवाहित मंडळीस आपल्या घरी मेजवानीस बोलावून त्यांच्या पंक्तीचा लाभ घेतला! तात्पर्य, तेलंग हे जरी धीट व कर्ते सुधारक होते असें म्हणतां येत नाही, तरी सामाजिकसुधारणा झाली पाहिजे असेंच त्यांचें प्रामाणिक मत होतें व त्या कामीं ते अंतःकरणपूर्वक सहाय करीत असत. त्यामुळेंच सुधारक मंडळी त्यांना आपले एक पुढारी मानीत असत व तेलंगही त्यांच्या सहवासापासून आपणास जास्त उत्तेजन व स्फूर्ति मिळावी, म्हणून सुधारक मंडळीच्या सर्व कार्यांत सामील होत असत. यासंबधानें चंदावरकर म्हणतात,

"Mr. Telang was a scholar—one of those men of whom it was rightly said by Emerson that they take unto themselves 'all the ability of the time, the contributions of the past, and the hopes of the future." Hence social reformers loved him and looked upon him as their leader, and he, weak as he felt he was, hoped to gather strength and courage from their inspiration and example."

वर सांगितल्याप्रमाणें कांहीं सुधारणाविरोधक जसे तेलंगांच्या एका व्याख्यानांतील कांहीं शब्दाचा—along the line of least resistance—

उपयोग करून खऱ्या वस्तुस्थितीचा विपर्यास करीत होते तसेच ते कै रावसाहेब मडलिकाच्या पक्षातील काही लोकाच्या भाषेचा उदाहरणार्थ "reform from within" (म्हणजे बाहेरची (सरकारची) मदत न घेता आपली आपणच करावयाची सुधारणा) याचा भलताच अर्थ करून आपला कार्यभाग उरकीत असत स्वत मडलिकामध्ये एक गुण असे की, एकाद्या गोष्टीविषयी त्याची खात्री झाली की त्याप्रमाणे वागण्यास ते कधी कमी करीत नसत वस्तुत ते अगदी जुन्या मताचे होते ते घरी देवपूजा करीत असत पण ती ते श्रद्धेने करीत असत त्यात दभाचा भाग नसे, आणि लोकानी आपणास जुन्याचे पुरस्कर्ते म्हणावे अशी त्याची इच्छा तर मुळीच नसे पण त्याच्या अनुयायी मडळीत काही लोक असे होते की त्याचा देवधर्मावर विश्वास मुळीच नव्हता, पण आपण जुन्याचे पुढारी म्हणून मिरविण्याकरिता देवतार्चन, भस्म पुड्र, सोवळे ओवळे वगैरे सर्व प्रकार ते राजरोसपणे चालवीत असत काही लोक तर इकडे एकाद्या समेलना-सारख्या सार्वजनिक प्रसगी वडिलासमान शोभणाऱ्या माणसासमोर अज्ञेयवादाचे विवेचन करून भाडावयाचे व तिकडे लागलीच दुसरे दिवशी त्याची जुन्याचे कैवारी आणि देशाभिमानी म्हणून वर्तमानपत्रातून व जाहीर सभातून मिरविण्याचीही तयारी! मडलीक जात-पात पाळीत असत व ती श्रद्धापूर्वक पाळीत असत पण त्याचे काही अनुयायी खुशाल इराण्याच्या हाटेलात वाटेल ते खावयाला-प्यावयाला जात असत व इकडे वर्णाश्रमधर्मावर व्याख्याने देऊन आपण श्रेष्ठ जातीचे म्हणून मिरवीतही असत तात्पर्य, रा सा मडलिकाच्या वर्तनामध्ये दाभिकपणाचा लेशही नसल्यामुळे त्याच्या विरोधाबद्दल तो प्रामाणिकपणाचा असल्यामुळें सुधारणाप्रिय लोकाना काही वाटत नसे उलट त्याच्या विरोधापासून हे आपल्यामधील दोष काढून टाकून अधिक जोमाने आपले कार्य मात्र चालवीत असत म्हणजे मडलिकासारख्याच्या टीकेपासून प्रगमनशील मडळीचा फायदाच होत असे. असो ही झाली मडलिकाच्या जुन्या मताविषयीची गोष्ट पण काही काही गोष्टीविषयी त्याच्या मनाची खात्री झाली म्हणजे त्याप्रमाणे ते धैर्यानें वागण्यासही कमी करीत नसत सबब पुढील भाग मडलिकाचे नाव घेऊन कोणत्याही सुधारणेला येन केन प्रकारेण विरोध करणाऱ्या लोकानी जरूर वाचून त्याचे मनन करावें सर चदावरकर एके ठिकाणी म्हणतात,

"In the sixties he (R. S. Mandlik) championed the side of the great social reformer, Karsandas

Mulji, when the latter was sued for defamation for boldly and fearlessly writing against the Vallabhacharya Maharajas in the columns of the *Rast Goftar* and *Satya-Prakash,* and he was also one of the foremost Hindus of his time, who sowed the seeds of female education in this part of the country "

म्हणजे गेल्या शतकाच्या साठीमध्ये कर्सनदास मुलजी व गुजराथी महाराज याचा हायकोर्टात खटला चालला असता डॉ भाऊ दाजीबरोबर मडलिकानीदेखील त्या वेळचे प्रमुख सुधारक कर्सनदास मुलजी यास मनापासून मदत केली. इतकेच नव्हे, तर मुबईस स्टु लि सा. सोसायटीच्या मुलीच्या शाळा स्थापन झाल्या, तेव्हा मुख्य व्यवस्थापकामध्ये मडलिक होते ! सन १८८३-८४ च्या सुमारास पुणे येथील फीमेल हायस्कूल स्थापन झाले व त्यावर मुख्य सुपरिंटेडेट म्हणून एक युरोपीयन बाई नेमिली गेली म्हणून पुण्यातील सनातनवाद्याचा पक्ष धरून काही सुशिक्षित लोकानी वर्तमानपत्रातून व अन्य रीतीने कसे काहूर उठविले होते ह्याचे कित्येकास कदाचित् अद्याप स्मरणही असेल. पण तेच जुन्या मताचे खरोखर प्रामाणिक पुढारी रा सा मडलिक यानी एका प्रसगी काढलेले ( १८६३ ) स्त्रीशिक्षणाच्या आवश्यकतेविषयीचे व इग्लिश शिक्षणाच्या इष्टतेविषयीचे उद्गार पाहा—

" A hothouse education would not catch firm root, and the lessons of history seem to be forgotten by those who advocate an almost entire exclusion of the Vernaculars from their scheme of female education At the same time I should be delighted to see properly conducted English schools for such girls as were well-grounded in their own vernaculars, and whose parents could afford the luxury, as it at present is, and must continue to be for years to come. "

मुबईस पहिली मुलींची शाळा स्थापन करणारामध्ये रा. सा मडलीक होते व इग्लिश शिक्षण मुलीना देणे इष्ट आहे असे त्याना वाटत असे इतकेच नव्हे, तर पुढे (१८६७) विलायतेतील प्रसिद्ध मिस मेरी कार्पेटर (Miss Mary Carpenter) याना जेव्हा स्टू सोसायटीतर्फे मुबईस मानपत्र देण्यात आले, तेव्हा त्यात लायक शिक्षकिणीबद्दलची व्यवस्था करण्याच्या बाबतीत त्याची मदत व सल्ला मिळावा अशी विनती करण्यात आली होती त्या सर्व कामात सेक्रेटरी या नात्याने रा सा मडलीक याचेच मुख्य अग होते असो याप्रमाणें मडलिकाचीं मते व वर्तनक्रम असे त्याच्या पक्षाचे मुख्य तत्व "reform from within" हे होते हे वर सागितलेच, परतु ते सुधारणेच्या कामी निरुपयोगी होते व अनुभवाती ते तसे ठरलेही रा. सा मडलिक यास सामाजिक सुधारणा हवी होती; पण ती आपले जुने शास्त्री, भिक्षुक, धर्मगुरु याना बरोबर घेऊन करावी असे त्याचें म्हणणे होते पण ही मडळी कोणत्याही सुधारणेला कधी कबूल होणार नाही हे ठरलेलेच होते व आहे अर्थात् त्याचा नाद सोडावा हेच बरे असो सुमारे चाळीस वर्षापूर्वी एकदा एक गृहस्थ विलायतेहून परत आले तेव्हा मडलिकाच्या मते त्या गृहस्थाना प्रायश्चित्त देऊन जातीत घ्यावे याकरिता काही जुने शास्त्री, वैदिक वगैरे याना बोलावून त्याना मडलिकानी विचारिले. पण त्यापैकी एकही मनुष्य कबूल होईना त्यातून महामहोपाध्याय भीमाचार्य झळकीकर याची व चदावरकर याची एकदा भाषा झाली तेव्हा शास्त्रीबोवा म्हणाले, "कालाचा ओघ हा आमच्या विरुद्ध आहे हे आम्ही जाणून आहो आम्ही त्याच्या विरुद्ध जाऊन काही एक उपयोग होणार नाही तेव्हा तुम्ही आम्हास विचारू नका तुम्ही आपल्या मार्गाने जा व जे योग्य दिसेल ते करा आम्ही तुमच्या आड येत नाही तुम्ही आम्हाला विचारिले आणि तुमच्या सोईप्रमाणे शास्त्राचा अर्थ करण्यास सागितलें तर आम्ही स्पष्ट बोलणार व तुम्हाला विरोध करणार " असो अखेर त्या विलायतेस जाऊन आलेल्या गृहस्थाना प्रायश्चित्त देण्याची सर्व तयारी झाली पण शास्त्री कोणीच आले नाहीत रा सा मडलीक मात्र आले आणि त्यानी फक्त पानसुपारी घेतली ते जेवणाला मुळीच राहिले नाहीत समारभातला "जेवण" हाच महत्वाचा भाग होता. असो साराश, मडलीकानी चालविलेला यत्न फसला आणि तेव्हापासून "reform from within" ही भाषा पुढे कधी ऐकूच आली नाही. असो.

हा एक सुधारणा घडवून आणण्याचा मार्ग आहे. पण तो—त्यात जुन्या मडळीच्या हाडी मासी खिळून गेलेल्या काही समजुतीचा व चालीचा सबध येत असल्यामुळे—निरुपयोगीच ठरण्याचा केव्हांही सभव असतो, व तो मडलिकाच्या वेळींही तसाच ठरला ? सामाजिक सुधारणेचे दुसरे काही मार्ग होते, व त्याचा डॉ भाडारकराच्या व न्या रानड्याच्या अनेक लेखातून व भाषणातून उल्लेख आलेला आहे बिन अडचणीच्या मार्गाने जाणे, कायद्याच्या सहाय्याने सुधारणा करणे, सुधारकाची एक निराळी जात करून सुधारणा करणे, सह्या देऊन "सुधारणा करू" म्हणून स्वत स बाधून घेणे, व जुने शास्त्री पडित किवा धर्मगुरु याची समजूत करून त्याना बरोबर घेऊन समाजसुधारणा करणे, वगैरे वगैरे यापैकी प्रत्येक मार्गात काही ना काही अडचणी असतातच त्या सर्वाचा विचार केल्यास असे आढळून येईल की, एकच मार्ग सर्व ठिकाणी व सर्व प्रकारच्या सुधारणामध्ये उपयोगी पडणार नाही ज्या ठिकाणी जो मार्ग पसत पडेल किंवा सोयीचा वाटेल त्या ठिकाणी त्या मार्गाचे अवलबन करावे, व सुधारणा करावी. फक्त एक मार्ग मात्र सर्व ठिकाणी व सर्व लोकानी—त्याची तशी तयारी असल्यास—उपयोगी पडण्या सारखा आहे जी सुधारणा आपल्या सदसद्विवेकबुद्धीस पटली व जी हितकारक आहे अशी आपल्या मनाची खात्री झाली ती आपल्या कुटुबात धैर्याने व निश्चयाने एकदम अमलात आणावी ! त्यात लोकाची वाट पाहात बसण्याची जरूर नाही या बाबतीत तुकोबाच्या एका अभगात गोवलेले तत्व नेहमी लक्षात ठेवावे तो अभग असा —

**आपुलें स्वहित करावें तें आधीं । विचारूनि बुद्धि समाधान ।**
**नये मागे पाहों वाट फिरोनियां । दुसरा सांगिया साहाकारी ॥**
**आपुलिया बळें घालावी हे कास । न येणेंचीं आस आणिकांची ॥**

याप्रमाणे, कोणी कसे कोणी कसे, पण निश्चितपणे सुधारणेच्या दिशेनेच वागल्यामुळें गेल्या पन्नास वर्षात समाजसुधारणेचे पाऊल महाराष्ट्रात पुष्कळच पुढे पडले आहे व आद्य सुधारकाच्या—रानडे, तेलग, भाडारकर, मोडक वगैरे याच्या—आकाक्षा मुबई पुण्यासारख्या शहरापुरत्या पाहिल्यास—बऱ्याच अशाने पूर्ण झाल्या आहेत त्यात तेलगाची महत्वाची मदत होतीच आता ते काम प्रस्तुत पिढीला पुढे चालवावयाचे आहे देश विस्तीर्ण, हिदुसमाज प्रचड, त्या मानाने काम करणारे जितके जास्त पुढे येतील तेवढे हवेच आहेत

---

## प्रकरण तेविसावें.

# सामाजिक परिषद्.



मलबारी शेटजीच्या दोन पत्रकाच्या योगानें एक महत्वाचे कार्य झाले हे कबूल केले पाहिजे त्याच्या पूर्वी हिंदु लोकात सामाजिक सुधारणेविषयी जी एक प्रकारची अनास्था माजली होती ती बद होऊन त्याच्या मध्ये तत्सबधाने बरीच जाणीव उत्पन्न होऊन ते समाजसुधारणेसबधाने आता चर्चा करू लागले स्त्रीशिक्षणाची घडी आता मुबईत चागली बसल्यामुळें त्याविषयी काळजीचे कारण नव्हते परतु समाजसुधारणेच्या इतर अगाकडे जनतेचे जावे तितके लक्ष गेले नव्हते ते आता मलबारीच्या पत्रकामुळें सहजच तिकडे वेधले गेले विशेषेकरून सुशिक्षित लोकामध्ये त्यासबधाने बराच ऊहापोह होऊ लागून सामान्य जनताही—तिची इच्छा कदाचित् नसली तरी—जागी झाली या सामाजिक जागृतीचे श्रेय खरोखर मलबारीच्या प्रयत्नासच दिले पाहिजे

सुशिक्षित लोकामध्ये देखील दोन वर्ग होते एकाचे म्हणणें असे होते की, आपण राजकीय बाबीचाच प्रथम ऊहापोह करून, त्यासबधाने चळवळ करून सरकाराकडे दाद मागावी, व ते काम पुरे झाले म्हणजे मग सामाजिक बाबी—त्या आमच्या घरातल्याच असल्यामुळे आपण पाहून घेऊ सामाजिक बाबी आताच हातात घेतल्या म्हणजे सामान्य जनता बिथरेल आणि आम्ही उगीच त्याच्या कामात ढवळाढवळ करतो असे त्याना वाटून राजकीय कामात आम्हास त्याच्याकडून सहानुभूति किवा मदत मिळणार नाही आणि त्यायोगे राजकीय कामाचा बिघाड होईल ! ही विचारसरणी कित्येकास अगदी सोपी व सोयीची वाटली तरी ती अत्यत कोतेपणाची होती व तिला आधार कोणत्याच देशाच्या इतिहासात मिळणार नाही मूळ आधी इकडे ही जी थोडी बहुत लोकजागृति झाली होती तिला मुख्य कारण म्हणजे इग्लिश शिक्षणाची या देशात केलेली सुरवात व इग्लडच्या इतिहासाचा आमच्या लोकानी केलेला अभ्यास ! बरें, लोक जागे झाले म्हणजे त्याच्या नजरेस प्रथम घरांतले दोष पडतील की घराबाहेरचे ? डॉ भाडारकरानीं स्पष्ट सांगितले की, पहिल्या पिढीतल्या सुशिक्षित लोकाना जी गोष्ट प्रथम दिसली ती आमच्या स्त्रीवर्गाची दु:स्थिति होय ! त्यामुळें ती स्थिति सुधारण्याचे

त्या मडळीनी प्रथम प्रयत्न केले व त्याप्रमाणें मुबईस पहिली मुलीची शाळा स्थापन करण्यात आली भाडारकर म्हणतात की, त्या वेळीं राजकीय चळवळ मुळी जन्मलीही नव्हती ! राजकीय दृष्टीने लोकात खरी जागृति सन १८८३ सालातल्या इल्बर्ट बिलाच्या वादाने उत्पन्न केली तत्पूर्वी काही राजकीय स्वरूपाचे प्रश्न उत्पन्न झाले होते त्यासबधाने सभा, अर्ज, डेप्युटेशने वगैरे कित्येक वेळा प्रकार घडले होते, पण त्याला राष्ट्रीय चळवळीचे स्वरूप आले नव्हते ते इल्बर्ट बिलाविरुद्ध युरोपियन लोकानी केलेल्या जगी चळवळीनें आले राष्ट्रीय चळवळीला मग लॉर्ड रिपन, लॉर्ड डफरिन याच्याकडून उत्तेजन मिळाले व ती फोफावत गेली, हे सर्वविश्रुतच आहे असो. तात्पर्य याप्रमाणे या देशातील—विशेषत· मुबई इलाख्यातील—लोकाच्या चळवळीचा इतिहास आहे अशा स्थितीत प्रथमपासून आरभिलेले सामाजिक कार्य तसेच अर्धवट स्थितीत सोडून द्या आणि राजकीय चळवळीच्या—कित्येकास गोड व सोयीचे वाटते म्हणून—मागे लागा यात न्याय किंवा समजसपणा तो काय राहिला ? तो जवळ जवळ हातचे सोडून पळत्याच्या पाठीस लागण्याचाच प्रकार नव्हे काय ? साराश, वरील प्रकारची विचारसरणी ही अत्यत कोतेपणाची व एकदेशीय असल्यामुळें ती त्याज्यच होती आता तर पन्नास वर्षांच्या अनुभवानतर लोकमताचा ओघ कोणत्या दिशेने वाहात आहे हें आपण प्रत्यक्ष पाहातच आहो. असो ही एका वर्गाची स्थिति झाली

दुसरा वर्ग होता त्याचें प्रथमपासून हे एक मुख्य तत्वच होते की, आम्ही सर्व प्रकारच्या राजकीय, सामाजिक, धार्मिक, औद्योगिक वगैरे—सुधारणाकडे सारखेच लक्ष दिले पाहिजे आता ज्याना ज्या क्षेत्रात काम करण्याची सवड व आवड असेल, त्यानी त्या क्षेत्रात हवे तर काम करावे व इतर क्षेत्रात खपणाऱ्या मनुष्याना शक्य ती मदत करावी पण अमकी सुधारणा आधी आणि दुसरी सुधारणा मग, हे म्हणणे बरोबर नाही व तसे करण्यापासून देशाचा खरा फायदा होणार नाही तेलगानी एके ठिकाणी स्पष्ट म्हटले आहे की, देशाची प्रगति म्हणजे—one whole integral system—सामुदायिक दृष्टीनें एकच काम अगर व्यवहार आहे, किंवा ते एकाच देहाचे पोषण करण्यासारखे आहे. त्या व्यवहाराच्या एका भागावरच जोर दिला किंवा त्या देहाच्या एकाद्या अवयवाचे पोषण केलें आणि दुसऱ्याकडे दुर्लक्ष केलें तर दुसरे भाग किंवा दुसरे अवयव कमकुवत राहातील, म्हणजे तो व्यवहार यशस्वी होणार नाही व त्या सबध देहाचें पोषण होणार नाही. तेलगानी व्यवहारांतलें विविध कामें करण्या-

बाबतचे नित्याचे आपल्या अनुभवाचे एक उदाहरण देऊन प्रतिपक्षाला विचारलें की यापैकी कोणती कामे आधी करावी व कोणती नतर करावी हे तुम्हीच ठरवा वास्तविक ती सगळीच जरूरीचीं व सगळीच निकडीची. त्यात निवड करणार कशी ? त्यानी आपणास एकदा सुमारें चार सहा दिवसात सार्वजनिक कामासबधानें अजमासे पचवीस बोलावणी अगर सूचना आल्याचे सागितले त्यात राजकीय कामे होती, सामाजिक होती, शिक्षणविषक होती, औद्योगिक होती, वाङ्मयात्मक होती व इतर स्वरूपाचीही होती तेलगानी स्पष्ट विचारले की यापैकी फक्त राजकीय कामाकडेच प्रथम लक्ष द्या, बाकीची मग पाहू असे म्हणून चालेल काय ? अशा रीतीने देशाची खरी प्रगति मुळी होणारच नाही तात्पर्य, राजकीय कामे चालू ठेवून सामाजिक बाजूस सारणे हे बरे नव्हे तसेच केवळ सामाजिक बाबी हाती घेऊन राजकीय मागे ठेवणे हेही बरोबर नाही देशाची सर्व बाजूनी राजकीय, सामाजिक, धार्मिक, औद्योगिक प्रगति झाली पाहिजे, व त्यापैकी अमुक कामे आधी हाती घेऊन बाकीची मागाहून पाहू असे म्हणून चालावयाचे नाही सामाजिक दृष्टीने पाहिल्यास, उदाहरणार्थ स्त्रियाच्या बाबतीत पुरुषवर्गाकडून हरघडी अन्याय होत आहे, त्याचा बदोबस्त झाला पाहिजे अस्पृश्यवर्गाना आम्ही नीट वागवीत नसतो हे बद झाले पाहिजे असल्या महत्वाच्या बाबी मागे ठेवून राजकीय कामे सुरळीतपणे पार पडणे शक्य नाही या सर्व गोष्टीचा विचार करून वर सागितलेल्या या दुसऱ्या वर्गाने मोठ्या दूरदर्शीपणाने सर्व प्रकारच्या सुधारणा हाती घेऊन चळवळ केल्यामुळेच देशातील जनता या पन्नास वर्षात चागली जागी झाली आहे, व याबद्दलचे सर्व श्रेय या दुसऱ्या वर्गालाच दिले पाहिजे

ही जी सर्व बाजूनी सुधारणा करण्याचे प्रयत्न करणारी पुढारी मडळी हिलाच न्या रानडे यानी "तेलगपथ" हे नाव दिले आहे या सप्रदायाचे पहिले लक्षण म्हणजे आपल्या हिदुस्थान देशाच्या भावी कालाविषयी पूर्ण आशावादी राहून त्याच्या उन्नतीकरिता पराकाष्ठेची मेहनत करणे, व दुसरे लक्षण म्हणजे त्या प्रयत्नाची शिकस्त करणे ती एकाच बाबतीपुरती न करता सर्व दिशानी ते प्रयत्न चालू ठेवावयाचे या पथासबधाने इकडे इतकाच उल्लेख तूर्त पुरे आहे. जरूर तर पुढील एकाद्या प्रकरणात अधिक विस्तार करता येईल

सन १८८४ सालापर्यत समाजसुधारकाना आपल्या कामासबधाने काही सघटित योजना करता आली नाही परतु मलबारींच्या चळवळीच्या योगानें

जनता बरीच जागी झाल्यामुळें सुधारणेच्छु मडळीला आपली चळवळ सुसघटित रीतीने करण्याची इच्छा झाली व त्यानी त्या दिशेने खटपट चालविली. सन १८८५ सालच्या डिसेबर महिन्यात मुबईमुक्कामी राष्ट्रीय सभेची स्थापना झाली हे सर्वविश्रुत आहे परतु पहिल्याच वर्षी सामाजिक बाबतीत काय करावयाचे हे नक्की ठरले नाही मुबईस सर्व प्रातातून जमलेल्या मडळीमध्ये सामाजिक विषयासबधी थोडीशी चर्चा झाली रा ब रानडे, दिवाणबहादुर रघुनाथराव, नामदार तेलग याची सामाजिक सुधारणेवर भाषणे झाली, व वर्षातून एकदा परिषद भरवून सामाजिक चर्चा व्हावी असे सर्वानाच वाटू लागले सन १८८६ मध्ये कलकत्त्यास मडळी जमली तेव्हा सामाजिक विषय निघून त्यासबधाने पुन्हा बराच खल झाला परतु नक्की असे काहीच ठरले नाही सन १८८७ सालची राष्ट्रीय सभा मद्रासेस भरली त्या वेळी सुधारणेच्छु मडळीची एक सभा होऊन त्यात दरसाल राष्ट्रीय सभेनतर सामाजिक परिषद भरविण्याचे नक्की ठरले व त्याप्रमाणे त्याच साली मद्रासेस राजा सर टी माधवराव याच्या अध्यक्षतेखाली पहिली सामाजिक परिषद झाली सन १८८६ मध्ये कलकत्त्यास व सन १८८७ साली मद्रासेस प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे ना तेलग यास हजर राहता आले नाही असो मग मद्रासच्या सामाजिक परिषदेत बालविवाह, विधवा पुनर्विवाह, परदेशगमन वगैरे विषयासबधी ठराव पास करण्यात आले सन १८८८ मध्ये अलाहाबाद येथे डिसेबर ता ३० रोजी दि ब सभापति मुदलियार याच्या अध्यक्षतेखाली दुसरी सामाजिक परिषद भरली त्या वेळी ना तेलग हजर होते

सामाजिक परिषदेची स्थापना व तिची पुढे सुमारे पधरा वर्षे करण्यात आलेली जोपासना याबद्दलचे सर्व श्रेय न्या रानड्यानाच दिले पाहिजे परिषदेचे सेक्रेटरी प्रथम काही वर्षे मद्रासकडचे दिवाणबहादुर रघुनाथराव हे होते, ही गोष्ट खरी पण त्याचे देखील खरे कारण आमच्या मते, रानड्याचे अगी सदैव वसत असणारा मनाचा थोरपणा हेच होय ! कोणतेही काम असो, ते सगळे आपण खपून करावयाचे, पण नावाला म्हणून कोणी तरी एकादा मोठा माणूस पुढे आणून उभा करावयाचा, अशी रानड्याची रीत असे त्यातलाच हा—दि ब रघुनाथरावाना सेक्रेटरी नेमण्याचा एक प्रकार होता ! रानड्याना सामाजिक परिषद किती प्रिय वाटत असे व तिला त्यानी लहानाची मोठी करून देशाची केवढी महत्वाची कामगिरी केली हे सर ना चदावरकरानी एकदा सुदर रीतीनें दाखविले आहे ते म्हणाले,

" The National Social Conference was conceived and created by him ( Mr J. Ranade ) as a visible embodiment of the unity of social reform. . . . It was the child of his love, the child of his soul, it was to its interests that he gave the best part of his time and thought, it was on its platform that he delivered those weighty and eloquent annual addresses, wise with the wisdom of the heart, powerful with all the power of his great intellect, majestic with the majesty of his lofty and commanding personality "

रानड्यांचीं सामाजिक परिषदेंतील प्रसिद्ध झालेली भाषणे म्हणजे सामाजिक सुधारणा व तिचे मार्ग यासबधी आधारभूत ग्रथ आहेत किंबहुना तो हिंदुस्थानातील सामाजिक सुधारणेचा—पधरा वर्षांचा—इतिहास आहे असे म्हणण्यासही हरकत नाही त्या भाषणातील विशेष हा की, भाषण ज्या ठिकाणी व्हावयाचे असेल त्या ठिकाणच्या सुधारणेच्छु लोकाना उत्तेजक होणारी अशी त्याच ठिकाणची मागील माहिती परिश्रमपूर्वक मिळवून ती सुदर रीतीने त्याच्यापुढे माडावयाची व त्याच्यात स्वाभिमानाची जागृति करून त्याच्याकडून देशाचे काम करून घ्यावयाचे ! ही हातोटी इतर पुढाऱ्यापैकी फारच थोड्याना साधली असेल वाचकापैकी कोणास याचा थोडासा अनुभव घ्यावयाचा असेल तर त्यानी सन १८९८ साली मद्रास येथे केलेले " Southern India a hundred years ago " हे व १८९९ मध्ये लखनौ येथे केलेले " India a thousand years ago " हे, अशी दोन भाषणे जरूर वाचावी या वार्षिक भाषणासबधाने चदावरकर एकदा म्हणाले —

" His ( Mr Ranade's ) annual addresses delivered at the meeting of the Social Conference are full of instruction to those who seek for it They almost were always conceived in some happy allusion or reference to the special history, needs or activities

of the places where they were delivered .. ... and they cannot but be of valuable use to the workers in those vicinities."

सामाजिक परिषदेपासून देशाचा अनेक दृष्टींनी फायदा झाला आहे रानड्यांच्या निधनकालापर्यंतच्या काळात जेवढ्या सामाजिक दृष्टीने देशात महत्वाच्या गोष्टी घडल्या, त्याना परिषदेपासून तर मदत झालीच परतु राष्ट्रीय सभेच्या बाल्यावस्थेत हिंदुस्थानच्या सर्व प्रातातील लोकात आपलेपणा उत्पन्न करण्याच्या कामी ज्या ज्या साधनाचा उपयोग झाला, त्यात खुद्द सामाजिक परिषदेला नि सशय बरेच महत्वाचे स्थान द्यावे लागेल परिषदेचे कामच मुळी असे होते की त्याबद्दल कोणत्याही प्रातातील समजस माणसात मतभेद होण्याचा सभवच नव्हता भिन्न भिन्न प्रातात काही भिन्न भिन्न प्रकारच्या चाली प्रचारात होत्या ही गोष्ट खरी पण त्यात सुधारणा केली पाहिजे ही एक गोष्ट सर्व प्रातातील समजस लोकास मान्य होती याच एका गोष्टीचा फायदा घेऊन रानड्यानी सामाजिक परिषदेची उभारणी केली! शिवाय परिषदेपासून त्याना काडीचाही स्वार्थ साधावयाचा नसल्यामुळे किवा फुकाची लोकमान्यता सपादन करावी अशी आकाक्षा त्याच्या अष्टागीही शिवली नसल्यामुळे, त्या सर्व उद्योगात रानड्याचा नि स्वार्थपणा व लोकहिताची खरीखुरी कळकळ हे अमोलिक गुण स्पष्टपणें लोकाच्या निदर्शनास आले, व त्याच्याबद्दल सर्व प्रातातील सुशिक्षित लोकामध्ये साहजिकच अत्यत आदरभाव उत्पन्न झाला याचा परिणाम असा झाला की न्या रानडे व सामाजिक परिषद याना कोणत्याच प्रातातील जबाबदार पुढारी विरुद्ध झाले नाहीत बगालमधले उमेश्चद्र बानर्जी, सुरेंद्रनाथ बानर्जी, लाहोरचे लाला लजपतराय, लाला मुनशीराम, सयुक्त प्रातातील मि व रामकाली चौधरी, मुनशी हरगोविंद दयाळ, मद्रासकडचे त्या वेळचे जी सुब्रह्मणी अय्यर, सर टी माधवराव, दि ब रघुनाथराव, हे सर्व प्रसिद्ध राजकीय पुढारी, त्याच्या त्याच्या प्रातात सामाजिक परिषद आली म्हणजे तिला आनदाने हजर राहून व अन्य रीतीने मदत करीत असत याला सर्व हिंदुस्थानात अपवाद म्हणजे फक्त आमचा महाराष्ट्र! महाराष्ट्रातील काही लोकाकडून सन १८९५ साली जो सामाजिक परिषदेला पुण्यास विरोध झाला त्यात लक्षात ठेवण्यासारख्या एक दोन गोष्टी आहेत तेवढयाचाच फक्त इकडे उल्लेख करतों. त्यावरून निघणारी अनुमाने वाचकानीच आपलीं आपण काढावीत. सन १८८७ सालापासून सामाजिक परिषद दर वर्षी राष्ट्रीय सभेच्याच मडपात—सभेचे काम

सपल्यावर—भरत असे व तिचे काम एक दिवस चाले यात बहुतकरून कधीच सहसा अडचण उत्पन्न झाली नाही फक्त सन १८९५ मध्ये पुण्यास राष्ट्रीय सभा आली तेव्हा त्या सभेचा मडप सामाजिक परिषदेला द्यावयाचा नाही असा क्षुल्लक कारणावरून वाद उपस्थित होऊन शेवटी परिषद दुसऱ्या ठिकाणी भरवावी लागली राष्ट्रीय सभा स्थापन होऊन आज पचेचाळीसापेक्षा अधिक वर्षे झाली परतु या इतक्या अवधीत सामाजिक परिषदेसारख्या अनुपद्रवी बाबीकरता वरील सारखा—क्षुल्लक कारणाकरिता—रिकामा वाद कोणीच उपस्थित केला नाही ! १८९५ पूर्वी सामाजिक परिषद राष्ट्रीय सभेच्या मडपातच भरत असे, व त्या सालानतरही ती तशीच तिकडे भरत असते त्याबद्दल विशेष काही कोणालाच कधी वाटले नाही दुसरी महत्वाची गोष्ट ही की, पुण्यास (१८९५) मध्ये सामाजिक परिषदेस विरोध करणारे गृहस्थ पूर्वीच्या परिषदाना हजर राहिले होते; इतकेच नव्हे, तर त्यानी कित्येक ठरावाच्या सूचना पुढे आणल्या होत्या व दुसऱ्या कित्येकाना अनुमोदने दिली होती ! अशा गृहस्थानी परिषदेस विरोध का करावा व तो पुण्यासच का करावा याचा वाचकानीच विचार करावा याचा यापेक्षा जास्त इकडे उल्लेख करण्यात अर्थ दिसत नाही

राष्ट्रीय सभा आणि सामाजिक परिषद या दोन सस्थात वस्तुत हेतूच्या किवा कार्याच्या दृष्टीने फरक होता तो रानड्यानीच आपल्या एका भाषणात (१८८८) सुदर रीतीने दाखविला आहे त्याचा साराश असा —“ राष्ट्रीय सभेत सामान्यत सर्व जातीच्या व सर्व धर्मांच्या लोकाचा सबध येत असतो कारण हिंदु, मुसलमान, पारशी, ख्रिस्ती—कोणीही झाले तरी—सर्व एकाच राजाची प्रजा, सारखेच कर देणारे, सारखेच हक्क उपभोगणारे व सारख्याच गाऱ्हाण्याची दाद मागणारे असे लोक त्या सभेत जमू शकतात व विचारविनिमय सहज करू शकतात परतु सामाजिक परिषदेसबधानें तशी स्थिति नाहीं नुसते हिंदु लोकच घेतले तरी त्याच्या निरनिराळ्या प्रातात निरनिराळ्या प्रकारच्या चाली आहेत जातिभेदाची स्वरूपें निराळ्या प्रकारची आहेत अशा स्थितीत इतक्या सर्व प्रकारच्या गोष्टीचा पूर्ण रीतीने एकाच सस्थेत विचार करता येणे शक्य नाही एका प्रातात बहुपत्नीकत्वाची चाल जोरात आहे, ती दुसऱ्या प्रातातून माहीतही नाही ! विधवा स्त्रियाच्या बाबतीत भासणाऱ्या अडचणी सर्वच ठिकाणी सारख्याच स्वरूपाच्या आहेत असे नाहीं. बालविवाहाची चाल कित्येक जातीत माहीतही नाहीं पण दुसऱ्या पुष्कळ जातीच्या सामान्य प्रगतीला तीच चाल आड येते काही प्रातात परदेशगमनाविरुद्ध

निर्बंध आहेत ते अगदी कडकरीतीने पाळण्यात येतात, तर दुसऱ्या कित्येक प्रातात त्याचे महत्वही वाटत नाही ! पण या सर्व प्रकारात सुधारणा झाली पाहिजे, त्याशिवाय प्रस्तुतच्या स्थितीत गत्यतर नाही असे मात्र सर्व प्रातातील लोकास वाटत होते त्याप्रमाणे निरनिराळ्या प्रातात काही स्थानिक सस्था निघून सुधारणेची कामे चालली होती त्या सर्व प्रातातील प्रमुख लोकाना एके ठिकाणी जमविणे, त्यानी आपापल्या प्रातात साऱ्या वर्षांत सामाजिक कामे काय केली असतील त्याची चौकशी करणें, त्याबद्दलचे रिपोर्ट मागविणे, असल्या निरुत्साहजनक कामात त्याना चार शब्दानी त्याचे गौरव करून उत्तेजन देणे, त्याना योग्य सल्ला देणे ही कामे सामाजिक परिषदेत करावयाची असतात ही कित्येकास कदाचित् अगदी क्षुल्लक वाटून त्यात व्यर्थ कालक्षेप करून फायदा काय, असेही ते म्हणतील पण राष्ट्रीय सभेच्या निमित्ताने एके ठिकाणी जमलेल्या भिन्न भिन्न प्रातीय लोकाशी त्याच्या त्याच्या बाजूच्या सामाजिक बाबीसबधाने सहानुभूतिपूर्वक विचारविनिमय केल्याने राष्ट्रीय भावना दृढतर होत नाहीत काय ? शिवाय सर्व प्रातातील हिदुलोकामध्ये बधुत्वाची भावना व खरा देशाभिमान प्रदीप्त करणारा असा आमचा गतकाल हा नेहमीचाच विषय आहे त्याचे वर्णन न्या रानड्याच्याच अर्थपूर्ण भाषेत द्यावे हेच इष्ट वाटते ते आपल्या भाषणात ( १८८८ ) म्हणतात —

I do not wish to be understood as if there are no common features in our social organization. If that had been the case, we would never have come together We are in a sense as strictly national socially, as we are politically. Though the differences are great for purposes of immediate and practical reform, yet there is a back-ground of common traditions, common religion, common laws and institutions and customs and perversions of such customs, which make it possible for us to deliberate together in spite of our differences. In dealing with these differences, it would not do to forget the common background any more than by reason of

the common background it would be wisdom to forget the differences. We have to eliminate the differences, and correct the perversions, which have sprung up, and obscured the nobility of our common stock and ancient origin. It is a fortunate thing that most of the social evils complained of in these days, were unkown in the days of our highest glory, and in seeking their reform, we are not initiating any foreign models, but restoring its ancient freedom and dignity in place of subsequent corruptions "

उतारा जरा लाब झाला पण त्यातील उद्गारावरून अनेक गोष्टीचा उलगडा होतो त्यावरून न्या रानड्याचा खराखुरा देशाभिमान व आपल्या प्राचीन पूर्वजाबद्दलचा आदर हे तर व्यक्त होतातच, पण निरनिराळ्या ठिकाणचे रहिवासी असलो तरी आम्ही सर्व हिदु परपरेने, धर्माने व मन्वादि स्मृतिप्रणीत नियमाना अनुसरणारे असे एकच असल्यामुळे खरे खुरे बधुच आहोत, ही सबध उतारा व्यापून राहणारी एक कल्पनाच सर्व श्रोत्याची व वाचकाची अत करणे हालवून सोडणारी आहे ! असे असले तरी, प्रस्तुतचा हिदु समाज कसा मध्यतरीच्या अनेक क्रात्यामुळे अनिष्ट चालीच्या मगरमिठीत सापडला आहे हे रानड्यानी स्पष्टपणे निर्दिष्ट करून ती मगरमिठी सोडवून आम्ही पूर्वीचे आचारविचार—जरूर ते फेरबदल करून—पुन्हा सुरू केल्याशिवाय आमचा तरणोपाय नाही असे चक्क सागितले आहे ! असा खरा प्रकार असताना रानडे किवा भाडारकर व त्याचे साथीदार हे युरोपीयन लोकाचें सामाजिक बाबतीत अनुकरण करीत असत असे कोणत्या आधारावर म्हणावयाचे ? तात्पर्य, सामाजिक परिषदेने सर्व देशभर जागृति उत्पन्न करून सामाजिक सुधारणेचे कार्य तरसुकर केलेच पण सर्व प्रातातील हिंदूना बद्ध करणारे अनेक पाश उत्पन्न करून तिने एकराष्ट्रीयत्वालाही मदत केली आहे आणि हे सगळें राष्ट्रीय कार्य एका महाराष्ट्रीय थोर पुरुषाने—न्या रानडे यानी—सतत पधरा वर्षे, घरगुती किवा इतर अडचणी असल्या तरी त्या बाजूला सारून एकही वर्ष न चुकविता, लोकाच्या टीका व छळ सोसून, लोकमान्यतेची किंवा सर्वमान्यतेची—कसलीही—बिलकुल इच्छा न करता केले. रानड्याची—राष्ट्रीय दृष्टीनें—ही बिनमोल कामगिरी आहे असें कोण म्हणणार नाही ? असो.

सामाजिक परिषदेंत न्या तेलगानी महत्वाचे काम केले आहे त्याचा उल्लेख करण्यापूर्वी त्या परिषदेचा थोडासा पूर्वेतिहास देणे इष्ट वाटल्यामुळे हे इतके आतापर्यंतचे विवेचन केले आहे

सामाजिक परिषदेची सन १८८७ साली स्थापना होऊन पुढच्याच वर्षी अलाहाबादेस दुसऱ्या परिषदेचे अधिवेशन झाले, हे मागे सागितलेच आहे त्या परिषदेस न्या तेलग हे हजर होते व दि ब सभापति मुदलियार हे अध्यक्ष होते. तेलगानी मुख्य ठरावास अनुमोदन देण्याचे काम केले अनुमोदन देताना त्यानी जें भाषण केले, त्याचा थोडक्यात साराश पुढे दिला आहे ठरावात मुख्य सहा गोष्टीचा अतर्भाव केलेला होता व त्यापैकी प्रत्येकासबधाने तेलगानी थोडक्यात विवेचन करून कोणत्या दिशेने त्यात सुधारणा करता येईल, हे सुचविले होते ते सहा विषय हे—१ लग्नाचे वेळी विनाकारण होणारा खर्च २ लग्नाचे वय पुढे ढकलणें, ३ विधवा पुनर्विवाह, ४ केशवपन, ५ परदेशगमन, ६ पोटजातीतील विवाह. या सहा विषयासबधी तेलगानी आपल्या भाषणात सयुक्तिक रीतीने विवरण केले. पहिल्या बाबीसबधाने ते म्हणाले की लग्नाच्या वेळी साधारणत हिदु लोकात होत असलेल्या निष्कारण खर्चाच्या बाबतीत सुधारणा झाली पाहिजे याविषयी वादच नाही मुलामुलीच्या लग्नाकरिता होणाऱ्या खर्चासाठी काही लोक आपल्या मित्रमडळीमध्ये किंवा इतराकडे कर्ज मागण्याकरिता गेलेले आपणास माहीत आहेत ! ही लाजिरवाणी स्थिति अशीच चालू राहावी असे कोण म्हणेल ? बरें, या कामी इष्ट ती सुधारणा केल्यास त्यात काही शास्त्राज्ञा उल्लघिल्यासारखे तरी होईल काय ? मुळीच नाही फक्त या बाबतीत समाजातील चार समजस पुढाऱ्यानी एके ठिकाणी जमून याविषयी खल केला पाहिजे लग्नात व्यर्थ असा पुष्कळ खर्च झाल्याने काही कुटुबास कसे दारिद्र्य आले आहे याचा विचार केला पाहिजे, व त्यासबधानें जनतेची मने वळवून सदहू घातुक चालीस काही तरी आळा बसेल—शक्य तर ती समूळ नष्ट होईल—अशी खटपट झाली पाहिजे. या चालीच्या मुळाशी फक्त डामडौल किंवा थाटमाट याची हौस याशिवाय दुसरा कोणता हेतु असणार ? प्रत्येक समाजास किंवा जातीस साधारणत आपल्यात चागली सुधारणा होऊन भरभराट व्हावी असे वाटत असतें व त्याकरिता जो तो समाज झटत असतो तर तसा झटून प्रयत्न करण्याला प्रस्तुत बाबीसारखे उत्तम क्षेत्र दुसरें कोणतें असणार ? या दिशेनें सुधारणा करण्याच्या मार्गांत मुख्य अडचण बायकाची असते. डामडौलाची किंवा आपण श्रीमत आहो असें

दाखविण्याची पुरुषामध्यें देखील हौस कमी असते असें नाही. अर्थात् पुरुषामधील देखील असली हौस दाबण्याचा प्रयत्न करणें हें कठीणच काम आहे. पण बायकाच्या बाबतीत ते काम तर त्याहीपेक्षा अधिक कठीण आहे हें सागावयालाच नको ! याला मुख्य उपाय म्हणजे स्त्रियाना शिक्षण देऊन त्याच्या बुद्धीचा विकास होऊ देणे हाच होय त्यायोगाने प्रस्तुत सुधारणेचें त्याना महत्व समजेल व आमच्या प्रयत्नात त्याचें साहाय्य होईल निदान त्या कामात त्या आड तरी येणार नाहीत असो हें तेलगानी आपल्या वेळच्या सामाजिक परिस्थितीच्या दृष्टीने भाषण केले होते, हे वाचकानी लक्षात ठेवावें. हल्लीच्या काळी स्त्रीशिक्षणाचा प्रसार--विशेषेकरून उच्च वर्णीय जातीत—बराच झाला आहे त्यामुळें पूर्वीच्या डामडौलाच्या हौसेस प्रस्तुत उतरती कळा लागली आहे असेही म्हणण्यास हरकत नाही पण परिस्थिति बदलत आहे तशा दुसऱ्या नव्या अडचणीही वाढत आहेत चाळीस-पन्नास वर्षापूर्वीच्या मानाने हल्लीच्या सुशिक्षित सामान्य लोकांची आर्थिक स्थिति बिकट होत चालली आहे पूर्वीच्या लग्नासबधाच्या खर्चात हुड्याचा अतर्भाव होतच असे, पण त्या वेळी त्या बाबीला कदाचित् हौसेचे स्वरूप होते असे म्हणता येईल. पण हल्लीच्या परिस्थितीत हुड्याचे पूर्वीचे हौसेचे स्वरूप जाऊन त्याला आर्थिक स्वरूप येत चालले आहे. म्हणजे स्वरूपात बदल झाला तरी हुड्याची चाल बहुतेक कायमच आहे ! त्यात काही तरी सुधारणा होणे जरूर आहे पण ही माजराच्या गळ्यात घाट बाधावयाची कशी आणि कोणी ? असो, हे विषयातर इतकेच पुरे

तेलगाच्या भाषणात दुसरा विषय—लग्नाचे वय पुढे ढकलण्या बाबतचा—आला त्यासबधाने त्यानी मुद्देसूदपणे विवेचन केले मुलीच्या लग्नाचे वय पुढे ढकलले पाहिजे याबद्दल वादच नाही अर्थात् त्यासंबधानें जास्त बोलण्याचे कारणच नाही या विषयाची चर्चा करताना आमची केव्हा केव्हा चक्रव्यूहात सापडलेल्या माणसाच्या स्थितीसारखी स्थिति होते ! मुलीच्या लग्नाचे वय वाढविण्याच्या कामी स्त्रीवर्गामध्ये शिक्षणाचा बराच प्रसार झाल्याशिवाय आम्हास यश येणार नाही उलट पक्षी, लग्नाचे वय पुढे ढकलल्याशिवाय स्त्रीवर्गात शिक्षणाचा जास्त प्रमाणावर प्रसार होणें सभवनीय नाहीं ! अशा स्थितीत आम्हास हळूहळू पण निश्चयाने दोन्ही सुधारणा हाती घेतल्या पाहिजेत. एका बाजूनें आहे त्या स्थितींत आम्हाला स्त्रीशिक्षणाचा झपाट्यानें प्रसारही केला पाहिजे, आणि दुसऱ्या बाजूनें मुलींच्या लग्नाची वयोमर्यादाही हळूहळू पुढें लोटीत राहिलें पाहिजे अशी

दोन्ही बाजूनीं सुधारणा करीत राहिल्यास प्रथम पाऊल पुढे पडण्यास जरी थोडासा उशीर लागला तरी त्यापासून पुढील पाऊल जास्त अतरावर पडण्यास सहाय्य झाल्याशिवाय राहाणार नाही, आणि असे झालें म्हणजे वर सागितलेल्या चक्रव्यूहाची भीतीही पण राहाणार नाहीं !

वर सागितलेल्या सुधारणा–स्त्रीशिक्षण व लग्नाच्या वयोमर्यादेची वाढ–बऱ्याचशा अमलात आल्यावर विधवाविवाहाच्या–हा तेलगाच्या भाषणातील तिसरा मुद्दा होता—अर्थात् बालविधवाच्या विवाहसबधात प्रस्तुत ज्या अडचणी भासतात त्याचे महत्व दिवसे दिवस कमी कमी होत जाईल विधवाच्या बाबतीत सुधारणेचें काही कारण नाही असे म्हणणारे बरेच सुशिक्षित लोक तेलगाच्या वेळी होते, हल्लीही तसे काही लोक मिळतील पण त्याची सख्या आता नि सशय कमी झाली आहे व ती कमीच होत जाणार आहे असो पण अशा लोकाच्या विचारसरणीचाच आपणास बोध होत नाही असे तेलग आपल्या भाषणात म्हणाले तेलगाच्या मते चालू स्थितीतील दोषाकडेच डोळेझाक करण्याची आम्हास दुष्ट सवय लागली आहे हिंदुस्थानच्या इतर प्रातातील वस्तुस्थिति काय असेल ती असो, पण महाराष्ट्रातील काही लोकाची जी—आमच्या चाली कशाही बऱ्या वाईट असोत असें म्हणून त्यातील दोषावर पाघरूण घालण्यातच खरा देशाभिमान आहे असे मानण्याची—प्रवृत्ति स्पष्ट दृष्टोत्पत्तीस येते ती पाहून मात्र तेलगाना अत्यत वाईट वाटत असे या दुष्ट प्रवृत्तीची जर लोकात जास्त जास्त वाढ होत गेली, तर खऱ्या राष्ट्रसुधारणेला किंवा प्रगतीला कायमचा रामराम ठोकावा लागेल ! इतकेंच नव्हे तर आपल्यामधील दोषाकडेच डोळेझाक करण्यात जर खरा देशाभिमान आहे असे मानले तर देशाभिमान हा एक सुधारणेचा किंवा प्रगतीचा शत्रु असून तो एक खोडसाळपणाचे साधन आहे असे म्हणावे लागेल ! प्रचलित रूढीप्रमाणे विधवा बायका वैधव्यस्थितीत राहिल्यापासून स्त्रीवर्गाला भूषणभूत जो पातिव्रत्यगुण त्याचे रक्षण होते म्हणून त्या रूढीचे गोडवे गात बसणारे काही लोक आपल्यामध्ये आहेत व ते तेलगाच्या वेळीही होते. तेलगाच्या मते, एकादी बालविधवा जर पुनर्विवाहाच्या कल्पनेचा अनादर करून आपल्या खुषीनेंच सन्यस्तवृत्तीने राहाण्याचे पत्करत असेल तर तिच्यासबधानें वरील पातिव्रत्याचें वर्णन बरोबर ठरेल कारण जी विधवा बाई, पुनर्विवाहाची मोकळीक असतांही तिचा अनादर करून, केवळ आपल्या पतीच्या ठिकाणीं एकनिष्ट होत्साती आमरण पातिव्रत्यानें राहण्यास–असलें असिधाराव्रत आचरण्यास–कबूल होईल

तिजबद्दल कोणालाही–मग तो सुधारक असो वा नसो–आदरच वाटेल! परतु केवळ लोकलज्जेच्या दाबामुळे किंवा ज्या समाजात आपणास राहावयाचे आहे, किंबहुना सारा जन्म घालवावयाचा आहे, तो समाज पुनर्विवाहाच्या विरुद्ध आहे तर त्याच्या मताविरुद्ध कशास जा असे वाटून जी विधवा वैधव्यदशेंत राहात असेल तिला पातिव्रत्याचा नियम कसा लावता येईल? हेही क्षणभर असो पण जे लोक, आपले वय कितीही झाले असले तरी, एकामागून एक अशा–किंवा लहर लागली तर एकाच वेळी—अनेक बायका करून चैनीखातर ससारसुखाचा उजळ माथ्यानें उपभोग घेतात त्यानीच बिनदिक्कतपणे बालविधवानी–त्याचे वय कितीही लहान असले तरी–पातिव्रत्याच्या सबबीवर सारा जन्म वैवव्यदशेतच घालविला पाहिजे असा अट्टाहास करावा हा कालिदासाच्या, "गडस्योपरि पिटिका सवृत्ता!" या उक्तीप्रमाणे, ह्या अबलाच्या बाबतीत दु खावर डागण्या देण्याचाच प्रकार नव्हे काय? या अत्यत निर्दयतेच्या प्रकाराला तेलगानी आपल्या भाषणात सन १८७७-७८ सालातल्या मुबईचे गव्हर्नर सर रिचर्ड टेपल यानी विलायतेतील सेक्रेटरी आफ स्टेटला पाठविलेल्या सरकारी खलित्याची उपमा दिली आहे! एकाद्या अगदी उपासमाराच्या वेळी देखील आमचे दयाळु सरकार केव्हा केव्हा कसे निर्घृण बनत असते हेही यावरून स्पष्ट रीतीने सिद्ध होते सबब तेलगाच्या त्या भाषणातून तेवढा उताराच देतों —

"It reminds me of a Despatch sent to the Secretary of State by Sir Richard Temple, when Governor of Bombay, at the time of the famine. In that Despatch, the Bombay ryot, who had his land assessment wrung from him by the paternal Government of Sir Richard Temple, without any remission, was complimented by His Excellency on the spirit of self-reliance he had shown when subjected to that operation."

याचे शब्दश भाषातर करता न इतकेच सागतो की सन १८७७–७८ सालीं दक्षिणेंत भयकर दुष्काळ पडून मुबईइलाख्यातील गरीब रयतेची केवळ उपासमार चालू असता तिच्यापासून—मायबाप म्हणविणाऱ्या सरकारकडून एक पैची सूट न

देता तिला पिळून—साऱ्याची वसुली करण्यात आली होती व तत्सबधाच्या रिपोर्टात वसुलीच्या वेळी त्याच रयतेमध्ये दिसून आलेल्या आत्मविश्वासाबद्दल तिची भरपूर स्तुति करण्यात आली होती ! ही वस्तुत गरीब रयतेची खरीखुरी स्तुति नसून तिच्या दु खावर त्या डागण्या होत्या ! हिंदुसमाजातील विधवा बायकाच्या सबधात पुरुषवर्गाकडून असाच अहर्निश निर्दयपणा होत असल्यामुळे त्याला तेलगानी वरील सरकारी खलित्याची अगदी समर्पक उपमा दिली आहे असो. दुसरी सहज जाता जाता गोष्ट सागावयाची म्हणजे वरील उताऱ्यात स्पष्ट दिसून येणारी तेलगानी मुबईसरकारासबधी—गव्हर्नरचे नाव घेऊन—वापरलेली कडक भाषा ! त्यापेक्षा स्वत चा भारदस्तपणा राखून अधिक कडक भाषा सरकाराविरुद्ध कोणाला वापरता येईल असे वाटत नाही तरी कै. टिळकानी—एका क्षुल्लक बाबतीत तेलगाशी त्याचा एकदा मतभेद झाल्यामुळे—" तेलगामध्ये निर्भीडपणे स्वमतप्रतिपादन करण्याचे धैर्य नव्हते " असे ( केसरी १०-१-९३ ) लिहिलेच आहे ! असो

तेलगाच्या भाषणात मग विधवाच्या केशवपनाचा मुद्दा आला आहे त्यावर त्यानी आपली एकही शब्द बोलण्याची इच्छा नाही असे सागितले कारण त्या चालीतला निर्घृणपणा व किळसवाणा प्रकार हे इतके स्पष्ट आहेत की ते स्पष्टतर करण्याकरिता जास्त शब्द खर्चण्याचे कारणच नाही त्यातल्यात्यात समाधानाची गोष्ट एवढीच की ती रानटीपणाची ( barbarous ) चाल आता हळू हळू बद पडत चालली आहे.

पुढे तेलगानी परदेशगमनाच्या मुद्यासबधाने थोडेसे विवेचन केले त्यानी आरभीच स्पष्ट सागितले की, ज्या शास्त्रवचनात परदेशगमनाचा निषेध सागितला आहे असे लोक म्हणतात, त्या वचनाचा तसा केलेला अर्थ आपणास कबूल नाही इतकेच नव्हे तर त्याच्याही पुढे जाऊन तेलगानी म्हटले की, आपल्याला परिस्थितीप्रमाणे वागले पाहिजे, तेव्हा शास्त्रनिषेध त्याला आड येत असेल तर तो बाजूस सारला पाहिजे हा निषेध जेव्हा घालण्यात आला तेव्हा त्याला कदाचित् तशी कारणे असतील, व हल्लीच्या प्रवासाच्या सोयीही त्या वेळी अस्तित्वात नसतील अर्थात् ती कारणे जर हल्ली उरली नाहीत व प्रवासाच्या सर्व सोयी होत आहेत, तर तो निषेध किंवा निर्बंध पाळण्यात समजसपणा तो काय राहिला ? तेलगाच्या वेळी सदर्हू बाबतीत जुन्या शास्त्रीपडिताची मने वळविण्याचेही कित्ये-

कांनी—उदाहरणार्थ रा सा मडलिकानी प्रयत्न करून पाहिले, परतु त्यात त्याना यश आले नाही ! तेलगानी म्हटले की तसे प्रयत्न करण्यातच अर्थ नाही परिस्थितीप्रमाणे वागण्याची आवश्यकता व सामाजिक बाबीचा व्यवहाराच्या दृष्टीनें विचार करणे या दोन गोष्टी जुन्या शास्त्रीपडिताच्या मुळी गळी उतरण्याचाच सभव नाही अशा स्थितीत एकादा सयुक्तिक सुधारणाविषयक प्रश्न त्याचे पुढें एकदा ठेविला व त्यानी आपला त्याच्या विरुद्ध निकाल दिला तर मग आपण त्याचा नाद सोडून आपल्या प्रगतीच्या मार्गानेंच जाऊ लागणे हेच बरें

शेवटी तेलगानी आपल्या भाषणात एकाद्या मुख्य जातीच्या ज्यात अन्नव्यवहाराची रूढि पूर्वींच सुरू आहे अशा—पोट जातीतील विवाहसबधाविषयी थोडेंसे विवेचन केले ते म्हणाले की, या बाबतीत देखील आम्ही आपल्या पूर्वजानी घालून दिलेल्या नियमापासून च्युत झालो आहो त्यानी हिदूच्या फक्त चारच जाति मानल्या होत्या. हल्ली चार हजारापेक्षा अधिक जाति झाल्या आहेत याबाबतीत देखील सुधारणेची तीच दिशा ठेविली पाहिजे आम्हाला आपल्या प्राचीन —फार प्राचीन समाजस्थितीबद्दल, निदान बोलण्यात तरी, अत्यत आदर व अभिमान वाटत असतो तेव्हा त्याच स्थितीचे—शक्य तेवढे—पुनरुज्जीवन करण्याला हरकत कोणती ? आपल्यामध्ये ज्या काही अनिष्ट चाली शिरून आमच्या प्रस्तुत अवनतीला कारण झाल्या, त्या बऱ्याच—प्राचीन कालाहून—नतरच्या आहेत त्याच चालीचा आम्हास वस्तुत प्रस्तुत त्याग करावयाचा आहे फार प्राचीन काळची वस्तुस्थिति—हल्लीच्या काळी फिरून प्राप्त झाली तर—ती नि सशय प्रगतीला पोषक होईल, आणि असे झाले तर निदान माझे तरी अत्यत समाधान होईल असे तेलग म्हणाले त्याचे शब्द असे होते —

“ I, for one, shall be thoroughly statisfied, if on many of the matters now practically important, we can securely occupy the position of advantage, which was occupied by our ancestors of the genuine old times.”

सन १८८९ मध्ये सामाजिक परिषदेचें तिसरें अधिवेशन मुबईस झाले त्या वेळी न्या तेलग याचीच अध्यक्षपदावर योजना झाली होती तेलगानी त्या प्रसगी अध्यक्ष या नात्यानें जें भाषण केले ते नेहमीप्रमाणें चागलेच झाले त्याचा

साराश असा होता " या वर्षी परिषदेत काही स्त्रिया हजर आहेत, ही आनदाची गोष्ट आहे स्त्रियानी राजकीय बाबतीत पडावे की नाही याबद्दल इग्लडात तूर्त वाद चालला आहे त्याचा निकाल काय लागेल तो लागो, परतु आम्ही आरभिलेल्या सामाजिक बाबतीत तरी स्त्रीवर्गाच्या सहकारितेची अत्यत जरूर आहे आमच्या समाजस्थितीत कोणत्या सुधारणा आवश्यक आहेत, व त्या कोणत्या उपायानी करावयाच्या यासबधाने चर्चा करताना आमच्या भगिनीचे सहाय्य व सहकारिता याची आम्हास अगदी जरूर आहे त्यामुळें यावर्षी सुदैवाने आम्ही एक पाऊल पुढे टाकले आहे असे म्हणण्यासही हरकत नाही हे पाऊल म्हणजे फार पुढे पडले आहे असे मी म्हणत नाही तरी परिषदेच्या या तिसऱ्या वर्षी आम्ही जरा एक पाऊल पुढे गेलो व त्यामुळे भावी काळाविषयी सामाजिक दृष्टीने काही तरी आशा वाटते, इतकेच ! असो जे लोक—बहुधा युरोपीयन लोक–राष्ट्रीय सभेवर केव्हा केव्हा टीका करीत असतात, त्याचा मुख्य आक्षेप असा असतो की, आम्ही आपले सगळे लक्ष देशाच्या राजकीय सुधारणेकडे लावीत असतो व सामाजिक सुधारणेकडे आम्ही पाहातसुद्धा नाही असा आक्षेप घेणाऱ्या टीकाकारास आजच्यासारख्या सभानी चोख उत्तर मिळेल ! असे जरी आहे तरी त्याच्या टीकेत सत्याचा जो थोडासा अश असतो त्याचाही आपण जरूर विचार केला पाहिजे आपल्यापैकी काही लोक असे आहेत की, त्याच्या भाषणाचा किंवा लेखाचा विचार केल्यास राजकीय बाबतीकडे तेवढे लक्ष देण्याबद्दलची त्याची दृढ प्रवृत्ति दिसून येते, व त्याचा परिणाम असा होतो की सामाजिक सुधारणेचा प्रश्न ते अजिबात विसरतात अर्थात् वरील ( युरोपीयन ) टीकाकाराच्या टीकेत त्यामुळे थोडेंसे सत्य आहे असें म्हणावे लागते सबब तशा प्रकारच्या टीकेने जागे होऊन आम्ही सामाजिक सुधारणेकडे—आमच्या घरगुती बाबीकडेही आपले लक्ष जरूर पुरविले पाहिजे आणि असे झाले म्हणजे त्या बाबतींत कोणाच्या टीकेला कारण उरणार नाही येथे दुसऱ्या एका गोष्टीचा उल्लेख केला पाहिजे आमच्यापैकी कित्येक लोक जो केव्हा केव्हा सार्वजनिक कामासबधी वादविवाद करीत असतात त्यावरून असे स्पष्ट दिसून येते की राजकीय बाबी व सामाजिक बाबी या एकमेकापासून अगदी भिन्न असून त्याचा एकमेकाशी काही एक सबध नाही असेच त्या लोकाना वाटत असावे पण ती समजूत चुकीची आहे कारण दोन्ही बाबतीत आपणास आपल्या देशाची सुधारणाच करावयाची असल्यामुळें दोन्हीच्या मुळाशी असलेली तत्वे एकच आहेत हे विस-

रून चालावयाचे नाही पण कित्येकाची मन स्थिति वस्तुत अशी विलक्षण असते की सामाजिक सुधारणेच्या बाबतीत ते ज्या विचारसरणीचे अवलबन करतात, ती ते राजकीय सुधारणेविषयी बोलताना पार झुगारून देण्यासही प्रवृत्त होतात! सामाजिक सुधारणा मात्र घाईने करता उपयोगी नाही असें ही मडळी म्हणत असते, पण तेच तत्व राजकीय सुधारणेला लावण्यास मात्र ते कबूल होत नाहीत वास्तविक तेलग युरोपीयन लोकाचेच प्रत्येक बाबतीत अनुकरण करणारे होते असे कोणीच म्हणणार नाही कारण हिदु लोकाची समाजस्थिति केवळ साहेबलोकाच्या समाजस्थितीच्या वळणावर न्यावी अगर ती म्हणजे हिचीच एक नक्कल बनवावी असे त्याना कधी वाटले नाही किवा तसे त्यानी कधी प्रतिपादन केले नाही. पण असे त्याचे ठाम मत होते की, जसा आपण इग्लिश लोकाच्या चालीरीतीचा किंवा सस्थाचा राजकीय दृष्टीनें लक्षपूर्वक अभ्यास करीत असतो, तशीच त्याच्या मधील काही सामाजिक बाबीसबधाने देखील आम्ही काळजीपूर्वक माहिती करून घेतली पाहिजे ती माहिती मिळाली म्हणजे आमच्या परिस्थितीप्रमाणे तिच्यासबधी विचार करण्यास व त्याच्यापैकी कोणत्या गोष्टी आम्हाला घेता घेण्यासारख्या आहेत हे ठरविण्यास बरे पडेल ''

इग्लिश लोकाशी आमचा ज्या अर्थी सबध आला आहे, त्या अर्थी काही बाबतीत त्याचे आम्ही अनुकरण करावे असे कित्येकास वाटल्यास आश्चर्य नाही. फार काय, पण चागल्या गोष्टीत आम्ही त्याचे अवश्य अनुकरण केले पाहिजे. त्याशिवाय आमची प्रगति होणार नाही त्याच्या इतिहासापासून जशा आम्हास राजकीय दृष्टीने पुष्कळ गोष्टी शिकण्यासारख्या आहेत, तशाच सामाजिक दृष्टीनेही त्याच्यापासून आम्हास अनेक गोष्टी शिकण्यासारख्या आहेत तेव्हा आमच्या देशाची प्रगति व्हावी, त्याला ऊर्जितदशा प्राप्त व्हावी, त्याची सर्व सुधारलेल्या देशात गणना व्हावी, अशी आमची खरी खुरी इच्छा असेल तर आम्ही इग्लिश लोकापासून फक्त राजकीय चळवळ कशी चालवावी एवढयाच गोष्टीचे ज्ञान करून घेऊन बाकीच्या–उदाहरणार्थ, सामाजिक–शिकण्यासारख्या गोष्टीकडे दुर्लक्ष करू असे म्हणून चालणार नाही आमची राजकीय दृष्टीने सुधारणा झाली पाहिजे ही गोष्ट अगदी खरी आहे तशीच आमची सामाजिक दृष्टीनेही बरीच सुधारणा झाली पाहिजे हेही नाकबूल करून चालावयाचे नाही राजकीय व सामाजिक असे, स्थूल दृष्टीने, आमचे दोन डोळे आहेत अशी कल्पना केली तर त्यापैकी एक—राजकीय—डोळा उघडा ठेवून आम्ही आपला फायदा करून घेणार

आणि दुसरा—सामाजिक—डोळा मिटून आम्ही नवीन ज्ञान मिळविण्याचे साधनच बद करणार असे जर कोणी म्हटले तर ते समजसपणाचे असे कसे म्हणतां येईल ? पण तशी आमच्यामधील काही लोकांची स्थिति झाली आहे त्याच्या मनाचा नेहमी राजकीय चळवळ, राजकीय हक्क वगैरे गोष्टीकडेच कल असतो व सामाजिक गोष्टीकडे त्याचे तेवढे लक्ष नसते किबहुना ते त्याविषयी अगदी अनास्थ असतात अशी एकदेशीय, कोती दृष्टि ठेवून व्यक्तिविषयक कोणाचा काही फायदा झाला तरी देशाचा फायदा होणार नाही व त्याचे पाऊल कधी पुढे पडणार नाही म्हणूनच तेलगानी शेवटी स्पष्ट सागितले की, " इग्लिश लोक हे आमच्यापेक्षा हरएक बाबतीत पुढे गेलेले असल्यामुळे त्याच्यापासून जसें पुष्कळ राजकीय बाबीचे ज्ञान करून घेऊन आम्ही आपला फायदा करून घेतला पाहिजे तसेच त्याच्यापासून काही सामाजिक नवीन गोष्टीचेही ज्ञान करून घेऊन आम्ही आपले व आपल्या देशाचे कल्याण करून घेतले पाहिजे इतकेच नव्हे तर हे आमचे कर्तव्य आहे "

असो यानतर सामाजिक परिषदेस तेलग हजर राहू शकले नाहीत इतर सामाजिक चळवळीत भाग घेणे, लेख लिहिणे, भाषणे करणे—हे प्रकार तेलगाच्या बाबतीत चाललेच होते पण त्यासबधी विवेचन पुढील भागातून योग्य स्थळीं येईलच

---

## प्रकरण चोविसावे.

# संमतिवयाच्या बिलाचा वाद.



मलबारी शेटनी " बालविवाह व असमत वैधव्य " यावरील आपली दोन पत्रके प्रसिद्ध केल्याचे व त्यात विनति केल्याप्रमाणें कायदा करण्याचे सरकारानें नाकारल्याचे मागे सागितलेंच आहे तदनतर सन १८८९ साली प्रसिद्ध दयाराम गिडुमल यानी एक पत्रक प्रसिद्ध करून पीनलकोडमध्ये समतिवयाची मर्यादा जी दहा ठेविली होती ती बारा करावी अशी सरकारास शिफारस केली होती दयाराम गिडुमल हे न्यायखात्यातील एक बडे अधिकारी असल्यामुळें कायद्यात काहीं फेरफार करावयाचे असल्यास तसें सुचविण्याचें त्यांचें एका दृष्टीनें कामच होतें.

दयारामजीचे पत्रक प्रसिद्ध झाल्यावर त्यासबधानें वर्तमानपत्रातून चर्चा सुरू झाली परतु सरकारच्या मनाचा निश्चय होईना इतक्यात बगाल प्रातात "फुलमानी" नावाने प्रसिद्ध असलेले एक प्रकरण उपस्थित झाले त्यात दहा वर्षाच्या एका बालिकेवर तिच्या नवऱ्याने बलात्कार केल्याबद्दल त्याजवर खटला करण्यात आला होता त्या मुलीचे नाव "फुलमानी" असल्यामुळे ते प्रकरणच त्या नावानें मग प्रसिद्ध झालें होते त्या खटल्याने बगाल प्रातात त्या वेळी खूप खळबळ उडविली व अखेरीस कायद्यातील समतिवय बारा वाढविण्याबद्दल हिंदुस्थान सरकारचा निश्चय झाला ही बातमी प्रसिद्ध होताच मुबईस काही पुढारी मडळीची न्या तेलगाच्या अध्यक्षतेखाली सभा होऊन समतीचे वय बारा करण्याबद्दल सरकाराला एक विनति अर्ज करण्यात आला त्याचप्रमाणे मुबईच्या काही डॉक्टर लोकानीही तशीच सरकारास अर्जरूपाने विनति केली परतु पुण्यास तशा सूचनेविरुद्ध लोकाची सभा होऊन सरकारास समतिवय न वाढविण्याबद्दल विनति करण्याचे ठरले व तसे सरकारला कळविण्यातही आले तथापि सन १८९१ च्या जानेवारी महिन्यात कलकत्त्यास हिंदुस्थान सरकारचे कायदेपडित व मत्रि सर अँड्स्कोबल यानी समतिवय वाढविण्याबाबतचे बिल वरिष्ठ कौन्सिलमध्ये आणलेच. त्या वेळी त्या कौन्सिलमध्ये पुण्याचे रा ब कृष्णाजी लक्ष्मण नूलकर व कलकत्त्याचे सर रमेश्चद्र मित्र हे दोघे सभासद होते सदर्हू बिलास नूलकर यानी दुजोरा दिला व सर रमेश्चद्र यानी त्याला विरोध केला त्याबरोबर देशभर चळवळ सुरू झाली व बिलासबधाने अनुकूल—प्रतिकूल अशा दोन्ही बाजूनी कडाक्याचा वादविवाद चालू झाला एकदरीत पाहिल्यास सर्व प्रातातील सुशिक्षित व सुजाण लोक बिलास अनुकूल होते पुराणमतवादी व काही सुशिक्षित लोक विरुद्ध होते पण वादाला थोडेसें कटु स्वरूप यावयास असे कारण झाले की, बिलास विरोध करताना सर रमेशचद्र मित्र यानी "सरकार बिलाच्या रूपाने लोकाच्या धर्मात हात घालीत आहे व त्यामुळे राणीच्या जाहीरनाम्यात दिलेल्या वचनाचा भग होत आहे" असे प्रतिपादन केले, व कलकत्त्याच्या दुसऱ्या काही—तर्कचूडामणि वगैरे—लेखकानीही तेच प्रतिपादन पुढे चालविल्यामुळें लोकाची मने बिथरून गेली व त्यानी चळवळ जास्त जोराने केली खरें पाहिल्यास हा धर्मासबधाचा मुद्दा वादात पुढे आणला गेला नसता तर बरे झाले असते. कारण, एक तर धर्माचा ओढून ताणून एवढा व्यापक अर्थ करीत बसल्यास व्यवहारच चालणार नाहीं. प्रगति तर मुळीच होणार नाहीं. दुसरी गोष्ट सती, बालहत्या वगैरे सारख्या धर्माच्या नावावर देशात

प्रचलित असलेल्या काही अमानुषपणाच्या चाली जर सरकाराने कायद्याने पूर्वीच बद केल्या होत्या व ते कायदे जर आम्ही बिनतक्रार पाळीत होतो, तर आताच धर्माचा मुद्दा पुढे आणणे सुसगतपणाचे कसें म्हणता येईल ? तिसरी गोष्ट, पीनल कोडात समतिवयाची मर्यादा दहा ही पूर्वीच दाखल होती दहाची बारा करणे सरळ नव्हे काय ? असो पण धर्माचा व शास्त्राचा मुद्दा पुढे आणून बगालमधले व मग महाराष्ट्रातीलही लोक जेव्हा सदहू बिलावार वाद करू लागले तेव्हा सर्व परिस्थितीचा विचार करून डॉ भाडारकरानी प्रस्तुतविषयक धर्मशास्त्रग्रथाचे आलोडन केले व जरूर ते आधार देऊन एक लहान पुस्तक प्रसिद्ध केले न्या. तेलग यानीही बिलात अतर्भूत झालेल्या तत्वाचा कायद्याच्या व धर्मशास्त्राच्या दृष्टीने नीट विचार करून एक पत्रक ता २७-१-९१ च्या इदुप्रकाशात प्रसिद्ध केले सदरील दोन्ही लेखातील आधार किंवा उतारे इकडे देऊन जागा अडविण्याचे कारण दिसत नाही पण ते दोन लेख प्रसिद्ध होताच पुण्याचे कै लो. टिळक हे पुढे येऊन भाडारकरानी व तेलगानी शास्त्रवचनाचे केलेले अर्थ बरोबर नाहीत असे त्यानी प्रतिपादन केले

टिळकाच्या बाजूस—भाडारकर व तेलग याच्या मानाने—काही गोष्टीचा फायदा मिळाला हे कबूल केले पाहिजे त्या उभयताना आपले म्हणणे लोकापुढे माडण्याकरिता इदुप्रकाश किवा टाइम्स अशा वर्तमानपत्राकडे जावे लागे किंवा स्वतत्र रीतीने पुस्तके छापून प्रसिद्ध करावी लागत. दुसरे, त्याना आपली नेहमीची—भाडारकराना कालेजातले व तेलगाना हायकोर्टातले—कामे असल्यामुळें ती सभाळून वादविवाद करावा लागत असे तिसरी गोष्ट, त्याना आपले म्हणणे सरकारी जबाबदार अधिकाऱ्यापुढे किवा सुशिक्षित लोकाच्यापुढे माडावयाचे असल्यामुळें त्याना सर्व लिहिणे इग्रजीतून करावे लागे टिळकाच्या बाजूस यापैकी कोणतीच अडचण नव्हती केसरीपत्र त्याच्या घरचेच होते त्या पत्रात लिहिणे हाच त्याचा धदा होता व त्यानी सर्व वादविवाद केसरीतून मराठी भाषेत—क्वचित् मराठामधून—केला त्यामुळें टिळकाची बाजू सर्व लोकापुढे—सामान्य जनतेपुढे—यावी व भाडारकर व तेलग याची बाजू तेवढी प्रमुखत्वाने येऊ नये यात आश्चर्य नाही. अर्थात् या गोष्टीचा टिळकास चागलाच फायदा मिळाला व त्याचीच बाजू बरोबर होती अशी सामान्य लोकाची साहजिकच समजूत झाली. असो. वर सागितल्याप्रमाणें टिळकाचे मत केसरीच्या द्वारे प्रसिद्ध झाल्यावर महाराष्ट्रातील विरोधी पक्षास जोर आला व त्याने सभा, अर्ज वगैरे या रूपाने

मोठी चळवळ केली यात्रमाणें हा वाद सुमारें दोन महिने चालला पण अखेर सन १८९१ च्या मार्चमध्ये बिल पास झाले

रा रा नरसिंह चितामण केळकर यानी लिहिलेल्या टिळक चरित्राच्या बाराव्या प्रकरणात समतिवयाच्या वादासबधाने जी हकीकत दिलेली आहे ती एकतर्फी असून काही बाबतीत लोकाचा गैरसमज करणारी अशी आहे सबब त्या वादातील दुसरी बाजू लोकापुढे ठेवणे जरूर आहे समतिवयाच्या बिलाला अनुकूल पक्षाचे महाराष्ट्रातील मुख्य पुढारी म्हणजे रा ब रानडे, रा ब नूलकर, डॉ भाडारकर व न्या तेलग हे होते तरी शास्त्राधार वगैरे दाखविण्याचे काम भाडारकर व तेलग हेच मुख्यत करीत होते अर्थात् प्रतिपक्ष्याचा—विशेषत टिळकाचा—हल्ला त्याजवरच व्हावा यात आश्चर्य नाही सदहू वादात जोराने शिरण्यामध्यें टिळकाचा कोणता हेतु होता व त्यानी अवलबिलेली वादविवादाची पद्धत कोणत्या प्रकारची होती ह्याची नरसोपत केळकरानीच ( टि च पृ २५१ ) पुढीलप्रमाणें केलेल्या वर्णनावरून वाचकास सहज कल्पना होईल

" याच चळवळीत **टिळक** हे वादमतगज किंवा "**पटाईत भांडखोर**" म्हणून **प्रथम** प्रसिद्धीस आले + + + पण समतिवयाच्या बिलाचे वेळी त्यानी वादात डॉ भाडारकरासारख्या बड्या बड्या धेडाशी एकदम युद्धाची गाठ घातली, यामुळें **या इलाख्यांतच काय पण इतर प्रांतांतही टिळकांचे नांव एकदम प्रसिद्धीस आलें** "

याप्रमाणें जाड्या टाइपात घातलेल्या शब्दावरून टिळकाचा हेतु व रीत स्पष्ट झाल्यामुळें त्याच्या लेखातले उतारे देऊन इकडची जागा अडविण्याचे कारण नाही याबद्दलची सविस्तर हकीकत आमचे डॉ भाडारकराचे चरित्र, प्रकरण पधरावे यात आली आहे ती वाचकानी जरूर तर वाचावी असो इकडे फक्त केळकरानी आपल्या हकीकतीत न सागितलेल्या काही टिळकासबधाच्या महत्वाच्या गोष्टीचा उल्लेख करणें इष्ट वाटल्यावरून तेवढे करतो भाडारकराच्या बाजूच्या गोष्टी थोडक्यात सागता येतील सदहू वादाच्या वेळी टिळकानी जीं स्मृतिवचने पुढे आणली होती त्याचा अर्थ लावण्यात त्यानी खुद्द डॉ भाडरकराचीच मदत घेतली होती इतकेच नव्हे, तर वादविषयक टिळकाचे लेख वाचून त्याना काही पारिभाषिक शब्द ऐकूनही माहीत नव्हते, व टिळकानी काही वचनाचा आपणास हवा तसा अर्थ करण्याकरिता त्यातील शब्दाची फिरवा फिरव केली होती या गोष्टी भाडारकरानींच उघडकीस आणल्या आहेत याशिवाय सबब वादात टिळक

आपल्याशी मुद्दाम असभ्यपणाने वागत होते असें भाडारकरानी स्पष्ट म्हटलें आहे याहीपेक्षा महत्वाची गोष्ट म्हणजे ज्या गृहस्थाचें—कै रा ब यशवत वासुदेव ऊर्फ बापूसाहेब आठल्ये याचे—वादविषयक बाबतीतील मत टिळकास मान्य होऊन त्याबद्दल यानी त्याची सढळ हाताने स्तुति करून त्याना डॉ भाडारकराच्या बरोबरीचे—किंबहुना काकणभर जास्त विद्वान् ठरविले होते, त्यानीच मग पत्र लिहून केसरीच्य द्वारें सदहू सर्व प्रकाराचा निषेध करून भाडारकरानी दिलेला अभिप्रायच बरोबर आहे असे आपले स्पष्ट मत कळविले हे बापूसाहेबाचे पत्र ता १७ मार्च १८९१ च्या केसरीतच प्रसिद्ध झालेले असून केळकरानी आपल्या बाराव्या प्रकरणात दिलेल्या हकीकतीत त्याचा पत्ता नाही ! ही भाडारकराच्या दृष्टीने दुसरी बाजू झाली

तेलगाच्या दृष्टीने दुसरी बाजू काय होती हे त्याहीपेक्षा थोड्या शब्दात सागता येण्यासारखे आहे इकडे देखील टिळकाच्या किंवा केळकराच्या लेखातले लाब लाब उतारे देऊन जागा अडवीत नाही पण एकाच शब्दात सागावयाचे म्हणजे केळकराचे लिहिणे—भाडारकराच्या बाबतीतल्यासारखेच—इकडे देखील एकतर्फीच झालेले असल्यामुळे त्याची हकीकत वाचून वाचकाचा "टिळकानी तेलगाच्या म्हणण्याचे खडन करून ते विजयी झाले" असा जो समज होतो, त्याला अगदी आधार नाही यापेक्षा याविषयी इकडे जास्त लिहिण्याची इच्छा नाहीं तेलगाच्या लिहिण्याचा रोख काय होता हे पुढील विवेचनावरून स्पष्ट होईल. तेलगाचा मुख्य कटाक्ष सर रमेश्चद्र मित्र यानी आपल्या भाषणात पुढे आणलेल्या आधारावर होता, व त्यासबधाने त्यानीं एक टिपण किंवा पत्रक ( note ) लिहून इदुप्रकाशच्या (ता २७–१–९१) एका अकात प्रसिद्ध केले होते सर रमेश याचा मुख्य भर "रघुनदन" यावर होता रघुनदन याचे ग्रथ धर्मशास्त्राच्या बाबतीत बगाल प्रातात आधारभूत मानले जातात अर्थात् त्याने केलेल्या धर्मशास्त्रवचनाच्या अर्थासबधाने कायदे कौन्सिलमध्ये चर्चा करण्याचे कारण नाही असे सर रमेश याचे म्हणणें होतें, पण ते तेलगाना कबूल नव्हते तेलग म्हणाले की मुबई इलाख्यात जो मान निर्णयसिंधु किंवा धर्मसिंधु याना देण्यात येतो तोच बगालप्रातात रघुनदनला सबब त्यानें केलेला शास्त्रवचनाचा अर्थ बरोबर आहे की नाही याचा कौन्सिलनें विचार केल्यास त्यात आक्षेपार्ह काहीं नाहीं शिवाय धर्मसिंधूने भागवत पुराणातला एक दाखला दिला आहे, त्याचाही विचार झाला पाहिजे याविषयी तेलग आपल्या पत्रकात असे म्हणतात —

"The *Dharma Sindhu* further relies on a passage in the *Bhagwat* (Skandha XI, verse II), in which it is distinctly stated that the meeting of husband and wife, eating, meat, drinking liquor are not matters for scriptural command, for man resort to them without any command, but they are matters for regulation by scripture and restriction to special times and occasions"

भागवत पुराणातील वचनाचा अर्थ एवढाच की, पतिपत्नीचा समागम, मासाशन किंवा मद्यपान हे शास्त्राज्ञेचे विषय होऊ शकत नाहीत कारण, शास्त्राज्ञेशिवायही मनुष्याला त्याचे मनोविकारच त्या विषयाकडे प्रवृत्त करीत असतात फक्त त्या गोष्टी अमक्या वेळी कराव्यात किवा अमक्या वेळी करू नयेत इतकाच शास्त्राला नियम घालता येईल ! भागवत पुराण हा ग्रथ केवळ मुबई इलाख्यातच प्रमाणभूत मानला जात नसून तो सर्व हिंदुसमाजाला पूज्य आहे असो प्रथम रजोदर्शनानतर गर्भाधान न केल्यास भार्याभिगमन न केल्याचे पाप लागेल असे कित्येकाचे म्हणणे होते परतु तेलगाचे त्यावर असे उत्तर होते की, भार्याभिगमन न करणे हे काही पाप होऊ शकत नाही कारण तसे वर्तन अप्रीतीमुळे होते असे म्हणता येणार नाही त्यातला हेतु आरोग्याच्या दृष्टीने भार्येच्या बऱ्याचाच असतो, व त्यात सरकाराची इच्छा किवा आज्ञा (law) आहे असे झाल्यास त्या सदिच्छेला जोर येईल उलट पक्षी, भार्याभिगमन न करणे हे पाप आहे असे धरले तरी त्याला धर्मशास्त्राप्रमाणे परिहार किंवा प्रायश्चित्त आहे तेही फार अवघड नाही. प्रायश्चित्त म्हणजे काही वेळ प्राणायाम करणे किवा कृच्छ्रदान करणे ! पहिल्यात थोडेसे शरीराला श्रम पडतील, दुसऱ्यात थोडे पैसे खर्च होतील ! यापेक्षा अधिक ते काय ?

पण सर रमेशचद्र मित्र याची बाजू प्रथमपासूनच फारशी बळकट नव्हती असें दर्शविणारी एक दोन प्रमाणे होती. त्या वेळी कलकत्त्याच्या "इडियन मिरर" वर्तमानपत्रामध्ये एका लेखकाने पत्र लिहून असे प्रसिद्ध केले की, खुद्द बगालमध्ये देखील काही कुलीन ब्राह्मणापैकी लोक आपल्या मुलीची ऋतुप्राप्तीनतर लग्ने करून देत असतात ! मग समतिवयाच्या बिलाला विरोध करण्यात अर्थ काय ?

शिवाय खुद्द रघुनंदनाला देखील—ज्याचा आधार सर रमेशचंद्र यानी समतिवयाच्या बिलाला विरोध करताना घेतला होता त्याला—सन १८८० मध्ये बंगालमध्ये कोणी इतके महत्वही देत नसत ! ही गोष्ट तेलंगाना समजताच त्यानी ती ता २९-१-९१ च्या टाइम्समध्ये पत्र लिहून प्रसिद्ध केली

आता राणीच्या जाहीरनाम्याचा मुख्य मुद्दा राहिला कौन्सिलमधील आपल्या भाषणात सर रमेशचंद्र मित्र यानी सदरील जाहीरनाम्यात नमूद असलेल्या "आम्ही धर्माच्या बाबतीत हात घालणार नाही" या वचनावर जोर देऊन प्रस्तुत बिलाच्या योगे सरकार प्रजेच्या धर्मात हात घालीत आहे असे प्रतिपादन केले सर रमेशचंद्र यानी जाहीरनाम्याचा केलेला अर्थ तेलंगाना कबूल नव्हता राजाने आपली अनियंत्रित सत्ता चालवून कोणाचा धर्मछळ करू नये व होऊ देऊ नये इतकाच त्या जाहीरनाम्यातील वचनाचा अर्थ घ्यावयाचा असतो त्याचा ओढाताणीने अर्थ करून प्रस्तुतसारख्या बाबीला ते वचन लागू करता येत नाही तेलंगानी सर्व गोष्टीचा जरा उच्चतर दृष्टीने विचार करून असे स्पष्ट सांगितले की, आपल्या प्रजेपैकी कोणाच्या अंगास जर अन्यायाने मोठी इजा होत असेल तर त्याचे त्यापासून संरक्षण करणे हे राणीचे किंवा राजाचे आद्य कर्तव्य आहे प्रस्तुत वादातील मुलीला जर, तिच्या शरीराची चांगली वाढ होण्यापूर्वी तिच्या पतीपासून इजा होण्याचा संभव असेल तर त्याबद्दलचा बंदोबस्त करणें हें सरकारचे कर्तव्य नव्हे काय ? अवेळी पतिसमागम झाल्यास स्त्रीच्या प्रकृतीवर दुष्ट परिणाम होतो असा पुरावा आहे अशा स्थितीत—राणीने वचन दिले असे मानले तरी—तिकडे दुर्लक्ष करून स्त्रीचे म्हणजे आपल्या प्रजेचे राजाला संरक्षण करणे प्राप्त आहे. यासंबधात तेलंग म्हणतात —

"There was ample evidence to show that unjust harm, eye, fatal harm was occasionally done to the child wives by the husbands' prematurely claiming to exercise the socalled marital rights upon their person. And therefore, the pledge even if given, cannot be obligatory in such cases."

राजा हा सर्व लोकांचे समदृष्टीने संरक्षण करीत असतो. पण प्रस्तुतच्या बाबतींतील मुलीला त्याचा फायदा मिळतो असें म्हणता येईल काय ? तेलंगांनी हाच प्रतिपक्ष्याना प्रश्न विचारला ? ते म्हणाले,

"Can it be said that the equal and impartial protection of the law is enjoyed by all when a girl can be ravished by her husband with impunity even before she becomes *apta viri* ?"

सर रमेशचद्र मित्र किंवा त्याचे मित्र यानी राणीच्या जाहीरनाम्याचा केलेला अर्थ गृहीत धरला तर कशी अनर्थावह स्थिति उत्पन्न होईल, हे तेलगानी उत्तम रीतीने दाखविले आहे तेलग म्हणतात —

"We may well ask Sir R. C. Mitter and those who argue like him whether they think that good government and progress of the people may be ever expected to come if the British Government accepts as authoritative their construction of the Queen's Proclamation That construction must logically involve, for instance, the shutting up of the schools and colleges where a system of astronomy is taught that must knock on the head the absurdities of the Hindu Jyotish which forms an integral part of their ritual of marriage It must also involve a condemnation of all police regulation of Hindu and Musulman processions, for is not that clearly an interference with religious worship ?"

तेलग म्हणाले की, सर रमेश यानी जाहीरनाम्याचा केलेला अर्थ ग्राह्य मानला तर आमची शाळा—कालेजें बद करावी लागतील, व पोलिसाकरिता केलेले नियम व कायदे रद्द करावे लागतील ! कारण शाळातून मुलाना दररोज शिकविण्यात येत असलेले धडे कोठून तरी आमच्या नेहमीच्या धर्मविधीच्या आड येणारच ! व पोलिसाचे कायदे आमच्या धर्मसबधी मिरवणुकीवर काही तरी नियत्रण घालणारच ! मग शाळा कॉलेजें बद करावी काय ? व पोलीसखातें बद करावें काय ? अशी अनर्थावह स्थिति उत्पन्न करण्यास कारण होण्यापेक्षा ना. नूलकरांच्याच प्रयत्नास मदत करून हें ( समतिवयाचें ) बिल पास करून घ्यावें हेंच आपणास पसत आहे असें सागून सरकारालाही तें बिल पास करण्याबद्दल

तेलगानी विनति केली आहे ! ज्या ठिकाणी लहान लहान अर्भकाच्या जीवाचा व भूतदयेचा प्रश्न आला तेथे सरकाराने स्वस्थ बसणें अगर उदासीन राहाणे हे त्याच्या इभ्रतीस शोभणार नाही तेलग म्हणतात —

"For our own part we are bound to add that we hold with the Hon'ble Mr. Nulkar. If in such a case, where the claims of humanity are implicated, the British Government is to hold its hand and put forward a plea of *non possumus*, it will write itself down as unworthy of its best traditions, and will lay down a principle of action, that, if logically carried out, will destroy the possibility of any solid good resulting from its presence in India"

समतिवयाच्या बिलाला मुबईचे पुढारी फक्त न्या तेलगच अनुकूल होते, व इतर सर्व गुजराथी—दक्षिणी सुशिक्षित लोक विरुद्ध होते असा सामान्य लोकाचा समज होता व आहे पण तो निराधार आहे वादविवाद दोन महिने चालला होता त्या मुदतीत बऱ्याच प्रमुख लोकाची पत्रे त्या वेळच्या टाइम्स व बॉबे गॅझेट या वर्तमानपत्रात प्रसिद्ध झाली आहेत त्यात चदावरकर, भाडारकर, डॉ. भालचद्र, दाजी आबाजी खरे याची बिलाला अनुकूलता दर्शविणारी पत्रे आहेत. समतिवयाचे बिल हे सर्व जातीना लागू असल्यामुळें इतर मुख्य धर्मातील लोकाच्या मताचाही विचार केला पाहिजे मुबईतील पार्शी समाज व युरोपियन ( तसाच नेटिव्ह ख्रिस्ती याचे ) समाज बिलास अनुकूलच होते मुसलमान समाज हा साधारणत मागसलेला असा समजला जातो, पण त्या समाजातील त्या वेळचे मुख्य पुढारी बद्रुद्दीन तय्यबजी, रहिमतुल्ला सयानी, अबदुल्ला धरमसी हे सर्व बिलाला अनुकूल असून त्यानी मुसलमान लोकाची सभा भरवून बिलाच्या समर्थनार्थ ठराव पास केले होते ही इतर जातीच्या व धर्माच्या लोकाची गोष्ट झाली.

मुबईतील मुख्य मुख्य हिंदु पुढाऱ्याची मते पाहिल्यास ती याप्रमाणे होती —

| अनुकूल. | प्रतिकूल |
|---|---|
| १. डॉ मोरेश्वर गोपाळ देशमुख. | १. रा महादेव चिमणाजी आपटे |
| २. दि ब. लक्ष्मण जगन्नाथ वैद्य, माजी बडोद्याचे दिवाण. | २ प्रो जिन्सीवाले |
| | ३ डॉ. कीर्तिकर. |

| अनुकूल. | प्रतिकूल. |
|---|---|
| ३. मिस्तर भाईशकर नानाभाई. | ४ हरदेवराम नानाभाई हरिदास. |
| ४ ,, चदावरकर | |
| ५ ,, मो. मु मुनशी. | |
| ६. डॉ. स. वा. काणे. | |
| ७. मिस्टर दाजी आबाजी खरे. | |
| ८. ,, ग रा किर्लोस्कर. | |
| ९ डॉ भालचद्र कृष्ण. | |
| १०. मिस्टर एकनाथ खोटे. | |
| ११. ,, विष्णुपत भाटवडेकर. | |
| १२ ,, वा आ मोडक. | |
| १३. ,, गो. क पारेख. | |

याशिवाय लक्ष्मीदास खिमजी, परशुराम वैद्य, वसनजी खिमजी, जव्हेरीलाल याज्ञिक, माणिकशहा तालयारखान वगैरे पुष्कळच प्रमुख लोक बिलाला अनुकूल होते. त्याप्रमाणे या अनुकूल असलेल्या लोकाची मुबईस जव्हेरबागेत मोठी सभा झाली. त्या सभेचे महत्त्व कमी करण्याच्या हेतूनें रा. केळकरानीं जो आपल्या पुस्तकात मजकूर लिहिला आहे तो एकतर्फी असून त्यालाही थोडीशी दुसरी बाजू आहे जव्हेर बागेतील सभेस आम्ही स्वत हजर होतो; व ती केळकर समजतात तितकी लहान किंवा क्षुल्लक नव्हती. माधवबागेंतल्या सारखाच तो जव्हेरबागेचा भव्य दिवाणखाना होता. व तो सभेच्या वेळी अगदी चिकार भरून गेला होता, ता २३-२-९१ च्या इदुप्रकाशात त्या सभेचे पुढीलप्रमाणे इग्रजीत वर्णन आहे —

"The enthusiasm found a particularly happy expression when the Hon. Mr. Justice Telang entered the Hall. The audience has been estimated to number about 4,000 but whatever the actual number, it is certain that not a nook or corner of the capacious hall and grounds of the Javer Bag was left unoccupied, and there was literally no standing

room for many late comers, who had to leave the place in disappointment."

अध्यक्षस्थानी श्री जव्हेरिलाल उमियाशंकर याज्ञिक हे होते. जव्हेरिलाल भाईसबधाने सागण्यासारखी महत्वाची गोष्ट म्हणजे ही की ते अगदी जुन्या चालीचे व मताचे असूनही बिलात सुचविलेली सुधारणा समाजात जरूर झाली पाहिजे असे त्याना वाटत असे ते डॉ भाडारकराच्या वेळचे त्याचे सहाध्यायी असल्यामुळे व ते मनाचे भारी सज्जन व सरळ असल्यामुळे त्याचा भाडारकर, रानडे, तेलग याचे ठिकाणी पूर्ण विश्वास असे व हे देशहिताला विघातक असें कधी काही करणार नाहीत अशी त्याची खात्री होती शिवाय या चळवळीपासून याज्ञिक याना काही स्वार्थ साधून घेण्याची किंवा प्रसिद्धि व सवग लोकप्रीति मिळविण्याची महत्वाकाक्षा बिलकूल नसल्यामुळे त्याना तेलग व भाडारकर यानीं प्रतिपादन केलेले मत बरोबर होते असे वाटले व ते अनुकूल पक्षात सामील झाले. जव्हेरिलाल भाईविषयी—त्याच्या अगदी सरळ व प्रामाणिक मताबद्दल—कै. चदावरकर हे नेहमी आपल्या भाषणात व लेखात फार आदर व्यक्त करीत असत. असो असे हे गृहस्थ जव्हेर बागेतील सभेच्या वेळी अध्यक्ष होते सभेचें काम सुरळीतपणें शेवटास गेले त्यात गोंधळ झाला वगैरे जें केळकरानी लिहिले आहे तें अगदी असत्य आहे सभेत सूचना—उपसूचना आल्या—त्याचा रीतीप्रमाणें विचार झाला, व अखेर बिलाला अनुकूल असा ठराव पास झाला. सभेला मुबईचे बहुतेक सर्व पुढारी हजर होते सभेचे काम चालू असतानाच न्या. तेलग आले. ते आल्याबरोबर जमलेल्या त्या प्रचड सभेने उभे राहून व हातरुमाल हातानी उडवून जो त्याचा सत्कार केला तो पाहून कोणालाही धन्यताच वाटली असती ! पण तेलगाना जमलेल्या मडळीतून प्लॅट फॉर्मवर जाण्याकरिता वाट मिळेना तेव्हा जमलेल्या मडळीपैकीच कित्येकानी तेलगाना—ते नको नको म्हणत होते तरी—एका आराम खुर्चीवर बसवून ती खुर्चीची खुर्चीच उचलून प्लॅटफॉर्मवर अध्यक्षाजवळ ठेविली ! त्या वेळी त्याची प्रकृति जरा नीट नव्हती घरून निघताना घरची मडळी—जाऊ नका म्हणून आग्रह करीत होती पण "आज मला सभेस हजर राहिले पाहिजे" असे म्हणून ते निघालेच व सभेस आले तात्पर्य, मुबईचे बहुतेक सर्व सुशिक्षित व समजस पुढारी बिलास अनुकूल होते त्यात महत्वाची गोष्ट ही की, टिळकाचे अगदी निकट स्नेही दाजी आबाजी खरे व डॉ नानासाहेब देशमुख हे अनुकूल पक्षात होते डॉ. भालचद्र, डॉ काणे ही मडळी तर होतीच.

वास्तविक बिलाच्या बाबतींत मुद्दा धर्माचा नसून पीनल कोडाच्या दुरुस्तीचा होता पण धर्मशास्त्राचा मुद्दा मध्येच काही विरोध मडळीकडून निघाल्यामुळें कित्येक लोकाराधना करण्यास उत्सुक झालेल्या मडळीस आयतीच सधि मिळाली व त्यानी त्या सधीचा पुरा फायदा घेतल्यामुळे वादास जरा कटु स्वरूप आले अखेर बिल पास व्हावयाचे ते झालेंच त्या कायद्याप्रमाणे तेव्हापासून आतापर्यंत, एकही महत्वाचा खटला कोर्टात आल्याचे आम्हास माहीत नाही ! फक्त त्या वेळी पक्षाभिमानाने कित्येकाचीं मने काही दिवस विकारवश झालेली स्पष्ट दिसली ! इतकीच गोष्ट देशाच्या पदरात पडली

सदहू वादात जे पडले होते त्यापैकी बहुतेकाचा, मग ते अनुकूल पक्षाचे असोत की प्रतिकूल पक्षाचे असोत—प्रस्तुत विषयासबंधी आपलें जें प्रामाणिक मत होते ते सरकारला कळवून आपले एक सार्वजनिक कर्तव्य करावे इतकाच हेतु होता पण टिळकाचा, केळकराच्या लिहिण्याप्रमाणे, याहून निराळ्या प्रकारचा हेतु असल्यामुळे, बिल पास होताच त्याची निराशा व्हावी व त्यानी ती हातात असलेल्या साधनाचा–केसरीचा उपयोग करून वाटेल त्या प्रकारच्या भाषेत व्यक्त करावी यात अस्वाभाविक असे काही नाही बाकीच्या लोकाजवळ असली स्वाधीनची साधने होती कोठे ? आणि समतिवयाचे बिल पास झाले म्हणून आनद किंवा दु ख करीत बसण्याला फुरसत किती जणाना मिळाली असती ? तेव्हा टिळकानी आठवड्याचे आठवडे केसरीत लेख लिहून आपली झालेली निराशा व्यक्त करावी यात आश्चर्य नाही पण आश्चर्य हे की, नरसोपत केळकरासारख्या समजस व सुशिक्षित गृहस्थानी केसरीतून टिळकानी कैक दिवसपर्यंत रानडे–भाडारकर–नूलकर–तेलग याच्यासारख्या पूज्य मडळीवर वाटेल तसल्या भाषेत पुष्पवृष्टि करून चालविलेल्या निदासत्राचा सबध बाराव्या प्रकरणात एका शब्दानेही उल्लेख करू नये व मुबईतल्या ठाकुरद्वारच्या सारस्वत ब्राह्मणाच्या सभेसारख्या अप्रस्तुत विषयाचा काथ्याकूट करीत बसण्यात भूषण मानावे ! सज्जनाचा छळ करण्यात कोणास किती व कसे सुख वाटत असते याचे दाखले प्राचीन साधुसत एकनाथ—नामदेव वगैरे याच्या ग्रथातून तर भरपूर मिळतातच, पण एकाद्या बाबतींत मतभेद झाला म्हणून थोर व्यक्तीवर एकादा आधुनिक सुशिक्षित मनुष्यदेखील कसा तुटून पडतो व मन पूत लिहीत सुटतो हें ज्याला पाहावयाचें असेल त्याने ता २४–३–९१ व ता. ७–४–९१ चे केसरीचे अक जरूर वाचावे आम्हीं इकडे फक्त त्यातून काही वाक्ये मासल्याकरिता देतो.

" ज्या लोकानी या मठ हिंदु समाजाचें न ऐकता सरकारनें बेलाशक कायदा करावा असे सरकारचे कान फुकून सरकारास आमच्यावर जुलूम करावयास लाविलें इतकेच नव्हे तर लोकमताचा पाडाव करून त्याबरोबर आपले व लोकाचे पाय मोडून टाकले, असल्या "**घरभेदी मंडळी**"**ची** अगोदर अपणास नीट व्यवस्था लाविली पाहिजे ही मडळी शहाणी सुरती असेल पण याचा आपणास काहीएक उपयोग नाही + + + करिता याचा विश्वास धरू नका इतकेच नव्हे तर, त्याचा व आपला इतउत्तर जितका सबध तुटेल तितका सबध तोडला पाहिजे. **ही मंडळी आमची पुढारी नव्हत,** व त्याजकडून आमचे काही एक कार्य व्हावयाचे नाही. + + + शरीराचा एकादा भाग सडल्यास तो कापून काढावा लगतो, तद्वतच या मडळीसबधाने आपणास वर्तन केले पाहिजे "

( केसरीचा २४–३–९१ चा अक पाहा )

ता ७–४–९१ च्या केसरीत "**संबंध कां तोडला पाहिजे ?**" या लेखात आरभी, रानडे, भाडारकर, तेलग हे विद्यालकृत दुर्जन आहेत असे,

**दुर्जनः परिहर्तव्यो विद्ययालंकृतोऽपिसन् ।**

या अवतरणानें दाखवून व या रीतीने वाचकाना त्याची ओळख करून देऊन जो मजकूर लिहिला आहे त्यातून एक दोन वाक्येच देतो —

" हे सरकारचे बदे दास आम्हास केव्हा फसवतील याचा नेम नाही, व जोपर्यंत आम्हास याचा विश्वास नाही तोपर्यंत अर्थात्च आम्हास याचा सबध तोडला पाहिजे." "आमची हल्ली जी पायमल्ली होत आहे तीस कारण आमचेच लोक आहेत त्यास खड्याप्रमाणें निवडून काढून आपली समाजबधने पूर्ववत् दृढ करा, एवढीच लोकास विनति आहे "

ही जी काही केसरीच्या लेखातून वाक्ये इकडे दिली आहेत, त्याविषयी जास्त लिहिण्याचे कारणच नाही त्यातील काही वाक्यरचना व वाक्ये टिळकाच्या अनुयायापैकी काहीनी इतकीं तोडपाठ करून टाकली होती की वरीलपैकी कोणत्याही पूज्य पुढाऱ्याविषयी लिहावयाचा प्रसग आल्यास " घरभेदी, " "देश-बुडवे " वगैरे शेलक्या विशेषणानी त्याना सबोधावयाची जी वहिवाट सुरू झाली ती परवा परवापर्यंत चालू होती ! आता मात्र ती विशेषणे फारशीं ऐकू येत नाहींत. याचे मुख्य कारण हे कीं, ज्या समाजसुधारणेच्या बाबीविषयी वरील सारखे कडाक्याचे वादविवाद पन्नास वर्षांपूर्वी महाराष्ट्रात झाले त्या सर्व बाबी

आज लोकानीं अमलात आणून भाडारकर–रानडे–तेलग यांच्या सामाजिक धोर-णावर आपल्या पसतीचा छाप कधीच मारला आहे! त्यामुळे समतिवयाचा कायदा तर आता निर्माल्यवत् झाला आहे! स्त्रीशिक्षणाचा अश्रुतपूर्व प्रसार झाला आहे, व होत आहे मुला मुलीचीं लग्ने आता मोठेपणीच होत आहेत. विधवाविवाहाचे पाऊल पुढे पडत आहे जातिबधनें पूर्वीच्या मानानें शिथिल होत चालली आहेत मागसलेल्या जातीत व अस्पृश्य जातीत आता बरीच जागृति होऊन त्या त्या जातींतले लोक आपली सुधारणा करून घेण्याकरिता झटत आहेत. तात्पर्य, चाळीस पन्नास वर्षापूर्वीची परिस्थिति आता राहिली नाही तथापि मधून मधून केव्हातरी रानडे, भाडारकर किंवा तेलग याविषयीं लिहिण्याचा प्रसग आल्यास टिळक सप्रदायातील एकाद्या लेखकाला आपल्या मामूलवहिवाटीचे स्मरण होते, पण त्याला बहुधा लेखणी आवरावी लागते तथापि सरळ मनाच्या माण-साना सदरील पूज्य पुढाऱ्याचे स्मरण झाल्याशिवाय राहात नाही. परवा पुण्याच्या कन्याशाळेतील एका समारभाचे वेळी सागलीच्या सौ राणीसाहेबानी जो आपल्या भाषणात तेलग, रानडे, भाडारकर याच्या नावाचा गौरवयुक्त उल्लेख केला तो अगदीं योग्य होता

---

## प्रकरण पचविसावे.

# पेशवाईतील सामाजिक धोरण.



समतिवयाच्या बिलासबधाने जो काही दिवस वाद चालला होता त्यात कित्ये-काकडून अनेक अवातर मुद्दे निघाले होते कित्येकाची—किंबहुना बऱ्याच लोकाची—अशी समजूत होती कीं सुधारणेची कल्पना किंवा प्राचीन काळापासून आमच्यामध्ये प्रचलित असलेल्या आचारात शिथिलता राहू देण्याची प्रवृत्ति इग्लिश लोकाचे देशात राज्य आल्या दिवसापासून सुरू झाली. त्याच्या पूर्वी ती नव्हती पण ही समजूत चुकीची आहे आमच्या बऱ्याचशा आचारात धर्माचा अगर शास्त्राचा प्रत्यक्ष असा सबध फार थोडा असतो. "शास्त्राद्रूढिर्बली-यसी" हाच केव्हा केव्हा नियम होऊन बसतो. पण पुढे काय होते ? परिस्थिति अमळ बदलली की कित्येकास त्या रूढीपासून गैरसोय उत्पन्न होते. मग ती त्या

लोकांच्या बाबतीत सैलावत जाते दुसऱ्या काही चाली अशा असतात की, त्या काही काही राजकीय कारणानी बदलतात तिसरी एकादी रूढि अशी असते की, ती दुसऱ्याच काही कारणानी बदलते याप्रमाणें एकदा एक कारण घडले व रूढि बदलली म्हणजे " यद्यदाचरतिश्रेष्ठस्तत्तदेवेतरोजन " या न्यायाने इतर लोक देखील तसेच वागू लागतात व काही दिवसानी हीच मग रूढि होते व पहिली मागे पडते असा आमच्या देशात प्राचीनकाळापासून प्रकार चालत आला आहे.

दुसरा एक मुद्दा असा होता की, आमच्या धार्मिक किंवा सामाजिक चाली-रीतीत हात घालण्याची बुद्धि सरकारास,—ते सरकार परकीय आहे म्हणून—झाली. आमच्या लोकाचीच सत्ता असती तर तसा प्रकार झाला नसता या मुद्याच्या बुडाशी देखील बरेंच अज्ञान आहे ते घालवून खरा प्रकार काय होता हें लोकास समजावे म्हणूनच न्या तेलगानीं आपल्या " Gleanings from Maratha Chronicles " या निबधात हा विषय घेऊन त्याचे विवेचन केलें आहे आम्हा महाराष्ट्रीय लोकाना पेशवाई अगर मराठेशाही ही कालदृष्ट्या जवळची असल्यामुळे त्या वेळची आमची सामाजिक अगर धर्मदृष्टीने स्थिति हल्लीच्या स्थितीहून फार भिन्न होती असे नाही त्या वेळी आमच्यामध्ये बालविवाह होता. विधवा पुनर्विवाह-प्रतिषेध होता स्त्रीशिक्षण नव्हते सतीची चाल होती. व दुसऱ्या अशाच काही—हल्ली अगदीं जुन्या मताच्या मडळीत ऐकू येणाऱ्या—समजुती व कल्पना होत्या. पण त्यात प्रसगानुसार कसा ढिलेपणा येत होता व काही गोष्टीना त्या वेळचे जबाबदार अधिकारी देखील लोक कसे इष्ट दिशेनें वळण लावीत होते हे तेलगानी आपल्या वर सागितलेल्या निबधात अति सुदर रीतीने दाखविले आहे त्या निबधाचा मागें एकदा उल्लेख आलेलाच आहे. परंतु प्रस्तुत तेलगाच्या सामाजिक कामगिरीचें विवेचन चालू असल्यामुळें त्यात त्यानी पेशवाईमधल्या खऱ्या प्रकारा लोकास ज्ञान करून देऊन त्याची सामाजिक सुधारणेच्या बाजूस कशी प्रवृत्ति उत्पन्न करण्याचा किंवा असलेली प्रवृत्ति दृढ करण्याचा प्रयत्न केला हें सागणें जरूर आहे. म्हणूनच त्या त्याच्या निबधाचा अगदी थोडक्यात इकडे साराश देतो.

आपल्या हिंदुस्थानच्या इतिहासांत शिवाजी हा एक अगदी लोकोत्तर पुरुष होऊन गेला. परंतु त्याच्या वेळच्या लष्करी पेशाचा अगर लष्करी दृष्टीने देशात चालू असलेल्या धामधुमीचा विचार केला म्हणजे त्याला राज्यव्यवस्थेच्या निर-

निराळ्या अगाकडे लक्ष पुरवून त्याची पायाशुद्ध कशी माडणी करता आली याचें खरोखर आश्चर्य वाटते व त्याबद्दल अभिमान वाटतो ! यावरून त्याच्यामध्ये केवळ शूरत्व व धाडस इतकेच गुण होते असे नाहीं, तर त्याचे ठिकाणीं मुत्सद्दी-पणा व बुद्धिमत्ता हींही होती. अष्ट प्रधानाची—म्हणजे Cabinet ची—कल्पना तर त्याच्या बुद्धिवैभवाचीच द्योतक होती त्यात पुन आश्चर्याची गोष्ट ही की, बाकी सर्व खात्याबरोबर धार्मिक दृष्टीनें आचार, व्यवहार, प्रायश्चित्त—या प्रकरणाची व्यवस्था लावण्याकरिता त्याने अष्ट प्रधानामध्ये एक "पडितरावा"ची योजना केलेली होती, व त्याच्याकडे निरनिराळ्या प्रकारच्या शाति, अगर सरकार तर्फे इतर धर्मकृत्ये करणें, राज्यातील धर्मादायाची व्यवस्था करणें वगैरे कामे सोपविण्यात आली होती. आणि त्यात मुख्य मुद्याची गोष्ट सागावयाची म्हणजे ही की, शिवाजीने आपली सर्व राज्यव्यवस्थेची योजना परपरागत वहिवाटीला अनु-सरून केली होती. साराश, शिवाजीच्या वेळेपासून मराठ्याच्या सर्व राज्य-व्यवस्थेत धर्माला व आचाराला—Church and State—महत्वाचे स्थान होतें. व त्याप्रमाणें सन १७१६ सालच्या एका आज्ञापत्रकांत कोल्हापूरच्या छत्र-पति शभु महाराजांचा देशपाडे, कुळकर्णी याना असा हुकूम होता की, राज्यात धर्माला विरुद्ध अशा पाखड मताचा प्रसार होऊ देता कामा नये. जर कदाचित् कोणाच्या हातून असा प्रकार घडलाच तर त्याबद्दलची पडितरावाकडून चौकशी केली जाऊन अपराधी मनुष्यास दड किंवा शिक्षा झाली पाहिजे व दुसरे लोक त्याचे अनुकरण करणार नाहीत असा बदोबस्त झाला पाहिजे.

शाहू महाराजाच्या वेळी व बाळाजी बाजीराव पेशवा असताना ब्राह्मण–प्रभु प्रकरण उपस्थित झाले होते. हा वाद फार जुना होता तो शिवाजीच्या वेळीही त्याच्या कारकीर्दीच्या सुरवातीसच निघाला होता. पण त्या वेळी जो निकाल देण्यात आला तो शिवाजीच्या, संभाजीच्या व राजारामाच्या कारकीर्दीत इतकेच नव्हे तर खुद्द शाहूच्या कारकीर्दीत देखील प्रथम प्रथम पाळला गेला होता. पण शाहूच्या कारकीर्दीच्या अखेरीस तो वाद पुनश्च उपस्थित झाला. याचे मुख्य कारण म्हणजे शाहूच्या दरबारात प्रभु लोकाचे जास्त वजन होतें. पण तसे ते शिवाजीच्या वेळीही होते ! प्रभु लोकाचें म्हणणें असे होतें की, त्यांच्या जातीला कमीपणा आणण्याकरिता ब्राह्मणानीं काहीं धर्मग्रथात—विशेषेकरून सह्याद्रि खडात—नवीन प्रक्षिप्त श्लोक करून मुद्दाम घुसडून दिले आहेत ! प्रकरण नानासाहेबांपुढें येताच त्यानी आपलें असें मत दिलें कीं, पूर्वीच्या वहिवाटीप्रमाणे

वागण्याचा स्पष्ट हुकूम द्यावा आणि ब्राह्मणांनी चालविलेल्या भाडणाला उत्तेजन मुळींच देऊ नये. शाहू महाराजानीं त्याप्रमाणें कृष्णेच्या तीरावरील खडे व माहुली परगण्यातील ब्राह्मणाना असे हुकूम सोडले कीं, सर्व वैदिक विधि जसे विजापूर बादशहांच्या अमदानीत, त्याचप्रमाणें, शिवाजी महाराज, सभाजी, राजाराम व ताराबाई यांच्या कारकीर्दीत व चालू—शाहूच्या कारकीर्दीत देखील प्रथम प्रथम चालविण्याची वहिवाट होती तीच पुढें चालवावी. हुकुमात असें स्पष्ट म्हटलेलें होते की "नवीन पद्धत पाडू नये व जुनी पद्धत सोडू नये" परतु हा हुकूम शाहूच्या तर्फे सातान्यास सर्व व्यवस्था पाहणारे प्रतिनिधि जगजीवनराव पडित व त्याचा गुमास्ता यमाजी याना कबूल नव्हता याचे कारण एवढेंच की, शाहूचा अत काळ जवळ आला होता ! मग शाहूच्या पाठीमागून त्या हुकुमाला कोण विचारतो? परतु शाहूचा अत झाल्याबरोबर नानासाहेब पेशवे यानी प्रतिनिधि व त्याचा गुमास्ता यमाजी या दोघानाही ताबडतोब तुरुगात टाकले व प्रभु लोकाच्या घरी सर्व धर्मकृत्यें पूर्वीप्रमाणेंच वेदमत्रानी चालवावी असे सक्तीचे हुकूम सोडले. तीच वहिवाट थोरल्या माधवरावाच्या कारकीर्दीच्या शेवटपर्यंत—म्हणजे नारायणरावाच्या कारकीर्दीच्या सुरवातीपर्यंत चालू होती.

सवाई माधवरावाच्या वेळी एक "नरहरि रनळेकर" नावाचा ब्राह्मण "यवनमय आणि भ्रष्ट" झाला होता. म्हणजे त्यानें हिंदुधर्म टाकून मुसलमानी धर्माचा स्वीकार केला होता. त्याला पैठणच्या काहीं ब्राह्मणानी प्रायश्चित्त देऊन परत हिंदुधर्मात घेतला होता. परतु पेशव्याच्या मतें हें करणें बरोबर नव्हतें. या प्रकारानें पैठणच्या ब्राह्मणांत दुफळी झाली. परतु पुढे काहीं दिवसानी एका सरकारी कामगारानें सर्व—बहिष्कृत झालेले व इतर—ब्राह्मणाना जेवावयास बोलावून सक्तीने सगळ्याची एकच पगत केली. म्हणजे ह्याचा सर्थ असा कीं, पैठणची सगळी ब्राह्मण जातच बहिष्कृत झाली ! मग पेशव्यानी दोन कारकून मुद्दाम पैठणास पाठवून पैठण गावातील ब्राह्मणाना प्रायश्चित्त देवविलें. इतकेच नव्हे तर सबध जालनापूर परगण्यातील—जसा ज्याचा पैठणच्या ब्राह्मणाशीं सबध आला असेल तसें—सर्व ब्राह्मणाना त्याच दोन कारकूनाच्या रुजवातीनें प्रायश्चित्त देवविलें ! या सर्व प्रकारांत सबध परगण्यांतील ब्राह्मणाना—एकासही न सोडता—प्रायश्चित्त देवविण्यामध्यें जो एक प्रकारचा काटेतोलपणा दिसून येतो तो खरोखरच विचार करण्यासारखा आहे ! असाच—बरोबर सबध गावचा गाव बहिष्कृत समजून सर्व ब्राह्मणाना प्रायश्चित्त देण्याचा—प्रकार नतर काहीं वर्षांनीं ( सन १८००

च्या आक्टोबरमध्यें ) खुद्द पुण्यास घडून आला. त्या वेळी नानाफडणवीस व परशुरामभाऊ पटवर्धन हे दोघेही स्वर्गस्थ झाले होते. तेव्हा एकदा असे आढळून आलें कीं, पेशव्याच्या वाड्यातील नोकर माणसात जो एक ब्राह्मण जातीचा म्हणून समजून नोकर ठेवण्यात आला होता, तो जातीनें जिनगर होता ! पुढे ही गोष्ट उघडकीस आली तेव्हा त्या मनुष्याला शिक्षा करण्यात आली व मग सबध पुणें शहरातील ब्राह्मणाना ससर्ग दोषास्तव प्रायश्चित्त देवविण्यात आलें !

बाळाजी बाजीराव पेशव्याच्या वेळी एक मोठ्या गमतीचे प्रकरण उपस्थित झाले होते. त्यातील खरी गमत त्या प्रकरणाचा निकाल लावण्यात होती त्रिबकेश्वर येथील गोसाव्यामध्ये गिरी व पुरी अशा दोन जाती होत्या एकदा सिंहस्थ पर्वणी आली त्या वेळी नदीत प्रथम स्नान करण्याचा मान कोणाचा याविषयी त्या दोन जातीत वाद उपस्थित झाला गिरी गोसावी म्हणत की, तो मान आपला ! व पुरी गोसावी म्हणत तो मान आपला ! तटा काहीं केल्या मिटेना दोन्ही पक्षाच्या लोकाची मारामारी जुपली व प्रकरण पुण्यास पेशव्यापुढे आले सदाशिवरावभाऊनी सागितलें की त्रिंबकला येऊन तटा मी मिटवितो ! त्रिबकेश्वरचे दोन्ही पक्ष त्याला कबूल झाले सदाशिवराव भाऊ त्रिंबकला गेले व त्यानी दोन्ही पक्षाच्या महताना बोलावून त्यापैकी एका महताचे दोन्ही हात आपल्या एका हातात धरून दुसऱ्या महताचे हात दुसऱ्या हातात धरले व “ चला माझ्याबरोबर ” असे म्हणून त्या दोघाना बरोबर घेऊन सदाशिवराव भाऊ कुशावर्त नदीत शिरले ! दोघेही महत बरोबरच नदीत शिरताच त्याच्या मधील पहिल्या मानासबधाचा वाद आपोआप मिटला ! !

पेशव्याला लोकाच्या विरोधामुळे आपल्या मनाप्रमाणें केव्हा केव्हा वागता येत नसे त्याचे तेलगानी एक उदाहरण दिलें आहे ते पहिल्या बाजीरावाच्या वेळचे आहे. त्याची मस्तानी नावाची एक रखेली होती हें सर्वास माहीत आहे. तिच्यापासून त्याला एक मुलगा झाला होता. बाजीरावाच्या मनातून त्या मुलाची मुज करून त्याला ब्राह्मण बनविण्याची इच्छा होती. पण ती ब्राह्मणाच्या विरोधामुळें पूर्ण झाली नाही तेलगानीं एक आधार दिला आहे त्यावरून असें दिसते कीं, बाजीराव व मस्तानी याच्यामध्यें—खरें खुरें लग्न नसलें तरी—काहीं विधि केला जाऊन लग्नाची बतावणी तरी करण्यात आली होती, इतके खरें. त्याची पूर्वीची थोडीशी हकीकत अशी आहे की, मस्तानी ही हैदराबादच्या निजामाची

मुलगी होती तिच्या आईने निजामास सुचविलें होते की, मस्तानीचें बाजीरावाशी लग्न करून दोघाचा स्नेहसबध दृढ करावा ! त्याप्रमाणें लग्न झालें, पण ते कट्या-रीशी झाले ! बाजीरावाने मग मस्तानीला पुण्यास आणली व तिच्याकरिता शनवारवाड्याच्याच आवारात एक स्वतत्र वाडा बाधून त्यात तिला ठेविलें !

तेलगाच्या वेळी सामाजिक सुधारणेची पुष्कळ दिवस चर्चा चालली होती. त्यात कन्याविक्रयाच्या चालीचा उल्लेख वरचेवर येत असे त्याला अनुलक्षून तेलगानीं एक पेशवाईतला दाखला दिला आहे व त्यात तशा गर्हणीय व्यवहारात सबध असलेल्या सर्वानाच शिक्षा करण्याबद्दल पेशव्यानी एकदा हुकूम सोडल्याचे सागितले आहे. त्या हुकुमात वाई प्राततील ब्राह्मणांचाच मुख्यत उल्लेख आहे. त्या अर्थी ही कन्याविक्रयाची चाल त्या प्राततच त्या वेळी जास्त प्रचलित होती असे स्पष्ट होतें पेशव्याचा हुकूम सर्व पाटील, कुळकर्णी, देशपाडे वगैरे गाव-कामगार याना उद्देशून असून त्यात असें स्पष्ट सागितले होते की, मुलगी विकून जो पैसे घेतो त्याने घेतलेल्या रकमेच्या दुप्पट रक्कम सरकारला दड भरला पाहिजे, मुलगी विकत घेणारानें जेवढे तिचे पैसे दिले असतील तितका दड भरला पाहिजे, व जो एजट असेल त्यानें मिळालेल्या कमिशनच्या इतका दड भरला पाहिजे. तेलग म्हणतात —

"It is unnecessary to say anything more with reference to this order, than that its all embracing character deserves notice. All parties to the nefarious transaction are hit at, the man who sells his girl, the man who buys her, and the man who arranges the bargain and sale."

एकदरीत मराठेशाहीमध्ये राजे लोक धर्माच्या कामात सरकार या नात्यानें हात घालीत असत, इतकेच नव्हे तर आपण त्या बाबतीत सोडलेले हुकूम अम-लात आणले जातील असा पक्का बदोबस्तही करीत असत. व हा प्रकार मराठे राजाच्याच अमदानीत चाले एवढेंच नव्हे तर तो ब्राह्मण पेशव्याच्या वेळींही चालत असे. इतकेच कीं, पेशवे असल्या प्रकरणांत हुकूम देत असत तेव्हां त्यावर मराठे राजाचा शिक्का घेत असत, आणि तें एका अर्थी बरोबरच होतें. राजानें किंवा सरकारने कोणत्याही धर्मसबधीं बाबी आपल्या अधिकाराबाहेर

आहेत असे मानावे ही कल्पना अद्यापि सर्वमान्य झाली नाही शिवाय, दुसरी गोष्ट अशी की शिवाजीने स्वराज्य स्थापन करण्याकरिता म्हणून जो एवढा उद्योग आरभला होता त्याचा मूळ हेतुच जर हिंदुपदपादशाहीची म्हणजे मुसलमान लोकांपासून हिदु धर्मांचे सरक्षण करण्याकरिता हिंदु राज्याची स्थापना करावी असा होता, तर ब्राम्हण पेशव्यानी देखील वरीलसारख्या धर्मसबधी बाबतीत सोडलेल्या हुकूमावर मराठे राजाचा शिक्का घेण्याची खबरदारी घ्यावी हे योग्यच होतें तिसरी गोष्ट अशी की, शिवाजी राजाचा आपणास क्षत्रिय मानण्याचा हक्क बराच लोकमान्य होऊ लागला होता, त्या अर्थी राजाचे हक्क किंवा सर्व राजचिन्हे ही मराठे राजाना लागू करण्यास हरकतच नव्हती वस्तुत. कलियुगात ब्राह्मण व शूद्र या दोन जातीशिवाय दुसरे वर्ण राहिलेच नाहीत असे ब्राह्मण लोक नेहमी सागत असतात आणि " नदवशीय राजाबरोबरच क्षत्रिय वर्ग नष्ट झाला " अशा भागवत पुराणातील वचनाचा त्याला ते आधार देत असतात, ही गोष्ट खरी आहे; पण शिवाजीच्या बाबतीत त्या भागवतपुराणातील वचनाचा ब्राह्मण लोक विचार करीत असतील असे वाटत नाही शिवाय शिवाजीचा—आपणास क्षत्रिय म्हणविण्याचा—हक्क खुद्द समर्थ रामदास स्वामीनींच कबूल केला होता, तेव्हा त्या बाबतीत कोणता आक्षेपच राहात नव्हता याहीपेक्षा एक चवथे कारण सागता येईल की, राजा म्हटला की त्याच्यात ईश्वरी अश असतोच असतो. प्रत्यक्ष मनुस्मृतिच म्हणते —

**अराजके हि लोकेऽस्मिन् सर्वतो विद्रुते भयात् ।**
**रक्षार्थमस्य सर्वस्य राजानमसृजत्प्रभुः ॥ १ ॥**
**इंद्रानिलयमार्काणामग्नेश्च वरुणस्य च ।**
**चंद्रवित्तेशयोश्चैव मात्रा निर्हृत्य शाश्वतीः ॥ २ ॥**
**तस्मादेषां सुरेंद्राणां मात्राभ्यो निर्मितो नृपः ।**
**तस्मादभिभवत्येष सर्वभूतानि तेजसा ॥ ३ ॥**
**बालोऽपि नावमंतव्यो मनुष्य इति भूमिपः ।**
**महती देवता ह्येषा नररूपेण तिष्ठति ॥**

आणि या तत्वाचा फायदा एका बखरकारानें जर खुद्द दिल्लीच्या मोगल बादशहाला देखील दिला आहे, तर शिवाजी किंवा सभाजी याना तर तो—राजामध्ये ईश्वरी अश असल्याचा—फायदा हक्कानेच प्राप्त होतो. असो.

येथें एक गोष्ट सागण्यासारखी आहे शिवाजीनें स्वराज्याची स्थापना जरी हिंदु धर्माच्या सरक्षणाकरिता केली होती, तरी त्याच्यात इतर धर्मांविषयींही जी सहिष्णुता दिसून येत असे ती पाहून–त्या धामधुमीच्या कालाचा विचार केल्यास– खरोखर आश्चर्य वाटते ! यासबधानें तेलगानी कृष्णाजी अनत सभासद यानें लिहिलेल्या शिवाजीच्या चरित्रातून एक दाखला दिला आहे आपल्या राज्यव्यवस्थेत हिंदुलोकाचीं देवळें किंवा इतर धर्मसस्था याची व्यवस्था नीट चालविण्याकरिता देणग्या देताना शिवाजी महाराज मुसलमान लोकाच्या मशिदी, पीर, वगैरे धर्मसस्था चालविण्याची तजवीज करण्यास विसरले नाहीत ! मुसलमान लोकाच्याही धर्मसस्थामधून—मशिदींतून दिवाबत्ती, नमाज वगैरे चालू राहावेत म्हणून शिवाजी महाराजानीं त्याना देणग्या दिल्या आहेत ! सभासद यानीं शिवाजीचें चरित्र हे सन १६९४ मध्ये राजारामाच्याच आज्ञेवरून लिहिल्यामुळें सदरील प्रकार विश्वसनीय आधारानेंच दिलेला आहे याबद्दल शकाच राहात नाही

पण असल्या हिदु लोकाच्या धर्मसबधी प्रकरणाचा निकाल करण्याचे प्रसग मुसलमान राजानाही येत असत एकदा कोकणातील ब्राह्मण व प्रभु याच्यामध्यें वेदोक्तासबधाने वाद उपस्थित झाला तेव्हा त्यानी तो तिकडेच असलेल्या विजापूर सरकारच्या अधिकाऱ्यापुढें नेला तो अधिकारी बिचारा अर्थात् मुसलमान होता त्याला आमच्या हिंदु धर्मशास्त्रातल्या भानगडी समजणार कशा ? त्यानें दोन्ही पक्षातल्या लोकास सागितले की, मला तुमचे शास्त्र समजत नाही, तुम्ही काशीला जाऊन तिकडील पडिताकडून तुमच्या वादाचा निकाल लावून घ्या व तो मला कळवा मग मी त्याची बरोबर अमलबजावणी करीन लागलीच ब्राह्मण व प्रभु अशा दोन्ही पक्षाचे लोक काशीस गेले व तिकडे पडिताची सभा भरून तिच्यात कडाक्याचा वादविवाद झाला, आणि अखेर प्रभु हे क्षत्रिय असून त्यांना गायत्रीमत्राचा व सर्व धर्मकृत्यें वैदिक मत्रानीं करण्याचा अधिकार आहे असें ठरलें ब्राह्मणाचें समाधान झालें व त्या निकालाप्रमाणें प्रभूच्या घरी वेदोक्त कर्मे करण्याचे त्यानीं कबूल केलें आणि याप्रमाणेंच पुढें वहिवाट चालली.

खुद्द शिवाजीचा बाप शहाजी याच्या लग्नाची जी हकीकत नमूद आहे, तिच्यायोगानें वरील प्रकाराचेच—मुसलमानराजानें हिंदुलोकाच्या धर्मसबधी व्यवहारात हात घालण्याची वहिवाट होती याचें—समर्थन होतें लखजी जाधवराव हा एक निजामशाहीतला मनसबदार होता त्याच्या हाताखालीं मालोजी व विठोजी असे दोघेही भाऊ नोकरीस होते. एकदा शिमग्याचा सण आला असता सन १५९८ मध्यें

रंगपचमीच्या दिवशी जाधवरावांच्या घरी बरीच मडळी जमली होती त्यात मालोजी आपला पाच वर्षांचा मुलगा शहाजी याला घेऊन हजर राहिला होता. शहाजी जरा अगापिंडाने देखणा मुलगा होता. त्याला जाधवरावाने घेऊन आपल्या तीन वर्षांच्या जवळच असलेल्या मुलीच्या शेजारी बसविले आणि सहज विनोदानें म्हटलें "पाहा हो जोडा कसा सुरेख दिसतो!" इतकेच नव्हे तर, त्याने त्या मुलीलाही पण "तुला हा नवरा आवडतो का?" असे विचारले. त्याबरोबर मालोजी व विठोजी या दोघाही भावानीं उठून जमलेल्या मडळीकडे वळून मोठ्यानें म्हटले की," पाहा हो, या मुलामुलीच्या लग्नाबद्दलचे जाधवराव वचन देत आहेत त्याला तुम्हीच साक्षी आहात" पण ही गोष्ट जाधवरावाच्या बायकोला आवडली नाही व तिच्या सागण्यावरून जाधवरावाने त्या दोघाही—मालोजी व विठोजी—भावाना नोकरीवरून दूर केलें. ते दोघे निघून गेले परतु पुढे त्याचा चागला उत्कर्ष झाला आणि ते दोन तीन हजार शिपायाचे पुढारी झाले व आणखी त्याना दुसऱ्या कित्येकाची मदत मिळली याप्रमाणें तयारी होताच ते दोघेही भाऊ दौलताबादेस आले आणि त्यानीं काहीं डुकरें मारून एका मशिदीत फेकून दिली इतकेच नव्हे तर त्यानी त्याबरोबरच काही पत्रेंही लिहून मशिदीत टाकून दिली आणि त्यात निजामाला स्पष्ट बजावून सागितलें की, "पूर्वीच करार केल्याप्रमाणे जाधवरावाने जर आपली मुलगी शहाजीला देऊन त्याचे लग्न केले नाही, तर राज्यातील इतर मशिदीही आम्ही अशाच रीतीने बाटवून टाकू!" त्याबरोबर निजामाने जाधवरावाला बोलावून आपल्या समोर आणविले व त्याला सागितले की, ठरल्याप्रमाणे लग्न झालें पाहिजे! अखेर शहाजीचे जाधवरावाच्या मुलीशी मोठ्या थाटाने खुद्द निजामाच्याच देखरेखीखाली लग्न झाले आणि मग निजामाने मालोजी व विठोजी अशा दोघाही भावाना आपल्या राज्यात मोठ्या नोकऱ्या दिल्या या सगळ्या प्रकारात लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट हीच की, त्या काळात हिदु प्रजाजन लग्नासारख्या नाजूक कामात देखील आपल्या मुसलमान-राजाचे सहाय्य मिळवीत असत व आपला कार्यभाग करून घेत असत

खर्ड्याच्या लढाईची जी बखर आहे त्यात धर्मसबधी खटल्यात एक न्याय करण्याचा जो प्रकार सागितला आहे तो खरोखरीच विचार करण्यासारखा आहे. सवाई माधवरावाची कारकीर्द चालू होती, तेव्हा तळेगाव येथील एक ब्राह्मण स्त्री एका मुसलमानाबरोबर व्यभिचार कर्म करून राहात होती तेथील ब्राह्मणानीं पुण्यास जाऊन सर्व हकीकत नाना फडणवीस यांस सागितली व म्हटलें कीं

"आता ब्राह्मण धर्माचे दिवस गेले!" नानानीं ब्राह्मणास उत्तर दिलें की, "तुम्ही म्हणता तसे नाहीं" पण त्यानी त्यासबधीं चौकशी करण्याकरिता पच नेमले. पचाची त्या मुसलमान मनुष्याने द्रव्य देऊन समजूत केल्याचे स्पष्टच दिसत होते. कारण अखेरचा निकाल सागण्याची वेळ यावयाच्या पूर्वीच पचाचा कल त्या मुसलमानाच्या बाजूस झुकलेला दिसत होता व ब्राह्मणानी केलेल्या आरोपात काही अर्थ नाही असे त्याचे मत झालें होते मग सुमारें शे दोनशे ब्राह्मण गोळा झाले व पुण्यास गेले पेशव्याची खर्ड्याच्या लढाईवर सैन्य घेऊन जाण्याची जगी तयार चालली होती ब्राह्मण हातात मशाली घेऊन भर दोन प्रहराच्या वेळी थेट पेशव्याच्या तबूसमोर आले व तिकडे ते सर्व ठाणे देऊन बसले पेशवे तबूच्या बाहेर पडताच ब्राह्मणानी एकदम "हर हर महादेव" असे मोठ्याने म्हटलें! ते ऐकताच पेशव्यानी "हे काय प्रकरण आहे?" म्हणून विचारलें. ब्राह्मणानी मग सर्व अथपासून हकीकत सागितली आणि म्हटलें की, "या राज्यात इतका अधेर आहे की, भर दिवसादेखील मशाली लावाव्या लागतात!" पेशव्यानी लागलीच नानाना बोलावून आणविले, पचाना आणविलें आणि शेवटी त्या बाईलाही आपल्या समोर आणविले! पेशव्यानी त्या बाईला—तिच्या विरुद्ध आलेल्या आरोपासबधी—प्रथम विचारताच ती काही एक बोलली नाही! त्या बरोबर पेशव्यानी "वेताच्या छड्या आणवा, हो!" असा एकदम हुकूम केला हे ऐकताच ती बाई कबूल झाली व "मी अपराधी आहे खरी" असे तिनें सागितलें. पेशव्यानी निकाल दिला की दोघेही गुन्हेगार आहेत व हा निकाल यज्ञेश्वर शास्त्री याना मान्य होता त्या मुसलमान मनुष्याला अशी शिक्षा फर्मावण्यात आली की, त्याची सर्व पुणें शहरातून गाढवावरून धिड काढावी व मग त्याला हत्तीच्या पायाला बाधून ठार मारवावे ह्या बाईला, ती स्त्री असल्यामुळें तिला देहात शिक्षा देता येत नाही, सबब हद्दपार करावी!

आतापर्यंत केलेल्या विवेचनावरून स्पष्ट झालेंच आहे की, मराठेशाहीत राजे हे केवळ धर्माच्या बाबतीत कायदेच करीत असत असें नव्हे, तर ते त्या कायद्याप्रमाणें पुढे आलेल्या प्रकरणाचा निकाल लावीत असत व कारकून वगैरे पाठवून त्या निकालाची अमलबजावणी करीत असत म्हणजे ते—हल्लीच्या भाषेंत सागावयाचे म्हणजे—legislative, judicial and executive powers—सर्व प्रकारचे अधिकार चालवीत असत, आणि ही पद्धत शिवाजीच्या वेळेपासून सवाई माधवरावाच्या कारकीर्दीपर्यंत सारखी चालू होती, असे तेलग आपल्या पुढील इतिहासाच्या साधनावरून म्हणतात

मराठेशाहीत वर्णाश्रमधर्माकडे राजकारणाच्या हेतूने दुर्लक्ष केलें गेल्याचेही तेलगानी काही दाखले दिले आहेत. मराठे राजे राज्यकारभारात धर्माची बाब आल्यास देखील त्यात हात घालीत असत याचें एक कारण ते आपल्यास क्षत्रिय म्हणवीत असत हें मागे सागितलेच या गोष्टीचा शिवाजीच्या चरित्रात व अन्य कागदपत्रात अनेकदा उल्लेख आलेला आढळतो त्याचा लक्षपूर्वक बारीक नजरेने विचार केल्यास असे दिसते की शिवाजीच्या क्षत्रियत्वासबधानें जो हक्क पुढे माडण्यात आला होता तो वस्तुत समर्थनीय नव्हता ! पण तो राजकारणाच्या दृष्टीने सर्वानी कबूल केला होता, इतकेच कारण शिवाजीचा उदेपूरच्या सिसोदे राजघराण्याशी सबध जोडण्याची कल्पना शिवाजीला राज्याभिषेक करण्याची कल्पना निघण्याच्या पूर्वी मुळीं निघालीच नव्हती ! पुढे राज्याभिषेक करण्याचे नक्की ठरल्यावर जेव्हा काशीहून गागाभट्ट याला बोलावण्यात आले, तेव्हा त्याच्या पुढे शिवाजीसबधाच्या सर्व गोष्टी ठेवण्यात येऊन "अशा स्थितीत राजकारणाच्या दृष्टीनें काय करणें योग्य वाटते ते सागा" असे त्याला विचारण्यात आले तेव्हा सर्व गोष्टीचा शात चित्तानें विचार करून अभिषेकाच्या कामात सामील होण्याचे त्याने कबूल केले. पण पुढें दुसरीच अडचण उत्पन्न झाली. राज्याभिषेक करावयाच्या पूर्वी क्षत्रियाची प्रथम मुज झाली पाहिजे असे शास्त्र असल्यामुळे शिवाजीच्या बाबतीत तोही विधि उरकण्याचे ठरले यात लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे ज्या शिवाजी राजाची मुज करावयाचे ठरले त्याचें पचेचाळीस किंवा पन्नास वर्षाचे वय झालेलें असून त्याला दोन मुलगे झाले होते. मुज झाली व त्यात सगळे पडित व ब्राह्मण सामील झाले होते ह्या गोष्टी खऱ्या आहेत, पण त्यानी वरील अडचणीतून आपला मार्ग कसा काढला, याचा कोठेच उल्लेख नाही असें तेलग म्हणतात त्याच प्रमाणे शिवाजीच्या कुटुबातील, फक्त जे राज्याच्या गादीवर बसले असतील त्याच्याशिवाय दुसऱ्या कोणाच्याच मुजी झाल्याचा कोठेंच दाखला मिळत नाही, व ज्याच्या झाल्या त्याच्या मुजीदेखील त्याच्या राज्याभिषेकाच्या वेळी झाल्या या सर्व गोष्टीचा विचार केला तर शिवाजीचा उदेपूरच्या राजघराण्याशीं सबध असल्याच्या व इतर अशाच हकीकती ज्या काही कागदपत्रात आढळून येतात त्या विश्वसनीय दिसत नाहीत, असें तेलग म्हणतात शिवाजीचे उदाहरण पाहून मग साताऱ्याचे राजे, शिंदे, नागपूरचे भोसले, घोरपडे वगैरे या मडळीनीही आपण क्षत्रिय असल्याचे सागितल्यास त्यात आश्चर्य नाही. खरा प्रकार काय होता याविषयी कृ अ. सभासद यानें

लिहिलेल्या शिवाजीच्या चरित्राच्या आधारानें तेलग असें म्हणतात कीं, गागाभट्ट हा काशीहून आल्यावर त्याचे शिवाजीनें जें थाटाचे आदरातिथ्य केलें ते पाहून तो फार सतुष्ट झाला व त्याने असे उद्गार काढले की " खुद्द मुसलमान बादशहा जर गादीवर बसल्यामुळे छत्र व इतर राजचिन्हे याचा उपभोग घेत आहे, तर ज्या शिवाजीनें इतका पराक्रम करून राज्य स्थापना केली त्याने राजचिन्हे धारण न करणे हे योग्य नाहीं " ही सूचना शिवाजीला ग्राह्य वाटली व मग जेव्हा त्याला राज्याभिषेक करण्याचे ठरले, तेव्हा मग त्याच्या वशाच्या पूर्वसबधाची चौकशी करणे व शिवाजी मूळी जन्मत च क्षत्रिय होता असें जाहीर करणे या गोष्टी ओघानेच प्राप्त झाल्या मुद्याची गोष्ट ही की, शिवाजीला राज्याभिषेक करणें जरूर होते व ती गोष्ट वर्णाश्रमधर्म व इतर गोष्टी याकडे—राजकीय परिस्थितीचा विचार करून—दुर्लक्ष करून उरकून टाकण्यात आली. तेलग या गोष्टीतला पुरावा पाहून म्हणतात —

" Taking the whole evidence together, it looks like a case of a more or less deliberate manipulation of facts and religious rules, in aid of a foregone conclusion adopted for a purely political purpose "

धर्मबधनें अगर जातिबधनें न पाळल्याचीं आणखी किती तरी उदाहरणें मिळतील. एक मराठेशाहीतील अगदी आरंभीचें आहे. शिवाजी व सभाजी असे दोघेही एकदा दिल्लीस औरगझेबाच्या कैदेंत होते, हे इतिहासज्ञास श्रुतच आहे. पण शिवाजीने मोठ्या युक्तीने आपली दोघाची मुक्तता करून घेतल्यावर शिवाजी दक्षिणेंत येण्यास निघाला, तेव्हा वाटेत जास्त अडचणी उत्पन्न होऊ नयेत म्हणून त्यानें सभाजीला काशीपत नावाच्या ब्राह्मणाजवळ दिल्लीस ठेविलें मुलगा जातीनें ब्राह्मण नसावा अशी बादशहाच्या काही नोकरास शका आली. पण काशीपतानें तो ब्राह्मणच म्हणून सागून वेळ मारून नेली परतु त्या लोकास पुन· पुन शका येऊ लागताच त्यानीं काशीपतास " मुलगा व तुम्ही एकाच ताटात आमच्या समक्ष बसून जेवून दाखवा " असें सागितलें. तरी " ठीक आहे " असें बोलून काशीपतानें खरोखरीच तसे करून दाखविलें. मात्र त्यांत त्यानें थोडासा पर्याय केला. म्हणजे एक केळीचें पान घेऊन काशीपतानें बादशहाच्या नोकरांसमक्ष त्यावर सभाजीस घेऊन दहीपोहे खाल्ले ! तेवढयावरून त्या लोकाची खात्री झाली

व त्यांनीं तसा बादशहास रिपोर्ट केला ! शिवाजीच्या एका चरित्रकारानें लिहिलें आहे की, काशीपतानें मग हळूच गुप्त रीतीनें प्रायश्चित्त घेतलें. त्याचें काहीं विशेष नाही. पण आपल्याजवळ असलेल्या मुदतीत काशीपतानें सभाजीस ब्राह्मणाच्या मुलाप्रमाणें धोतर नेसवावे, यज्ञोपवीत घालावें व त्याला आपल्याबरोबर ब्राह्मणाचा मुलगा म्हणून फिरवावे हे तरी आश्चर्यच ! सभाजीला हक्कानें जानवें घालावयास मिळालें ते सन १६७९ मध्ये—म्हणजे ज्या वेळी त्याला युवराज्याभिषेक करण्याचे ठरताच त्याची प्रथम मुज करण्यात आली त्या वेळी !

अशाच प्रकारची दुसरी एक गोष्ट शिवाजीच्या कुटुबात घडली होती. शहाजी वारल्यानतर जिजाबाईने सती जाण्याचा निश्चय केला. शिवाजीने तिला तसे करू न देण्याबद्दल खटपटीची, विनवणीची शिकस्त केली. पण ती ऐकेना ! तेव्हां शिवाजीने तिला निर्वाणीचे अस्त्र सोडून सागितलें की, "तू गेलीस तर माझ्या जीवाची मला पर्वा नाही. आणि मी गेल्यावर इतके राज्य स्थापन केले आहे तेही गेलेंच असे समज !" या निर्वाणीच्या अस्त्राचा उपयोग झाला व जिजाबाईने आपला बेत रहित केला !

ब्राह्मण पेशव्यानी क्षात्रधर्म स्वीकारल्याने वर्णाश्रमधर्म मोडला गेला हे तर उघडच आहे, पण ती गोष्ट महाराष्ट्रात इतकी परिचयाची झाली होती की, त्यात शास्त्रनियमाचा भग झाला होता ही गोष्टदेखील सामान्यत लोकाच्या स्मृतीतून गेली होती एकदा रामशास्त्र्यानीं थोरले माधवरावास स्नानसंध्येकडे जास्त लक्ष दिल्याबद्दल दोष दिला होता, यावरूनही तेंच सिद्ध होते शास्त्रीबोवानी पेशव्यास स्पष्ट सागितले कीं, "आपण क्षात्रधर्म स्वीकारला आहे, त्याअर्थी आपण स्नानसध्येकडे अधिक वेळ घालविणे योग्य नव्हे !"

एकदा खुद्द थोरल्या माधवरावानें एका मनुष्यास आपण "ब्राह्मण वगैरे काहीं पाहात नाही" असे स्पष्ट सागितलें होतें. माधवराव हैदरावर स्वारी करण्यास निघाला होता व त्यानें नेहमीच्या वहिवाटीप्रमाणे नागपूरचे राजे भोसले यास सैन्यात येऊन मिळण्याबद्दल बोलावणें केले. भोसल्याचा पुणें येथील वकील सखाराम बापूला त्याविषयी सल्ला विचारण्याकरिता गेला, तों तिकडे पेशव्याचा कारकून होता. त्याच्या समक्ष बापूच्याने भोंसल्याच्या वकिलास आपला सल्ला उघड रीतीनें देतां येईना ! सुदैवेंकरून तिकडे दुसरे दोघे बुद्धिबळें खेळत बसले होते. त्यांपैकीं एकाला उद्देशून बापू म्हणाले कीं, "त्याचीं प्यादी जर पुढें आलीं

आहेत तर तू आपल्या राजाला दोन घरें मागें घे." त्यावरून भोसल्याचा वकील बापूचा मतलब समजला व त्याबरोबर त्याने भोसल्यास पत्र लिहून कळविले की, "आपण पुण्यास न येता दोन मुक्काम मागे जावे ! " भोसले त्याप्रमाणें खरोखरीच वागल्यामुळे त्याचे पेशव्याच्या अपेक्षेप्रमाणे पुण्यास येणे झाले नाही ! राज्यात कोठे काय होत आहे याची बातमी काढण्यात माधवरावाचा हातखडा होता अशी त्याची प्रसिद्धि होती. कारकुनाने येऊन बापूच्या घरी घडलेली हकीकत पेशव्यास सागितलीच होती पेशव्यानी कारकुनास जरा उलट सुलट चार प्रश्न विचारल्यावर खरा प्रकार काय होता हे त्याच्या चटकन् लक्षात आले. माधवराव हा दृढनिश्चयाचा पुरुष होता त्याने ताबडतोब भोसल्याच्या वकिलास बोलावणें पाठवून आपणासमोर आणविले आणि त्यास सखाराम बापूच्या सल्ल्यावरून भोसले नागपुरास परत गेल्याचे सागितले, आणि म्हटले की, "भोसले पधरा दिवसाच्या आत पुण्यात हजर झाले तर ठीक आहे, तसे न झाल्यास या तबूच्या खुटीने तुमचे डोके फोडीन ! 'तुम्ही ब्राह्मण' हे मी मुळीच पाहणार नाही." तेलगाचे शब्द असे आहेत

"If your master is in Poona within fifteen days, well and good, if not, I will pay no heed to the fact of your being a Brahman, but will smash your head with a tent peg."

पण त्या वेळी ब्राह्मण जातीचे लोक इतर—वेदाध्ययन वगैरे सोडून—व्यवहार खुशाल करीत असत व त्याबद्दल कोणालाच काही वाटत नसे एका ब्राह्मण लेखकानें ब्राह्मण परशुरामभाऊ पटवर्धन याचा अत झाला तेव्हा त्याजविषयीं लिहिताना असे लिहिलें होते "भाऊसाहेबाचा शेवट एकंदरीत चागलाच झाला कारण त्यानीं क्षत्रिय या नात्याने पेशव्याची शेवटपर्यंत सेवा केली ! " इतकेच नव्हे, तर कयगावचे भिक्षुक व खुद्द धावडशीचे स्वामी हेदेखील व्यावहारिक—राजकीय—गोष्टींकडे फार लक्ष देत असत. सदरील स्वामीला पहिला बाजीराव व इतर लोक आपले गुरूच मानीत असत, व कयगावचे भिक्षुक तर पेशव्याना वगैरे व्याजाने पैसे देत असत व हे त्याचा पुष्कळच राजकीय बाबतीत सल्ला घेत असत.

परतु सरकारी दप्तरांत तेलगाना जें एक गोपिकाबाईचे पत्र मिळालें त्याचे फार मोठे महत्व आहे. ती सवाई माधवरावाची आजी. तिला त्याने " राज्यकारभारात

मी कसे वागू " असे विचारताच गोपिकाबाईनें त्याला एक पत्र लिहिले त्यात तिनें असें लिहिले, " तू आता स्नानसध्या कमी कर. घरचा ब्राह्मण देवाची पूजा करीतच असतो. तू फक्त देवास एक तुलसीपत्र वाहा, म्हणजे झाले " असा उपदेश गोपिकाबाईसारख्या वृद्ध बाईने सवाई माधवरावास—राज्यकारभारात शिरणाऱ्या तरुण मुलास—करावा हें खरोखरीच आश्चर्य आहे म्हणजे राजकारणामुळे खुद्द पेशव्याच्याच कुटुबात वर्णाश्रमधर्म कसा गुडाळून ठेविला जात होता हें यावरून स्पष्ट रीतीने सिद्ध होते गोपिकाबाई ही फार व्यवहारज्ञ स्त्री असून ती अत्यत हुशार व दृढनिश्चयी होती अर्थात् पेशवाईत कसकसे मोठमोठे पुरुषदेखील आपला पूर्वीचा वर्णाश्रमधर्म टाकून राजकारण करीत असत हे तिने प्रत्यक्ष पाहिलेले होते व त्याप्रमाणें तिने आपल्या नातवास वरील प्रकारचा उपदेश केला, ते ठीकच होते

पेशवाईत खाण्यापिण्याच्या बाबतीत देखील केव्हा केव्हा जातिबधने कशी बाजूस सारली जात असत याची तेलगानी काही उदाहरणे दिली आहेत. एकदा शाहूची प्रतिनिधि परशुराम त्रिंबक याजवरची त्याचा मुलगा कोल्हापुरकराच्या पक्षास जाऊन मिळाल्यामुळें मर्जी उडाली आणि त्याला ठार मारण्याचा हुकूम झाला शिक्षेची अमलबजावणी होणार इतक्यात खडोबल्लाळ चिटणीस याने मध्यें पडून प्रतिनिधीचा प्राण वाचविला ! तेव्हापासून पुढे कैक दिवसपर्यंत प्रतिनिधीच्या कुटुबात दरवर्षी श्राद्धाचे दिवशी ब्राह्मणाबरोबर चिटणीसाच्या कुटुबातील एकाद्या मुख्य पुरुषाला भोजनास बोलावण्यात येत असे ! त्याचप्रमाणे आणखी एकदोन प्रसगी घडले होते खर्ड्याची लढाई जिंकल्यावर मराठे सरदारात जिकडे तिकडे आनदी आनंद व्हावा यात आश्चर्य नाही जय मिळविल्यावर शेवटच्या दिवशीं सध्याकाळी पेशव्यानी नाना फडणवीस यास बरोबर घेऊन मुख्य सरदाराच्या छावण्यातून जाऊन त्याना भेटी दिल्या. त्याप्रमाणें पेशवे शिंद्याचे दोन मुख्य सरदार जिवबा दादा व लखोबा नाना याच्या तबूत त्याच्या भेटीस गेले भेटीस आलेल्या मडळीस रात्रीच्या फराळास राहण्याविषयी विनति करण्यात आली ! जिवबादादा व लखोबा नाना हे सारस्वत ब्राह्मण—शेणवी—होते व त्याचा व कोकणस्थाचा उघड अन्नव्यवहार होत नसे. वरीलप्रमाणे विनति केलेली ऐकताच पेशव्यानी लागलीच नाना फडणविसाकडे वळून म्हटले, "असे कसे करता येईल ? हे शेणवी आहेत " नानाने ताबडतोब उत्तर दिले, " काही हरकत नाही. ते शेणवी असले म्हणून काय झालें ? स्वयपाक आमच्याच ब्राह्मणानी तयार केला

आहे. आज जिवबाच्या इच्छेकडे आपणास दुर्लक्ष करता येत नाही त्यानीं आपली तरवार चागली गाजविली आहे तेव्हा सरदाराच्या बाबतीत असल्या अडचणी दूर सारल्या पाहिजेत " नतर पेशवे व बरोबर गेलेले दुसरे ब्राह्मण यानी एकत्र बसून सर्वानी फराळ केला पेशव्यानी औपचारिक रीतीनें थोडेसे काहीं घेतले व बाकीच्यानी नेहमीप्रमाणे बसून फराळ केला ! वरील प्रकार चालू वहिवाटीविरुद्ध होता असे सर्वास वाटले खरे, पण त्याला राजकारणाच्या दृष्टीने काहीं हरकत नाही अशीच सगळ्याची समजूत झालेली दिसली.

पेशवे मग जिवबाच्या तबूतून परशुरामभाऊ याच्या तबूत गेले तिकडेही सर्व मडळीस भोजनास राहण्याविषयी विनति करण्यात आली तिकडे जातीची आडकाठी नव्हती, पण दुसरी होती भाऊचा पुतण्या लढाईत पडल्यामुळें ते सुतकात होते सुतक्याच्या घरात भोजन कसे करावयाचे ? विनति ऐकताच पेशव्यानी पुन नानाकडे वळून म्हटले, "परशुरामभाऊ सुतकात आहेत तेव्हा करावयाचे कसे ?" नानाचे उत्तर तयार होतेच त्याने म्हटले, "काही हरकत नाही. भाऊच्या इच्छेविरुद्ध आज आपणास जाता येत नाही. सुतकासबधाच्या अडचणीचा मग विचार करता येईल !" नतर पेशवे व इतर बरोबरची मडळी यानी बसून भोजन केले. फक्त भाऊ तेवढे सुतकामुळें जरा बाजूस बसले. बाकीच्या सर्वांनी एकाच पक्तीला बसून भोजन केले बखरकार म्हणतो की, वरील प्रकारात पेशव्यानी दाखविलेले सौजन्य पाहून भाऊ पुतण्या गेल्यापासून झालेले सर्व दु ख विसरले व त्यानी पेशव्याकडे स्पष्ट उद्गार काढले की, "आपल्या आजच्या कृतीने माझ्या समरागणातील सर्व श्रमाचा पूर्ण परिहार झाला !"

याहीपेक्षा जेवण्या खाण्याच्या बाबतींत पेशवाईतल्या मडळीनी बरेंच पुढे पाऊल टाकल्याचा सवाई माधवरावाच्या लग्नासबधाच्या हकीकतीत दाखला मिळतो. तेलग म्हणतात की या बाबतीतला उपलब्ध असलेला पुरावा जितका सबळ व स्पष्ट असावा तसा नाही परतु जो मिळतो त्यावरून सुद्धा त्या वेळी खरा प्रकार काय घडला असेल याची सहज कल्पना होऊ शकते सदहू लग्नाच्या तयारीचा तपशिलवार खुलासा ज्यात केलेला आढळतो असें सन १७८२ सालचे एक टिपण—memorandum—मिळालें आहे त्यावरून पाहतां माधवरावाचा लग्नसमारभ फारच थाटाचा झाला एका ठिकाणी असा दाखला मिळतो कीं त्या लग्नाच्या कामांत जो नुसता कपडा लागला त्यातच मुळीं पन्नास हजार रुपये खर्च झाले

होते. पण बाकीच्या गोष्टी राहोत मुख्य महत्वाची गोष्ट ही की, लग्नाकरितां बोलावण्यात आलेल्या पाहुणेमंडळींत सर्व जातीचे व सर्व धर्माचे लोक होते. त्यात सरदार, शिलेदार, मराठे तर होतेच, पण त्यात मुसलमान, अली बहादुर वगैरे सर्व लोक होते आणि त्या सर्वांना नवरी मुलीच्या बापाच्या घरी फराळाकरिता व भोजनाकरिता न्यावे व तसेच त्याना पेशव्याच्या वाड्यात योग्य प्रसगी फराळास व भोजनास आणावे असे ( टिपणात ) स्पष्ट म्हटलेलें होते या सर्व व्यवस्थेत मराठे व मुसलमान याची जेवणास बसताना निराळी काही तजवीज केली होती की काय, किंवा सर्वांना ( त्याच ) एकाच भाड्यातून पदार्थ वाढण्यात येत होते किवा कसे, याबद्दलचा त्या टिपणात काहीच खुलासा नाही. त्याच प्रमाणे ब्राह्मणाची जेवणाखाणाची ज्या इमारतीत व्यवस्था करण्यात आली होती, त्यातच मराठे किंवा मुसलमान याची व्यवस्था करण्यात आली होती की काय याचाही टिपणात काहीच खुलासा नाही यावरून कल्पना काय करावयाची ?

येथपर्यंत पेशवाईत अन्नव्यवहाराच्या कामात, कोणत्याही कारणाने असो, कसकसा फेरबदल केला जात असे हे दाखविण्यात आले आता लग्नव्यवहाराच्या कामात पाहा या कामी काही सुधारणा करावी या हेतूने खुद्द पेशव्यानीच पुढें पाऊल टाकले होते, पण ती सुधारणा सर्वमान्य होऊन कधीच रूढ झाली नाही. पहिल्या बाजीरावाने मस्तानीशी केलेल्या सबधाची गोष्ट सोडून द्या. परतु बाळाजी बाजीरावाने स्वत कोकणस्थ असूनही राधाबाई नावाच्या देशस्थ ब्राह्मण स्त्रीशी विवाह केला होता त्याचप्रमाणें त्यानें कऱ्हाडे ब्राह्मणामधूनही आपली एक बायको केली होती असे म्हणतात पण त्याला लेखी पुरावा काहीं मिळत नाही असें करण्यात बाळाजीचा हेतु—देशस्थकोकणस्थ–कऱ्हाडे या तीन जाती एक करण्याचा–चागला होता पण तो अखेर सिद्धीस गेला नाही. ही दोन अडीचशें वर्षापूर्वीची गोष्ट अद्यापि या विसाव्या शतकात देखील असा एकादा–सदहू तीन जातीमध्ये –सबध घडून आल्यास कित्येक लोक नाके मुरडीत असतात ! फार काय, पण त्या तीन जातीत पूर्वी अन्नव्यवहार देखील होत नसे असे ज्ञानप्रकाशाच्या आधारानें तेलग म्हणतात.

"*The Dnyana Prakash* newspaper says that even dining together was extremely unusual among these three divisions before the times of Bajirao."

पण भर पेशवाईमध्यें देखील काही ठिकाणी नित्याची धर्मकृत्ये करणारे चागलेसे भिक्षुक मिळू नयेत ही आश्चर्याची गोष्ट आहे ! परशुरामभाऊ पटवर्धन याच्या एका अल्पचरित्रात असे सागितले आहे की भाऊचा अत होताच स्मशान-भूमीवर त्याच्या प्रेतदहनाची—सर्पण वगैरेची—सर्व तयारी झाली व जवळच्या एका खेड्यातून काही भिक्षुक बोलावण्यात आले हजर असलेल्या—नारो हरि करंदीकर—कारकुनाची इच्छा की भाऊच्या शवास मत्राग्नि द्यावा; पण त्या कामाकरिता चागलासा ब्राह्मण मिळाला नाही ! त्या खेड्यातले जोशी अगदी मूर्ख होते अखेर प्रेतास भडाग्नि देऊन कसे तरी काम चालवावे लागले !

अशीच शोचनीय—पण कदाचित् जरा कमी प्रमाणांत—स्थिति धावडशीच्या स्वामीचा अत झाल्यावरही दिसून आली ब्रम्हेद्र स्वामीच्या बखरीवरून—ह्या स्वामीला पहिला बाजीराव महापुरुष म्हणत असे !—असे दिसते की, त्याचा अत झाल्यावर पुढील सर्व क्रिया हजर असलेल्या ब्राह्मणानी केली ब्राह्मणाच्या हातात त्या धर्मविधीसबधाची पोथी होती तरी अखेर चूक—घोड चूक—व्हावयाची ती झालीच ! त्या वेळी शाहूराजा तिकडे हजर होता त्यानें ब्राह्मणास विचारलें, " काम सपलें का ? " त्यांनी म्हटले, " हो ! सर्व काम झाले " राजाने मग विचारलें, " पण सन्याशाचा प्रेतविधि करताना त्याच्या डोक्यावर शख मारून कपाळमोक्ष करावयाचा असतो असे म्हणतात. तसे तुमच्या पोथींत सागितलेले नाही काय ? " ब्राह्मणानी उत्तर दिले, " पोथीत तसे आहे खरें. पण तिकडे आमचे दुर्लक्ष झालें ! " राजानें मग त्या सर्व ब्राम्हणाची त्याच्या अज्ञानाबद्दल व अनवधानतेबद्दल चागलीच निर्भत्सना केली ! हे सन्याशाच्या उत्तरक्रियेसबधाचे भिक्षुकामध्ये दिसून आलेले अज्ञान क्षणभर क्षम्य तरी म्हणता येईल कारण असले प्रसग केव्हा तरी यावयाचे. परतु परशुराम भाऊच्या बाबतीत दिसून आलेलें ब्राह्मणाचे अज्ञान अगदी अक्षम्य होते असल्या धर्मविधीकडे दुर्लक्ष व तत्सबधाचें ब्राह्मणवर्गांत व्यक्त होणारे अज्ञान या गोष्टीचा अनुभव प्रस्तुत काळी कमी अधिक प्रमाणात येतच असतो. परतु तशी स्थिति पेशव्याच्या अमदानीत असावी हे आश्चर्य आहे.

उत्तरक्रियेसबधाने शास्त्रनियमाच्या बाहेर ज्यात वर्तन घडले होते असे आणखी एक पेशवाईतील उदाहरण देण्यासारखें आहे. प्रसिद्ध बापू गोखले व त्याचा चुलता धोंडोपत गोखले याची व धोंडी वाघ नावाचा एक लुटारु होता

त्याची एकदां झटापट झाली त्यात धोंडोपत पडला व बापू गोखले याला जखम झाल्यामुळे त्याला चुलत्याच्या सहायास जाता आलें नाही. बापूने सदहू प्रसग घडला त्या ठिकाणी धोंडोपताच्या प्रेताचें दहन केलें व बाकीची क्रिया करण्या-करिता तो पुण्यास निघून आला. पण धोंडोपताची बायको लक्ष्मीबाई बापूला क्रिया करू देईना! ती त्याला नवऱ्याच्या मृत्यूबद्दल जरा टोंचून बोलली आणि म्हणाली कीं, "( धोंडोपताला ) मारल्याबद्दल धोंडीवर तू पुरा सूड घेऊन आल्याशिवाय तुला पुढली क्रिया करू देणार नाही." अर्थात् सर्व उत्तरक्रिया ठेवून देण्यात आली व मग जेव्हा बापूनें सधि साधून धोंडीला ठार मारून त्याचे शीर भाल्याच्या टोकाला लावून लक्ष्मीबाईला आणून दाखविलें, तेव्हा तिच्या मनाचे समाधान झाले आणि नतर तहकूब ठेवलेल्या क्रिया पुऱ्या करण्यात आल्या!

परशुरामभाऊ पटवर्धनाच्या चरित्रातील एका महत्वाच्या गोष्टीचा तेलगानी आपल्या निबधात प्रामुख्यानें उल्लेख केला आहे भाऊची वडील मुलगी बयाबाई ही सात वर्षाची असताना तिचे लग्न करून त्यांनी तिला बारामतीच्या जोश्याचे घरी दिली होती तिचा नवरा लग्न झाल्यावर पधराच दिवसानी वारला व नेहमीच्या रिवाजाप्रमाणे ती बालविधवा झाली काही दिवस गेल्यावर भाऊनी आपल्या त्या दुर्दैवी मुलीची सगळी हकीकत रामशास्त्री याना सागितली! शास्त्रीबोवाचें अत करण द्रवले व त्यानीं म्हटले की या मुलीचा पुन. विवाह करावयास हरकत नाही! भाऊनी नतर मुलीची सगळी हकीकत काशीच्या पडितापुढे ठेवली आणि त्या पडितानी मुलीच्या पुनर्विवाहास अनुकूल मत दिले. परंतु भाऊना आपल्या मुलीच्या पुनर्विवाहाचा बेत मग रहित करावा लागला कारण त्याना जवळच्या मडळीकडून असे दर्शविण्यात आलें की, विधवा स्त्रियानी आपल्या पतीच्या मागें अगदी सन्यस्त वृत्तीनें राहावें ही रूढि आपल्यामध्यें फार प्राचीन काळापासून चालत आली आहे व तिच्याविरुद्ध वागून आपल्या सर्व लोकाना दुखविणे बरोबर नाही अखेर भाऊनी आपला नाद सोडून दिला तथापि एकदर प्रकाराचा विचार केला म्हणजे त्यापासून अनेक महत्वाच्या गोष्टी सिद्ध होतात परशुराम भाऊ हा एक पेशव्याच्या दरबारात प्रमुख पुरुष होता. त्याची आपल्या जुन्या परपरागत धर्मावर पूर्ण श्रद्धा होती असें त्याचा चरित्रकार म्हणतो. याप्रमाणे चोहोकडून वर्णाश्रमधर्माच्या परपरागत कल्पनानीं बद्ध असलेल्या लोकापैकीच पेशवाईतल्या भाऊसारख्या एका प्रमुख पुरुषानें आज-पर्यंत चालत आलेल्या धर्माच्या विरुद्ध वागण्याची नुसती कल्पना मनात आणावी

हेंच मोठें आश्चर्य आहे ! याहीपेक्षां अधिक महत्वाची गोष्ट ही कीं, याप्रमाणें भाऊनीं मनात आणलेल्या गोष्टीला पेशवाईतल्या रामशास्त्री प्रभुणे याच्यासारख्या सर्वमान्य पडितानें समति द्यावी ! परतु सर्वात महत्वाची गोष्ट ही कीं, भाऊच्या म्हणण्यास काशीसारख्या क्षेत्रातील पडितानीं रुकार द्यावा !! आणि इतका भक्कम आधार मिळूनही केवळ कन्यावात्सल्याने प्रेरित होऊन जी गोष्ट करण्यास भाऊ प्रवृत्त झाले होते ती केवळ लोकमताविरुद्ध आहे, एवढ्याच करिता त्यानी ती करण्याचें रहित करावे, यावरून परपरागत रूढीनें एकादा समाज कसा कायमचा दृढ बद्ध होऊन जातो, व त्या समाजातच वाढलेला एकादा मोठा पुरुष उदार भावना-प्रेरित असूनही व सर्व प्रकारे तज्ज्ञ माणसाचे पाठबळ मिळाले असताही त्या परि-स्थितीचा कसा गुलाम होऊन राहातो हेंच वरील सर्व प्रकारावरून पाहण्यासारखें आहे !

आणखी एका गोष्टीचा तेलगानीं आपल्या निबधांत उल्लेख केला आहे. पेश-वाईतील दुसऱ्या एका प्रसिद्ध पुरुषाने ( राघोबा दादाने ) राजकारणाकरिता दोन ब्राह्मणाना इग्लडाला पाठविले होते व त्या ब्राह्मणाना परत आल्यावर प्रायश्चित्त देऊन जातीत परत घेण्यात आले होते ! या गोष्टीचे आज विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात कदाचित् कित्येकास महत्व वाटणार नाही परतु तेलगाच्या वेळी या प्रश्नानें मुबईतील सर्व हिंदुसमाजात मोठी खळबळ उडवून दिली होती इतकेच नव्हे, तर या परदेशगमनाबद्दल कोणी जुन्या शास्त्री पडिताकडे चौकशी करून " काही तोड काढा " असें म्हटल्यास जुनी शास्त्री मडळी " शोधितस्याप्य-सग्रह: " हें शास्त्रवचन चक्क त्याच्या तोडावर टाकीत असत ! ती गोष्ट लक्षात आणूनच तेलगानीं वरील पेशवाईतला दाखला देऊन त्याचें महत्व दृष्टोत्पत्तीस आणले आहे.

तेलग म्हणतात कीं, येथपर्यंत आपण पेशवाईंत धर्मबधनें अगर जातिबधनें, कसकशीं शिथिल होत चाललीं होतीं याचीं बरींच उदाहरणें दाखविलीं. आता उलट बाजूची—काहीं काही हल्लीं आक्षेपार्ह वाटणाऱ्या वहिवाटी त्यावेळीं कशा जोरांत होत्या याचीं—थोडीं उदाहरणें दाखविणें योग्य दिसतें. पेशवाईंत बालविवाहाची चाल अगदीं जोरात होती. खुद्द पेशव्याच्याच कुटुबात पाहा: बाळाजी बाजी-रावाचे लग्न त्याच्या नवव्या वर्षी झालें होतें; विश्वासरावाचे आठव्या वर्षी झालें होतें, थोरल्या माधवरावाचें नवव्या वर्षी झालें होतें; नारायणरावाचें दहाव्या वर्षी,

सवाई माधवरावाचें आठव्या वर्षी झालें होते ! खुद्द नानाफडणविसाचे लग्न त्याच्या दहाव्या वर्षी झालें होतें असें त्याच्या आत्मचरित्रावरून दिसते पहिली बायको मेल्यावर पुरुषाने लागलीच पुनर्विवाह—दुसरी बायको—केल्याची उदाहरणें अनेक होती असो शके १७२९ ( सन १८०७ ) श्रावण शुद्ध द्वादशी दिवशी पुण्याच्या नागझरीवर किती तरी विधवा स्त्रियाचे केशवपन करविण्यात आलें होते ! तेलगानी याला—hideous—किळसवाणा प्रकार म्हटला आहे ! लग्नसमारभात पेशवाईत वारागनाचें नृत्य, गायन वगैरे करविण्याची तर वहिवाट होतीच ! पण पुरुषाच्या लग्नाच्या बायकाच केवळ नव्हेत, तर त्याच्या रखेल्या देखील त्या वेळी सती जात असत !

आतापर्यत जें विवेचन केले गेले आहे तेवढयावरून जुन्या काळी—पेशवाईमध्ये—महाराष्ट्रातील हिंदुसमाजाची सामाजिक दृष्टीने काय स्थिति होती याची वाचकांस स्पष्ट कल्पना यावयास हरकत नाही. बऱ्याचशा गोष्टी हल्ली आहेत तशाच पेशवाईत होत्या हे उघड झालेच आहे इतकेच नव्हे तर ब्राह्मणीधर्माची स्थिति हल्लीपेक्षाही त्या वेळीं काही बाबतीत अधिक कडक असावी यातही आश्चर्य नाही पण तरी तशाही स्थितीत परपरागत धर्मबधनांकडे किंवा जातिबधनाकडे दुर्लक्ष करून तद्विरुद्ध वागण्याकडे समाजाची प्रसगविशेषी तयारी व्हावी यावरून एक गोष्ट मात्र स्पष्ट रीतीनें दिसून येते ती ही की, वर निर्दिष्ट केलेल्या प्रकारचे धर्मशैथिल्य किंवा समाजशैथिल्य हे देशात इग्लिश सत्तेचे आगमन झाल्यापासून—किंबहुना पाश्चात्य कल्पनाचा इकडे प्रसार झाल्यापासून—सुरू झाले व ते पूर्वी नव्हते अशी जी कित्येकाची समजूत आहे ती निराधार आहे तसें शैथिल्य मराठेशाही चालू असतानाच दृग्गोचर होऊ लागलें होते खरा प्रकार असा असावा असे दिसते पेशवाईत हिंदुसमाजाची जी बधने किवा हरएक प्रकारचे नियम अस्तित्वात होते ते पूर्वी भिन्न परिस्थितीत व काही विशिष्ट कारणाकरिता घालून देण्यात आले होते ती परिस्थिति व ती कारणे चालू होती तोपर्यंत ते नियम ठीक होते. पण पुढे ती परिस्थितिही राहिली नाहीं व ती पूर्वीचीं कारणेंही राहिलीं नाहीत मग तेच नियम अगर ती बधने टिकतील कशीं ? काही विशिष्ट बाबतीत प्रथम अडचण उत्पन्न झाली असेल. अडचण आली म्हणजे “ शास्त्र सुचतें ” असें म्हणतात त्याप्रमाणें अडचण भासतांच ती दूर करण्याचा मार्ग सुचला. त्या मार्गानें एकदा एका प्रकारची अडचण दूर झाली, म्हणजे त्यापासून दुसऱ्या विशिष्ट बाबतींत दुसऱ्या प्रकारची अडचण आल्यास मनुष्यास त्याबद्दलचाही

मार्ग सुचण्यास मदत होते, व याप्रमाणें त्या नियमातला विसगतपणा दूर होतो आणि अखेर त्या नियमाचा व नवीन परिस्थितीचा मेळ बसू लागतो व गाडे पुढे सुसूत्र रीतीने चालू लागते ! तेलगानी म्हटले आहे की,—

"Originally, I suppose, the incompatibility manifested itself only in certain special instances. But once the solvent, so to say, is applied in that way at one point similar results sometimes, follow even at other points, though the conditions are not equally directly favourable"

वर जी समाजबधने तोडल्याची उदाहरणे दिली आहेत, त्यापैकी काहीत ती तोडण्याची क्रिया परिस्थितीमुळें जाणून बुजून करण्यात आली होती व काहीत ती आपोआप समाजाच्या प्रवृत्तीमुळेंच घडली होती आणि पेशवाई आणखी काही दिवस राहाती, तर त्याच प्रवृत्तीची वाढ होऊन कदाचित् हिंदु समाजाचे पाऊल बरेंच पुढे पडले असते

कायद्याच्या दृष्टीने एकदा सर हेनरी मेन यानी म्हटले आहे की, हिंदु लॉची जी स्वाभाविक हळूहळू वाढ होत चालली असती ती ब्रिटिश सरकारच्या न्यायकोर्टानी—Courts of Justice—बद पाडली आहे तेलग म्हणतात की, हिंदु लोकाच्या सामाजिक स्थितीवरही ब्रिटिश सत्तेचा कमी अधिक प्रमाणावर असाच परिणाम झाला आहे ज्या काही गोष्टी सामाजिक दृष्टीने पेशवाईत सहज झाल्या असत्या, त्या हल्लीच्या दिवसात तशा घडत नाहीत. याचे कारण हिंदुसमाजात जो पूर्वी जोर होता तो आता राहिला नाही आता व्यक्तिस्वातत्र्याची कल्पना लोकात जोरावत चालली आहे. प्रत्यक्ष नानाफडणवीस अमकी एक गोष्ट परंपरागत चालत आलेल्या वहिवाटी विरुद्ध असताही करावयास सागतो व पेशवे ती गोष्ट बिनतक्रार करतात. इतकेंच नव्हे, तर इतर लोकही तसे वागतात, व त्याचा गवगवा कोणीच करीत नाहीं ! याचा अर्थ असा की, समाजात त्या वेळी स्वाभाविकच एक प्रकारचा लवचिकपणा होता तो आता राहिला नाही. त्या वेळीं जी गोष्ट सहज समाजांत खपून गेली असती तशी ती हल्ली घडत नाही. तेलगानी प्रत्यक्ष कृष्णशास्त्री चिपळूणकराचें उदाहरण दिलें आहे. प्रत्यक्ष माधवराव पेशवे नाना फडणविसाच्या सल्लयानें सुतक्याच्या घरात भोजन करतात व नाना "मग त्याचा शास्त्रार्थ पाहू" असे

म्हणतो. नानानें खरे पाहिल्यास शास्त्रार्थाची चौकशी केलीच नाही केलीच असती तर कदाचित् शास्त्रार्थही मिळाला असता. असो, आणि हल्लीच्या काळात—म्हणजे ब्रिटिशसत्ता सुरू झाल्यावर—कृष्णशास्त्री यानी एका युरोपीयन मित्राच्या घरी फक्त थोडीशी फळें खाल्याबद्दल पुण्याच्या ब्राम्हणानीं मोठे काहूर उठविलें! तथापि तेलगाच्या वेळी हिदु समाजात काही अशी मडळी होती की त्याना पेशवाईत घडलेल्या गोष्टी माहीत तरी नसल्या पाहिजेत किंवा त्याना त्या ग्राह्य तरी वाटत नसल्या पाहिजेत.

असो. सुमारें चाळीस वर्षाच्या पूर्वी देशात समतिवयाच्या बिलासबधानें जो वाद झाला, त्या वेळीं महाराष्ट्रातील काही मडळीनी ब्रिटिश सरकारावर किंवा त्याच्या सत्तेने उत्पन्न झालेल्या परिस्थितीवर जे आक्षेप घेतले होते त्याचे खरें स्वरूप उघड करण्याकरिताच तेलगानी पेशवाईत खरा प्रकार काय होता हें आधार व उदाहरणे देऊन सदहू निबधाच्या योगाने दाखविले त्या दृष्टीनेच तेलगाच्या निबधाचे महत्व आहे शिवाय एकादी गोष्ट प्रतिपक्ष्याच्या बिनतोड रीतीनें पदरात घालण्याचे तेलगानी मनावर घेतले म्हणजे ते प्रमाणें, दाखले, उदाहरणे याची रेलचेल उडवून आपलें काम कसे चोख करीत असत हेही या निबधावरून समजण्यासारखे आहे म्हणूनच त्याचा इकडे जरा विस्ताराने उल्लेख केला आहे

---

## प्रकरण सव्विसावें.

# स्वतःचें वागणें.



मनुष्याचा सामान्यत लोकाचे दोष काढण्याकडे कल असतो त्यात ज्याचे दोष काढावयाचे तो पुरुष मोठा किंवा विद्वान असला तर तो कल जास्तच दृढावतो, असा सामान्य नियम आहे दुसरें असें की, मनुष्य म्हटला की त्याच्यात एकाद दुसरा दोष हा बहुधा असतोच. कोणतेही दोष ज्याच्यात मुळीच नाहींत असा मनुष्य कोण मिळणार आहे? मनुष्याची खरी परीक्षा ही त्याच्यात जो गुण-समुच्चय असेल त्याचा लोकास, समाजास अगर देशास किती उपयोग झाला यावर अवलबून असते, व ती परीक्षा जे थोर व समजस लोक असतील त्यानी करावयाची असते. केवळ विकारवश होऊन अगर काही तरी हेतु मनात ठेवून जो

एकाद्या मोठ्या माणसाची—त्याच्यासबधी सर्व परिस्थितीचा विचार न करतां—परीक्षा करण्यास प्रवृत्त होतो त्याच्या कृतीस मग परीक्षा न म्हणता फार तर टीका म्हणता येईल. अशी टीका सार्वजनिक कामात पडणाऱ्या बहुतेक प्रत्येक मनुष्यावर होत असते पण त्या टीकेचा स्वत त्या मनुष्याने—ज्याच्यावर ही टीका असते त्याने—किती विचार करावा हे त्याच्या मन·स्थितीवर सामान्यत· अवलबून असते आणि लोकानी त्या टीकेला किती महत्व द्यावे हे दुसऱ्या काही अवातर गोष्टीवर अवलबून असते त्या सर्व गोष्टीचा विचार केला म्हणजे त्या टीकेची बऱ्याच वेळा समजस लोकाच्या दृष्टीनें किमत कमी होते व टीकेला विषय झालेल्या मनुष्यामधील गुणाचे तेज जास्त पडते असा मनुष्याचा साधारण नियम आहे

काशिनाथपत तेलग हे समाजसुधारकापैकीच एक असत त्यामुळें हिंदुसमाजाची सामाजिक दृष्टीने काही बाबतीत दु स्थिति झाली आहे ती दूर करून त्या समाजाला सुस्थिति—शक्य तर प्राचीन आर्य लोकाच्या समाजस्थितीसारखी—प्राप्त होईल अशी खटपट करणाऱ्यापैकी ते होते डॉ भाडारकराच्या भाषेत सागावयाचे म्हणजे "तेलगांना आपल्या जुन्या गोष्टीचा अभिमान वाटत असे. पण तेच घेऊन बसावे, त्यात सुधारणा करू नये असे मात्र त्यास वाटत नसे" असो. या कामास सामान्यत तीन प्रकारच्या माणसाची जरूर असते सामाजिक सुधारणेच्या मूळतत्वाचा शात चित्तानें विचार करून ती तत्वे समाजाच्या प्रस्तुत स्थितीत कशी लागू करता येतील याची दिशा दाखविणारे लोक असतील त्याचा एक वर्ग तत्वे व दिशा ठरल्यावर त्यासबधी योग्य रीतीने प्रतिपादन करून जनतेचीं मनें वळविणें हे काम करणारे जे त्याचा दुसरा वर्ग. तिसरा वर्ग अशा लोकाचा कीं, सुधारणेची तत्वे व दिशा यासबधीं विचार करून मनाची खात्री झाल्यावर सधि येताच जे ती सुधारणा स्वत अमलात आणण्यास तयार होतात त्याचा यापैकी पहिल्या दोन वर्गांची कामे तर तेलग हे स्वत करीतच असत. मात्र ते सुधारणेच्या कामात जास्त उत्सुकतेने अगर घाईघाईने न जाता लोकाची परंपरेवरील श्रद्धा, त्याच्या दृढ झालेल्या समजुती याकडे लक्ष देऊन आपलीं कामे करीत असत या विषयींचें विवेचन मागील कांही प्रकरणात आलेलेंच आहे, त्याची पुनरुक्ति इकडे करीत नाही.

पण सामाजिक सुधारणेच्या बाबतींत तेलग हे स्वत प्रतिपादन केलेली मतें सधि आल्यास आचरणात आणीत नसत हा त्याच्यावर कित्येकांचा मोठा आरोप

असे तो वस्तुत काहीं अशी बरोबर होता पण त्यावरून कांहीं लोक जी काही अनुमाने काढीत असत त्याना मात्र आधार नव्हता कोणी म्हणत तेलगात समाजसुधारणेस जरूर तेवढे धैर्य नव्हते दुसरे कोणी म्हणत की, अहो, त्याना लोकाच्या विरुद्ध जाऊन त्याना दुखवावयाचे नव्हते. तिसरे कित्येक म्हणत की, अहो! सामाजिक सुधारणा ही लोकास सागण्याकरिता असते ती स्वत च्या आचरणात आणण्याकरिता नसते! असे कित्येकाचे अनेक तर्क चाललेले असत पण यापैकी एकालाही आधार नसे तेलगाचे अगी धैर्य नव्हते असें म्हणणाराना एकच उत्तर आहे. जे गृहस्थ सार्वजनिक कामात सर फिलिप वुड हाउस किवा सर रिचर्ड टेपल याजवर व लॉर्ड लिटन अगर लॉर्ड डफरिन याजवर—म्हणजे गव्हर्नर किंवा व्हाईसरॉय यासारख्या जबाबदार व श्रेष्ठ अधिकाऱ्यावर—उघड रीतीने प्लॅटफार्मवरून आपल्या जाहीर भाषणात कडक टीका करण्यास मागे घेत नसत त्याच्यामध्यें—तेलगामध्ये—वैर्य नव्हते असे कोण म्हणेल? या बाबतीत प्रत्यक्ष सरकाराविरुद्ध जावयाचे असते व सामाजिक बाबतीत फार तर लोकमताविरुद्ध जावयाचें असते मग सरकारविरुद्ध जाण्यास अधिक धैर्य लागते की लोकाच्या विरुद्ध जाण्यास अधिक लागते हे कोणीही एकादा अजाण मनुष्यदेखील सागूं शकेल अर्थात् सामाजिक दृष्टीने तेलगामध्ये धैर्य नव्हते या म्हणण्याला—फक्त एकाद्या मनुष्याला कोटून तरी वाईट म्हणावयाचे या असदिच्छेशिवाय—जागाच नव्हती

आता तेलगाना लोकास दुखवावयाचें नव्हते, या आक्षेपाचे पाहू. या आक्षेपाचेही उत्तर वरील विवेचनात आलेच आहे. तथापि आणखी एक गोष्ट सागितली पाहिजे तेलगानी जाहीर सभातून अगर आपल्या लेखातून सामाजिक सुधारणेविषयी आपल्या प्रामाणिक बुद्धीप्रमाणे जें मत प्रतिपादन केले आहे त्यात लोकमताविरुद्ध बऱ्याच वेळा लिहिलेलें आहे, व सौम्य—किंबहुना गोड—भाषेंत आपला मतलब त्यानी लोकास समजावून सागितला, तर तेवढयावरून—तेलगामध्यें धैर्य नव्हते अगर त्याना लोकास दुखवावयाचे नव्हते असे कसे म्हणावयाचे? तेलगाचे सार्वजनिक कामातलें एक तत्त्व असे. आपले मत कोणत्याही बाबतीत प्रथमच पूर्ण विचार करून ठरवावयाचे आणि ते एकदा ठरलें म्हणजे ते उघड रीतीनें बोलून दाखविण्यास—भाषेत कदाचित् प्रसगानुसार फरक पडला तरी—कधींच कचरावयाचें नाहीं. तात्पर्य लोकास दुखवावयाचें नाही या तेलगावरील आक्षेपांत अर्थ नाहीं.

तिसरा आक्षेप तेलग हे आपली सुधारणाविषयक मते लोकास दाखविण्यापुरती प्रतिपादन करीत असत. ती मते आचरणात थोडीच आणावयाची असतात! म्हणजे तेलगाच्या मतामध्ये व वागण्यामध्ये मुळीच मेळ नसल्यामुळें, ते नुसते दाभिक होते, अशी कित्येक टीका करीत असत. तेलगासबधी दाभिकपणाच्या आक्षेपात मुळीं अर्थच नाही एक दोन प्रसगी त्याच्या हातून त्याच्या तत्वाविरुद्ध वर्तन घडले ही गोष्ट खरी परंतु त्याची तशी कारणें होती. त्या कारणाचे कित्येकास महत्व वाटेल, कित्येकास वाटणार नाही, ती गोष्ट निराळी पण कारणे होती, व घडलेल्या वर्तनाबद्दल त्याना फार वाईट वाटले या गोष्टी सत्य आहेत. यासबधी अधिक खुलासा पुढे येणारच आहे परतु तत्वाशी विसगत असे हातून वर्तन घडले म्हणून त्याच्या ठिकाणी तत्वनिष्ठा मुळीच नव्हती अगर त्याच्या हातून थोडीशी देखील गैरसोय सहन करणे होत नसे, असे कदापि म्हणता येणार नाही.

सामाजिक सुधारणेच्या कामात जो केव्हा केव्हा अगी एक प्रकारचा धाडशीपणा असावा लागतो तो तेलगाचे ठिकाणी नव्हता हे कबूल केले पाहिजे आपल्यामधील या कमीपणाच्या बाजूबद्दल त्यानी स्वत च एकदा कबुलीजबाब दिला आहे. "शास्त्र व रूढि" या विषयावरील आपल्या व्याख्यानाचे वेळी तेलगानी असे उद्गार काढले —

"जुनी रूढि सोडून नव्या मार्गात जाणें असेल तर तेथे क्रियाशूर मनुष्य पाहिजे. साधक बाधक प्रमाणाची व परिणामाची फार बारकाईनें चिकित्सा करीत बसणारा मनुष्य या कामास फारसा लायक नाही हे मी स्वानुभवावरून सागतों."

इतक्या प्राजलपणें आपल्यामधील दोष जाहीर रीतीनें कबूल करणारे लोक आपणामध्ये किती निघतील? उलट, आमच्या मते आपला दोष असला तरी तो झाकण्याकरिता आपल्या सदोष वर्तनाचें येन केन प्रकारेण समर्थन करणारे लोकच जास्त निघतील! गेल्या पाचपचवीस वर्षांत घडलेली अशी महाराष्ट्रातीलच उदाहरणें किती तरी दाखविता येतील अर्थात् तेलगामधील मनाच्या सरळपणाची खरी किंमत त्याच्या या कबुलीजबाबातच आहे त्यामुळे तेलगाच्या या प्रामाणिकपणाबद्दल कै सर नारायण चदावरकर यानी जे एकदा लिहिले आहे ते अगदी यथार्थ आहे. ते असेः—

"But if Telang had not the courage to do what he thought he ought to do, he never put a gloss on

his conduct-rather he was conscious and said so to those who knew him most intimately that 'cold and calculating natures' such as his—I am quoting his own expresssion—could not be trusted to lead any great cause or forlorn hope."

तेलग याना कर्ते सुधारक म्हणता येणार नाही हें खरे, पण त्याच्या स्थितीमध्ये व इतर त्याच्या वेळचे जे मुख्य समाजसुधारक होते त्याच्या स्थितीमध्ये बरेच अतर होते त्याच्या वेळचे प्रमुख सुधारक म्हणजे न्या रानडे, डॉ. भाडारकर, प्रि मोडक वगैरे हीच मडळी असत या मडळीची वडील माणसे सामाजिक सुधारणेस जोर येण्यापूर्वी—सन १८८४ सालापूर्वी—स्वर्गस्थ झाली होती. तेलगाचे वडील अखेरपर्यंत हयात होते म्हणजे तेलगाना स्वतत्रपणे—अर्थात् आपल्या मनाप्रमाणे—वागण्यास जी घरचीच अडचण असे, ती भाडारकर-रानडे याना नव्हती भाडारकराचे वडील सन १८७० पूर्वीच वारले होते रानडे याचे वडील सन १८७७ साली वारले त्यामुळे उभयताना किंवा मोडकानाही—त्याचे वडील लहानपणीच स्वर्गस्थ झालेले असल्यामुळे—आपली सुधारणाविषयक मतें आचरणात आणण्याच्या कामी घरची आडकाठी राहिली नव्हती. तेलगाच्या प्राठीमागे ही अडचण शेवटपर्यंत कायमची होती असे म्हणण्यास हरकत नाही.

आता या अडचणीला महत्व किती द्यावयाचे याबद्दल कदाचित् मतभेद होऊ शकेल कित्येकास वाटेल कीं, तेलग हे आपला भित्रेपणा झाकण्याकरिता नुसते आईबापाकडे बोट दाखवीत असत, व दुसरे कित्येक म्हणतील की तेलग आपल्या वडिलाना मान देत असत तेच बरोबर होते खरा प्रकार असा होता की, तेलग हे स्वभावाचे फार गोड व मनाचे कोमल होते. त्यामुळें ते कधी कोणावर—मग घरी असो, क्लबात असो किंवा इतरत्र असो—रागावले किंवा कोणाला तोडून बोलले असे प्रसग त्याच्या आयुष्यात फार थोडे घडले असतील विद्यार्थिदशेंतील त्याच्या स्वभावाचे वर्णन त्याच्या ( दलाल व देसाई ) दोन सहाध्यायाच्या आधाराने मागील एका प्रकरणात दिलेलेच आहे त्याचेच प्रतिबिब त्याच्या घरातल्या वर्तनात उमटलेले दिसत असे. घरची सर्व व्यवस्था त्याचे वडील त्रिंबकराव हे पाहात असत. तिकडे काशीनाथपताना काहीच पाहावे लागत नसे. त्रिंबकराव याची घरात शिस्त जबरदस्त असे, व काशीनाथपत हे सहसा त्याच्या विरुद्ध केव्हाही जात नसत. खुद्द डॉ. भाडारकराच्या शब्दात सागावयाचे म्हणजे

"तेलग हे आपल्या वडिलास फार मान देत असत व ते त्याच्या मर्जीच्या विरुद्ध सहसा जात नसत." तेलग हे इतक्या योग्यतेस चढलेले, विद्वान् बॅरिस्टर व पुढे हायकोर्टाचे जज्ज झालेले असे होते. पण ते घरी वडिलाच्या विरुद्ध अगदी जात नसत. त्याबद्दल इकडे एकच गोष्ट सागतो मुबईत सारस्वत ब्राह्मणात अनेक पोटभेद आहेत. हे भेद हल्लीं बहुतेक बुजून गेले आहेत. पण ते तेलगाच्या वेळी मानले जात असत खुद्द मुबईचे सारस्वत—बारघरे—त्या पोटभेदाना सामान्यतः "नरवणे" म्हणत असत, व ते त्याच्याशी उघड रीतीनें अन्नव्यवहार करीत नसत. काशीनाथपत हे स्वत. असले भेद किंवा जाति कडक रीतीने पाळीत नसत. पण घरात मात्र ते वडिलाच्या विरुद्ध वागत नसत, ही एक त्याची अट असे एके दिवशी काशीनाथपतानी एका पोटभेदातील मित्राचे घरी फराळ केला. ही बातमी कोठूनतरी त्याच्या वडिलास समजली ! ते मग काशीनाथपतावर फार रागावले व त्याना बरेंच बोलले, पण काशीनाथपतानी वडिलास एका शब्दाने उत्तर दिले नाही ! ही कित्येकास अत्युक्ति वाटेल पण ती गोष्ट कै. पढरीनाथपत तेलग याजकडून थोड्या दिवसापूर्वी आम्हास समजली. असो याबद्दल निरनिराळे लोक निरनिराळी मते देतील एका वृद्धगृहस्थाचे आम्हास काही दिवसापूर्वी यासबधात पत्र आले आहे. त्यात त्यानी काशीनाथपताना वरील सारख्या प्रकारासबधानें फारच कडक शब्दात टपका दिला आहे ! दुसरे कित्येक तेलगाची स्तुति करतील. ही सर्व हकीकत इकडे देण्यात आमचा हेतु इतकाच की, तेलगाची घरची परिस्थिति वाचकास समजावी, म्हणजे त्या दृष्टीने त्याच्या कृतीचे निरीक्षण करण्यास सोईचे होईल.

अशा प्रकारचे दुसरें एक उदाहरण इकडे देणें इष्ट दिसते. काशीनाथपत तेलग हे ज्या अर्शो रोगाच्या योगाने वारले ती विकृति त्याना दहा बारा वर्षे पूर्वी जडली होती त्याचें मुख्य लक्षण हेच की त्यापासून मनस्वी रक्तस्राव व्हावयाचा व अशक्तता वाटावयाची ! त्यापासून त्याना वरचेवर कमी अधिक प्रमाणात त्रास होत असे. ते जेव्हा अखेरीस आजारी पडले तेव्हा ते सुमारे एकवर्षभर त्याच स्थितींत होते. त्या वेळी त्याना पुष्कळ मित्रमडळी भेटावयास येत असत. त्यात मद्रासचे मिस्टर जॉन ॲडम हे एक होते. ते व तेलग यामध्ये त्या वेळीं झालेलें सभाषण मि. ॲडम यानी "इडिया"मध्ये मग थोड्या दिवसानी प्रसिद्ध केलें. ते वाचून अकोल्याचे प्रसिद्ध कै. अण्णासाहेब महाजनी यानीं असे उद्गार काढलेः "तो सवाद पाषाणालाही रडबिणारा आहे. त्यावरून दिसते

की, राज्यपद व राज्यवैभव सोडून जाणाऱ्या पितृभक्त **रामाची** निष्ठा कै. काशी-नाथपतात होती ! " तो प्रसग असा. तेलगाना जो रोग झाला होता त्यावर थोडीशी साधी शस्त्रक्रिया करून घेतल्यास ते बरे झाले असते. परतु त्याच्या शरीरातून एक रक्ताचा थेंबही बाहेर पडणें त्याच्या मातापितरास पाहावत नसे ! सबब त्याच्या समजुतीकरिता तेलगानी शस्त्रक्रिया करून घेण्याचे नाकारून आपल्यावर मरण ओढवून घेतले ! तो सर्व प्रकार अत्यत हृदयद्रावक होता यात सशयच नाही तेलगाचे शब्द असे होते. ॲडम यानी जेव्हा " मग थोडीशी शस्त्रक्रिया का करून घेत नाही ? " असें विचारले तेव्हा तेलगानी म्हटले,

" Ah, if it were only myself, the doctors could do what they like with me tomorrow. But my old father—adopted father too, remember, and mother have the most inveterate objection to the slightest use of the knife, to the shedding of a drop of blood. While they live, if I do not go first, I shall never act against their wishes. "

आईबापांच्या इच्छेविरुद्ध कधी न जाणे हेंच त्याच्या आमरण वर्तनातील मुख्य तत्व होते त्यामुळें त्याच्या हातून एक दोन वेळा सामाजिक सुधारणेच्या बाबतीत चुका झाल्या ते अत्यत समजस होते. त्याना लोक पुढारी मानीत असत हे त्याना माहीत होतें. त्यामुळें ते आपल्यावरील जबाबदारी पूर्ण ओळखून होते. सबब ते अत्यत सरळ मनाने आपली चूक कबूल करीत असत, किंवा ती सावरता येण्यासारखी असेल तेथे ती ते सावरीत असत. पण हा प्रकार लोकास कसा समजावा ? ते आपलें टीका करण्याचें काम चालवीतच असत व काही तर अद्यापि ते काम चालवीत असतात.

रा. नरसोपत केळकर यानी टिळक चरित्रात ( पृ २७७ ) असे लिहिलें आहे. " तेलगानी भाडारकराच्या पक्तीला बसून पुनर्विवाहात जेवण केले नाहीं ही गोष्ट तर झालीच, पण प्रौढ विवाहाचे मडन करणारे तेलग यानीं आपल्या आठ किंवा दहा वर्षांच्या मुलीचें लग्न वडिलाच्या आग्रहाची सबब सागून केलें." केळकराच्या व त्याच्या वाचकांच्या माहितीकरितां इकडे एक दोन गोष्टीचा उल्लेख करतो. त्यांवरून त्यानीं आपलें वाटेल तर समाधान करून घ्यावे. सन १८९९ सालीं

तेलगाच्या पुण्यतिथीच्या दिवशीं मुबईस न्या. रानड्याच्या अध्यक्षतेखाली डॉ० भाडारकरांचें मुख्य भाषण झाले त्यात त्यानी असे सागितले. " तेलग हे पुनर्विवाह मान्य अशा मडळीपैकींच होते. ते तशा ठिकाणी जेवणास गेले नाहीत हें खरें, पण त्यानीं पुनर्विवाहितास आपल्या घरी जेवण्यास बोलाविले होतें." भांडारकराचें समग्र भाषण ता ५–६–९९ च्या केसरीत प्रसिद्ध झाले आहे

तेलगानी आपल्या अतकालाच्या थोड्याच दिवसापूर्वी आजारी असतानाच आपल्या दोन मुलीची लग्ने केली होती. त्यापैकी एकीचे आठ वर्षाचे वय होते त्यानी तीं लग्ने घरच्या मडळींच्या आग्रहामुळेंच केली ही गोष्ट उघड आहे पण त्यामुळें तशा स्थितीत तेलगाच्या हातून आपल्या तत्वाप्रमाणें वर्तन न घडल्याबद्दल कोणत्याही हिदु मनुष्याने किती दोष द्यावयाचा ? खुद्द कै टिळकानी तेलगावर त्या वेळी ता ७–२–९३ च्या केसरीत आपल्या नेहमीच्या वहिवाटीप्रमाणे कडक टीका केली खरी. पण पुढच्याच अकात—ता १४–२–९३—टिळकानी जरा नमते घेऊन पूर्वीच्या टीकेतला कडकपणा कमी करण्याचा प्रयत्न केला ! त्यात केसरीकर्ते असे म्हणतात —" मिस्टर तेलग यास आम्ही सर्वांशीच नावें ठेवितों असे समजू नये. त्याच्या हातून जी चूक घडली, तसलीच इतराच्या हातूनही घडण्याचा सभव आहे. " ही तेलगासबधानें लौकिकदृष्टीची बाजू झाली स्वत· तेलग आपल्यावरची जबाबदारी किती ओळखून असत व त्याचे मन किती कोमल व थोर होते हे पुढील त्याच्या अतकालाच्या पूर्वीच त्याच्यामध्ये आणि कै. चदावरकरामध्ये झालेल्या सभाषणावरून दिसून येईल ! मुलीची लग्नें झाल्यावर तेलगानी ते बिछान्यावरच पडून होते अशा स्थितीत चदावरकराना मुद्दाम बोलावून आणून त्याच्याजवळ पुढील कोणत्याही मनुष्याच्या अत·करणास पाझर फोडणारे उद्गार काढले:—

" I know what I have done will pain my friends, Nulkar, Bhandarkar and Ranade. You know under what circumstances I have had to act as I have done. I do not feel strong enough to write to these friends. You must explain it all to them when you next go to Poona. But tell them this, that no one feels more than I do that I have not done the

right thing. I plead guilty to the charge—I have no defence."

या प्रकारावरून चदावरकरानी तेलंगास "how honest and magnanimous he was" असे म्हटले आहे टिळकानी देखील प्रथम तेलगावर कडक टीका करून नतर कसे आपले पाऊल मागे घेतले हेही वर सागितलेच आहे इतरानी आपल्या बुद्धीप्रमाणे वाटेल ते त्याविषयी लिहावे कित्येक लोकास आपली चूक कबूल न करण्यातच मोठेपणा—का देशाभिमान आहे असें वाटत असते अशा लोकाच्या टीकेचे महत्व कसले ? आणि त्याबद्दल वाटावयाचे काय ?

खरा प्रकार म्हणजे अण्णासाहेब महाजनीनी एकदा म्हटल्याप्रमाणे तेलगाचे हातून जी चूक झाली तशा त्या वेळच्या बहुतेक सर्व पुढाऱ्याच्या हातून—चुकाचे स्वरूप सारखेच नसले तरी—चुका होत असत सामाजिक सुधारणेला त्या वेळी नुकताच आरभ झाला होता अशा स्थितीत जुनी घडी मोडून नवी बसविताना कित्येक जरा घसरले तर त्याबद्दल आश्चर्य वाटण्याचे कारण नाही राजाराम मोहनराय, केशव चद्रसेन, ईश्वरचद्र विद्यासागर, किंवा आमच्या इकडचे विष्णुशास्त्री पडित अथवा डॉ भाडारकर याची कर्ते सुधारक या नात्याने योग्यता फार मोठी होती ती योग्यता वर्तनाच्या बाबतींत तेलगाना अगर रानड्याना येणार नाही, हे कबूल केले पाहिजे त्यामुळे त्याच्यावर केव्हा केव्हा झालेली टीका क्षम्य होती. परतु या थोर पुरुषानी प्रथम जमीन तयार केली हे विसरून चालावयाचे नाही. पहिले श्रम, अडचणी व घस सोसणे वगैरे खरे कष्ट वरील थोर मडळीनी केले आहेत त्याचा फायदा आम्ही हल्लीच्या पिढीतले लोक घेत आहोत

तेलग किंवा रानडे याच्या मतात व वर्तनात केव्हा केव्हा मेळ घालता येत नसे याची कारणें न्या. रानडे यानीच एका प्रसगी सागितली आहेत, ती अगदीं यथार्थ आहेत त्यासबधाचा इकडे अधिक विस्तार करीत नाही पण त्याचा तात्पर्यार्थ असा होता. ता ६–१०–९३ रोजीं मुबईस जी तेलगाच्या स्मारकासबधाची सभा झाली त्यात अनेक गृहस्थाची भाषणे झालीं. त्यात न्या. रानडे यानी केलेले भाषण फार महत्वाचें होते सामाजिक सुधारणेच्या सुरवातीस प्रथम काहीं लोकाचे लौकिक दृष्टीनें कसें दुटप्पी वर्तन—divided life—असे हें सागून त्याबद्दलची रानड्यानी कारणमीमासा केलेली आहे. सुधारणेच्या दृष्टीने मडळीचे तीन वर्ग होते. एकाला आपली पूर्वीची जी स्थिति होती तीच चागली

होती असे वाटत असे व त्यांतच राहण्यात त्याला सतोष असे त्यांत कोणताही फरक करणें त्याला पसत नव्हते व " इतराशीं आपल्यास काय करावयाचे आहे ? " अशीच त्या वर्गाची साधारणत वृत्ति असे. दुसरा वर्ग होता त्याला वाटे कीं जुन्या गोष्टीतच खितपत पडून राहून समाजाची केव्हाही प्रगति होणार नाही तो समाज सोडून—निदान जुन्या चाली, जुन्या कल्पना, जुन्या समजुती—ज्यानी देशास हल्लीची अवनत स्थिति आणली आहे—त्या कायमच्या सोडल्याशिवाय आपल्यास आता तरणोपाय उरला नाही अशी या दुसऱ्या वर्गाची पक्की खात्री झाली होती याबद्दल रानडे म्हणाले —

"Between these extreme views, there are a small number among us who while they revere their past, would see it gradually adapt itself to the new circumstances with which it has pleased Providence to surround us, as we believe, for our own ultimate good. We cling to the past and yet would keep our hold on the future. We are thus often liable to be misunderstood by friends and foes alike."

म्हणजे तिसरा एक वर्ग होता त्याला वाटे की जुन्याशी असा कायमचा सबध तोडून उपयोगी नाही त्याची अशी समजूत की, पूर्वीच्या चागल्या गोष्टी राखल्याच पाहिजेत व पुढे पाऊल टाकण्याकरिता नवीन उद्योगही केला पाहिजे याच वर्गातले तेलग हे एक होते पहिल्या वर्गातील माणसास दुसऱ्या लोकाशी सबध ठेवावयाचाच नसतो. अर्थात् दोहोंमध्यें खडा जगी माजण्याचा सभव कमी. दुसऱ्या वर्गातील लोकानी जुन्याशी सबधच तोडल्यामुळें, जो सोक्षमोक्ष व्हावयाचा तो नवीन मार्गानेंच होवो असें म्हणून तो वर्ग निर्धास्तच असतो. तिसऱ्या वर्गातील लोकाना मात्र बराच त्रास सोसावा लागतो. त्याला जुन्या लोकानाही सोडावयाचे नसते व नवीनाचाही शक्य तेवढा स्वीकार करावयाचा असतो. अशा स्थितीत गैरसमजुतीचे प्रकार, टीकेचे प्रसग हे यावयाचेच. त्यामुळें काही लोकाचे वर्तन, अल्प काल का असेना, दुटप्पीपणाचे आहे असें लोकास साहजिकच वाटते. हा प्रकार थोडासा अपरिहार्य आहे. निदान तेलग-रानड्याच्या वेळी तरी तो अपरिहार्य होता. तो तसा आता राहिला आहे असे वाटत नाही. प्रस्तुत काळी सामाजिक सुधारणेच्या बाबतींत लोकाचे विचार पुढें गेलेले आहेत. अर्थात् तसे प्रसग या दिवसात

येण्याचा संभव नाही असो तेलग-रानड्यांच्या हातून एक दोन वेळा त्यांच्या तत्वाप्रमाणें वर्तन घडले नाही, म्हणून त्या तत्वाविषयीं त्याच्या मनाची खात्री झालेली नव्हती अगर ते लोकाना भीत असत असा त्याचा अर्थ करावयाचा नाहीं. त्याच भाषणात रानडे म्हणाले —

"It was not strictly correct to say that men like Mr. Telang paused and halted from want of earnestness or from fear of offending people. Those who live in the past secure popularity. Those who bury their past obtain ease. Men like Telang and others obtain neither ease nor popularity by the very fact that they can neither hold by the past nor forget it altogether. This is the difference in our points of view "

त्यामुळे त्याना त्या वेळेपुरती घरच्या परिस्थितीपुढे मान वाकवावी लागते. न्या. रानड्याना वडिलाच्या हट्टामुळे पुनर्विवाह न करता एका लहान मुलीशीं लग्न कसे करावे लागले व विष्णुशास्त्री पडिताना घरी मेजवानीस बोलाविले म्हणून रानड्याचा व त्याच्या वडिलाचा सबध अगदी कसा तुटून जाण्याच्या बेतात आला होता हे कै श्री रमाबाई रानडे यानी आपल्या "आठवणीत" अति सुदर रीतीनें दाखविलें आहे. ते जरूर तर वाचकानीं अवश्यमेव वाचावें. तोच प्रकार तेलगाच्या बाबतीतला घरच्या मडळीनी मुलीचे लग्न करून टाकण्याविषयी आग्रह चालविला असतां त्यांना साफ "नाही" असें मरणोन्मुख झालेला कोणता मनुष्य म्हणू शकेल ? बरे, मुलीचें लग्न झालें तरी आपल्या हातून चूक होत आहे अशी तेलगाना केवढी तीव्र जाणीव होती ? आमच्या मते तेलगाच्या किंवा रानड्याच्या आयुष्यातले हे प्रसग अत्यत हृदयद्रावक असून त्यावरून ते आत्यतिक तत्वनिष्ठेमुळें परिस्थितीशी कसे धैर्यानें झुजत होते हें स्पष्ट रीतीने दिसून येते. वडील माणसांकरिता जड मनाने तत्वनिष्ठेला मुकणें यात एक प्रकारचा स्वार्थत्यागच आहे असे कोण म्हणणार नाही ? असो. त्या त्या प्रसगीं त्याच्यावर कित्येकानी कडक टीका केली ती त्याच्या दृष्टीने क्षम्यच होती, व त्याबद्दल टीकाकाराना मुळीच दोष देता येत नाही.

न्या. रानड्यांनीं वरीलप्रमाणें न्या. तेलगांच्या स्मारक सभेच्या सधीचा उपयोग करून जी कारणमीमासा केली ती अगदी यथार्थ होती हें वर सागितलेंच. पण त्यायोगें त्यानी आपल्यावरील एक दोन प्रसगांसंबधानें जाहीर रीतीनें खुलासा केला असेंही म्हणण्यास हरकत नाही तात्पर्य, तेलगानी किवा रानड्यानी सामाजिक बाबतीत आपल्या हातून कधी दाभिकपणा होऊ दिला नाही की, त्यानीं लोकाची दिशाभूल केली नाहीं हेंच विशेष आहे. त्यानीं आपण पतकरलेली कामगिरी एकनिष्ठेने करण्याचा प्रयत्न केला, व आपातत आपल्या हातून चूक झाल्यास ती त्यानीं प्राजल मनाने कबूल केली, यामध्येच त्याच्या वर्तनाचे खरे रहस्य आहे.

तेलगानी सामाजिक सुधारणाविषयक तत्वाचा लेख, व्याख्याने व पुस्तके याच्या द्वारें प्रसार केला, हें तर झालेच, परतु दुसरा एक सुधारणाविषयक सत्कल्पनाचा प्रसार करण्याचा मार्ग असतो. त्याचाही तेलगानी उपयोग केला होता. सुधारणा तत्वाविषयी किंवा ती प्रतिपादन करणाऱ्याविषयी लोकात गैरसमजुती उत्पन्न करण्याची कित्येकाची—जाणून किंवा न जाणून—रीत असते. अशा लोकाच्या कृतीतील दोषाविष्करण करून जनतेस खरा मार्ग दाखविणे हा एक सुधारणा करण्याचाच मार्ग आहे. त्या मार्गाचाही तेलग केव्हा केव्हा अवलब करीत असत · सन १८९१ साली मुबईच्या एल्फिन्स्टन हायस्कुलात नव्या व जुन्या विद्यार्थ्यांचे समेलन "Elphinstonians' Gathering" झाले. त्यावेळी मुख्य भाषण प. वा डॉ. आर. के कीर्तिकर याचे झालें. विषय "विचार स्वातत्र्य" (Freedom of Thought) हा होता. अध्यक्षस्थानी न्या. तेलग होते. डॉ कीर्तिकर हे स्वत विलायतेस जाऊन आले होते. त्यांचें वर्तन शुद्ध सुधारकांच्या सारखेंच होते म्हणजे सामाजिक सुधारणा झाली पाहिजे हे ते वस्तुत वर्तनानेंच दाखवीत होते. तरी ते जुन्याचीच नेहमी तरफदारी करीत असत. मनास वाटले तर एकादे दिवशीं ते देवळात बसून देवापुढे पुराणही सागत असत. असा त्याचा एकदरीत प्रकार असे. त्याचेच प्रतिबिंब त्याच्यावरील भाषणात उमटलें होते. कीर्तिकरानीं आपलें भाषण लिहून आणलें होते डॉ कीर्तिकराच्या मते समाजसुधारक ज्या मार्गाने सुधारणेचें काम चालवीत होते तो चुकीचा होता. ते म्हणाले,

"There were some men who wished to borrow everything from the new civilization and engraft it on the old, forgetting that the religions of this

country were ingrained in their constitutions and bound up with all important social surroundings. The new civilization would make light of such factors."

म्हणजे नवीन सुधारणा बरी नव्हे जुनीच चांगली आहे. स्त्रियाना समत्वाच्या तत्वावर वागविण्याची कल्पनाही डॉक्टराना पसत नव्हती. आमच्या देशात मोठमोठ्या सुधारणा—civilizations—होऊन गेल्या आहेत. त्या टाकून नवीन सुधारणेचें ग्रहण करण्यापूर्वी विचार करा असे व्याख्याते श्रोत्यास म्हणाले. सर्व जातीच्या व धर्मांच्या लोकानी वर्षातून एक वेळ एकाच पक्तीत जेवण्यास हरकत नाहीं परदेशगमनास उत्तेजन देऊ नये. कारण त्यायोगें देशाभिमान व धर्माभिमान नष्ट होतात. वगैरे वगैरे. अशा अर्थाचे कीर्तिकराचे भाषण झाले. शेवटी अध्यक्षाचे—न्या. तेलगाचे भाषण झाले. त्यानी प्रथमच सागितले की, डॉ. कीर्तिकारांच्या भाषणातील काहीं भागाविषयी आपला मतभेद आहे व त्याची एकदरीत विचारसरणी आपणास पसत नाही. कारण ती प्रगतीला पोषक नसून पिच्छेहाटीची दर्शक होती. स्त्रियाना समत्वाच्या तत्वावर का वागवू नये? देवानें सर्वानाच बुद्धि दिली आहे त्या बुद्धीचा विकास होऊ देण्याची सधि पुरुषास असावी व स्त्रियास मिळू नये हा पुरुषाचा आप्पलपोटेपणा नव्हे काय? तसेच पुरुषास—त्याचे वय कितीही असले तरी—वाटेल तितक्या बायका, एकाच वेळीं किंवा एक मेल्यावर दुसरी याप्रमाणे—करण्याची मुभा असावी आणि बायकाना मात्र—त्याचे वय कितीही लहान असले तरी—एक पति मेल्यावरसुद्धा दुसरा करण्याची सवड नसावी याला न्याय म्हणावयाचा कीं आप्पलपोटेपणा? कीर्तिकराचे म्हणणें कीं, सुधारणा म्हणजे क्राति होय तेलग त्यावर म्हणाले, नवीन परिस्थिति आणि जुन्यात तदनुसार जरूर ते फेरफार हें गाडें सृष्टिक्रमाप्रमाणें चालावयाचेच आहे. त्यात क्रांति ती काय झाली? सृष्टिक्रमाच्या विरुद्ध जाणारे मात्र क्राति उत्पन्न करतील. तेलगाचे शब्द असेः—

"If any revolution took place in India, it would not be the work of those who wanted to go ahead in matters social and religious, but of those who blindly tried to nip in its very bud every movement

for reform." "Modern civilization did not bring with it peace, but a sword to fight for justice."

कोणी म्हणेल कीं, मग न्यायाच्या नांवाखाली अन्याय होतील? तेलगानी विचारले की, धर्माच्या नावाखाली आमच्या देशात अन्याय झाले नाहींत काय? अद्यापि होत नाहीत काय? असो. तेलगानीं म्हटले की, कीर्तिकरांनीं फक्त एका बाजूने विचार केला होता दुसरी बाजू पाहिली नव्हती परदेशगमनाविषयीं तेलगानी आपला कलकत्त्यास आलेला अनुभव सागितला तेलग—एजुकेशन कमिशनच्या निमित्तानें—काहीं दिवस कलकत्त्यास होते. त्या मुदतीत एका मोठ्या बगाली गृहस्थाशी आपले सभाषण झालेलें त्यानी सागितलें. त्या गृहस्थास इग्लडास जाणें, तेथे राहाणें, इग्लिश लोकासारखा पोषाख करणें वगैरे सर्व गोष्टीत धर्म गेला, देशाभिमान बुडाला असे वाटत होते तेलगानी उमेश्चद्र बानर्जी, सुरेंद्रनाथ बानर्जी, मनमोहन घोस वगैरे लोक इग्लडात काही दिवस राहिल्याचे सागितलें. त्यावर त्या बगाली गृहस्थानी वरील सर्व लोकाना देशाभिमान नाही, ते देशाचे शत्रु होते असे चक्क सागितलें! त्या दृष्टीनें खुद्द डॉ. कीर्तिकर व स्वत तेलग हे देश-द्रोहीच ठरत होते असें तेलगानी सागितले. कारण कीर्तिकरानी सर्वच साहेबी पोषाख केला होता! व तेलगानी बूट, पाटलोण वगैरे कपडे घातलेले होते! एका शब्दात सागावयाचें म्हणजे ज्याना मुळी प्रगतिच नको असते, अशा लोकाच्या ह्या वर सागितलेल्या कोट्या होत असें तेलगानी सागितले व आपले भाषण सपविले.

तेलगाचे तें भाषण चांगलेंच झालें त्या वेळीं सुदैवानें आम्ही स्वत हजर होतों. तेलंगाची वक्तृत्वशक्ति व त्यांचे इग्लिशभाषाप्रभुत्व ही प्रसिद्धच होतीं. पण ज्या तत्वांसबधीं एकदा मनाची खात्री झाली व ज्याला अनुसरून आपण व आपले मित्र उक्तीच्या व कृतीच्या योगानें यथाशक्ति वागत आहों अशा तत्वाविषयी बोलण्याचा प्रसग आला म्हणजे तेलगाचें वक्तृत्व जास्तच खुलत असे असाच प्रसंग सदरील संमेलनाच्या वेळचा होता तेलगाच्या वक्तृत्वाचा ओघ सारखा सुमारें एक तासभर चालला होता. हायस्कूलचा खालचा दिवाणखाना नव्या जुन्या विद्यार्थ्यांनीं गच्च भरून गेला होता. श्रोते मडळींत चदावरकर, डॉ० भालचद्र, विष्णुपत भाटवडेकर वगैरे लोक हजर होते व अध्यक्षाचें भाषण चाललें असता मधून मधून श्रोतृगणांतून पसतीदर्शक टाळ्या झडत होत्या काहीं श्रोत्याचा तेलगाचें वक्तृत्व पाहून उत्साह इतका वाढला होता कीं त्यांपैकीं कित्येकजण आपल्या खुर्च्यांवरून

उठून नुसते अध्यक्षांचें भाषण ऐकत उभेच राहिले होते व काही तर एकमेकाच्या हातावर टाळ्या देऊ लागले होते फक्त डॉ कीर्तीकराची मन स्थिति मात्र त्याच्या भाषणातील अध्यक्षानीं दोषाविष्करण चालविलेलें असल्यामुळें चमत्कारिक झाली होती असें त्याच्या चेहऱ्यावरून दिसत होतें असो त्या प्रसगीं मुख्य वक्त्याचे भाषण सामाजिक सुधारणेला विरोधक व अध्यक्षाचे भाषण सुधारणेला पोषक झाल्यामुळें दुसऱ्या दिवशी " टाइम्स " मध्यें एक उग्र लेख येऊन त्यात तेल॰ गाची स्तुति व डॉ कीर्तीकरावर टीका करण्यात आली होती असो. तात्पर्य, स्वत. सुधारक असून अगर सुधारणातत्वाप्रमाणें वागणारे असूनही कोणी मनुष्य बाहेरून—कोणत्याही कारणास्तव असो—वेळीं अवेळीं जुन्याची अवास्तव तरफ-दारी केल्यास त्यायोगे दाभिकपणाची तर वृद्धि होतेच, पण जनतेचीही दिशाभूल होण्याचा सभव असतो अर्थात् अशा प्रयत्नाचा जिकडचा तिकडे व जेव्हाचा तेव्हा निषेध झाला पाहिजे, व तशा प्रकारें तेलग हे वेळ आल्यास निषेध करून सुधा-रणेचे काम सुकर करीत असत.

तेलगाच्या घरची परिस्थिती सामाजिक सुधारणेला अनुकूल नव्हती व त्यामुळें तो एक आपल्या बाजूला कमीपणा होता ही गोष्ट ते पूर्ण जाणून असत त्यामुळें ते फार जपून वागत असत व आपण होऊन पुढे येऊन ते कोणतीही सुधारणा-विषयक जबाबदारी आपल्यावर घेत नसत या कामी न्या रानडे हे त्याच्यापेक्षा चार पावलें पुढे गेलेले होते सन १८७० सालापासून पुढे—किंबहुना त्याच्या पूर्वीही—महाराष्ट्रात निघालेल्या बहुतेक सर्व चळवळीशी रानड्याचा प्रत्यक्ष व निकट सबध असे सन १८८७ पासून पुढे सुमारें पधरा वर्षेपर्यत तर सामाजिक परिषदेचे ते केवळ अतरात्मा होते व त्यामुळें देशातील बहुतेक सर्व प्रातातून त्याच्या दोन दोन, तीन तीन वेळा खेपा झाल्या होत्या अर्थात् सुधारणाद्वेष्टयाना त्या दीर्घ कालात " सामाजिक परिषद व न्या. रानडे " हा कायमचा टीकाविषय होऊन राहिला होता.

तेलगावर लोकाची अतिकडक टीका झाली ती फक्त दोन प्रसगी. सन १८९१ साली ते डॉ. भाडारकराच्या येथे पुनर्विवाहाला हजर राहून जेवणास बसले नाहीत त्या वेळीं एकदा लोकानीं टीका केली व सन १८९३ मध्ये त्याच्या अतकाळाच्या थोडे दिवस पूर्वी त्यानीं आपल्या अल्पवयी मुलीचें लग्न केलें त्यावेळीं एकदां लोकानीं त्याचेवर टीका केली. पण या दोन्ही प्रसगाविषयींचा जरूर तो खुलासा वर आलाच आहे.

सामाजिक सुधारणेबद्दल तेलगाना कळकळ ही होतीच, व तिच्या आवश्यकतेबद्दल मनाची खात्री झाल्यावर ती आचरणात—आपल्या कुटुबात—आणण्याइतका ते मनाचा निग्रहही करू शकत. त्यानी मिस्टर मलबारीना दिलेल्या उत्तरात बालविवाहाच्या बाबतीत जी सुधारणेची—विवाहविधीपेक्षा प्रथम गर्भाधानविधीचा कालच पुढे ढकलण्याबाबतची—दिशा दाखविली होती ती सुधारणा त्यानी स्वत च्या बाबतीतच अमलात आणली होती! त्याच्या बाबतीत गर्भाधानविधीची वेळ आली तेव्हा त्याचा अभ्यासक्रम पुरा व्हावयाचाच होता तो पुरा होईपर्यंत तो विधि पुढे ढकलण्याबद्दल तेलगानी आपल्या आईला निक्षून सागितले, व अखेर ते अभ्यासक्रम पुरा होईपर्यत कडकडीत ब्रह्मचर्यव्रत पाळून राहिले! असे हल्लींच्या तरुण मडळीपैकी किती जण राहू शकतील? तथापि सामाजिक बाबतीत ते आपल्या वडीलमाणसाच्या इच्छेविरुद्ध सहसा जात नसत, हे खरें.

वर सागिल्याप्रमाणें जरी तेलगाच्या हातून आचरणाच्या बाबतीत चूक झाली तरी सुधारणेच्या आवश्यकतेविषयी झालेली त्यांच्या मनाची खात्री व त्या कामी शक्य ते सहाय करण्याची त्याची असलेली तयारी या गोष्टीविषयी सुधारक मडळीना कधीच शका वाटली नसल्यामुळे ते तेलगाना आपले एक पुढारी मानीत असत व तेलगही त्याची उदाहरणे पाहून आपल्या अगी जास्त धैर्य येईल असा यत्न करीत असत या बाबतीतले कै. चदावरकराचे उद्गार अत्यत अर्थसूचक होते व ते मागे बावीस प्रकरणात दिलेले असल्यामुळें त्याची इकडे पुनरुक्ति करीत नाही.

तेलग हे आपल्या काळीं मुबईत सर्वतोपरी एक पुढारी होते. ते सन १८९१ मध्यें जी "विधवा विवाह सस्था" (Widow-Remarriage Association) निघाली तिचे अध्यक्ष होते इतर काहीं सस्थाशीं त्यांचा सबध होता. तसेंच ते हिंदु, मुसलमान, पारशी, युरोपीयन वगैरे सर्व धर्माच्या व जातींच्या लोकाशी स्नेहानें वागत असत. पण ते कधीही अशा अन्य धर्मीय लोकाच्या घरी चहा, काफी अगर मेजवान्या याकरिता गेले नाहीत व अशा मडळीना आपल्या घरींही त्यानी कधीं बोलाविले नाही! लॉर्ड रे, सर रेमड वेस्ट, सर विल्यम वेडरबर्न ही तेलगांची स्नेही मडळी असे. पण त्याच्यांशीं खाण्यापिण्याचे प्रसग तेलगांना कधींच आले नाहीत तेलगाचा नेहमींचाच अगदीं सात्विक आहार असे. व मद्याला तर त्यानीं अखेरपर्यंत स्पर्शही केला नाही. अशा माणसाचा वरील सारख्या मड-

ळीशी खाण्या-पिण्याचा प्रसंग येणें संभवनीयच नव्हतें पण हिंदूपैकी कोणत्याही जातीच्या लोकाशीं वागताना त्यानीं आपला सोवळेपणा मात्र कधी मिरविला नाही हे विशेष ते सगळ्याशीच बधुभावाने वागत असत.

लॉर्ड रे हे तेलगाचे मित्र असल्यामुळें युरोपीयन मडळीत काशीनाथपताचें फार वजन व चहा असे. त्या वेळचे युरोपीयन लोकापैकी मुबईतले वजनदार पुढारी म्हणजे गव्हर्नर लॉर्ड रे, कमाडर इन चीफ ड्यूक आफ कनॉट व युरोपीयन चेबर आफ कॉमर्सचे अध्यक्ष सर फ्रॅक फॉर्ब्स ॲडम हेच असत याच्याशीं तेलगाचा वरचेवर निकट सबध येत असे एकदा कोटात टाउन हॉलमध्ये मोठी सभा भरली होती प्लॅट फॉर्मवर मुबईतील पुढारी मडळी बसली होती. व गव्हर्नर साहेब येताच लेडी रे पुढे व लॉर्ड रे मागे अशी मडळी मुख्य आसनावर जात असता प्लॅटफॉर्मवरील पुढारी लोक उभे राहिले त्यात ना तेलग होते लेडी रे तेलगाजवळ येताच जरा चार मिनिटे त्याच्याबरोबर बोलण्याकरिता थाबल्या, व भाषण सपताच त्या आपल्या खुर्चीवर जाऊन बसल्या त्या तेलगाशी बोलत होत्या तोपर्यंत लॉर्ड रे हे तसेच मागे उभे होते ! ही गोष्ट त्या सभेस हजर असलेल्या एका गृहस्थाकडून आम्हास समजली साराश, इतका तेलगाचा युरोपीयन लोकाशी निकट सबध होता तरी जेवण्याखाण्याकरिता त्याचे येथे यानी किंवा याच्या घरी त्यानी येण्याजाण्याचे मात्र प्रसग आले नाहीत हे लक्षात ठेवण्यासारखे आहे. असो. पारशी मडळीमध्येसुद्धा तेलग फार लोकप्रिय असत. ते इतके की, कोटांत अलेग्झाड्रा इन्स्टिटयूशनच्या आजूबाजूस सध्याकाळच्या वेळी काही पारशी मित्राशी त्यांच्या खांद्यावर हात टाकून गप्पागोष्टी करीत फिरत असताना तेलगाना आम्ही किती तरी वेळा पाहिलेले आहे ! तरीदेखील त्याच्याशीं याचे खाण्याजेवण्याचे किंवा चहा-काफीचे प्रसंग आलेले कोणीच ऐकले नाहीत !

तेलगाच्या सामाजिक किंवा राजकीय दृष्टीनें उदार भावना असल्यामुळें हिदु लोकापैकीं कोणत्याही पोट जातीच्या किंवा पोटातल्याही पोट जातींच्या सस्थाना त्यांनी उक्तीनें किंवा कृतीनें कधी सहसा सहानुभूतिही दाखविली नाही व मदतही केली नाहीं. मात्र त्यांना एक दोन वेळा काही मित्राच्या भिडेखातर अशा सस्थातून पानसुपारीकरिता जावें लागलें होते ! त्याची हायकोर्ट जज्जाचे जागी सन १८८९ साली जेव्हा नेमणूक झाली तेव्हा मुबईतील दक्षिणी ब्राह्मणसभेनें काशीनाथपताना पानसुपारीकरितां बोलावून त्याचे गौरवपूर्ण अभिनदन केलें होतें. त्या

पानसुपारीला ते कांही स्नेह्यांच्या भिडेमुळें गेले होते. पण पुढें कांहीं दिवसांनीं मुबईच्या "सारस्वत समूहा" कडून त्याना पानसुपारी झाली तेव्हा त्या सस्थेच्या आमत्रणाचा स्वीकार करण्याचें त्याच्या मनात प्रथम नव्हतें. कारण इतकेंच कीं, ती जातिविशिष्ट सस्था ! परतु मग "समूहा"च्या मडळीनीं काशीनाथपताच्या वडिलाच्या मार्फत भीड घालताच तेलगानी त्या आमत्रणाचा स्वीकार केला व ते पानसुपारीला आले समूहाचे अध्यक्ष कै. रा. सा. नागेश विश्वनाथ पै यानीं काशीनाथपताना सस्थेतर्फे देण्याचें मानपत्र वाचून दाखविलें व तेलगानी त्याला समयोचित उत्तर दिलें उत्तर देताना तेलगानी समूहाच्या मडळीला चार उपदेशाचे शब्द सागून आपली सुधारणा करून घ्या असें सागितले. मोठे लोक असतात ते कोठल्याही संस्थेत गेले तरी तिकडील परिस्थितीचे निरीक्षण करून चालकाच्या श्रमाविषयी उत्तेजनपर उद्गार काढतात व त्याना चार उपदेशपर गोष्टी सागून त्याच्या व सस्थेच्या उत्कर्षासाठी झटण्याची दिशा दाखवीत असतात ह्या आपल्या कर्तव्यात न्या तेलग कधी चुकत नसत न्या रानडेही असेच वागत असत, व सर फरोजशहा हेही असेच करीत असत. पण त्यासबधाचा विस्तार आता नको.

---

प्रकरण सत्ताविसावे.

## तत्कालीन राजकीय परिस्थिति.



एकोणिसाव्या शतकाच्या शेवटच्या सुमारें तीस वर्षात मुबई इलाख्यात ज्यानीं अनेक प्रकारच्या सार्वजनिक चळवळी केल्या त्यात काशीनाथपत तेलग यांची प्रमुखत्वानें गणना होते. त्या वेळचे मुबईतील मुख्य पुढारी म्हणजे डॉ भाऊ दाजी, दादाभाई नवरोजी, नवरोजी फर्दुनजी, रा सा. मडलीक, फरोजशहा मेथा, तेलग, बद्रुद्दीन तय्यबजी हेच होत तेलगाच्या कामाचे स्वरूप वाचकाच्या पुरें लक्षांत यावे म्हणून पूर्वीचा थोडासा इतिहास देऊन त्या वेळीं खरी काय स्थिति होती याचें वर्णन देणें जरूर आहे

सन १७६५ सालापूर्वी ईस्ट इडिया कपनीला आपणास हिंदुस्थान देशांत काहीं सत्ता मिळेल याची चागलीशी कल्पनाही नव्हती. त्या सालीं कपनीला जेव्हां

दिल्लीच्या बादशहाकडून दिवाणीचा अधिकार देण्यात आला, तेव्हा मग सत्तेचा प्रश्न उत्पन्न झाला. पुढे मग सन १७७३ व १७८४ च्या कायद्याच्या योगानें कपनीच्या गव्हर्नर जनरलास कायदे करण्याचा अधिकार देण्यात आला त्यामुळें त्यानें केलेल्या नियमासच कायद्याचे स्वरूप येऊ लागले. त्यानतर सन १८३३ च्या कायद्याने गव्हर्नर जनरलच्या कार्यकारी कौन्सिलमध्ये एक "कायदे पडित" नेमण्यात येऊन हिदी लोकाना देखील सरकारी हुद्याच्या जागावर नेमण्याचा मार्ग खुला करण्यात आला. ही स्वराज्याच्या मार्गावरील पहिली मजल होय. पुढे १८५७ च्या बडानतर महाराणी सरकारानें या देशाची सर्व सत्ता कपनीच्या हातातून काढून आपल्या हातात घेतली, व त्याप्रमाणे सन १८५८ साली जाहीर-नामा काढण्यात येऊन लोकास जाहीर करण्यात आले. इतकेच नव्हे, तर त्या जाहीरनाम्याच्या द्वारें महाराणी सरकाराने मागील सन १८३३ च्या कायद्याच्या अन्वये हिदी लोकास युरोपीयन लोकाच्या बरोबरीने वागवू असें वचन दिलें आहे त्यामुळे तो जाहीरनामा म्हणजे हिदुस्थानातील लोकाच्या हक्काची एक सनद आहे असें मानण्यात येत असते. तथापि कायदे मडळ म्हणून त्या वेळी निराळी सस्था नव्हती. ती पुढे सन १८६१ मध्ये निर्माण करण्यात आली, व त्यात युरोपीयन व हिदी लोकाचे प्रतिनिधि नेमण्यात येऊ लागले सिव्हिल सर्व्हिसचे लोक निवडण्याकरिता मग विलायतेत परीक्षा घेण्यात येऊन त्यात हिंदी लोकाचा प्रवेश होऊ लागला. त्याच्यापुढे मग सुमारे तीस वर्षेपर्यंत देशात राजकीय दृष्टीनें लोकात खळबळ उत्पन्न करण्यासारखी महत्वाची गोष्ट घडली नाही लोकात शिक्षणप्रसार हळूहळू होऊ लागला होता अर्थात् जनतेत आपल्या राजकीय हक्काची अद्याप तितकी जाणीव उत्पन्न झाली नव्हती. त्यामुळे लोकाची चळवळ म्हणजे स्थानिक स्वराज्य, मीठाचा कायदा वगैरे केवळ किरकोळ स्वरूपाची असे लोकमत खवळून जाण्यास तशी काही कारणें लागतात ती सन १८७६ साली हिदुस्थानात लॉर्ड लिटन हे व्हाइसरॉय म्हणून आल्यानतर घडू लागली व लोक खडबडून जागे होऊ लागले. त्या वेळीं विलायतेत डिझरायली हे मुख्य प्रधान असून लॉर्ड सॅलिसबरी हे हिंदु स्थानचे सेक्रेटरी ऑफ् स्टेट होते. अशा वेळीं लॉर्ड लिटन हे इकडे व्हाईसरॉय म्हणून आल्यामुळें देशात एकामागून एक लोकास जाणवतील अशीं अन्यायाचीं व जुल्मी कृत्ये सरकारकडून घडू लागलीं. देशी वर्तमानपत्रावर त्याची तोडे बद-करण्याकरिता मुस्कटदाबीचा कायदा लादण्यात आला. आयात मालावरील जकात

उठविण्यात आली. मीठावरील कर वाढविण्यात आला "लायसन्स टॅक्स" म्हणून एक नवीन कर बसविण्यात आला अफगाणिस्थानची लढाई सुरू करण्यात आली. इकडे जनतेच्या दुर्दैवाने सन १८७७–७८ साली देशात भयकर दुष्काळ पडून मनस्वी लोकहानि झाली तरी ही सकटे निवारण्याची सरकारकडून चागली उपाय-योजना झाली नाही अशा कारणपरपरेमुळे हिदुस्थानचे लोक एकदम खडबडून जागे झाले व त्यानी जगी चळवळ केली देशात वस्तुत शिक्षणप्रसार मोठ्या प्रमाणावर अद्यापि झाला नव्हता व सार्वजनिक चळवळीत लोक अद्याप तरबेज झाले नव्हते तरी अशा स्थितीत आमच्या तत्कालीन पुढाऱ्यानी सार्वजनिक चळवळ केली व त्या कामामध्ये त्या वेळच्या बऱ्याच युरोपीयन लोकाची मदत झाली, हें कबूल केले पाहिजे पुढे सन १८८० सालीं विलायतेतील कॉन्झर्व्हेटिव्ह प्रधान मडळ बदलून ग्लॅडस्टन साहेब मुख्य प्रधान झाले, व त्यानी त्याच साली लॉर्ड रिपन यास इकडे व्हाईसराय म्हणून पाठवून दिले, हे उदारधी गृहस्थ इकडे आल्यापासूनच लौकिक दृष्टीने राज्यकारभाराचे स्वरूप बदलू लागले रिपन साहेब देशात आल्याबरोबर त्यानी प्रथम मुस्कटदाबीचा–Gagging Act–रद्द केला स्थानिक स्वराज्यासबधाचा आपला ठराव प्रसिद्ध केला. अफगाणिस्थानाशी चालू असलेली भानगड मिटवून तिकडील ब्रिटिश सैन्य परत बोलाविले. मीठावरील कर कमी केला शिक्षणप्रसाराविषयी चौकशी करण्याकरिता एक कमिशन नेमले व राणीच्या जाहीरनाम्यातील तत्वाबरहुकूम युरोपियन व हिंदु याचे समान हक्क स्थापन करण्याच्या इराद्याने इल्बर्ट बिल पुढे आणलें. यासबधाचा विस्तार पुढील प्रकरणात येईलच पण इकडे मुख्य सागण्यासारखी गोष्ट हीच की रिपनसाहेबाची कारकीर्द सुरू झाल्यापासूनच "आपण जरा उदार वातावरणात आहो" असे हिंदी लोकास वाटू लागले व त्याच्या राजकीय आकाक्षाना अकुर फुटू लागले. याचा परिणाम पुढे सन १८८५ साली राष्ट्रीयसभेच्या स्थापनेंत झाला, व देशातील राजकीय चळवळ व्यवस्थितपणें सुरू झाली राष्ट्रीयसभेनें प्रथम कायदेकौन्सिले सुधारण्याचाच प्रश्न हाती घेतला आणि त्या दिशेनेच खटपट चालविली त्या कामी आमच्या लोकास पुढे खुद्द इग्लडातल्याच काही उदारधी मडळीची मदत झाली हे प्रथम सागितले पाहिजे. त्यापैकी हेनरी फॉसेट, जॉन ब्राइट व चार्लस ब्रॅडला याचीं नावे आधी सागितलीं पाहिजेत. ब्रॅडलॉ साहेब तर सन १८८९ साली मुबईस भरलेल्या पाचव्या राष्ट्रीय सभेत हजर होते व त्याच्या समक्षच कायदे-कौन्सिलाच्या सुधारणेबाबतच्या ठरावावर सभेत वादविवाद झाला. त्यासबधाचे

मग एक कच्चें बिल तयार करण्यात येऊन तें ब्रॅडला साहेबाच्या स्वाधीन करण्यात आले. ते त्या वेळी पार्लमेटचे सभासद होते व त्यानी आपण विलायतेत परत गेल्याबरोबर ते बिल पार्लमेटमध्ये सादर करतो असें सागितले. इकडे लोकाची इतकी तयारी झाल्याबरोबर त्या वेळच्या नोकरशाहीचे धाबे दणाणलें, व तिकडे सेक्रेटरी ऑफ स्टेट लॉर्ड क्रॉस यानीच एक कायदेमडळाच्या सुधारणेचे बिल तयार करून पार्लमेटपुढे आणलें पुढे मुबईच्या राष्ट्रीयसभेत ठरल्याप्रमाणे आमचे एक प्रतिनिधिमडळ विलायतेत गेलें व त्यानी तिकडे व्याख्यानाची व भाषणाची झोड चालविली. त्यात उमरावतीचे मोरोपत जोशी व मुधोळकर होते, मुबईचे दादाभाई होते, कलकत्त्याचे सुरेंद्रनाथ बानर्जी होते, मद्रासचे नॉर्टन होते खुद्द ह्यूम व वेडरबर्न हे तर होतेच होते इग्लडमध्ये या मडळीनी खुद्द ग्लॅडस्टन साहेबाची गाठ घेऊन त्याना आपल्या आगमनाचा हेतु कळविला. ग्लॅडस्टन साहेबास सर्व हकीकत ऐकून फार समाधान वाटले व त्यानी पार्लमेटमध्ये बिलाच्या द्वितीय वाचनाचे वेळी होणाऱ्या वादविवादात आपण भाग घेऊ असे वचन दिले त्याप्रमाणे ग्लॅडस्टन व ब्रॅडलॉ या दोन गृहस्थाच्या सहाय्यामुळे बिलात निवडणुकीचे तत्व समाविष्ट करण्यात आले व त्या सन १८९२ च्या कायद्याच्या अन्वये इकडील काही विशिष्ट सस्थाना कायदेमडळात प्रतिनिधि निवडून पाठविण्याचा हक्क देण्यात आला. ही स्वराज्याच्या वाटेतील दुसरी मजल होती असे म्हणण्यास हरकत नाही. या सबधात पुढें सतरा वर्षेपर्यंत काही एक फेरफार झाला नाही. फक्त राष्ट्रीय सभेची अधिवेशने चालू होती, सामाजिक परिषदा चालू होत्या व दुसऱ्या काही किरकोळ चळवळी झाल्या. पण पुढे सन १९०५ मध्ये जेव्हा लॉर्ड कर्झन साहेबानी बगाल प्राताची, तिकडील लोकाच्या म्हणण्याकडे बिलकुल लक्ष न देता फाळणी केली, तेव्हा सबध बगालचे लोक खडबडून जागे झाले व त्यानी अश्रुतपूर्व अशी जगी चळवळ केली. त्याचा परपरया इतर सर्व प्रातावर कमी अधिक प्रमाणात परिणाम झाला व इग्लडमधील मुत्सद्दी मडळीला बगालच्या फाळणीचा पुन्हा विचार करावा लागला. सन १९०५ च्या अखेरीस झालेल्या निवडणुकीत विलायतेतील कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षाची नुसती दाणादाण उडाली व उदारमतवादी—लिबरल—पक्ष अधिकारारूढ झाला. तेव्हा जें प्रधानमडळ विर्माण करण्यात आले, त्यात प्रसिद्ध लॉर्ड मॉर्ले याची हिंदुस्थानच्या सेक्रेटरी ऑफ स्टेटच्या जागी नेमणूक झाली. जॉन मॉर्ले याची, ते एक विद्वान् ग्रथकार, बर्क व मिल्ल याचे चेले व आपल्या उत्तमोत्तम लेखांनी इग्लडातील निदान एक दोन पिढयातील लोकात

जागृति उत्पन्न करणारे, म्हणून तर प्रसिद्धि होतीच, पण ते प्रसिद्ध ग्लॅडस्टन साहेबाचे केवळ उजवे हात या नात्याने त्याची प्रख्याति असल्यामुळें त्याच्या नेमणुकीने या देशातील लोकात साहजिकच काही आकाक्षा उत्पन्न झाल्या. त्यानी मग त्या वेळचे व्हाइसरॉय लॉर्ड मिंटो याना वळवून इकडील कायदेकौन्सि-लच्या सुधारणेची एक योजना तयार करून ती पार्लमेंटमधून पास करून घेतली. त्या कामी त्याना ना गोखले यानी बरीच मदत केली, हे प्रसिद्ध आहे. तोच सन १९०९ चा मॉर्ले-मिंटो याच्या नावाने प्रसिद्ध असलेला सुधारणा-कायदा होय. ह्या सुधारणाच्या योगाने राजकीय बाबतीत देशाचे पाऊल बरेच पुढे पडले. ही स्वराज्याच्या मार्गावरील तिसरी मजल होय. त्यायोगाने कायदेमडळात लोकनियुक्त सभासदाची सख्या वाढली, बजेटावर ठराव पास करण्याचा अधिकार मिळाला, हे तर झालेच, पण प्रत्यक्ष व्हाइसरायच्या कार्यकारी कौन्सिलमध्ये एका हिंदी माण-साचा प्रवेश झाला ही बाब फार महत्वाची होती. ही सुधारणा घडवून आण-ण्याच्या कामी मॉर्लेसाहेबाच्या मार्गात जबरदस्त अडचणी होत्या खुद्द सप्तम एडवर्ड बादशहा हेच त्या सुधारणेला विरुद्ध होते असे म्हणतात. पण लॉर्ड मॉर्ले हे खबीर हृदयाचे असल्यामुळे व त्याना मुख्य प्रधान लॉर्ड ॲस्क्विथ याचे पाठ-बळ असल्यामुळे ती सुधारणा अखेर अमलात आली व लॉर्ड सिंह याची व्हाइ-रायच्या कौन्सिलात—पहिले हिंदी कार्यकारी सभासद म्हणून—नेमणूक झाली. त्याच वेळी मग बगाल, मुबई व मद्रास येथील गव्हर्नराच्या कार्यकारी मडळात देखील एकेक हिंदी सभासद नेमला जावा हें ओघानेंच प्राप्त झाले. इतकेच नाही तर खुद्द सेक्रेटरी ऑफ स्टेटच्या कौसिलमध्ये देखील दोन हिदी सभासदाच्या नेमणुका झाल्या तदनतर पुढे सन १९१४ मध्ये युरोपातील महायुद्ध सुरू झाले व त्यात इग्लड पडल्यामुळें त्या कामी त्याला हिदुस्थानच्या लोकानी अपेक्षेबाहेर मदत केली त्याचा परिणाम असा झाला की पार्लमेंटने हिदुस्थानाला ( ता १७ मे १९१७ रोजी ) अखेर स्वराज्य देण्याबाबतचा आपला सकल्प जाहीर केल्या-मुळें त्याबरहुकूम सेक्रेटरी ऑफ स्टेट मिस्टर मॉटेगु यानीं हिंदुस्थानात जातीनें येऊन निरनिराळ्या पुढाऱ्याच्या भेटी घेतल्या व त्याप्रमाणें सुधारणाचा एक मसुदा तयार करून पार्लमेंटमध्ये सादर केला. तोच सन १९१९ चा कायदा होय. तो हिंदी लोकाच्या पदरात पडलेला स्वराज्याचा पहिला हप्ता आहे आता दुसरा हप्ता काय द्यावयाचा याविषयीं सरकारात तपास चालू आहे. त्याचें फळ काय मिळावयाचें तें थोड्या दिवसानीं दिसेलच.

हा जो वर गेल्या सुमारें दीडशें वर्षांतील आमच्या देशाच्या राजकीय दृष्टीनें झालेल्या प्रगतीचा त्रोटक इतिहास सांगितला, त्यातून एक दोन अत्यंत महत्वाच्या गोष्टी बाहेर पडतात पहिली गोष्ट ही की, हिंदुस्थानाला कोणताही राजकीय हक्क मिळावयाचा असेल, तर तो बहुतेक करून विलायतेतील लिबरल पक्षाकडून मिळत असतो राष्ट्रीय सभेच्या पूर्वीच्या गोष्टी सोडून दिल्या तरी, सन १८९२ चा कायदा ग्लडस्टन-ब्रॅडलॉ याच्या सहाय्यानेच मिळाला सन १९०९ चा कायदा लॉर्ड मॉर्ले याच्यामुळे मिळाला, व सन १९१९ चा कायदा मि मॉटेगु याच्यामुळे मिळाला. या गोष्टी स्पष्ट आहेत सदहू कामी दुसऱ्या काही गोष्टी सहाय्यभूत झाल्या असतील, पण स्थूलदृष्टीने त्याचे तेवढे महत्व नाही दुसरी गोष्ट ही की, प्रत्येक खेपेला लोकास जागे करून त्याना उद्योग करावयास प्रवृत्त करणारे एकादें दुसरे—मग ते नोकरशाहीकडून असो, किंवा नसो—असे कारण घडत असते, व लोक त्याप्रमाणे शिकस्तीची खटपट करतात व त्याचे बहुधा फळ त्याच्या पदरात पडते. सन १८९२ चा कायदा होण्यास राष्ट्रीय सभेचे श्रम कारणीभूत झाले होते पण तिचा जन्म होण्यास ह्याच्या पूर्वी होऊन गेलेली लिटनशाही व इल्बर्ट बिलासबधी युरोपियन लोकानी केलेली चळवळ ह्या गोष्टी कारणीभूत झाल्या होत्या, हे लक्षात ठेवले पाहिजे सन १९०९ सालच्या कायद्याला मुख्य कारणे म्हणजे बगालची फाळणी व तदनतरची चळवळ हीच होत, व सन १९१९ च्या कायद्याला कारणे महायुद्ध व त्यात मदत करून हिंदुस्थानाला काही तरी हक्क मिळावे म्हणून लोकानी केलेली चलवळ हीच होत. तिसरी महत्वाची गोष्ट ही की, इग्लडमधील लोकाची हिदुस्थानाला काही हक्क देण्याची तयारी असली तरी त्या कामी नोकरशाही किवा तिचे पुरस्कर्ते नेहमी काही तरी अडचणी उपस्थित करण्यास तयार असतात सन १८९२ मध्ये मुळी लॉर्ड क्रॉस यानी ब्रॅडलॉ याच्या बिलाच्या परिणामाला भिऊन आपण होऊनच कौन्सिलच्या सुधारणेचे बिल पुढे आणल्यामुळे नोकरशाहीकडून काही अडचण उपस्थित होण्याचा सभवच नव्हता. पण सन १९०९ सालच्या कायद्याला हरकत घेण्यास पार्लमेटमध्ये स्वत लॉर्ड कर्झन हेच तयार होते. पण खुद्द लॉर्ड मॉर्ले याच्या वजनापुढे कर्झन याचे तेज पडले नाही. शिवाय मॉर्लेसाहेबानी लॉर्ड मिंटो यास आपल्या योजनेस पूर्वीच अनुकूल करून घेतले होतें त्यामुळें नोकरशाहीचे किवा कर्झनसाहेबाचे काहीच चालण्यासारखें नव्हतें. सन १९१९ सालच्या कायद्याविषयीची हकीकत अगदी ताजी आहे मॉटेगु साहेब तिकडे नवीन सुधार-

णेच्या उपाययोजनेत गुतले होते तर आमची नोकरशाही इकडे घाई घाईनें " रॉउलेट ॲक्ट " सारखा जुलुमी कायदा, अस्तगत होऊ घातलेल्या कौन्सिलमधून पास करून घेण्याच्या उद्योगात होती ! तो कायदा अखेर सर विल्यम व्हिन्सेट यानी लोकमताला धाब्यावर बसवून पास करून घेतलाच, पण तिकडे मॉटेगुसाहेब पडले खबीर, म्हणून तो कायदा अमलात आणण्याचा पोरखेळ नोकरशाहीला चालविता आला नाही ! अखेर एक दोन वर्षानतर तो कायदाही इतर काही अशाच कायद्याबरोबर रद्द करण्यात आला ! म्हणजे तो कायदा, लौकिक दृष्टीने गर्भावस्थेतच मृत झाला असे म्हणण्यासही हरकत नाही ! त्यात गमत ही की, ज्या व्हिन्सेट साहेबानी कौन्सिलमध्ये आकाशपाताळ एक करून तो कायदा मोठ्या शिकस्तीने पास करून घेतला, त्यानीच त्याला शेवटी मूठमाती दिली ! आणखी एक गोष्ट इकडे लक्षात ठेवली पाहिजे आमच्यापैकी काही लोक जरा कोठे आपणास थोडे अपयश आले की निराश होतात असे निरुत्साह होऊन आम्ही हात जोडून बसण्याचे कारण नाही आमचा पक्ष सत्पक्ष आहे, व त्याला ब्रिटिश पार्लमेट व मुत्सद्दी लोक ह्याचा पाठिबा आहे शिवाय असल्या मोठ्या गोष्टी झटपट होत नसतात त्याला दिनावधि लागणारच, यासबधात बरोबर चाळीस वर्षापूर्वी ब्रॅडलॉसाहेबानी पाचव्या राष्ट्रीय सभेस केलेला उपदेश आम्ही नेहमी लक्षात ठेविला पाहिजे ते म्हणाले —

" I would remind you as an encouragement to you to be patient, that in England great reforms have always been slowly won Those who first enterprised them were called seditious, and sometimes sent to jail as criminals, but the speech and thought live on. No imprisonment can crush a truth, it may hinder it for the moment, it may delay it for an hour, but it gets an electric elasticity inside the dungeon walls, and it grows and moves the whole world when it comes out."

नोकरशाहीशी चालू असलेल्या झगड्यात या गोष्टी आम्ही विसरून चालावयाचे नाही. त्या लक्षात ठेवूनच आपणास आपला उद्योग चालू ठेविला पाहिजे

वर दिलेल्या हकीकतीतल्या सन १८७२ ते १८९३ च्या मुदतीत काशीनाथपंत तेलगानी आपल्या देशाची कामगिरी केली आहे त्या मुदतीत लॉर्ड नॉर्थब्रुक, लॉर्ड लिटन, लॉर्ड रिपन, लॉर्ड डफरीन व लॉर्ड लॅन्सडाऊन हे पाच गृहस्थ व्हाइसरायाचे जागी एका मागून एक असे येऊन गेले असून मुबईच्या गव्हर्नराच्या जागी सर फिलिप वुडहौस, सर रिचर्ड टेपल, सर जेम्स फर्ग्युसन, लॉर्ड रे व लॉर्ड हॅरिस हे पाच आपआपल्या मुदतीपर्यंत अधिकारावर होते त्या वीस बावीस वर्षांच्या काळात देशात अनेक प्रश्न निघाले, अनेक चळवळी झाल्या, अनेक जुन्या सस्थाचे पुनरुज्जीवन झाले, अनेक नव्या सस्था निर्माण झाल्या पण यापैकी बहुतेक सर्वात तेलगाचे प्रमुखत्वाने अग होते त्यासबधात यानी इतकी भाषणे केली की ती सर्व एके ठिकाणी केल्यास तो एक मुबईतील सार्वजनिक कामाचा कित्येक वर्षांचा इतिहासच होईल ! सर रेमड वेस्ट हे म्हणतात –

"To record his speeches and to describe the occasions of them, would be in a manner to epitomize the political life of Bombay for many years"

त्यात लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे तेलगाना प्रथमपासूनच सार्वजनिक कामे करण्याची हौस असल्यामुळे त्याकरिता त्यानी कॉलेजात ते होते तेव्हापासूनच तयारी केली होती पण यासबधाचे मागील एका प्रकरणात विवेचन झालेले असल्यामुळे त्याची इकडे द्विरुक्ति करीत नाही त्याचे मुख्य धोरण हें होते की, देशात इग्रेजाची सत्ता झाल्यापासूनच आमचे लोक आपल्या दीर्घ निद्रेतून जागे झाले आहेत, व आमची आम्हास आताच कोठे थोडीशी ओळख पटत चालली आहे ती ओळख अद्यापि पुरी पटली नाही ती पटेपर्यंत आम्हास इग्लिश लोकाचा सहवास हवाच आहे अर्थात् इग्लिश लोकाची सत्ता इकडे आणखी काही काळपर्यंत असणे जरूर आहे आम्हास या राज्यात काही हक्क आहेत तशीच आमची काही कर्तव्येही पण आहेत हक्काकडेच केवळ लक्ष ठेऊन कर्तव्याकडे दुर्लक्ष करणे बरोबर नाही आम्ही आपली कर्तव्ये जसजशी बजावू तसतसे आम्हास अधिकाधिक हक्क मिळत जातील, अशी आम्हास राजाकडून, पार्लमेटकडून, व इतर अधिकारी लोकाकडून वचने मिळाली आहेत अर्थात् ते हक्क मिळविण्याचे सनदशीर मार्ग आम्हास खुलेच आहेत, व त्या हक्काकरिता भाडण्यास किंवा चळवळ करण्यास या राज्यात मुबलक वाव आहे याप्रमाणे

आपल्या हक्काची व आपल्या कर्तव्याची जाणीव त्या वेळच्या सर्व पुढाऱ्यात होती व त्याप्रमाणे ते आपल्या सर्व चळवळी चालवीत असत त्या वेळचे मागे सागितल्याप्रमाणे मुबईतले पुढारी म्हणजे डॉ भाऊ दाजी, दादाभाई नवरोजी, नवरोजी फर्दुनजी, रा सा मडलिक, हेच होते, व त्याच्याच धोरणाने—त्यानीच मळलेल्या पायवाटेने—जाण्याचा तेलगानी निश्चय केला

आमचे हिंदीराष्ट्र फार मोठे व अति प्राचीन देशात सर्व प्रकारच्या सोयी. परतु इग्लिश लोक यावयाच्या पूर्वी आमची दु स्थिति झाली होती. ते स्वत इकडे कोणत्याही हेतूने आलेले असोत पण आमच्या दु स्थितीच्या वेळी त्याचा आम्हास उपयोग झाला त्याच्यापासून आम्ही पुष्कळ नवीन गोष्टी शिकलो—अद्यापि शिकत आहो पाश्चात्य देशातील सुधारणा, राजकीय चळवळी, वगैरे गोष्टीचे ज्ञान आम्हास इग्लिश लोकापासूनच होत आहे, व अशा गोष्टीचे आम्हास पुरे ज्ञान होईपर्यंत आम्हास त्याच्या सहवासाची जरूरी आहे ही भावना आमच्या पहिल्या पिढीतल्या पुढाऱ्यामध्ये जागृत होती, व तिलाच अनुसरून तेलग, मेथा वगैरे पुढाऱ्यानी आपल्या चळवळी चालविल्या खुद्द विष्णु शास्त्री चिपळूणकर यानी देखील ( केसरी, ता १४-३-८२ ) "देशोन्नति" या विषयासबधाने लिहिताना असेच उद्गार काढले आहेत –"देशोन्नतीचे मुख्य लक्षण देशाभिमान होय तो जसा ग्रीस, रोम, इग्लड, व अमेरिका या पाश्चात्य देशात आढळून येत असे, तसा इकडील आशियाखडातील राष्ट्रात येत नाही, इकडे धर्माभिमान व जातिभेद मात्र आहे यास तोड इतकीच की इग्लिश लोकापासूनच आम्हास गुरुकिल्ली घेतली पाहिजे त्याचा इतिहास, त्याचा सहवास, त्याच्या उलाढाली पाहून आम्ही किती गचाळ आहो याची प्रतीति येईल व काल योगे करून देशाभिमानवृत्ति आम्हामध्ये सचरू लागेल"

त्या पुढाऱ्यानी सरकारावर व सरकारी अधिकाऱ्यावर प्रसग विशेषी टीका केली, त्याचे दोष दाखविले या गोष्टी खऱ्या आहेत पण तसे करण्यास त्याना भरभक्कम आधार होता सन १८३३ चा कायदा, सन १८५८ चा राणीचा जाहीरनामा, सन १८७७ च्या दरबारच्या वेळी लॉर्ड लिटन यानी दिलेली वचने, त्याचप्रमाणे बेंटिक, एल्फिस्टन, मनरो, मालकम यानी वेळोवेळी जाहीर रीतीनें काढलेले उद्गार, याच्या आधारावर त्या पुढाऱ्यानी चळवळी चालविल्या व काही बाबतीत त्याना यशही आलें त्या पुढाऱ्यामध्ये आणखी एक विशेष होता ते जसे सरकाराशी लोकाच्या हक्काकरिता भाडत असत तसेच ते लोकाकडे वळून त्यानी आपली सरकाराशी

कर्तव्यें कशी करावी हेही स्पष्टपणे दाखवीत असत लोकास दिशा दाखविण्याचे काम पुढाऱ्याचे आहे पण हक्काकरिता भाडून कर्तव्याकडे दुर्लक्ष करणे हे ठीक नाहीं यासबधानें खुद्द तेलगानीच एकदा असे उद्गार काढले आहेत -

"I do not object for an instant to their telling the Government, if they so believe, that the people will be discontented with the Government measure But in so doing they must remember that they are doing only one half of their duty Their whole duty requires that they should tell their brethren how they mis-appreciate the principles and the actions of Government in the matter."

त्या वेळेच्या पूर्वीपासून—किंबहुना कपनी सरकारच्या वेळेपासून अनियत्रित सत्ता गाजविण्याची जी काही अधिकारी लोकास सवय लागली होती तिला आळा घालून राज्यकारभार केवळ लोकहिताच्या दृष्टीने हाकला जाईल असें करणे हाच त्या वेळच्या पुढाऱ्याच्या चळवळीचा मुख्य हेतु होता सिव्हिल सर्व्हिसमध्ये हिंदी लोकास जास्त जास्त प्रविष्ट होऊ देणे, कायदेमडळात आमच्या लोकास जास्त प्रमाणात निवडून येण्याला सवड ठेवणे, म्युनिसिपालिट्या वगैरे पूर्णपणे लोकाच्या ताब्यात देणे वगैरे सर्व कामाचा वरील हेतूत समावेश होतो असो या पद्धतीनेच डॉ भाऊ दाजी, दादाभाई, नवरोजी फर्दुनजी, मडलिक, मगळदास नथूभाई वगैरे पुढाऱ्यानी सार्वजनिक कामे केली, व त्याच मार्गाने तेलग, मेथा, बद्रुद्दीन व वाच्छा हेही जाऊ लागले

साप्रत काळी राजकीय बाबतीत आमचे विचार फार पुढे गेले आहेत, व सरकारच्या व लोकाच्या दृष्टीपुढे आज स्वराज्य हे ध्येय आहे, फक्त ते ध्येय गाठावयाचे केव्हा याबद्दलच काय तो मतभेद आहे लोक म्हणतात, स्वराज्य आजच पाहिजे सरकार म्हणते, ते उद्या देऊ अशा स्थितीत तेलगाच्या वेळचे राजकारण किंवा त्यानी त्या कामी केलेली देशसेवा याचे वर्णन कित्येकास नीरस वाटेल किंबहुना ते चर्वित-चर्वणही वाटेल पण तो इतिहास आहे हे वाचकानी लक्षात ठेवावे पूर्वीच्या पुढाऱ्यानी परिश्रमपूर्वक मोठमोठी कामे करून जमीन तयार केली व त्यावरच पुढच्या पिढीतल्या लोकानी कामे केली—व काही हल्ली

करीत आहेत म्हणजे पूर्वीच्या पुढाऱ्याच्या श्रमाचा आम्हास फायदा मिळत आहे. अर्थात् मागच्या गोष्टीना ऐतिहासिक महत्व आहेच व त्यापासूनही आम्हास बोध झाल्याशिवाय राहणार नाही

दुसरीही एक गोष्ट आहे तिचा उल्लेख केला पाहिजे गेल्या चाळीस पन्नास वर्षांत आमचे पाऊल पुष्कळ बाबतीत पुढे पडले आहे व पडत आहे यात शकाच नाही परतु त्याबरोबरच परिस्थिति अधिक बिकट होत चालली आहे हे डोळयाआड करून चालावयाचे नाही शिक्षणप्रसार बराच झाला आहे, पदवीवर शेकड्यानी बाहेर पडत आहेत ह्या गोष्टी सत्य आहेत पण देशाचे पाऊल हरएक बाबतीत पुढे पडावे, व ते पडले म्हणजे आपलेही पाऊल व्यक्तिश पुढे पडणारच ही भावना किती सुशिक्षित लोकाचे ठिकाणी उदित झाली आहे ? व त्याकरिता आपल्या हातूनही काही तरी—अति स्वल्प प्रमाणात का असेना—घडले पाहिजे ही जाणीव कितीकामध्ये उत्पन्न झाली आहे ? खरे पाहिल्यास अशी जाणीव फार फार थोड्या लोकामध्ये झाली असेल बहुतेक कोणामध्ये नाहीच असे म्हणण्यासही क्षणभर हरकत नाही. वर्तमानपत्रात व कित्येकाच्या भाषणात देशकार्याच्या गोष्टी आपण नेहमी वाचीत असतो व ऐकतही असतो पण ते देशहित म्हणजे खरोखरी देशाचे हित की स्वत चे—किंबहुना स्वजनाचे हित—हे ओळखणार कसे ? थोडक्यात सागावयाचे म्हणजे देशात शिक्षणाचा प्रसार झाला व आम्ही विद्वान् झालो तरी आमच्यात अद्यापि राष्ट्रीय दृष्टिच उत्पन्न झाली नाही, असे दु खाने म्हणावे लागते मुसलमान मनुष्याला—बहुतेकाला—देशाचे हित मुळीच दिसत नसून मुसलमानाचे हित तेच देशहित असे म्हणण्यापर्यंत कित्येकाची मजल गेली आहे ! इतर जातिही मुसलमानाच्याच वळणावर जात आहेत मागसलेल्या किंवा अस्पृश्य जाति सोडून द्या पण वरिष्ठ जातीमध्ये तरी उदार दृष्टि उत्पन्न झाली आहे काय ? किंवा त्या दिशेने कोणी प्रयत्न करीत असतात काय ? ब्राह्मणापैकी देशस्थ, कोकणस्थ, सारस्वत किंवा कऱ्हाडे या जाति महाराष्ट्रात प्रसिद्ध आहेत पण कित्येकास इतकेच भेद पुरेसे वाटत नाहीत ! फिरून माध्यदिन, काण्व, कऱ्हाडे याचे निरनिराळे समाज किंवा क्लब आहेतच, सारस्वतापासून कित्येक कुडाळदेशकरास विभक्त होणे गोड वाटत असते ! प्रश्न इतकाच की, आता हे भेद जाणार तरी कोठवर ? अशी या निरनिराळ्या भेदाची वाढ होऊ देणे म्हणजे राष्ट्रीय दृष्टीचा सकोच करणे नव्हे काय ? या गोष्टीचा विचार केला म्हणजे चाळीस वर्षापूर्वीची स्थिति किती बरी वाटते ! त्या वेळी शिक्षणप्रसार इतका नव्हता हे

खरे, पण हल्लीच्या जाति, हल्लीचे धर्म, हल्लीचे समाज बहुतेक सर्व जशाचे तसे होते तशा स्थितीतही तेलग, रानडे, मेथा, दादाभाई, बद्रुद्दीन वगैरे थोर पुरुष कसे शुद्ध हेतूने वागत होते, त्याचा देशाभिमान—हल्लीसारखा वाचाळतापूर्ण नसला तरी—किती कडकडीत असे व तत्प्रीत्यर्थ ते कसे निरलसपणे श्रम करीत असत हे पाहिले म्हणजे राष्ट्रीय दृष्टीने हल्लीच्या पिढीचे लघुत्व नजरेत भरते व मन विषण्ण होते ! असो या दृष्टीने पाहिल्यास तेलगाच्या वेळच्या काही गोष्टी समजल्यापासून प्रस्तुत पिढीतील लोकास अत्यत बोध झाल्याशिवाय राहणार नाही असें वाटते म्हणूनच तत्कालीन काही काही गोष्टीचे वर्णन इकडे थोडक्यात देणे जरूर आहे

---

प्रकरण अठ्ठाविसावे.

# वक्तृत्व.

काशीनाथपत तेलग हे सार्वजनिक कामात पडू लागल्यापासून त्याच्यामधील आणखी एका गुणाचे—वक्तृत्वाचे—अस्तित्व लोकाच्या निदर्शनास येऊ लागले इग्लिश वाङ्मयाच्या वाचनाने त्याच्यामध्ये भाषाप्रभुत्व तर आलेच होते, पण वक्तृत्व वाढविण्याचाही त्यानी प्रयत्न केलेला होता ते कॉलेजात होते त्यावेळीच फुरसतीच्या वेळी लायब्ररीत ग्लॅडस्टन व ब्राइट याची भाषणें लक्षपूर्वक वाचीत असत हे मागें सागितलेच आहे त्याचप्रमाणे ते सभामधून भाषणे करण्याची सधि मिळाल्यास ती व्यर्थ दवडीत नसत या त्याच्या अभ्यासामुळे ते एक उत्तम वक्ते आहेत अशी ते कॉलेजात होते तेव्हापासूनच त्याची कीर्ति झाली होती इग्लिश ही परकीय भाषा त्या भाषेत बोलताना तेलगाचे जे वक्तृत्व दिसून येई ते पाहून सर्वानाच आश्चर्य वाटे. इग्लडमध्ये मोठमोठ्या वक्त्याची ज्यानी भाषणे ऐकली होती अशा दोन इग्लिश गृहस्थाचे तेलगाच्या वक्तृत्वाविषयी अभिप्राय इकडे देणे योग्य दिसते सर रेमड वेस्ट हे म्हणतात —

"His command of pure and idiomatic English showed both his natural good taste and the soundness of his academical training His style was framed on

the classic writers and expressed his meaning with admirable force and clearness It may, indeed, be doubted if any native orator has equalled him in lucidity and restraint which is so much more effective than exaggeration and over embellishment × × × A sweet persuasive reasonableness, illumined by a diffused radiance of feeling, characterised his public utterances from first to last × × × But this may be said with confidence, that Telang showed remarkable sagacity and judgment in taking up his positions, that he maintained them with great dialectic skill, and in language of a limpid purity that would have done credit to an English-born orator He was in fact, an assiduous student of Bright's speeches, and, without rising to majesty, he could infuse into his own addresses on great occasions an earnestness and patriotic fervour clothed in unaffected language not unworthy of the great tribune. × × × He could address a surging crowd on a proposed Salt Tax, or License Tax, without being carried away by his own eloquence from the region of loyalty and moderation × × × He could rise with the popular feeling but he could not sink with it below the level of his own magnanimity."

वेस्ट साहेबानी इकडे तेलगाची प्रसिद्ध वक्ते जॉनब्राईट याच्याशी तुलना केली असून, त्याच्याशी त्या वेळी कोणीच हिंदी—native—बरोबरी करू शकला नाही असे म्हटले आहे

दुसऱ्या एका इग्लिश गृहस्थाचा तेलगाच्या वक्तृत्वाविषयी अभिप्राय येथे देणे अवश्य दिसते कदाचित् तेलग आपली भाषणें पूर्वी लिहून काढीत असत अगर ते तशी पूर्वीच तयारी करीत असत असे कित्येकास वाटण्याचा सभव आहे.

पण खरा प्रकार तसा नव्हता हे मिस्टर जॉन ॲडम याच्या पुढील अभिप्राया-वरून दिसून येईल —

"With his matter thoroughly digested and his line of argument carefully arranged, he, like John Bright, left the appropriate words to come at the time Taken all round, in manner, matter and effect, his speeches may perhaps, be compared with those of Lord Roseberry than with the public utterances of any other English speaker of the present day"

यात तेलगाची जॉन ब्राइट व लॉर्ड रोजबरी याच्याशी वक्तृत्वामध्ये तुलना केलेली असून ते पूर्वी कधीच तयारी करीत नसत असे म्हटले आहे आपल्याला काय बोलावयाचे अगर कोणत्या मुद्यावर बोलावयाचे याचा ते मनाशी विचार करून ठेवीत असत पण भाषेच्या रचनेकडे ते मुळीच लक्ष देत नसत बोलाव-याचे काय याचा मनाशी विचार ठरल्यावर ते बोलावयास उभे राहत असत व ते उभे राहिल्यावर योग्य शब्दरचना त्याना सहज आपोआप सुचत असे यावरून त्याच्या भाषाप्रभुत्वाची सहज कल्पना होते

इल्बर्ट बिलावर तेलगानी केलेल्या भाषणावरून मुबईच्या **टाइम्सनें** त्याची प्रसिद्ध रोमन वक्ता सिसिरो याच्याशी तुलना केलेली असून त्याने

"Best speaker in India, even more eloquent and graceful than Mr Lal Mohan Ghose" असे उद्गार काढले

या सगळ्यात मुख्य सागावयाची गोष्ट ही की, तेलग हे आपल्या सर्व हयातीत इग्लडला मुळीच गेले नव्हते ! तरीदेखील इग्रजीचे भाषासौष्टव व शब्दोच्चार या दृष्टीने तेलगाच्या भाषणात खोड काढण्यास मुळीच जागा नसे इतकेच नव्हे तर, वाङ्मयपरिशीलनाने पाश्चात्य सस्कृतीशी झालेला पूर्ण परिचय व हिंदु सस्कृतीमध्येच वाढल्यामुळें स्वभावत च अगी खिळलेली शांत वृत्ति व साधी राहाणी याचे तेलगाचे ठिकाणी अत्यत हृदयगम समिश्रण झालेले असल्यामुळे त्याचेकडे सर्वांचीच मने सहज आकर्षिली जात असत, असे त्या वेळचे चीफ जस्टिस सर चार्लस सार्जट यानी तेलगाच्या स्मारक सभेत उद्गार काढले ! सार्जट

साहेबाच्या भाषणाचा साराश पुढील एका प्रकरणात यावयाचाच असल्यामुळे त्या-सबधाने इकडे विस्तार करीत नाही

तेलगानी अशा प्रकारची जाहीरसभातून भाषणे अनेक प्रसगी आपल्या सबध सार्वजनिक कारकीर्दीत केली आहेत त्या सर्वांचा इकडे साराशही देता येणे शक्य नाही काही थोडी भाषणे पुस्तक रूपाने पूर्वीच प्रसिद्ध झाली आहेत तेलगाच्या भाषणाचा व लेखाचा दुसरा खड थोड्या दिवसात प्रसिद्ध होणार आहे असे समजते येथे फक्त त्यानी वेळोवेळी केलेल्या भाषणाचा व लिहिलेल्या लेखाचा थोडक्यात उल्लेख करून काहीतून मधून मधून थोडे उतारे देऊ तेवढयावरून तेलगाच्या कामगिरीची वाचकास सहज कल्पना होईल

---

## प्रकरण एकोणतिसावे.

## " सन १८७२—७३. "



सन १८७२ साली काशीनाथपत तेलग यानी आपल्या " ॲडव्होकेट"च्या धद्यास सुरवात केली हे मागे सागितलेच आहे त्याच साली त्यानी आपले सार्वजनिक रीतीने पहिले भाषण—maiden speech—केले मुबईत त्या वेळी म्युनिसिपालिटीची व्यवस्था बरोबर नव्हती, आणि त्यात लोकानी निवडलेले लोक नसत त्यासबधी सरकारचा एका बिलाविषयी विचार चालला होता अशा वेळी सन १८७२ मध्ये ता २१ मे, रोजी "फ्रामजी कावसजी " हॉलमध्ये शेट दादाभाई नवरोजी याच्या अध्यक्षतेखाली म्युनिसिपालिटीची सुधारणा सुचविण्याकरिता म्हणून " रेटपेयर्स असोशिएशन"च्या तर्फे एक जाहीर सभा भरविण्यात आली होती सभेस युरोपीयन, हिदी वगैरे सर्व जातीचे लोक हजर होते त्यात म्युनिसिपल बिलाची चर्चा करून सरकारास एक अर्ज करावयाचा होता व त्यात निवडणुकीचा हक्क मागावयाचा होता यासबधी अर्जाचा एक नमुना पूर्वीच तयार करण्यात आला असून तो रा रा शाताराम नारायण, हायकोर्ट वकील, यानी सभेत वाचून दाखविला व थोडेसे भाषण करून तो अर्ज पास करण्याबद्दलची सूचना त्यानी सभेपुढे माडली त्याला रा तेलग यानी अनुमोदन दिले. त्याबद्दलचा ता २३ च्या " टाइम्स"मध्ये खालील रिपोर्ट प्रसिद्ध झाला आहे —

"Mr. Kashinath Telang had great pleasure in seconding the resolution and in the course of a short speech spoke in favour of the memorial and of the agitation for the representative principle."

याच सभेसबधाने व तेलगानी तीत केलेल्या भाषणासबधाने पुढील एका प्रसगी " टाईम्स"ने असे गौरवयुक्त लिहिले आहे —

"Mr Telang, who was then only twenty-two, delivered his speech in English with such force and ability that he carried the audience with him, and it is no exaggeration to say that it went far to lay the foundation of municipal reform which has led to the introduction of Local Self-Government in India"

म्हणजे तेलगाचे त्या वेळी जरी फक्त बावीस वर्षाचे वय होते तरी त्याच्या भाषणात जे तत्व प्रतिपादन करण्यात आले होते, त्याच पायावर पुढे हिदुस्थानातील स्थानिक स्वराज्याची उभारणी झाली असे म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाही

याच मताचा अनुवाद सर रेमड वेस्ट यानीही केला आहे तो असा —

"Thus his maiden speech delivered in 1872, was one in support of the movement for municipal reform in Bombay, to which effect has been given by the great Acts of 1872 and of 1889 This first appearance at once gained him at twenty-two the position of a leading public speaker"

म्हणजे " जाहीर सभेत बोलणारे एक मुख्य वक्ते " अशी तेलगाची त्याच्या बाविसाव्या वर्षापासूनच प्रसिद्धि झाली होती

दुसरे महत्वाचे भाषण करण्याची तेलगाना पुढच्याच वर्षी सधि मिळाली ता ८ नवबर सन १८७३ रोजी " सॉल्ट ॲक्ट " ( मिठाचा कायदा ) व दुसरे काही कायदे सरकारने घाईघाईने पास करून घेतल्याबद्दल लोकाचा निषेध व्यक्त

करण्याकरिता " टाउन हॉल " मध्ये मुबईच्या नागरिकाची एक जाहीर सभा भरविण्यात आली होती मिस्टर जे ए फॉर्ब्स हे अध्यक्षस्थानी होते. सभेस बरेच युरोपीयन गृहस्थही हजर होते सभेत "Hurried legislation" म्हणजे घाईघाईने—लोकास विचार करण्यासही फुरसत न देता—कायदे पास करून घेण्याबाबतच्या सरकारी धोरणाचा निषेध व्यक्त करणारा ठराव सभेपुढे माडण्यात आला होता त्यास तेलगानी अनुमोदन दिले अनुमोदन देताना त्यानी पुढील आशयाचे भाषण केले —

" काही बिलाची पहिले, दुसरे व तिसरे अशी वाचनें कौन्सिलच्या एका बैठकीत उरकून घेण्यात आली असून ती बिले सरकारी गॅझेटमध्ये प्रसिद्धही झाली आहेत राजकीय सस्थाना व इतर लोकाना त्याविषयी विचार करण्यास वेळच मिळाला नाही आताशा बिले प्रथम कौन्सिलपुढे येतात परतु लोकाच्या तत्सबधाच्या सूचना, अर्ज वगैरे येतात न येतात तो बिले पासही होतात ! लोकाचे श्रम अर्थात् फुकट जातात सॉल्ट बिल, टोल्स बिल, मोफ्युजल म्युनिसिपल बिल, बॉयलर्स इन्स्पेक्शन बिल व स्टीमशिप सर्व्हे बिल, ही पाच बिले आगस्ट ता ११ रोजी कौन्सिलपुढे प्रथम वाचण्यात आली परतु याबद्दलचा—गॅझेटमधून—रिपोर्ट लोकाच्या हातात पडण्यापूर्वीच सिलेक्ट कमिटीचा रिपोर्ट तयारही झाला ! मिठाच्या कायद्याचे दुसरे वाचन ता ६ आक्टोबर रोजी झाले परतु पहिल्या वाचनासबधाचा रिपोर्ट सप्टबर ता २६ रोजी प्रसिद्ध झाला म्हणजे मधले अतर सगळे दहा दिवसाचे ! त्या वेळी चालू असलेल्या ( कौन्सिलच्या ) बैठकीत कौन्सिलपुढे एकदम दहा बिले माडण्यात आली होती, व त्यापैकी आठ तर फार महत्वाची होती

"The speaker (Mr Telang) then referred at length to the Tolls Bill, Salt Bill, Mofussil Municipalities Bill, and the Watandars Bill, showing their great importance and the shortness of time accorded to the public for their consideration, and yet, he said, it was expected that within so brief a period the public should be prepared with elaborate protests, otherwise they (Government) would not wait for them. If such was the manner of conducting

legislation, he thought the best course would be to go back to those times when there was no Legislative Council, the only authority being that of the executive Government He was much struck with the Hon'ble Mr Gibbs' remark that it was unreasonable to expect that the Council should stop until the public understood what the Council was doing. That appeared to him to be the *reductio ad absurdum* of the whole theory on which Government was proceeding. If it was not necessary for the public to know, why permit the show and the delusion of publishing the Council's proceedings? Let the Bills be read a first, second and third time without having been published at all, and let them become Law without the public knowing anything about them It was perfectly useless according to the logic which underlies the Hon'ble Mr. Gibbs' statement to perpetuate the system of publishing the debates"

म्हणजे लोकाना कळू न देता जर सरकारला कायदे पास करावयाचे असतील तर कौन्सिले तरी कशाला हवीत? आणि वादविवादाचे रिपोर्ट प्रसिद्ध करण्याचे सोंग तरी कशास हवे? वरीलपैकी एकाही बिलास पास होण्यास तीन महिन्यापेक्षा अधिक दिवस लागले नाहीत एकाला तर दोन महिन्यापेक्षाही कमी दिवस लागले हे घाईने कायदे करणे नव्हे काय? इग्लडात प्रत्येक बिलास बहुधा साडेचार महिने—कित्येकदा तर सहा महिनेही लागतात इकडे वास्तविक त्याहीपेक्षा अधिक दिवस दिले पाहिजेत इग्लडात पास करणारे लोक जनतेनें निवडलेले असतात इकडे सगळे सरकारने नेमलेले—केव्हा केव्हा तर खुद्द सरकारचेच अमलदार—असतात इग्लडातील कायदे पास करणारे लोक आमचेपेक्षा अधिक सुशिक्षित आहेत व त्याचे पाठीशी सर्वसमर्थ लोकमत असते तेव्हा तिकडचे कायदे पास करणारे लोक लोकमतास धाब्यावर बसविण्यास प्रवृत्त होतील हे

शक्यच नाही याच्यापुढे तेलगानी त्या वेळचे मुबईचे गव्हर्नर सर फिलिप वुड-हौउस यानी केलेल्या भाषणातील काही मुद्यावर आक्षेप घेतला ते भाषण तेलगानी सभेपुढे वाचून दाखविले व त्यातील प्रत्येक मुद्दा त्यानी घेऊन तो खोडून काढला! गव्हर्नरसाहेबानी म्हटले होते की एका विशिष्ट कायद्याचा सरकार तीन वर्षे विचार करीत होते व तो सरकारास तीन महिन्यात पास करावयाचा होता लोक इतके दिवस निजले होते काय? तेलगानी विचारले की, हे म्हणणे न्याय्य होईल काय? काही बिले पाहून जर खुद्द कौन्सिलचे सभासदच—त्याना त्याची पूर्वी माहिती न मिळाल्यामुळे—आश्चर्यचकित झाले, तर लोकास तरी कसे समजावे? गव्हर्नरसाहेबानी म्हटले की, ही भरविलेली सभा जनतेची नसून विशिष्ट वर्गातील लोकाची आहे तेलगानी स्पष्ट सागितले की, तसा प्रकार मुळीच नाही सभेचा हेतु सरळ आहे आणि गव्हर्नरसाहेबानी भलतीच विधाने करून जनतेची मने कलुषित करू नयेत

सदर्हू भाषणातून वर जरासा लाब असा इग्रजी उतारा देण्याचा हेतु इतकाच की तेलग हे अगदी तरुणपणी—वयाच्या तेविसाव्यावर्षी—देखील कसे निर्भिड-पणे लोकाच्या वतीने बोलत असत व मुद्देसूद कोटिक्रमाने खुद्द गव्हर्नराच्या व कार्यकारी सभासदाच्या भाषणातील मुद्धा कसे दोषाविष्करण करीत असत हे वाचकास समजावे हे तेलगाचे स्पष्टवक्तेपणाचे दर्शक असे भाषण सर्वानाच पसत पडले मुबईच्या "टाइम्स"ने त्या भाषणाविषयी आपल्या ता १०-११-७३ च्या अकात पुढीलप्रमाणे उद्गार काढले आहेत –

"The exceedingly able ××× speech of Mr. Kashinath Telang, in which he so closely grappled with the Official apologies put forward in Council, left little to be desired in justification of the larger political object of the meeting."

त्याच साली तेलगानी म्युनिसिपालटीच्या—(building houses) Bye laws—पोटनियमाचा विचार करण्याकरिता भरविण्यात आलेल्या दुसऱ्या एका सभेंत भाषण करून त्या नियमातील काही दोष दाखविले

त्याचप्रमाणे सिव्हिल सर्व्हिसमध्ये आमचे जास्त लोक घ्यावे अशा अर्थाची सरकारास विनति करण्याकरिता जी मुबईस एक सभा ह्याच साली—१८७३

मध्ये—भरली होती त्यातही तेलगानी एक उत्तम भाषण केले त्यासबधाने वेस्ट साहेब म्हणतात —

" Telang spared the general feeling of his countrymen as to the wider opening of the Indian Civil Services to natives, and he set forth his views very effectively at a public meeting in 1873."

वेस्ट साहेबानी आपल्या—तेलगाच्या—अल्पचरित्रात इग्लिश लोकानाच त्या " सर्विस " मध्ये अधिक प्रमाणात का घेतले पाहिजे यासबधाने बरेच विस्तृत विवेचन केले आहे पण त्याचा इकडे अनुवाद करण्याचे कारण नाही त्यावरून एक गोष्ट मात्र स्पष्ट दिसून येते ती हीच की, तेलग हे मोठमोठ्या युरोपीयन लोकाबरोबर वरीलसारख्या विषयावर बरीच चर्चा करीत असत व " आम्हास ह्या कामी मिळावा तसा न्याय मिळत नाही " असे ते त्याना स्पष्ट सागत असत यासबधाने त्यानी एका प्रसगी आपले मत स्पष्टपणे नमूद करून ठेविले आहे. ते असे —

" I am no fanatical advocate of the claims of my countrymen to appointments in the public service, but I must say, we have not received quite fair measure in this matter To borrow a figure from John Bright, we have had a feast with a very small quantity of meat, and a very large quantity of table-cloth."

---

## प्रकरण तिसावे.

## " सन १८७६ ते १८७८."



तेलगाच्या सार्वजनिक कारकीर्दीच्या मुदतीत हिंदुस्थानचे पाच व्हाइसरॉय झाले होते हे मागें सागितलेच आहे त्यापैकी लॉर्ड लिटन, लॉर्ड रिपन व लॉर्ड डफरीन या तीन बड्या अधिकाऱ्यासबधानें तर जाहीर सभातून बोलण्याचे त्याना अनेकदा प्रसग आले होते. त्यातूनही लॉर्ड लिटन साहेबाच्या अनेक जुलमी

कृत्यासबधाने तेलगानी आपली काही—उत्तम म्हणून गणली गेलेली—भाषणे केली होती.

सन १८७६ साली लॉर्ड लिटन साहेबाच्या कारकीर्दीत "रेव्हिन्यु जुरिस्डिक्शन बिल" पास झाले त्या बिलाला कोणतीच जबाबदार सस्था अगर लोक अनुकूल नव्हते सगळेच त्याच्या विरुद्ध होते. हायकोर्ट विरुद्ध होते मुबई सरकार विरुद्ध होते लोक तर विरुद्ध होतेच होते इतका सार्वत्रिक विरोध असूनही लॉर्ड लिटन अधिष्ठित सरकाराने तिकडे दुर्लक्ष करून ते बिल पास केले! मिस्टर जेम्स मॅक्लीन हे मोठे खदे लेखक असून ते त्या वेळी "बॉबे गॅझेट"चे सपादक होते. त्यानी सदहू बिलासबधाने पुढीलप्रमाणे मोठ्या अलकारिक—पण अत्यत कडक—भाषेत आपला निषेध व्यक्त केला आहे —

"The Bill has withdrawn the ordinary privileges of British subjects and has involved them in a common degradation as the hewers of wood and drawers of water for the Officials charged with the administration of the Empire It is not enough that every avenue should be closed to the ambition of men born in India, but recently the great desire of the legislature apparently has been to undo the work of the English conquerors who tried to give the people the same securities that Englishmen enjoy at home and to transform a civil government into a mere Oriental tyranny. Trial by jury to these superior persons is a mere relic of a barbarous age in favour of which the stupid British people cherish an absurd prejudice. Liberty of the press is the next British institution marked for destruction and soon the English traveller visiting these shores will have the satisfaction of seeing among other curious Indian antiquities the ruins of the English Constitution."

यामध्यें मॅकलीन साहेबानी लॉर्ड लिटन याच्या कारकीर्दीसंबधानें त्याचे डोळे उघडावे म्हणून जितके लिहावयाचे तितके सर्व लिहून घेतले आहे. त्यात काही कमी केले नाही. यापेक्षा त्यासबधानें इकडे जास्त लिहिण्याच्या किंवा त्या उताऱ्याचें मराठीत भाषातर करण्याच्या भरीस आम्ही पडत नाहीं इतके लिहून मॅकलीन साहेबानी, लोकमताचे खरें प्रतिबिंब कायदेकौन्सिलमध्ये पडेल अशी त्याची सुधारणा करण्याबद्दलची सूचना केली आहे.

सदरील बिल पास झाले तरी विलायतेतील सेक्रेटरी ऑफ स्टेट यानीं त्याला मजुरी देऊ नये असा अर्ज ( petition ) करण्याकरिता म्हणून मुबईस "फ्रामजी कावसजी" इन्स्टिट्यूटमध्ये सर्व नागरिकाची ता १८-४-७६ रोजीं जाहीर सभा भरली होती मिस्टर डी ग्रॅहम हे युरोपीयन गृहस्थ अध्यक्षस्थानी होते त्यात मुख्य ठरावाच्या समर्थनार्थ तेलगानी महत्वाचे भाषण केले त्या वेळपर्यंत देशातील सर्व जमाबदीसबधाचे प्रश्न न्यायकोर्टाकडे निकालाकरिता जात असत. प्रस्तुत बिलाच्या द्वारें तो अधिकार कोर्टापासून काढून घेऊन मुलकी कामगाराकडे सोपविण्यात आला हे वास्तविक बरोबर झाले नाही. हे करणें अत्यत पिछेहाटीचे निदर्शक होते, इतकेच नव्हे तर ते वॉरन हेस्टिंग्स याच्या वेळेपासून चालत आलेल्या उदार धोरणाच्या विरुद्ध होतें अशा कायद्याचा निषेध करण्याकरिता म्हणून तेलगानी वरील सभेत जें अत्यत कडक भाषण केले ते अगदीं रास्त होतें. यासबधानें सर रेमड वेस्ट यानी असे उद्गार काढले आहेत —

"A favourable opportunity for the display of Telang's powers as a political speaker was offered by the introduction, in 1876, of a Bill for transferring the cognizance of disputes in which the fisc was concerned from the civil courts to the revenue officers This was from the political point of view a distinctly retrograde measure, a falling away from English principles and from the generous faith in the judiciary which statesmen like Warren Hastings and Mount Stuart Elphinstone had proclaimed and practised at an earlier time. Public feeling was a

good deal roused, and Telang delivered a powerful address to a sympathizing audience against the threatened decline towards a "Droit Administratif" in place of common subjection of all persons, official and non-official, to the ordinary tribunals "

अर्थात् वरील कायदा काही युरोपियन कामगाराना देखील पसत पडला नाही, व ही गोष्ट वर लिहिल्याप्रमाणें ग्रॅहॅम, मॅकलीन व वेस्ट याच्या कृतीवरून व उद्गारावरून स्पष्टच होत आहे.

तेलगानी आपल्या भाषणात स्पष्ट सांगितलें की, ब्रिटिश लोकांची राजनीति न्यायतत्वावर उभारलेली आहे ती वरील बिलाच्या योगानें त्या उच्च स्थानावरून खाली ओढली जाऊन एका व्यक्तीच्या खुषीवर टाकली जात आहे तेलगाचे या-सबधाचे उद्गार अगदी निर्भीडपणाचे आहेत ते असे —

" The Bill marks a tendency to bring people back to the days of personal Government It is objectionable on the ground that it vests in the revenue officers authority which they ought not to have, and takes away from the civil courts a power which they ought to have against arbitrary action by revenue officers It is not enough to be just, the officers must seem just "

तेलग म्हणाले की, जमीनधाऱ्याच्या सबधात पक्षकारांना दिवाणी कोर्टाकडेच जाऊ देणें बरें ती जबाबदारी मुलकी अधिकाऱ्यावर सोंपविणें बरोबर नाही. या-सबधाने आपण चौकशी केल्याचे सभेपुढे स्पष्ट सागून तेलग म्हणाले.—

"He was not a mofussilite himself, but he had taken pains to make inquiries into this matter, and believed from very good authority and reliable information that the Revenue officers and the ryots are not often on the very best terms. In conclusion, there could be no doubt that the rights of the ryots

were deemed by them to be secure only in the hands of the judges, and not at all safe in those of the Revenue officers; that, therefore, they ( ryots ) would never regard themselves, as treated fairly in cases tried by Revenue officers, and that was one great reason why this Bill should be abandoned."

सदहू सभेत "बॉबे गॅझेट" चे सपादक मिस्टर मॅकलिन हे स्वत हजर होते त्यानी दुसऱ्याच दिवशी आपल्या पत्रात तेलगाच्या–तरुण बॅरिस्टराच्या–इग्लिश भाषेवरील प्रभुत्वाबद्दल व त्याच्या गोड आवाजाबद्दल योग्य शब्दात स्तुति करून असे उद्गार काढले आहेत —

"No Englishman can appreciate the flexibility of the English language till he had heard it spoken by an educated and naturally clever native of India."

सन १८७७ मध्ये महाराणी सरकार यानी "हिंदुस्थानची बादशाहीण" हा किताब धारण केला हे सर्वविश्रुत आहे त्यासबधाने लॉर्ड लिटन यानी दिल्लीस मोठा दरबार भरविला होता त्या प्रसगी महाराणी सरकारचे अत करणपूर्वक अभिनदन करून व त्याचे आयुरारोग्य चिंतून आम्ही—हिंदुस्तानचे राजनिष्ठ प्रजाजन या नात्याने—त्याच्याजवळ अर्ज करून काही राजकीय देणग्या अगर हक्क मागण्यास हरकत नव्हती यात्रमाणे कल्पना निघताच पुण्यास रा ब रानडे याच्या खटपटीने "सार्वजनिक सभेच्या" तर्फे जानेवारी सन १८७७ मध्ये नागरिकाची पुण्यास मोठी सभा भरवून त्यात अर्ज पाठविण्याचे ठरले त्या वेळी मुबईचे रा रा बाळ मगेश वागळे व का त्रि तेलग याना मुद्दाम पाचारण करण्यात आले होते तेलगानी सभेत थोडक्यात एक भाषण करून अर्जाचे समर्थन केले व सभेत पसत ठरलेला अर्ज मग महाराणी सरकारकडे पाठविण्यात आला

त्याच साली जून ता ३० रोजी मुबईस "टाउन हॉल" मध्ये नागरिकाची एक जाहीर सभा भरविण्यात आली होती त्यात मुबईमध्ये "व्हालटिअर कोर" म्हणजे व्हालटीअरची एक पलटण स्थापन करण्याबाबतचा ठराव पास करावयाचा होता अध्यक्षस्थानी त्या वेळचे मुबईचे गव्हर्नर सर रिचर्ड टेपल हे होते सभेत

फक्त युरोपियन लोकाची " व्हालटीअर " पलटण तयार करण्याबाबतचा ठराव माडण्यात आला सभा सर्व मुबईच्या रहिवाशी लोकाची होती, आणि त्यात फक्त युरोपियन लोकाच्याच पलटणीबाबतचा ठराव पास व्हावा हे बरोबर नव्हते. वर सागितल्याप्रमाणे ठराव सभेपुढे माडण्यात आल्यावर रीतीप्रमाणें सूचना करणारा व अनुमोदन देणारा याची भाषणे झाली, व ठरावावर मते घ्यावयाच्या पूर्वी नेहमीच्या वहिवाटीप्रमाणे " कोणास काही बोलावयाचे आहे काय ? " असे अध्यक्षानी जमलेल्या मडळीस विचारले त्याबरोबर लागलेच सर फेरोजशहा मेथा हे प्लॅटफार्मवर आले व त्यानी पुढील उपसूचना सभेपुढे माडली —

" That it is not advisable to resolve on the formation of a volunteer corps composed exclusively of Europeans in a public meeting of the inhabitants of Bombay "

आणि ती माडतांना, " Sir P. M Mehta did not say a word against the object of the meeting, but they could not be a party to their own exclusion."

तेलगांनी या उपसूचनेला अनुमोदन दिलें व ते देताना त्यानी जे लहानच भाषण केलें त्याचा रिपोर्ट असा आहे —

Mr Telang seconded it observing with much force that he expected that, after the compliment which had been paid by His Excellency to the loyal and peace-loving character of the inhabitants, some reason would have been assigned for excluding natives from the corps."

तेलगानी काढलेला मुद्दा बरोबर होता गव्हर्नरसाहेबानी आपल्या सुरवातीच्या भाषणात मुबईच्या नागरिकाची त्याच्या शातताप्रियतेबद्दल खूप स्तुति केली होती. तेलगानी उपसूचनेवर बोलताना विचारले की, " ही स्तुति जर खरी आहे, तर हिंदी लोकास का वगळता ? याचे कांही तरी कारण सागितले पाहिजे ! " उपसूचना व त्यावरील मेथा व तेलग याची भाषणे ऐकल्याबरोबर सभेच्या मूळ चालकाच्या मनाची जरा तारांबळ उडाली त्याचा अदाज असा होता की,

" मुबईच्या लोकाची सभा म्हणावयाची व आपल्याला वाटेल ते करावयाचें ! " या मामूल वहिवाटीप्रमाणे ही सभा पचून जाईल पण तो त्याचा अदाज चुकला ! आणि याला कारण मेथा व तेलग या उभयतानी वेळीच दाखविलेली समयसूचकता व तदनुसार केलेले निर्भीडपणाचें वर्तन ! याच प्रसगाला उद्देशून पुढे तेलगाच्या—१८९३ मध्ये—स्मारक सभेत मेथानी एकदा अत्यत कळवळ्याचे ( with a very full heart ) उद्गार काढले होते ते असे —

" The speaker recalled the occasion on which his deceased friend and he had made their first appearance, as ' raw and humble recruits in the public cause ' in that very hall at a meeting held under the presidentship of the then Governor of Bombay for the purpose of forming a volunteer corps, since then they had fought together many a battle, and their close association in public life had ceased only with the elevation of Mr Telang to the Bench. * * * It was with a very full heart that Pherozsha spoke of his departed friend and fellow-worker "

सन १८७७–७८ साली हिंदुस्थानात भयकर दुष्काळ पडला होता. पण त्या वेळी दुष्काळपीडितास सहाय करण्याबाबतची चागलीशी व्यवस्था नव्हती यामुळें व इतर काही कारणामुळें हिदुस्थान सरकारच्या तिजोरीची स्थिति अगदी असमाधानकारक झाली होती बरे, एवढयावरच थाबते तरी बरें होते पण आमच्या सरकारच्या—किंबहुना डिझरायली अधिष्ठित ब्रिटिश सरकारच्या—डोळयापुढे फक्त राज्यतृष्णा आणि इग्लडचे हित याच मुख्य गोष्टी उभ्या असल्यामुळे त्याच्याकडून हिदी लोकाच्या हिताकडे दुर्लक्ष होई व त्याना " अफगाणिस्थानच्या लढाई " सारखीं विकत श्राद्धें घेण्याची दुर्बुद्धि होत असे याप्रमाणें तिजोरीची हलाखीची स्थिति व खर्चाचीं तोंडें " आ " करून बसलेलीं, अशी वस्तुस्थिति असल्यावर बजेटात तूट येणार नाहीं तर काय होईल ? त्या सुमारास काही वर्षेपर्यत दरसाल बजेटात तूट ही बहुतेक ठरलेलीच बाब असे ! खुद्द सर दिनशा वाच्छा यासबधीं एके ठिकाणीं म्हणतात कीं,

" It should be remembered that the revenues of India in the seventies were far from flourishing. Deficits, more or less, were common. Moreover, the sources of revenue themselves were hardly elastic "

अशा स्थितीतच आमचें सरकार विलायतेहून आयात होणाऱ्या मालावरील जकात उठविण्याच्या विचारांत होते! अफगाणिस्थानात चचु प्रवेश व लॅंकॅशायरच्या लोकास सतुष्ट करण्याकरिता त्याच्या मालाला जकातीची माफी या दोन खर्चाच्या किंवा नुकसानीच्या बाबीमुळे आमच्या फडणीसाना जमाखर्चाची तोडमिळवणी करणें अशक्य झाले असल्यास आश्चर्य नाही मग कर वाढविण्याशिवाय दुसरा उपाय काय ? त्याप्रमाणे मिठावरील कर वाढविला " लायसन्स टॅक्स " नावाचा नवीन कर बसविला असो ही जरा येथे त्रोटक हकीकत देण्याचे कारण इतकेच कीं त्या वेळी—लॉर्ड लिटनच्या कारकीर्दीत—लोक किती असतुष्ट झाले असतील याची वाचकास कल्पना यावी

लॉर्ड लिटन साहेबानी " लायसन्स टॅक्स " हा नवीन कर—सन १८७८ मध्ये बसविला त्याचा हेतु असा जाहीर करण्यात आला की, दुष्काळ निवारण्याची काही तरी तजवीज केली पाहिजे असें सरकारास वाटत असल्यामुळें एक "Famine Insurance Fund" (फॅमिन इन्शुरन्स फड) स्थापन करण्याच्या हेतूनें तो कर बसविण्यात येत आहे, व त्या करापासून उत्पन्न होणाऱ्या रकमेचा त्याच कामी उपयोग व्हावयाचा आहे! ते ठीक होते पण त्यात पक्षि-प्रपच कशाला ? तो कर मोठमोठ्या सरकारी कामगारापासून वसूल करावयाचा नाही, व वकील आणि बॅरिस्टर किंवा इतर धदेवाले याजपासूनही वसूल करावयाचा नाहीं! तर तो फक्त व्यापारी लोक व शेतकरी याजपासून वसूल करावयाचा!

या सर्व अन्यायाच्या प्रकाराने लोक अत्यत असतुष्ट झाले व सरकारच्या कृत्याचा निषेध करण्याकरिता जिकडे तिकडे सभा झाल्या तर त्यात आश्चर्य नाही. अशा प्रकारची निषेधप्रदर्शक सभा मुबईस नेहमीप्रमाणे " टाउन हॉल " मध्ये भरविण्याचे नक्की ठरले पण त्या कामाला—त्या हॉलमध्ये सभा भरविण्याला—सर रिचर्ड टेपल साहेबानी परवानगी दिली नाहीं! सबब ता. १९–२–७८ रोजी ही सभा कापाच्या मैदानात विल्सन सर्कसकरितां मारलेल्या भव्य तबूत भरली.

अध्यक्षस्थानीं मिस्तर डी ग्रॅहॅम हे युरोपीयन गृहस्थ होते सभेत त्या कराविरुद्ध पार्लमेंटकडे अर्ज करण्याचे ठरले त्याच्या समर्थनार्थ तेलगानी जें भाषण केलें ते त्याच्या उत्तम भाषणापैकी एक होतें त्या भाषणात त्यानी सरकारच्या विचारसरणीत अथपासून इतीपर्यंत कसा अन्याय भरला होता हें पायाशुद्ध तर्कपद्धतीनें व सुदर रीतीनें दाखविले. ते म्हणाले —

"The grounds on which the proposal to levy this tax is based are :—

1. That those who have taken such great pains in meeting the famine are not the proper persons to be taxed in order to defray the expenditure that has been incurred.

2. That in as much as these officers of Government are not to be taxed, therefore, all other Government officers shall not be taxed and people who may in some sense be supposed to stand in the same position ought not to be taxed Because these ought not to be taxed, therefore, the professional classes should not be taxed. Naturally enough the only persons fit to bear the burden of taxation were the traders and the agriculturists."

वस्तुत बहुतेक सर्व अप्रत्यक्ष कर व्यापारी लोकच भरत असतात शेतकरी लोक जमीनधारा तर भरतातच, पण त्याच्यावर पुन्हा मीठाचा करही पडतोच. अशा स्थितीत त्याच वर्गावर "लायसन्स टॅक्स" हा नवीन कर बसविणें हा केवळ अन्याय आहे या करापासून उत्पन्न झालेली रक्कम जर दुष्काळ निवारण्याच्या फडाकडे जावयाची आहे तर तो फड जमविण्याकरिता सरकारी बड्या कामगारानी किंवा वकील बॅरिस्टर लोकानी कराच्या रूपाने का सहाय करू नये ?

याच भाषणात तेलगानी कायदे कौन्सिलाची खरीखुरी स्थिति कशी होती हें उत्तम रीतीनें दाखविले ते म्हणाले की कोणतेही बिल सरकारनें कौन्सिल पुढे आणलें की सर्वांनी त्याला अनुकूल मत दिलेच पाहिजे अशी त्याची अपेक्षा असे

खरा प्रकार असा होता असे स्पष्ट दिसतच होते की सरकारी कौन्सिलमध्यें—Cabinet मध्ये—काही अमलदाराची जूट असे मग ते आपला मनोदय पूर्ण करून घेत असत व कायदे कौन्सिलाना धाब्यावर बसवीत असत.

" The present was only one of very numerous instances in which it had appeared quite plain that the Legislative Councils, as at present constituted, were of no value whatever. When the independent members happened to agree with a Government measure their opinion was spoken of as representing the general opinion of the public, but when they opposed any measure which the Government thought fit to introduce, their opinions were spoken of contemptuously as a mere individual opinion not representing the general views of the public, with which the Government officers were much better acquainted themselves."

ह्या भाषणाबद्दल तेलगाची सर्वांनीच स्तुति केली दुसऱ्याच दिवशी मिस्टर मॅक्लीन यानी "बॉबे गॅझेट" मध्ये त्या भाषणाचा असा गौरवयुक्त उल्लेख केला —

" No one could realise what a wonderful organ the English language is until he has heard an intelligent and eloquent Hindu play upon it."

" टाइम्स ऑफ इडिया "नें तर त्या तेलगाच्या भाषणासबधाने असा अभिप्राय दिला —

" It was remarked by some one that the young Hindu orator's mind was saturated with Bright and he seldom speaks without oozing Bright at every pore."

म्हणजे तेलगाचें मनच—डोकेंच—जॉन ब्राइटच्या वक्तृत्वानें इतके भरून गेलें होते कीं त्याच्या बहुतेक प्रत्येक वाक्यावरून किंवा शब्दावरून ब्राइटच्याच वक्तृत्वाची आठवण होत असे.

लॉर्ड लिटनसाहेबांची कारकीर्द त्यांच्या अनेक अरेरावीच्या कृत्यामुळें लोकास इतकी असह्य झाली होती की त्यातून देशाची केव्हा एकदा सुटका होईल अशी लोक उत्कठेनें वाट पहात बसले होते! त्याच्या प्रत्येक महत्वाच्या जुलमी कृत्याची तेलगानीं हजेरी घेतली होती, व अत्यत मुद्देसूदपणानें कडक भाषेत त्या कृत्यातील दोषाविष्करण करण्यात तेलगानीं मुळीच कसूर केली नाही त्यापैकीं "लायसन्स टॅक्स" संबधानें तेलगानी जाहीर सभेत केलेल्या भाषणाचा नमुना वर आलाच आहे आता त्यानी मुस्कटदाबीच्या ( Gagging Act ) कायद्यासबधानें केलेली टीका पुढील प्रकरणात पाहा.

---

प्रकरण एकतिसावे.

## मुस्कटदाबीचा कायदा



लॉर्ड लिटन याच्या कारर्दीची त्यात मुस्कटदाबीचा कायदा पास झाल्यामुळे तर फारच प्रसिद्धि झाली होती त्या कायद्याचा सर्वच प्रकार इतका विच्त्रि होता कीं हें सुधारलेल्या इग्रज लोकाचे राज्य नसून मोगलाईच आहे असेही क्षणभर लोकास वाटले असेल! त्या कायद्याची योजना अगदी गुप्तपणे झालेली होती. लोकास त्याचा पत्ताही नव्हता बिल अगदी अनपेक्षित रीतीने—पुरीशी नोटीस न देता —कायदेकौन्सिलपुढे ठेवण्यात आले, व एकाच बैठकीत घाईघाईने ते पास करून घेण्यात आले! त्या कायद्याचा मुख्य हेतु चालू असलेली सरकारावरील टीका बद करण्याचा नसून पुढे होणारी टीका टाळण्याचा होता. त्या कायद्याविषयी सर दिनशा वाच्छा यानी एके ठिकाणी असे लिहिले आहे.—

"The Famine policy and the Forward policy of that Tory Viceroy were greatly criticized by the independent Press—Indian and Anglo-Indian. Lord Lytton and his Government were so obsessed by that criticism, candid and out-spoken as it was, that it was thought fit that for a time such a gag should be put on publicists of the day." "The country pacific

as it was and untrammelled by any political agitation, was exceedingly outraged by the introduction of that universally condemned piece of legislation to gag the Press." "Mr Maclean, the then editor of the *Bombay Gazette*, had denounced the Act in no measured terms, and hesitated not to call it the 'Black Act."

काशीनाथपंत तेलंग यांनी त्या कायद्यावर अत्यंत मुद्देसूद व निर्भीड अशी लेखमाला लिहून " इंदुप्रकाश " पत्रांत प्रसिद्ध केली होती. पहिल्या दोन लेखांत त्यांनी त्या संबंध कायद्याचें कलमवारीनें परीक्षण करून त्यांत कसकसे दोष राहिलेले आहेत हे स्पष्ट करून सांगितले त्या कायद्याखालचे खटले न्यायकोर्टापुढे पाठविण्याची कायद्यांत सवड ठेविली नाहीं, याबद्दल तेलंगांनी तक्रार केलेली असून कांहीं कलमांची शब्दरचना तर त्यांच्या मतें इतकी अनिश्चित व संदिग्ध होती की, त्यांच्या कचाटींत अधिकारी लोकांस गैरसोयीचें वाटत असलेले कोणतेंही पत्र किंवा पुस्तक सहज आणता येईल ! शिवाय सुशिक्षित लोक हे राजनिष्ठ आहेत असें सरकार नेहमी म्हणत होते—म्हणत असते, पण त्या म्हणण्यांत व त्या कायद्यांत सुसंगतपणा तो काय राहिला असें तेलंगांनीं स्पष्ट विचारलें त्यांनी सांगितलें की, सर हेनरी मेन यांनी कांहीही म्हटलें तरी, सर्व परिस्थितीचा विचार करून पाहिल्यास खरें कायद्याचें राज्य मागें पडून एकसत्तात्मक राज्याकडे—किंबहुना मोंगलाईकडे—सरकारच्या धोरणाचा कल स्पष्ट दिसत होता तेलंगांच्या लिहिण्याचा स्पष्ट आशय असा होता की, या कायद्याप्रमाणें कोणीही अधिकारी आपणाला " सरकार "च समजणार व आपल्या प्रत्येक कृतीला तो " सरकार "ची कृति असें म्हणणार मग सरकाराविषयीं लोकांच्या मनांत अप्रीति उत्पन्न केल्याचा आरोप करण्यास उशीर किती ? तेलंगांनी स्पष्ट सांगितलें की, अशी या कायद्याच्या द्वारें मतस्वातंत्र्यावर गदा आणणें हे केवळ अन्यायाचें व अप्रयोजक कृत्य असून त्यायोगें योजिलेला हेतु तर मुळींच सिद्धीस जाणार नाहीं फार काय, पण जे परिणाम या कायद्याच्या योगानें टळतील असें सरकारास वाटतें तेच परिणाम अखेर हटकून घडून येतील !

पत्रांत लेख छापण्यापूर्वी तो एका सरकारी अधिकारी माणसाकडे अवलोकनासाठी पाठवावा असें त्या कायद्यांत एक कलम होतें. तेलंग म्हणाले की त्या अधिकारी

माणसाच्याही--इतर मनुष्याप्रमाणें--काही आवडी-नावडी असतील, व त्या दृष्टीनेच तो त्या लेखाचा विचार करील म्हणजे तो त्या लेखाचा निर्मल मनानेच विचार करील याची खात्री काय ?

याच्या पुढचे तेलगाचे उद्गार तर फारच महत्वाचे व बहारीचे आहेत. ते असे —

" It appears to us to be descent from the higher level of political status which under the wiser British Government, we had already reached, into the slough of the patriarchal rule and personal Government. If there was one thing, more than another, to which an advocate of the British Government could point as marking unmistakably the superiority of it to by-gone Governments, it was this reign of law—the liberty of speech and thought, which is now become to a considerable extent a thing of the past under the provisions of the Gagging Act. The Reign of Law is passed, ceasing under the hands of these sapient legislators who have been ruling during the past few years. "

तेलगानी म्हटले की, आम्ही ब्रिटिश अमलाखाली प्रस्तुत काळी असल्यामुळें तदनुषगिक मतस्वातत्र्य, भाषणस्वातत्र्य, मुद्रणस्वातत्र्य वगैरे अशा ज्या गोष्टी-मुळे आम्ही काहीं बाबतीत उच्चस्थानावर आहो असे वाटत होते तो भ्रम ठरून त्या स्थानावरून या कायद्याने आम्हास खाली ओढून आणून एकसत्तात्मक राज्यात व अनुदारकल्पनासूचक गर्तेत सोडले आहे असे वाटू लागले आहे म्हणजे पूर्वीच्या देशी राज्याच्या मानाने ब्रिटिश राज्याचे श्रेष्ठत्व दर्शविण्याऱ्या ज्या काही विशेष प्रकारच्या गोष्टी होत्या त्या या कायद्याने मागें पडून पुन्हा आम्ही पूर्वीच्या एकसत्तात्मक राज्यातच येऊन पडलो असे आम्हास वाटू लागले आहे !

सरकारने सदहू " Gagging Act " हा आयर्लंडकरिता पार्लमेटने पास केलेला, जो "Irish Act of 1890" त्याच्या वळणावर तयार केला आहे, असा

खुलासा केला होता पण त्यातील फोलपणा तेलगानी आपल्या तिसऱ्या व चवथ्या लेखात चागल्या रीतीनें व्यक्त केला त्यानी प्रथम सागितले की प्रस्तुत कायदा व आयरिश ॲक्ट यात मुळी साम्यच नाही आयरिश कायद्याच्या पूर्वी आयर्लंडात दगे, मारामाऱ्या वगैरे मनस्वी अत्याचार झाले होते, तसे हिंदुस्थानात मुळीच झाले नाहीत बड करणें हे आपले कर्तव्य आहे असे आयर्लंडमधील लोक म्हणत असत तसे हिदुस्थानातील एकाही पत्रकारानें म्हटले नाही उलट पबना, सुरत या शहरात किंवा महाराष्ट्रात जे थोडे दगे झाले त्याचा देशी पत्रकारानी निषेधच केला आहे. ते दगे स्थानिक कारणामुळे झाले त्याना चिथावणी किंवा उत्तेजन देशी पत्रकाराकडून मुळीच मिळालें नाही. दुसरी गोष्ट अशी की, आयर्लंडातील लोकाच्या समजुती करण्याचे प्रथम प्रयत्न तरी करण्यात आले होते पण त्यात सरकारास यश आले नाही ती गोष्ट निराळी तशा प्रकारचे प्रयत्न सरकारने या देशात काय केले आहेत असे तेलगानी विचारले तिकडे आयरिश चर्च बिल किवा आयरिश लॅंड ॲक्टस् पास करण्यात आले होते तशा प्रकारचे यत्न सरकारनें इकडे कोणते केले ? देशात दुष्काळ पडला असता व लोकाचे दारिद्र्य वाढत चालले असता सरकार त्याच्या डोक्यावर करांचें ओझे वाढवीत आहे यामुळे लोकात असतोष पसरत आहे त्याचा उपशम करण्याकरिता सरकारने काय केले आहे ? इतके सागून सरकाराजवळ सुशिक्षित लोकाच्या काय मागण्या आहेत—पण त्या सरकाराने पुऱ्या करण्याचा काही एक प्रयत्न केला नाहीं—त्याची तेलगानी एक यादी दिली आहे त्यावरून सुशिक्षित लोकांच्या त्या वेळी आकांक्षा काय होत्या याचे सहज दिग्दर्शन होते त्या मागण्या येणेंप्रमाणे —

"Have Natives yet been allowed the same opportunities to be admitted to the Civil Service as the members of the ruling race ? Has the drain on Indian resources for the home-charges been reduced ? Have not the Import Duties been abolished at the same time that a new tax has been imposed and this in the teeth of the solemn declarations of Lord Lytton and Lord Salisbury and in the teeth of the Resolution of the House of Commons itself ? Has the dividing wall of bitter

memories between Europeans and Natives been yet broken down ? Have not attempts been made to legislate away the old rights of private individuals by Acts like the Abkari Act and the Forest Act ? Has not the personal Government been increased under the Criminal Procedure Code and like Acts ? Has any attempt been made to stop by the Indian Penal Code the mischief alleged to grow from the press being free ? Intensely desiring as we do, the continuance of British rule in India, we are extremely sorry to find our Government holding an inexpugnable belief in its own perfection and lulled, so to speak, in the optimistic sleep from which the attempt to rouse it, only entails its supreme displeasure "

यात सिव्हिल सर्विसमध्ये युरोपीयनाच्या बरोबरीनें हिंदी मनुष्यास शिरू देणे; "होम चार्जेस" च्या रूपाने दरसाल इग्लडात जाणारा द्रव्यप्रवाह बद करणे, आयात मालावरील—वचनभग करूनही—जकात उठविणे, नवीन कर बसविणे, युरोपीयन व हिंदी लोक याजमधील अविश्वासाची कारणें दूर करणे, वगैरे सर्व हिंदी मागण्याचा उल्लेख करून तेलग आपण एक राजनिष्ठ प्रजाजन या नात्यानें स्पष्ट म्हणतात की, "ब्रिटिश लोकाचेच हिदुस्थानात राज्य चालू राहावे अशी आमची मनापासून इच्छा आहे, पण आमचे सरकार आपण सर्वज्ञ आहो असे मानून " सर्व ठीक चालेल " अशा भरंवशावर जें झोपी जाते त्या झोपेतून त्याला कोणी जागे करण्याचा प्रयत्न केल्यास ते त्याच्यावरच पुन्हा रुष्ट होते याचेच आम्हास अत्यत वाईट वाटते "

याप्रमाणे सरकाराकडून कोणत्या गोष्टी व्हावयाला हव्या आहेत—पण त्या लवकर त्याच्या हातून घडतील अशीं लक्षणे दिसत नाहीत !—हें सुचवून तेलगानी सरकारास खालील चार कळकळीचे शब्द लिहून आपली " मुस्कटदाबीच्या कायद्या "वरील लेखमाला पुरी केली —

" We believe, we cannot yet rule ourselves, and we believe that we cannot get any foreign rulers as good as the English Wishing then, as we do, from whatever motives for the continuance of the British rule, we are extremely anxious that our rulers should do every thing which they reasonably and properly can and may do, to keep the people at large contented; for in the last resort as eminent British Statesmen have always maintained, it is on the contentment and good will of the people that the British Empire can rest most securely. Therefore, it must keep itself fully informed of the wants and feelings and thoughts of their subjets And by the necessity of the case, they being foreigners in the land, they can have few better sources of information than the newspapers and journals written by persons who, as being themselves of the people, necessarily know a great deal about the people We venture to say, inspite of the boast, that the ruling race has not yet succeeded in understanding us "

अर्धशतकापूर्वी तेलगानी जे एका जुलमी कायद्यासबधाने लिहिताना हे शब्द उच्चारले, त्याचे आजच्या तारखेलाही बऱ्याच अशाने महत्त्व कायम आहे सन १९१७ मध्ये ब्रिटिश पार्लमेंटनें दिलेल्या वचनाप्रमाणें मॉटेगु साहेबानी सन १९१९ सालच्या आम्हास सुधारणा दिल्या व दहा वर्षानी ( १९२९ मध्ये ) आणखी जास्त सुधारणा देऊन चार पाउलें पुढे जाऊ असे सागितले पण मध्यतरी हिदुस्थानच्या दुर्दैवानें मॉटेगुसाहेब स्थानभ्रष्ट झाले व दुसऱ्या काही गोष्टी घडल्या त्याचा परिणाम असा झाला की, मॉटेगुच्या जागी दुसरे लोक आले व त्यानी आपल्या कृतींनी मॉटेगु साहेबानीं आपल्या वर्तनाने दहा वर्षापूर्वी लोकाच्या मनात उत्पन्न केलेल्या विश्वासाला अमळ धक्का दिला व सर्वास साशक केले ! अर्थात् त्यामुळे हिंदुस्थानाने ब्रिटिश साम्राज्यातून फुटून मोकळे व्हावे अशी कल्पना निघून तदनुसार

जाहीर करणारी काही मडळी देशात आज उत्पन्न झाली आहे ! या सगळ्याचा स्वाभाविकपणे काय परिणाम व्हावयाचा असेल तो होईल पण अशा बिकट प्रसगी पन्नास वर्षापूर्वी तेलगासारख्या एका दूरदर्शी मुत्सद्दी गृहस्थाने जे सरकारला उद्देशून चार इशारतीचे शब्द उच्चारले त्याचा प्रस्तुत काळी सरकाराने व आपल्या काही फाजील उत्साही मडळीनी जरूर विचार करावा असे वाटते. परिस्थिति बदलली असली तरी तत्वे तीच आहेत, सरकार तेच आहे व जनताही तीच आहे सबब तेलगाच्या भाषेत थोडासा फरक करून असे म्हणता येईल की, ब्रिटिश लोकाशी आमचा असलेला सबध तोडण्याची अद्यापि वेळ आलेली नाही अर्थात् त्याचा सबध आणखी काही काळपर्यत राहिला पाहिजे; व त्या मुदतीत मिळालेल्या सधीचा उपयोग करून आम्ही आपल्या अगी जास्त कार्यक्षमता आणण्याचा प्रयत्न केला पाहिजे ती कार्यक्षमता अगी आल्यावर आम्ही आपला कारभार पाहाण्यास पात्र होऊ याबद्दल शकाच नको

पण तेलगानी त्या वेळी सरकारास दिलेल्या इशारतीचे महत्व आजही आहेच ब्रिटिश सरकाराने आम्हास काही जास्त हक्क दिले आहेत ही गोष्ट खरी. पण त्याच्या मनातील आमच्याविषयीचा अविश्वास अद्यापि नष्ट झाला आहे असे वाटत नाही. सगळेच अविश्वास धरीत असतील असे आम्ही म्हणत नाही तथापि ज्याच्या मनात अद्यापि—कोणत्याही कारणाने असो—आमच्याविषयी अढी आहे त्याचेच म्हणणे तूर्त चालत आहे यात मात्र शका नाही अशा बड्या लोकानाच उद्देशून तेलगाचे शब्द आहेत असे मानण्यास हरकत नाही. तेलग म्हणतात की, हिदुस्थानात ब्रिटिश राज्यच चालू राहावे असेच आम्हास वाटते, व म्हणूनच ब्रिटिश अधिकाऱ्यानी लोकास सतुष्ट राखण्याकरिता जे काही करता येण्यासारखें असेल तेवढे सर्व जरूर करावे असे आम्हास मनापासून वाटते कारण इकडील प्रजेच्या सतोषावरच व सदिच्छेवरच ब्रिटिश राज्य टिकणार आहे हे मोठमोठ्या ब्रिटिश मुत्सद्यानीही कबूल केले आहे त्यामुळें लोकाच्या इच्छा काय आहेत, त्याच्या गरजा काय आहेत व त्याचे विचार काय आहेत याबद्दलची माहिती अधिकाऱ्यानी करून घेतली पाहिजे. अद्यापि बरेचसे अधिकारी—तेलगाच्या वेळी असे फारच होते—युरोपीयन म्हणजे परकीय आहेत अर्थात् लोकाच्या अतरगातील आकाक्षा काय आहेत हे अधिकाऱ्याना समजणें सभवनीय नाही ती माहिती पुरविणारी उत्तम साधने म्हणजे देशी वर्तमानपत्रें ती चालविणारे लोक नेहमीं जनतेत राहाणारे, त्याच्याशीं हरएक बाबतीत बोलणारे चालणारे असतात,

त्याना लोकासबधींची सर्व माहिती असते अशाची तोंडें बद करून अगर हात बाधून कसे चालेल ? तेलग अखेर म्हणतात कीं, अधिकारी लोकानी काहीही म्हटले तरी त्यानीं आम्हास अद्यापि पुरे ओळखिले आहे असे निदान आम्हास तरी वाटत नाही

वरच्याच विचारसरणीचा अनुवाद करून असे म्हणता येईल की आमच्या हल्लीच्या अधिकारी लोकानीसुद्धा वृथा अभिमानाच्या किंवा इज्जतीच्या ( prestige ) भरीस न पडता लोकाच्या इच्छा काय आहेत, त्याच्या आकाक्षा काय आहेत याची पुरी माहिती करून घ्यावी व त्या आकाक्षा पूर्ण करण्याच्या कामास लागावे. यात केवळ हिंदुस्थान देशाचाच फायदा आहे असें नव्हे, तर त्यात इग्लडचाही फायदा आहे व तसें केल्यानें इग्लडच्या कीर्तीत नि सशय भर पडेल.

असो या मुस्कटदाबीच्या—Gagging Act च्या—चळवळीचा अखेर परिणाम झाल्याशिवाय राहिला नाही लोकाचे जीवित असह्य झाले. पुढे सन १८८० मध्ये विलायतेतील प्रधान मडळ बदलून ग्लॅडस्टन साहेब मुख्य प्रधान होताच लॉर्ड लिटन यानीं आपल्या जागेचा राजीनामा दिला व ते इग्लडला निघून गेले त्याच्या पाठीमागून व्हॉइसरायच्या जागेवर लॉर्ड रिपन येताच त्यानी सदहू कायदा रद्द केला ! यासबधानें सर दिनशा वाच्छा यानी असें म्हटले आहे –

"Such was the feeling of antagonism to that Act that the agitation was kept fanning in till a change of ministry occurred in 1880 and the Liberal minded ministry of Mr Gladstone, the Premier, abolished it to the great joy and contentment of the vast Indian population "

---

प्रकरण बत्तिसावे.

## खुला व्यापार व संरक्षण.



हिंदुस्थानच्या राज्यकारभाराच्या गेल्या सुमारें साठ वर्षांच्या इतिहासाचें जो बारकाईनें निरीक्षण करील त्याच्या सहज लक्षात येईल की सन १८७६–७७ च्या सुमारास लॉर्ड लिटन अधिष्ठित हिंदुस्थान सरकाराने अर्थशास्त्रीय दृष्टीनें आपल्या

करवसुलीच्या बाबतीत मोठी क्रांति घडवून आणली होती त्या वेळी विलायतेंत कॉन्सर्व्हेटिव्ह पक्ष अधिकारावर होता. डिजरायली हे मुख्य प्रधान होते व लॉर्ड सॅलिसबरी हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी होते विलायतेतून या देशात येणाऱ्या कापशी मालावर शेकडा ७½ टक्के जकात कैक वर्षेपर्यंत घेण्यात येत होती, तो बहुतेक सर्व माल मॅचेस्टर येथील गिरण्यात तयार होत असे त्या गिरणीवाल्यानी सन १८७४ सालापासून—म्हणजे कॉन्सर्व्हेटिव पक्ष अधिकारारूढ झाल्या सालापासून —आपल्या मालावर बसविलेली ७½ टक्के जकात उठविण्याबद्दल तिकडील अधिकाऱ्याच्या मागे सारखी टोचणी लाविली होती. त्याच सुमारास मुबईतील गिरण्याची चाललेली भरभराट पाहून मॅचेस्टरवाल्यांच्या पोटात दुखू लागले होते व हा पुढे मागे आपल्या उरावर एक शत्रु उभा राहाणार ही गोष्ट त्याच्या लक्षात आली होती ’ इकडे हिदुस्थान सरकाराच्या तिजोरीची स्थिति त्या वेळी समाधानकारक नव्हती बजेटात दरसाल बहुतेक तूट ठेवलेली असे बरे, देशात कर वाढविल्यास तो सहन करण्यासारखी लोकाची स्थिति नव्हती. अशा स्थितीत तिजोरीतील जमाखर्चाची तोड मिळवणी करण्याकरिता हिदुस्थान सरकारानें सर्व परदेशाहून आयात होणाऱ्या मालावर शेकडा ७½ टक्के जकात बसविली होती. व ती कित्येक वर्षें चालू होती. परतु सन १८७४–७५ च्या सुमारास मॅचेस्टरच्या गिरणीवाल्यानी उगीच ओरड आरभली की सदरील ७½ टक्के जी जकात घेण्यात येत असे ती सरक्षक स्वरूपाची आहे ! झाले विलायतेतील पत्रानी व लॅकॅशायरतर्फे पार्लमेटमध्ये काम करणाऱ्या सभासदानी मिळून जगी चळवळ चालविली विलायतेतील डिझरायली आदि मडळीला पक्के ठाऊक होते की आपला पक्ष अधिकारावर आहे तो बहुतेक या लॅकॅशायरच्या मताधिक्याच्याच जोरावर आहे. तशा स्थितीत त्या सभासदाच्या म्हणण्याकडे सरकार दुर्लक्ष कसे करणार ? मॅचेस्टरचे गिरणीवाले हे मोठे धूर्त लोक होते त्याची अधिकारावर कोणताही पक्ष कॉन्सर्व्हेटिव्ह वा लिबरल–असो, त्याच्या मागे सारखी टोचणी चालू राहिलेली असे की, ही हिदुस्थानातली जकात उठवा ! लिबरल पक्ष अधिकारारूढ असला तर मॅचेस्टरवाल्याना तेवढी अडचण भासत नसे कारण लिबरल पक्ष हा खुल्या व्यापाराचा कैवारी होता पण कॉन्सर्व्हेटिव्ह पक्ष अधिकारावर असला म्हणजे तो खुल्या व्यापाराच्या बाबतीत आपल्या प्रतिपक्षाला—opposition ला—( लिबरल ) जरा भिऊन असे. सबब मॅचेस्टरवाले चळवळ करून खुल्या व्यापाराची वाढ करण्याकरिता कॉन्सर्व्हेटिव्ह पक्षावर वजन खर्च करीत असत सन

१८७४-७५ सालात मुबईतील गिरण्याची स्थिति चागलीच होती त्या गिरण्यात तयार होणाऱ्या मालानें लॅकॅशायरहून इकडे आलेल्या जाड्या मालाची हकालपट्टी आरभली होती ही हिंदुस्थानातील बाजाराची स्थिति झाली पण पुढे मागे मुबईचा माल चीन देशात जाऊन त्या देशातीलही आपला—मॅचेस्टरचा—व्यापार बसवील ही विलायती गिरणीवाल्याना धास्ती होतीच ! अर्थात् मुबईच्या मालाने जर चीन देशातील बाजार व इकडचा घरचाच बाजार असे दोन्ही बाजार बळकावले तर मग काय करावयाचे ? अशी मॅचेस्टरवाल्याच्या छातीत धडकी बसली होती ! ती केवळ अगदीच निराधार होती असे नाही परतु इकडील आयात मालावरील जकात उठविण्याकरिता मॅचेस्टरवाल्यानीं जो कोटिक्रम अवलबिला होता तो मात्र चुकीचा होता त्याचे म्हणणें असे होते की, इग्लडचा माल चीन देशात जात असे मुबईच्या गिरण्यातील मालही जर तिकडे जाऊ लागला तर विलायती मालावर इकडे बसविलेल्या जकातीने तितक्या प्रमाणात मुबईच्या मालाचे सरक्षण केल्यासारखे होतें सबब ती सरक्षक जकात झाली इग्लडात खुल्या व्यापाराच्या तत्वावर सर्व राज्यकारभार चालला आहे अर्थात् तिकडील मालावर हिंदुस्थानात सरक्षक जकात बसवू देणें बरोबर नाहीं ! हा सर्व कोटिक्रम केवळ आप्पलपोटेपणाचा होता व्यापार करावयाचा तो चीनच्या बाजारात चिनी लोकाना वास्तविक जिकडचा माल पसत पडेल तिकडचा ते घेतील तिकडच्या व्यापाराचा व इकडील जकातीचा सबध काय ? इकडे जकात स्थानिक कारणामुळें—जमाखर्चाची तोंड मिळवणी करण्याकरिता—बसविण्यात आलेली होती चीन देशाशी असलेला व्यापार चालू राहो किंवा न राहो इकडचा खर्च भागलाच पाहिजे व त्याकरिता जकात वसूल झालीच पाहिजे पण वरीलप्रमाणें कोणत्या तरी गोष्टीचा इकडच्या जकातीशीं बादरायण सबध जोडून तेवढी जकात उठविण्याचा मचेस्टरवाल्यानी उपक्रम माडला होता खरा प्रकार म्हणजे हिंदुस्थान देश इग्लडच्या ताब्यात त्याला वाटेल तसा वळवून आपला कार्यभाग उरकून घ्यावयाचा, यापेक्षा मॅचेस्टरवाल्याचा दुसरा कोणता हेतु असणार ? डिझ्रायली किंवा लॉर्ड सॅलिसबरी याच्या हातात हिंदुस्थानची सगळी सूत्रे त्याना पार्लमेटमध्ये लॅकॅशायर परगण्यातले सभासद डोईजड झालेले हिंदुस्थानचा वाली तिकडे कोणीही नव्हता इकडचे आमचे सरकार लॉर्ड सॅलिसबरी याचे बदें गुलाम मग "अजापुत्र बलिं दद्यात्।" हा न्याय सरकारला सुचावा यात आश्चर्य काय ? अशा स्थितीत झाला तरी तो अजापुत्र काही तरी धडपड केल्याशिवाय कसा

राहील ? वरील प्रकारात दिसत असलेला उघड उघड अन्याय पाहून कोणता न्यायप्रिय मनुष्य स्वस्थ बसेल ? इकडे मुबईच्या गिरणीवाल्यानी व इतर सार्वजनिक कामात मन घालणाऱ्या लोकानीही मॅचेस्टरवाल्याच्या अन्यायमूलक ओरडीविरुद्ध चळवळ चालविली. सन १८७२–७६ या मुदतीत लॉर्ड नॉर्थब्रुक हे आमचे व्हाइसराय होते ते खुल्या व्यापाराचे पुरे कैवारी ! पण त्याना देखील वरील मॅचेस्टरवाल्याच्या कोटिक्रमातील फोलपणा पटला, आणि त्यानी कायदे कौन्सिलातील आपल्या जागेवरून असे जाहीर केले की —

"He (Lord Northbrook) declared from his place in the Legislative Council that no statesman having a regard to the true interests of India should submit to the abolition of that duty."

हिंदुस्थानच्या खऱ्या हिताचा विचार करणारा कोणीही जबाबदार अधिकारी ती आयात जकात उठविण्यास कबूल होणार नाही ! अशा आणीबाणीच्या वेळीं काशीनाथपत तेलग यानी एक अत्यत उपयुक्त निबध लिहिला व तो मार्च सन १८७७ मध्ये "सॅसून मेक्यानिक्स इन्स्टिटयूट" पुढे वाचला त्यात "खुला व्यापार व सरक्षक जकात" (Free Trade and Protection from an Indian Point of View) या प्रश्नाचा तेलगानी मोठ्या मुद्देसूदपणाने व जरूर ते आधार व आकडे देऊन विचार केला आहे सर दिनशा वाच्छा यासबधी एके ठिकाणी म्हणतात की,

"Mr Telang was a Free Trader with some qualifications just as the late Mr Ranade and Sir Phirojshah Mehta were and as I am As far as India is concerned, we all share the view that young industries bearing all the germs of future prosperity should, for a time, be protected by the Indian Government Mr. Telang then undertook the task of proving how far the duty was in no sense protective."

तेलग, रानडे, मेथा व वाच्छा हे सगळेच खुल्या व्यापाराचे पुरस्कर्ते होते. पण गिरण्यासारख्या बाल्यावस्थेत असलेल्या व उद्योन्मुख धद्याची हिदुस्थान सरकारनें काळजी घेतली पाहिजे व त्याचे जरूर ते सरक्षण केले पाहिजे असे त्याचें मत असे त्यामुळे वर सागितल्याप्रमाणे मॅचेस्टरवाल्याच्या सतोषाकरिता भलत्याच सबबीवर सरकारने आयात जकात उठविण्याचा विचार चालविला असता ती जकात सरक्षक स्वरूपाची मुळीच नाही असें दाखविण्याचे तेलगानी काम पतकरले व ते त्यानी उत्तम प्रकारे केले असे वाच्छा शेटजी वरील वाक्यात म्हणतात

तेलगाचा सदर्हू निबध इतका विस्तृत आहे की, त्याने छापील पानेच सुमारें नव्वद भरली आहेत अर्थात् त्याचा इकडे साराश—जसेचे तसें भाषातर तर राहोच—देखील विस्तारभयास्तव देता येणार नाही. आम्ही फक्त येथे त्या निबधातील काही महत्वाच्या मुद्याचे थोडक्यात दिग्दर्शन करून तेलगानी अखेर आपले काय सिद्धात स्थापित केले आहेत तेवढेच निर्दिष्ट करण्याचे मनातून योजिले आहे

तेलग आपल्या निबधाच्या आरभीच मिल्ल व प्रो केर्नस याच्या आधारावर असे सागतात की, अर्थशास्त्राचे सारेच सिद्धात पदार्थविज्ञानशास्त्राच्या किंवा रसायनशास्त्राच्या सिद्धाताप्रमाणे सार्वत्रिक स्वरूपाचे नसतात त्या सिद्धातात स्थल, काल किंवा दुसरी कारणे असतील त्याप्रमाणे फेरफार केलेच पाहिजेत मिल्ल आपल्या आत्मचरित्रात अर्थशास्त्राचा ( Political Economy ) असा उल्लेख करतो·—

"As a branch of Social Philosophy so interlinked with all the other branches that its conclusions even in its own peculiar province, are only true conditionally, subject to interference and counteraction from causes not directly within its scope"

म्हणजे "अर्थशास्त्र" ही एक समाजशास्त्राचीच शाखा असल्यामुळें त्याचे कोणतेही सिद्धात झाले तरी—दुसऱ्या महत्वाच्या कारणाचा विचार होईपर्यंत—तात्पुरतेच समजावयाचे असतात ते यावश्चद्रदिवाकरौ जसेचे तसे सत्यच राहातात असे धरून चालता येत नाही प्रो. केर्नस एके ठिकाणी म्हणतो —

" The data thus furnished ( by Political Economy ) may, indeed, go far to determine our judgment, but they do not necessarily, and *should not in practice always*, do so For, there are few practical problems which do not present other aspects than the purely economical—political, moral, educational, artistic aspects—and these may involve consequences so weighty as to turn the scale against purely economic solutions. "

म्हणजे अर्थशास्त्राच्या प्रश्नाचा विचार करताना त्याचा राजकीय, नैतिक वगैरे दृष्टीनेंही विचार करावयाचा असतो, व तसा विचार केल्याशिवाय जे सिद्धात ठरतील ते एकदेशीय ठरण्याचा सभव असतो पण चमत्काराची गोष्ट ही की आमच्या देशातील जकातीच्या—Customs Tariff—प्रश्नाचा विचार करीत असताना इग्लडमधील किंवा इकडील कोणीच लेखक या मुख्य मूलभूत मुद्याकडे लक्ष देत नव्हता सर्वच लोक अर्थशास्त्राचे सिद्धात सर्वच देशात, सर्व काळी व सारखेच लागू असतात असे गृहीत धरून चालत होते सबब तेलग म्हणतात की, आपणास ही इशारत प्रथमच द्यावी हे इष्ट वाटले.

अर्थशास्त्राचे सिद्धात सदैव सत्य व कायम नसतात अशा अर्थाचे प्रो. टी ई क्लिफ लेस्ली याने काढलेले उद्गार तर मिल्ल व केर्नस याच्या पेक्षाही अधिक स्पष्ट व निश्चित स्वरूपाचे आहेत ते असे —

" I venture to maintain, to the contrary, that Political Economy is not a body of natural law in the true sense, or of universal or immutable truths, but an assemblage of speculations and doctrines which are the result of a particular history, coloured even by the history and character of its chief writers, that, so far from being of no country, and unchangeable from age to age, it has varied much in different ages

and countries and even with different expositors in the same age and country."

याचा स्पष्ट अर्थ असा की एका देशाला किंवा एका काळी जे अर्थशास्त्राचे सिद्धात लागू पडतील तेच सिद्धात दुसऱ्या देशाला त्याच काळी अगर भिन्न काळी लागू पडत नाहीत. हा सामान्य दृष्टीने एक मूलभूत मुद्दा झाला.

पुढे तेलगानी सरक्षण जकातीला सामान्यतः जे आक्षेप घेण्यात येतात त्याचा विस्तारानें ऊहापोह केला आहे पण त्या सर्वाचा आम्ही इकडे अनुवाद करीत नाही फक्त एक दोन महत्वाच्या आक्षेपाचे तेलगानी जें निराकरण केले आहे त्यासबधानेच थोडक्यात विवेचन करतो पहिला आक्षेप हा की, सरक्षक जकात एकाद्या मालावर बसविल्यास बाजारात त्या मालाची किमत वाढते व तो गिऱ्हाइकाना महाग पडतो म्हणजे गोरगरीबाचा तोटा होतो उलट ती जकात उठविली तर तो माल स्वस्त मिळतो व गिऱ्हाइकाचा फायदा होतो या आक्षेपाचा हिंदुस्थानच्या दृष्टीनें विचार केल्यास असे आढळून येईल की, विलायती कापडावर आयात जकात बसविल्यास ते कापड बाजारात महाग विकेल व गोरगरिबाचे नुकसान होईल, व ती जकात उठविल्यास माल तितका स्वस्त विकेल व गिऱ्हाइकाचा फायदा होईल ह्या गोष्टी खऱ्या आहेत, व हाच कोटिक्रम सन १८७७च्या सुमारास आयात मालावरील जकात उठविण्याचे घाटत होते त्या वेळी मॅचेस्टरवाल्याकडून व त्याच्या साथीदाराकडून लढविण्यात आला होता तो त्याच्या दृष्टीने बरोबर असेल तेलग म्हणतात की, वरील कोटिक्रम बरोबर होता असे जरी क्षणभर मानले तरी त्यापासून परिणाम काय होण्याचा सभव होता ते पहावयास नको काय ? इकडे सरकारी तिजोरीची त्या वेळी स्थिति चागली नव्हती हे मागे सागितलेच आहे अशा स्थितीत आयात मालावरील जकात उठविली तर तेवढा वसूल कमी होऊन जमेंत तूट पडेल ती कशी भरून काढावयाची ? याला फक्त दोनच मार्ग होते दुसरा एकादा नवीन कर बसवावयाचा किंवा खर्चांत काटकसर करावयाची ! याशिवाय तिसरा मार्ग नव्हता नवा कर बसवावयाचा तर तो कोणावर बसवावयाचा ? जे लोक आयात जकात भरीत असत त्याच्यावरच नवीन कर बसविला तर त्यापासून फायदा तो काय ? आणि कोणाचा ? आयात जकात मॅचेस्टरवाले भरीत असत. त्यांच्यावरच जर नवीन कर बसविला तर एका हातानें केलेलें दान दुसऱ्या हातानें परत घेतलें असे होत नाही काय ? बरें, नवीन कर जे आयात जकात भरीत असत त्याच्यावर न बसविता दुसऱ्या लोकावर बस-

विला तर तो निव्वळ अन्याय होत नाही काय ? एका वर्गातील लोकाचा फायदा व्हावा म्हणून दुसऱ्या वर्गावर नवीन कराचे ओझे लादणें हा केवळ जुलूम होय ! बरें, नवीन कर बसविण्याचा मार्ग सोडला तर जमेतील तूट भरून निघण्याकरिता खर्च कमी करणे एवढाच मार्ग उरला त्याचा आता विचार करू आयात जकात जी त्या वेळी बसविली होती ती जमाखर्चाची तोडमिळवणी करण्याकरिता बसविली होती हे मागे सागितलेच आहे ती जकात उठवावयाची म्हणजे तेवढी कराची—taxation—सूट दिल्यासारखे होते हे उघडच आहे मग कराची सूट द्यावयाची तर कोणता कर सूट देण्यालायक आहे याचा विचार व्हावयास नको काय ? या गोष्टीचा विचार करू लागल्यास त्या वेळी दुसरे पुष्कळच कर सूट देण्याच्या लायकीचे होते, असे स्पष्ट दिसत होते मुबई इलाख्यातील जमीनधाऱ्याची पद्धत बरी असो किंवा वाईट असो, पण त्या वेळी महाराष्ट्राच्या काही भागातील रयत लोकानी केलेल्या दग्यावरून व सन १८७७-७८ साली पडलेल्या भयकर दुष्काळावरून पाहिल्यास जमीनधाऱ्याच्या बाबतीत काहीतरी सूट देणे अत्यत जरूरीचे होते, हे कोणाच्याही लक्षात येईल त्याचप्रमाणे गोरगरिबाना जड वाटणारा दुसरा कर म्हणजे मिठावरील कर होता. त्यात काही सूट देणें अत्यत जरूर होते तात्पर्य, एकाद्या कराची सूट द्यावयाची सरकारने मनात आणल्यास आयात मालावरील जकातीपेक्षा दुसरे पुष्कळ कर सुटीला अधिक लायक होते असे सहज दाखविता येईल.

पण आयात मालावर जकात बसविल्यास तो माल बाजारात महाग विकेल व गिऱ्हाइकाचा तेवढा तोटा होईल, आणि ती जकात उठविली तर माल स्वस्त विकेल व गिऱ्हाइकाचा फायदा होईल, या गोष्टी सत्य आहेत, व विशेषेंकरून ज्या देशात त्या प्रकारचा माल उत्पन्न होण्याचा सभव नाही त्या देशाच्या बाबतीत वरील आक्षेपास महत्वही आहे पण ज्या देशात तसला माल उत्पन्न होण्यासारखा आहे त्या देशाच्या बाबतीत त्या आक्षेपाचे महत्व उरत नाही उदाहरणार्थ, हिदुस्थानच घ्या. इकडे मॅचेस्टरच्या मालावर आयात जकात बसविल्यानें—ती नसलेल्या वेळेपेक्षा—तो माल गिऱ्हाइकास महाग विकतो ही गोष्ट खरी म्हणजे तितका त्या गिऱ्हाइकाचा तोटा होतो यात शका नाही पण तो तोटा फार वेळ टिकावयाचा नाही, व अखेर तो माल या देशात स्वस्तच होणार ! ते कसे ते पहा कापसाचे कापड हिदुस्थानात तयार होण्यासारखे आहे कच्चा माल इकडे मुबलक आहे. इग्लडपेक्षा इकडे मजुरी कमी पडते, आणि कोळसाही काही लांब

नाहीं फक्त तुम्ही भाडवल घातलें व धंद्याला चांगली सुरवात केली, म्हणजे थोड्याच दिवसानी कापड तयार होईल व मालाचा पुरवठा झाला की अखेर किंमत उतरली पाहिजे हें उघडच आहे. पण इतक्याच केवळ तात्विक कोटिक्रमावरच तुम्हास थांबण्याचें कारण नाहीं. सन १८७३ मध्ये मिस्टर डेव्हिड साइम नावाच्या गृहस्थानी एक लेख लिहून अमिरिकेत व फ्रान्स देशांत काय अनुभव आला हें स्पष्ट सागितलें आहे त्या दोन देशात सरक्षक जकात बसविल्यावर प्रथम जरी मालाची किंमत काही दिवस वाढली तरी अखेर थोड्या दिवसांनीं किंमत उतरून माल स्वस्त पडू लागला. इतकेंच नव्हे तर देशातल्या देशात मालाची जास्त पैदास होऊन लोकाच्या गरजा भागल्या, एवढेच नाही तर तो माल व्यापाराकरिता बाहेरही जाऊ लागला. फार काय पण अमेरिकन व्यापारी लोक इग्लडपेक्षाही माल अधिक स्वस्त विकू लागले ! अर्थात् कोणत्याही दृष्टीनें पाहिलें तरी—तात्विक दृष्टीनें विचार केला तरी व इतर देशात मिळालेला अनुभव पाहिला तरी—हिंदुस्थान देशाच्या बाबतीत वरील आक्षेपात जीव राहात नाहीं. तेलग म्हणतात —

"Both *a priori* reasoning, and the experience already gained in other countries, lead concurrently to the conclusion that in a country adapted to any manufacture, or protective duty, although it may in the first instance, raise the cost of the manufactured article, must, in the long run, reduce the cost. And if this is so, can the objection we are discussing be maintained ? Can it be said that protection under such circumstances means injustice to the consumer ? It is one of the characteristics of civilised life, contrasted with the primitive condition of mankind to forego a small present good, or even to suffer a present privation in the hope and with the intention of thereby securing some larger advantage in the future. Is it not clear, then, that in such a case as that we have put, the true interests even of

the consumer dictate a policy of Protectionism instead of Free trade ?"

अशा ठिकाणीं खुल्या व्यापाराच्या तत्वापेक्षां सरक्षणपद्धतीच अधिक हितकर होत नाही काय ?

आता दुसऱ्या एक आक्षेपाचा विचार करू रिकार्डो हा अर्थशास्त्रावर एक अधिकारानें लिहिणारा व बोलणारा असा गृहस्थ होता त्यानें एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं,

"The sole effect of high duties on the importation, either of manufacture or corn, or of a bounty on their exportation, is to divert a portion of Capital to an employment which it would not directly seek. × × It bribes a manufacturer to commence or continue in a comparatively less profitable employment."

याचा अर्थ इतकाच की आयात मालावर जकात—सरक्षक जकात—बसविल्यास सरक्षित धदेवाल्या लोकास आपला धदा सुरक्षित आहे असे वाटते, व त्याचे भाडवल अधिक किफायतशीर धद्यात पडावयाचे ते बाजूला राहून त्याच धद्यात—सरक्षित म्हणजे कमी किफायतशीर धद्यात—पडून रहाते किंवा दुसऱ्या अशाच कमी किफायतशीर धद्याकडे वळते, म्हणजे एकदरीत तोटाच होतो तेलगानी स्पष्टपणें दाखविले की हे म्हणणें—इतर कोणत्याही देशास लागू पडलें तरी—हिंदुस्थान देशातील परिस्थितीस मुळींच लागू पडत नाही इकडे थोडासा उलट प्रकार मात्र घडून आला होता, म्हणजे जें भाडवल लोकाच्या पेटीत पडून राहात असे त्याला हल्ली अधिक किफायतशीर मार्ग मिळून ते मुंबईतील गिरण्या उभारण्यात पडलें आहे ही इष्टापत्तिच नव्हे काय ? तेलग म्हणतात —

"It appears that in former times before banking had reached its present development, the great merchants in Bombay used always to keep large balances in hand for the purposes of their trade, so that money might be forthcoming at any time when

it was required. The methods of business having now altered so as to dispense with the necessity of keeping in hand such large balances, a great portion of the Capital which used formerly to remain in that form has now gone to make up the Capitals of our Mills Is this, or is it not a desirable state of things ? It appears to me * * * * that result is by no means to be deprecated So much wealth, which before was not productively employed, is now employed for purposes of production The aggregate production of the country, therefore, must have increased to the extent of the outturn of this additional Capital "

हल्लीच्या बॅंका निघण्यापूर्वी मुबईतील मोठमोठे व्यापारी लोक, गरज पडेल तेव्हा उपयोगी पडाव्यात म्हणून, बऱ्याच मोठ्या रकमा हातात ठेवीत असत. आता व्यापाराचे स्वरूप बदलल्यामुळे व्यापाऱ्याना पूर्वीसारख्या मोठमोठ्या रकमा हातात बाळगण्याचे कारण पडत नाही. त्या रकमा मुबईतील गिरण्या उभारण्यास जें भाडवल लागले त्यात पडल्या हे भाडवल त्या वेळीं झाले तरी काही थोडे थोडके नव्हते सन १८७५ मध्यें मुबईतील कापसाच्या कारखान्यात सुमारें चार कोट रुपयाचे भाडवल पडले होते तेलग विचारतात की ही गोष्ट चागली झाली की वाईट ? मग मागे सागितलेल्या रिकार्डोचे म्हणणे कोठें राहिले ? तेलगानी दुसरी एक गोष्ट सागितली आहे. त्या वेळी मुबईतील काहीं व्यापाऱ्या-जवळ असलेल्या सरकारी नोटापैकी बऱ्याचशा नोटा जवळपासच्या संस्थानात गेल्या होत्या म्हणजे त्यायोगाने आमच्या राजेरजवाड्याच्या तिजोरीत रिकामा पडून राहिलेला पैसा बाहेर पडून जर गिरण्याना भाडवल पुरवू लागला तर ही स्थिति बरी की वाईट ? व ही स्थिति मॅंचेस्टरच्या मालावरील आयात जकात चालू होती अशा वेळी प्राप्त झाली होती रिकार्डोनें किंवा दुसऱ्या कोणी अशाच अर्थशास्त्रज्ञानें लढविलेला कोटिक्रम कदाचित् इग्लडाला लागू पडत असेल. किंबहुना तो कोटिक्रम इग्लडला फायदेशीरही असेल, पण तो हिंदुस्थानातील परिस्थितीला बिलकूल लागू नव्हता वर सागितल्याप्रमाणे रिकामे पडून राहिलेलें भाडवल धनोत्पादक धदे उत्पन्न करण्याचे कामी लागल्यामुळे

हिंदुस्थानचा फायदा झाला व काही अर्थशास्त्रज्ञांनी केलेलीं दुराग्रहमूलक विधानें ( dogmatic views ) खोटी पडली तेलग म्हणतात —

" So much wealth which had remained idle in the hands of its possessors × × × has now been turned into Capital employed in production and going to the support of the labouring classes These facts × × × seem rather to point to a state of things not entirely squaring with a *priori* views of the dogmatic Free Traders, if I may venture so to call them."

खुल्या व्यापाराचे पुरस्कर्ते म्हणत असतात की, सरक्षक जकात बसविल्यास त्या देशातील व्यापार मदावतो या म्हणण्याचा अर्थ एवढाच की हिंदुस्थानात आयात जकात बसविण्यात आली होती—ती सरक्षक स्वरूपाची होती असे या पुरस्कर्त्यांचे म्हणणे होते, पण खरोखर ती सरक्षक जकात नव्हती—ती चालू ठेवल्यास मुबईचा आयात-निर्यात व्यापार बसेल पण हे म्हणणे निराधार होतें हे तेलगानी आकडे देऊन सिद्ध करून दाखविले सन १८५७–६० व १८६८–७१ या सुमारें दहा वर्षातले बगाल, मद्रास व मुबई या मोठ्या शहरात झालेल्या व्यापाराचे आकडे—त्या वर्षांत आयात जकात चालू होती—घेऊन तेलगानी तुलना केली व दाखविले की, त्या मुदतीत मुबईचा आयात व्यापार साठ लक्ष पौंडानी वाढला व निर्गत व्यापार सुमारें एक कोटि सव्वीस लक्ष पौंड किमतीचा वाढला ! म्हणजे सरक्षक जकातीने व्यापार मदावला तर नाहीच, पण पुष्कळ वाढला. यासबधाने तेलग शेवटी म्हणतात —

" Upon the whole, therefore, the general figures of our import and export trade do not afford the slightest support to the dogmatic Free Trade views. They show that Bombay with her Protectionist system has not gone to rack and rain, but has been exhibiting, on the contrary, a striking development, so striking, indeed, as to throw into the shade, the development of at least one of her sister Presidencies

( Madras ), who are breathing " the free and bracing air of Free Trade."

याचा तात्पर्यार्थ वर आलाच आहे

खुल्या व्यापाराच्या पुरस्कर्त्यांचे मुख्य म्हणणें हें की हिंदुस्थानात शेतकीचा धदा उत्तम चालतो तेव्हा तुम्ही इकडे कापूस चागला पिकवा आणि तो इग्लडला पाठवा तिकडे कापड चागलें तयार होते ते तुम्हास आम्ही पुरवू तेलगाचें म्हणणें असे होते कीं, अशी वस्तुस्थिति कायमची राहू देणें हें हिंदुस्थानाच्या हितैक दृष्टीने बरोबर नाही. ते म्हणतात की,

" Whatever the benefits of trade × × between England and India, I apprehend that it will not be contended by such writers as Professor Cairns or Mr. Mac Donell, that trade should, in the interests of the whole world, for ever continue to be exactly on the existing lines—in other words, that India should continue to export the raw material to England and import the manufactured goods from England."

याला तेलगानी एक उदाहरण ( काल्पनिक ) दिलें आहे खुल्या व्यापाराचे तत्व अक्षरश लागू केल्यास कशी वस्तुस्थिती उत्पन्न होते ते पहा समजा एकाद्या लहानशा देशात एकच वस्तु उत्पन्न होऊ शकते व तिचीच सर्वत्र मागणी आहे त्या देशातील लोक फक्त तेवढयाच वस्तूची पैदास करतात, पण आपल्या स्वत च्या इतर आवश्यक वस्तूसबधाच्या गरजा भागवीत नाहीत.

" According to the broad principle of Free Trade, that country ought not to waste its labour and capital on any other article of production at all, but ought to be content to receive all it wants from other countries in exchange for the article in question. And yet," तेलग म्हणतात, " it seems to me to be quite clear that it would be extremely bad statesmanship, even if it were good Political Economy,

to confine the production in such a case to that article."

ती वस्तु बाहेर पुष्कळ खपते म्हणून सर्व भांडवल तेवढी एकच वस्तु उत्पन्न करण्यात घालून बाकीच्या वस्तूसाठी दुसऱ्या देशाच्या तोडाकडे पाहात बसणें शहाणपणाचे होईल काय ? समजा त्या वस्तूला काही काळानें मागणी कमी झाली मग त्या देशाने काय करावे ? उपाशीं मरावे काय ? असो त्या वेळी जे अर्थशास्त्रज्ञ म्हणून पुढे आले होते त्याचे लक्ष फक्त इग्लडातील गिरण्याची स्थिति कशी चागली राहील या एका गोष्टीकडे होते व वाटेल तो कोटिक्रम लढवून व वाटेल ते आकडे इकडचे तिकडे करून, तेवढी एक गोष्ट त्याना साध्य करावयाची होती. त्यात दुसऱ्या देशाचा सबध आल्यास त्याच्या स्थितीकडे त्याचे तेवढे लक्ष जाणे सभवनीय नव्हते.

याच्यापुढे तेलगानी हिंदुस्थान सरकारने या देशातील उद्योगधद्याला प्रथम काही दिवस उत्तेजन देणें अगर त्याचें सरक्षण करणे कसे जरूर आहे हे मिल्लच्या आधाराने दाखविले आहे काही लोक नेहमी आम्हास इग्लडचे उदाहरण दाखवीत असतात. तेलग म्हणतात की, इग्लडचे उदाहरण आम्हास काय उपयोगी ? इग्लडने उद्योगधद्याच्या बाबतीत इतकी आघाडी मारली आहे की त्याला सरकारच्या किंवा दुसऱ्या कोणाच्या मदतीची जरूरच नाही हिदुस्थानात जिकडे नवीन प्रकारच्या उद्योगधद्यास अजून नुकती सुरवात आहे, तिकडे इग्लडातील *Laissez Faire* (सरकारने प्रत्यक्ष असे काही एक न करण्याची) पद्धत काय कामाची ? आमच्या देशात तूर्त उद्योगधद्याची आणि शिक्षणाची स्थिति सारखीच आहे असे तेलग म्हणतात शिक्षणाच्या बाबतीतील मिल्लाचे म्हणणे उद्योगधद्याच्या सरक्षणास लागू करून, तेलग म्हणतात की,

"When, unless introduced by Government help, manufactures would not be introduced at all, such help has the opposite tendency to that which in so many other cases makes it objectionable, it is help towards doing without help"

या तत्वाप्रमाणे पाहिल्यास आमच्या देशातील उद्योगधद्यास सरकाराने सहाय्य करणें किवा त्याचे सरक्षण करणे अगदी जरूर आहे दुसरे उदाहरण, अज्ञान.

मनुष्याचे सुधारलेल्या देशात अज्ञान मनुष्याची सर्व व्यवस्था—तो सज्ञान होई-पर्यंत—सरकार पहात असते अज्ञान मनुष्याप्रमाणे एकादे राष्ट्रही अज्ञान असते. तसा प्रस्तुत उद्योगधद्याच्या बाबतीत हिदुस्थान देश आहे तेलग म्हणतात —

"With an entirely different civilization from our own such as we now stand face to face with, with entirely different modes of work, with the need for kinds of knowlege rarely, if ever, cultivated amongst us, our nation is, to all intents and purposes, of immature judgment in the matters we are considering. Without State Protection, without State guidance and aid, we should know but little of the resources of our country, knowing those resources we should have no knowledge of the modes of developing them, or having a knowledge both of the resources and of their modes of development, we should still be at a loss for the means of developing them, without Government encouragement."

अशा स्थितीत इकडील उद्योगधद्याना हरएक प्रकारें उत्तेजन देणें, त्याचे सरक्षण करणें, त्याना आसरा देणें हे हिदुस्थान सरकाराचे कर्तव्य आहे असें तेलगाचे स्पष्ट मत होते याला तेलगानी आणखी एका "स्पेन्सर" च्या अनुयायाच्या Westminster Reviews for April, 1877, p. 325—मताचा आधार दिला आहे तो लेखक म्हणतो —

"There is an early stage of existence in which nations like infants or children cannot be set free from authority, they cannot judge wisely enough or act with sufficient self-control to avoid fatal or irretrievable mistakes."

पण उद्योगधद्याना सरकारानें उत्तेजन द्यावयाचे अगर त्याचे सरक्षण करावयाचें असते हे तत्व क्षणभर कबूल केलें तर ते सरक्षण कोणत्या उद्योगधद्याचे

करावयाचे ? व ते तसे करावयाचें तर सरक्षण किती दिवस टिकावयाचें ? असा मिस्टर रॉजर्स याने आपल्या " Politicl Economy " नामक पुस्तकात प्रश्न विचारला आहे काशीनाथपत तेलग यानी त्याला हिंदुस्थानदेशाच्या दृष्टीने समर्पक उत्तर दिले आहे ते म्हणतात,

" Where a Government is asked to interfere and does at times interfere between debtor and creditor, where it decides what sort of education shall be given to its subjects, where it determines what roads shall be made, and what lines of railway laid down; where, I say, Government does all these and a legion of other things, surely it may also determine what Industry shall be protected, and how long the Protection shall last."

ज्या सरकारास आपल्या प्रजेस कोणते शिक्षण द्यावयाचे हे ठरविता येते, रस्ते कोणते करावयाचे, रेल्वे लाईन कोणती घालावयाची वगैरे गोष्टी ठरविता येतात, त्याला कोणत्या धद्याला उत्तेजन द्यावयाचे व ते किती दिवसपर्यंत द्यावयाचे हे सहज ठरविता येईल, हे उघड आहे

मोठमोठे लोक इग्लडमध्ये म्हणत असतात की, पार्लमेंटने जर खुद्द इग्लडातून सरक्षणपद्धतीचे उच्चाटन केले आहे तर ते हिंदुस्थानात—ताब्यातल्या देशात—तीच पद्धत चालू ठेवील काय ?

" It has been said and said by very high authorities that the British Parliament which has signed the death-warrant of Protection in England, could not permit it to exist in its great Dependency "

पण पार्लमेंट सभा असेच वागेल किंवा तिने असेच वागावे असे कोठे आहे ? तेलगानी या कोटीला अगदी समर्पक उत्तर दिले आहे ते म्हणतात,

" There is nothing illogical in its holding Free Trade to be good for England, and not yet good for India. It is a principle of the British Constitution

that the people shall not be taxed except by the vote of their representatives in the House of Commons. Of that fundamental principle, we are not allowed the benefit, although we have frequently asked for it, and although the benefit is indisputable Why should we have another principle of the British Constitution—certainly not so fundamental as this—extended to us, when we ask that it should not be extended to us, and when the benefits to be derived therefrom are, to say the least of it, problematical? The logical inconsistency does not seem to me to be greater in the one case than in the other and for this very good reason—in neither case is there a logical inconsistency at all."

लोकावर कर बसवायाचा तो त्याच्या प्रतिनिधीच्या समतीशिवाय बसवावयाचा नाही असे ब्रिटिश राज्यव्यवस्थेतील एक मुख्य तत्व आहे ते तत्व आमच्या देशास लागू करा अशी वरचेवर आम्ही मागणी केली तरी त्याचा आम्हास फायदा मिळत नाही—( हल्ली लोकप्रतिनिधि आमच्या कौन्सिलमधून निवडून जातात व बजेटवर ते ठराव पास करू शकतात ) व खुल्या व्यापाराचे तत्व–जें आम्हास नको व जें आम्ही मागत नाही—ते आम्हावर लादावयाचे यात सुसगतपणा किंवा न्याय तो काय राहिला ? अर्थात् इग्लडचे खुल्या व्यापाराचें तत्व हिदुस्थानास लागू करीत नाही असे पार्लमेट सभेनें ठरविल्यास त्यात न्याय दृष्टीने विसगतपणा मुळीच होणार नाही.

तेलगानी अर्थशास्त्रीय दृष्टीनें सरक्षणपद्धत हिंदुस्थान देशास लागू करण्यास का हरकत नाही यासबधाने जें विवेचन केले आहे, त्याचाच येथे फक्त अति सक्षिप्त रीतीने येथवर उल्लेख केला आता सरक्षक पद्धत हिदुस्थान देशात सुरू करणे का जरूर आहे व देशाच्या हितैक-दृष्टीनेंही का अगत्याचे आहे याचे जें त्यानी विवरण केले त्याचा थोडक्यात उल्लेख करतो

पहिलें कारण तेलगानी असे दिले आहे की, हिदुस्थानात तयार झालेला हरएक प्रकारचा माल पूर्वी सर्व जगात खपत असे व त्यायोगे इकडचे धदेवाले

लोक आपली पोटे भरत असत; आता युरोपातील यत्रसामर्थ्यानें तयार झालेला माल जिकडे तिकडे झाल्यामुळें आमच्या देशातील काहीं धदे साफ बुडाले व काहीं त्याच पथास लागले आहेत अशा स्थितींत नवीन पद्धतीचे दुसरे धदे सरकारच्या मदतीशिवाय इकडे निघणें शक्य नाही या ठिकाणीं इग्लडातले *Laissez Faire*—धद्याची वाढ आपोआपच होऊ देणें—हें तत्व लागू केल्यास परिणाम काय होईल हें उघड दिसतेच आहे! यासबधाचे तेलगाचे शब्दच येथे देणें बरें दिसतें —

"Now every body × × is aware of the one universal wail for departed industries which may be heard in various parts of the country. It is well-known that several articles, which in days gone by were exported from India for the use of the rest of the world are not now produced in India at all, having been supplanted by the products of machinary turned out in Europe and elsewhere × × × Now this being so, the experience of the past few years has shown that no advantage in the way of the opening of new industries can be gained, unless some guidance and aid are forthcoming for the instruction and support of our capitalists. If then, we are to follow what may be called the *Laissez faire* policy in this matter × × × the conclusion as regards our future prospects seems to me to be obvious. Our general want of enterprise, our ignorance of the resources of our own country, our ignorance of the modes by which those resources are to be developed —all these will reduce us to the condition of a nation of pure agriculturists, with no manufactures worth the name to afford—to employ the language of Professor Cairnes—'scope for wider and more

diversified cultivation, such as is furnished by an industry branching in numerous directions and offering to enterprise a varied field.' Is this a desirable state of things? Is it a state of things which we can contemplate calmly and without alarm?"

पूर्वीचे धदे मरून गेलेच आहेत. नवीन धदे त्याच्या जागी उभे करण्यास जर सरकारनें मदत करावयाची नाही तर मग हिंदुस्थान म्हणजे एक शेतकऱ्याचें राष्ट्र होऊन बसेल! ही गोष्ट इष्ट आहे काय? शेतकीचा धदा म्हणजे शेतकऱ्यांनीं आकाशाकडे डोळे लावून पावसाची वाट पाहात बसण्याचा धदा नव्हे काय? एखाद्या वर्षी पाऊस पडला नाही तर हजारों—किंबहुना लाखो—लोक खाण्यास न मिळाल्यामुळें मृत्युमुखी पडतात. याबद्दल तेलगानी त्या वेळी—सन १८७७ मध्यें घडलेलें—दुष्काळाचें उदाहरण दिलेलें आहे. हजारो लोक अशा दुष्काळाचे वेळीं सरकाराने किंवा मातबर लोकानीं चालू केलेल्या धर्मावर आपलीं पोटे भरून आपले प्राण कसे तरी जतन करून राहातात! ही इष्टापत्ति आहे काय? काही अर्थशास्त्रज्ञ लोक इकडे सरक्षणपद्धत सुरू करणे—demoralizing—आचारभ्रष्टतेचे व अनीतिकारक आहे असें म्हणत असतात. तेलग विचारतात की वरीलसारख्या दुष्काळाच्या वेळी शेतकऱ्यानी सरकाराने किंवा सधन लोकानीं केलेल्या धर्मावर दिवसाचे दिवस राहावे ह्यात नीतिदृष्टीनें कमीपणा नाहीं काय? एका बाजूनें उद्योगधद्याला—सरक्षणपद्धत ही नीतिदृष्टीनें कमीपणाची आहे म्हणून—मदत करावयाची नाही आणि दुसऱ्या बाजूनें—दुष्काळासारख्या आपत्तीच्या वेळी शेतकऱ्याना लोकावर अवलबून रहाण्यासारखी—नीतिदृष्टीनें कमीपणाची गोष्ट करू द्यावयाची, याचा अर्थ तरी काय?

पण तेलग म्हणतात कीं गोष्ट इतक्यावरच थाबत नाहीं दुष्काळाची गोष्ट सोडून दिली तरी एकादें राष्ट्र केवळ शेतकीवरच राहू देणें म्हणजे देखील अनिष्टच आहे मिल्ल आपल्या "Political Economy" नामक पुस्तकात म्हणतो —

"The American Protectionists believe that a nation all engaged in the same or nearly the same pursuit—a nation all agricultural—cannot attain a high state of civilization, and culture"

म्हणजे केवळ शेतकीवर अगर एकाच धद्यावर राहणारें राष्ट्र सुधारलेले म्हणता येत नाहीं. त्याची सुधारणेच्या मार्गानें प्रगति होऊ शकत नाही. दुसरे एक किट्रेज नावाचे ( Mr Kittredge ) मोठे गृहस्थ होते त्यानी "चेंबर्स आफ कॉमर्स" सस्थेपुढे असे उद्गार काढले,

"Agricultural countries are proverbially poor countries, and India is no exception to the rule. While she has to depend, as has been the case until very lately, wholly upon agriculture, she will remain poor."

म्हणजे हिंदुस्थान देशाला जोपर्यंत केवळ शेतकीवरच अवलबून राहावे लागेल तोपर्यंत तो दरिद्रीच राहील मिस्टर आर एच् इलियट व लेफ्टनट कर्नल टिरेल याचीही मते अशीच आहेत इतकेच नव्हे, तर मिल्ल व प्रो. केर्नस याचेही मत असे आहे की

"A purely agricultural people cannot be a highly civilized people."

याच्या पुढे तेलगानी शेतकी सुधारण्यासबधाने बरेच विस्तृत विवेचन केलें आहे. ते आम्ही सोडून देऊ पण त्यानी मुबई इलाख्यातील शेतकरी लोकाच्या स्थितीचे जें सामान्य वर्णन केलें आहे, त्याचा अल्पसा उल्लेख येथे केला पाहिजे. ते म्हणतात —

"It is not an unfamiliar fact, that at least three months of the year, the agricultural population of the mofussil of this Presidency is to a great extent unemployed"

शेतात खपणारे काही लोक हगामाचे दिवस निघून गेल्यावर शहराचे ठिकाणीं जाऊन गाड्या हाकू लागतात किंवा असलीच कामें करू लागतात डॉक्टर ह्युलेट ( Dr. Hewlett ) यानी आपल्या खानेसुमारीच्या रिपोर्टांत सागितल्याप्रमाणे महाराष्ट्रातले, कच्छ—काठेवाडमधले, कुलाबा, रत्नागिरी, मालवण, गोंवे इत्यादि ठिकाणचे असख्य लोक मुबईत मजुरी करण्याकरिता येत असतात. याचा अर्थ तेलगाच्या शब्दात सागावयाचा म्हणजे

"It is easy to see that remaining merely agricultural people, we should be economically not so well-off as our capacities would fairly entitle one to expect"

हिंदुस्थान देशातील एकंदर स्थितीचा विचार केल्यास आम्ही केवळ शेतकऱ्याचे राष्ट्रच म्हणून राहून आमची आर्थिक दृष्टीने केव्हाही स्थिति चांगली होणार नाही आमच्या लोकांत अगदीच कर्तबगारी नाही असे नाहीं, पण त्यांना दिशा दाखविली पाहिजे त्यांना मदत केली पाहिजे. साइमसाहेबाच्या–अमेरिका व फ्रान्स या देशातील उद्योगधंद्यासंबंधाने लिहिलेल्या—लेखाचा मागें एकदा उल्लेख केलाच आहे त्यांत त्यांनी लिहिले आहे की,

"The whole population of a country can never be fully employed unless there be a diversity of occupations suitable to the young, the old, the weak and infirm of both sexes."

तेव्हा जितके धनोत्पादक धंदे असतील व जितके अधिक लोक त्यांत गुंतून राहतील तितकी देशाची भरभराट अधिक होईल, आणि ह्याच सिद्धांत तेलंगांनी काढला आहे. ते म्हणतात —

"It is, therefore, quite plain that even from the purely economical point of view, even confining our attention to the means of increasing the aggregate production of the country, it is not desirable to permit our industry to be confined to agriculture"

नुसते शेतकऱ्याचे राष्ट्र राहून कोणत्याही देशास सुस्थिति येणार नाहीं व त्याची सुधारलेल्या देशांत तर गणना केव्हाच करता येणार नाही

काही काहीं इंग्रज अर्थशास्त्रज्ञाचे सिद्धांत सर्व एकदेशीय असून, ते फक्त इंग्लंडच्या फायद्याच्या दृष्टीने काढलेले होते खुद्द इंग्लंडानेंच आपले काही धंदे संरक्षणपद्धतीचेंच प्रथम अवलंबन करून उभारलेले होते पण ही गोष्ट खुल्या व्यापाराचें तत्व इतरास उपदेशितांना सदहूं अर्थशास्त्रज्ञ "अपवादा"त ढकलीत असतात तेलंगांनी इंग्लंडाच्या इतिहासातील एक उदाहरण दाखवून सांगितले कीं, हिंदुस्थान देशातील धंदेदेखील वर सांगितलेल्या अपवादातच येतात, ॲडम

स्मिथ यानें इग्लडनें सतराव्या शतकात तिकडील गलबते बाधण्याच्या धद्यास (Ship-building) उत्तेजन मिळावें म्हणून जे नौकानयनासबधी कायदे (Navigation laws) पास केले होते ते "अपवादात" ढकलले होते सतराव्या शतकात युरोपखडातील सर्व व्यापार हॉलडमध्ये तयार झालेल्या जहाजातून चालत असे हॉलडशी इग्लडचे पुढें काही कारणानें पटेनासें झालें मग इग्लडने असा सक्त कायदा केला की इग्लडाच्या बदरात इग्लडाशिवाय दुसऱ्या कोणत्याही देशात तयार झालेल्या गलबतातून आलेला माल उतरू द्यावयाचा नाही फक्त ज्या देशातला माल असेल त्याच देशातले गलबत असल्यास चालेल ! खरा प्रकार असा होता की, तोपर्यंत हॉलडच्चेच समुद्रावर वर्चस्व असे इतर कोणच्याच देशाचें नसे व्यापाराची ने-आण वगैरे हॉलडच्याच जहाजातून होत असे. परतु वरील प्रकारचा इग्लडच्या पार्लमेंटनें कायदा केल्यामुळें इग्लडातील गलबते बाधण्याच्या (Ship-building Industry) धद्याला उत्तेजन मिळाले व तेव्हापासून इग्लडचे समुद्रावर जें वर्चस्व स्थापित झालें ते अद्यापि कायम आहे असे म्हणण्यास चिंता नाही एकोणिसाव्या शतकात फ्रान्स, इताली, जपान, अमेरिका, ही दर्यावर्दी राष्ट्रें ऊर्जितदशेस आल्यामुळे इग्लडच्या पूर्वीच्या "एकमेवाद्वितीयम्" स्थितीला जरा धक्का बसला आहे ही गोष्ट खरी परतु जगातील प्रस्तुत काळी जीं थोडीं प्रबल राष्ट्रे आहेत त्यात इग्लडचे बरेंच वरचे स्थान आहे यात शकाच नाहीं असो. इकडे मुद्याची गोष्ट म्हणजे हीच कीं इग्लडातील गलबते बाधण्याच्या धद्याला ऊर्जितावस्था यावयाला मुख्य कारण म्हणजे सन १६५१ मध्ये पास झालेला Navigation Act होय पुढे दोनशे वर्षांत सदहू धदा उत्तम स्थितीप्रत पोंचल्यावर किंबहुना समुद्रावर हरएक दृष्टीने इग्लडचे वर्चस्व स्थापित झाल्यावर—एकोणिसाव्या शतकात वर सागितलेला कायदा रद्द करण्यात आला तेलगाचें म्हणणें असे स्पष्ट होतें की त्याच अपवादाचा फायदा हिंदुस्थानच्या—सन १८७७ च्या सुमारास चालू असलेल्या—गिरण्याच्या धद्यास द्या व त्या धद्याचे सरक्षण करा ते म्हणतात की,

"We have shown that, with agriculture alone, even our economical condition must needs be less prosperous and satisfactory than it is in our power to make. It, therefore, follows that Protection to manufactures in India stands on at least as sound a

footing in theory as the 'Navigation Laws' did in England."

तेलग म्हणतात की हिंदुस्थानात ( शेतकीशिवाय ) काहीं तरी किफायतशीर धदे सुरू केल्याशिवाय गत्यतर नाहीं आणि तसे धदे सुरू करण्यास जर सरक्षक पद्धतीचेच अवलबन करणे जरूर असेल तरी ती पद्धत अवश्यमेव ग्रहण केली पाहिजे याही शिवाय दुसरें एक बलवत्तर कारण आहे त्याच्याकडे डोळेझाक करून चालावयाचे नाही सन १८७७ च्या सुमारास लडन येथील "ईस्टइडियन असोशिएशन" पुढे मिस्टर ईलियट (Mr. Elliot) यानीं "Our Indian Difficulties" या विषयावर एक निबध वाचला. त्यावर मग बराच वादविवाद झाला त्या वादविवादाचे वेळीं मिस्टर डिकिन्सन (Mr Dickinson) यानी स्पष्ट रीतीने दाखविले की, इग्लडनें हिंदुस्थानचा काही बाबतींतला व्यापार अगदीं ठार बुडविलेला आहे त्या साहेबाचे शब्द असे आहेत —

"Such things as Madras sheetings and Dacca muslins were well-known articles of commerce, and the way in which those industries were destroyed was by a most cruel system of protective duties in the English manufacturer's interest. By means of duties at the ports, and duties in transit, the native manufactures were utterly crushed out"

मद्रासच्या "चादरी" व डाक्काची "मजलीन" याचा इग्लडात मनस्वी खप असे परतु स्वदेशातील धद्याना उत्तेजन देण्याकरिता इग्लडनें सदहू जिनसावर इग्लिश बदरात व खुष्कीवरून वाहतुकीच्या निमित्तानें जब्बर संरक्षक जकाती बसवून ते धदे ठार बुडविले !

मिस्टर मॉन्टगॉमरी मार्टिन ( Mr. Mont-Gomery Martin ) याचा "ईस्ट इडिया कपनी" शीं निकट सबध असावा असें वाटते. ते गृहस्थ याच विषयावर लिहिताना असे उद्गार काढतात —

"For many years great commercial injustice was done by England to British India. High, indeed, prohibitory duties were laid on its sugar, rum, coffee

to favour similar products grown in the West Indies; still worse, we compelled the Hindus to receive cotton and other manufactures from England at nearly nominal duties (two and a half per cent) while, at the very same time, fifty per cent were demanded here on any attempt to introduce the goods of India. The same principle was adopted in silk and other articles, the result was the destruction of finer class of cotton, silk and other manufactures, without adopting the plan of Strafford in Ireland during the reign of Charles I, namely, the founding of the linen trade as a substitute for that of woollen, which was extinguished in order to appease the English handloom weavers."

या लांब उताऱ्याचें भाषांतर करण्याचे कारण दिसत नाहीं इतकेंच सागतों कीं, इग्लडनें केवळ आपल्या राजकीय सत्तेच्या जोरावर स्वार्थबुद्धीनें प्रेरित होऊन व्यापारदृष्टीनें हिंदुस्थानदेशास कसें ठार बुडविलें हें वरील उताऱ्यात स्पष्ट रीतीनें दाखविलें आहे यासबधानें मार्टिनसाहेबानें खटपट करून "ईस्ट इडिया" कपनीच्या लडन येथील मुख्य डायरेक्टर लोकाची आपण कशी खात्री केली व त्या डायरेक्टरानीं ह्या अर्थाचे कसे ठराव पास केले हें सागितलें आहे अखेर सर रॉबर्ट पील यानें इग्लडच्या हातून झालेला अन्याय कबूल केलेला असून त्याचें परिमार्जन करण्याची त्यानें तजविजही केली होती असें मार्टिनसाहेब म्हणतो. त्याचे शब्द असे आहेत —

"The late Sir R. Peel admitted the injustice and adopted measures for its redress" इतके सागून तेलग आपल्या निबधात म्हणतात कीं, "We see, therefore, that the agency employed to destroy our indigenous manufactures was this very Protectionism. And when we ask that the same instrument, which was used as a sword against us should now be used as a shield for us, we

are met with the reply—oh, it belongs to an antiquated arsenal, the English Government has long thrown it aside, and it cannot be used now. I deny, that in extending Protection to any native manufactures, the British Government would be doing any injustice to the manufactures of England. But even if × × × it would be an injustice, I venture to submit, that the injustice would only operate by way of compensation, as it were, to those to whom injustice had been done before, in the interests of the very persons who are now complaining"

आम्हास वाटते कीं, यात तेलगानीं इग्लिश लोकाचेच आधार देऊन ब्रिटिश सरकाराच्या—व त्याचेच हस्तक जें हिंदुस्थान सरकार त्याच्या—पदरात अन्यायाचे माप कोणाचीही भीड न ठेवता पुरें घातलें आहे व त्यास निरुत्तर केलें आहे या प्रकरणातील काही उतारे आम्ही तेलगाच्या निबधातून—क्वचित् अनावश्यक भाग वगळून—जसेचे तसे दिले आहेत, याचे कारण उघड आहे. ब्रिटिश लोकाचा हिंदुस्थानाशी सबध आला तेव्हापासूनचा—विशेषेकरून इग्लडच्या लोकानी केवळ स्वार्थबुद्धि प्रेरित होऊन हिंदुस्थानच्या धदेवाले लोकास कसें क्रूरपणानें वागवून भिकेस लावलें यासबधाचा—इतिहास इतका काळाकुट्ट आहे कीं त्याबद्दल कोणाही इग्लिश मनुष्याला बोलताना मान खालींच घालावी लागेल ! पण हा सर्व प्रकार लॉर्ड लिटन साहेबाच्या कारकीर्दीत तेलगानी वरील सारखा अत्यत मुद्देसूद निबध लिहून—निबधातील एकही महत्वाचें विधान आधाराशिवाय केलेलें आढळत नाहीं—निर्भीडपणाने सरकारच्या व लोकाच्या निदर्शनास आणला व त्यायोगानें देशाची मोठी कामगिरी केली, यात शका नाही.

खुद्द इग्लडचेच बहुतेक धदे सरक्षक पद्धतीच्या पागुळगाड्यानें कसे ऊर्जित स्थितीस पोंचले हें तेलगानीं ग्लॅडस्टन साहेबाच्याच आधारानें दाखविलें आहे. सन १८६४ मध्यें ग्लॅडस्टन साहेबांनीं आपलें जमाखर्चाचें पत्रक पार्लमेंटपुढें ठेवताना जें भाषण केलें त्यात त्यानीं असे उद्गार काढले आहेत –

"And what is really the case of the paper-makers? Is not their trial the same to which, one after

another almost every branch of British industry has been subjected? They grew up under the influence of Protection"

अर्थात् हिंदी धद्याना सरक्षक तत्त्व लागू करतांना जे इग्लिश लोक "नको नको" म्हणून ओरड करीत होते, त्याचा स्वार्थाशिवाय दुसरा कोणता हेतु असणार?

प्रो लेस्ली म्हणतो की,

"The aggregate wealth of a country depends on the degree of development of all its resources, the development of all the capacities for production and commerce of all its localities and all its inhabitants. But to secure the development of all these resources or natural forces, one indispensable condition is perfect liberty in every locality, for every trade, every company, every individual, and every enterprise to allow every effort, individual or co-operative, to be made, every experiment tried, every improvement attempted ××× The wealth of countries is in proportion, not to their natural resources, but to the liberty for their use."

एकाद्या देशाची सधनता ही त्या देशातील स्वाभाविक साधनावरच नसून त्या साधनाचा उपयोग करण्याच्या स्वतत्रतेवर अवलबून आहे हे लेस्ली साहेबाचे म्हणणें बरोबर असेल, पण हिदुस्थानाला तशी स्वतत्रता नाही, हीच मुद्याची गोष्ट आहे हिंदुस्थानात परकीय व्यापाऱ्यानीं येऊन वाटेल ती सवलत घ्यावी, वाटेल तितकी मोकळीक घ्यावी आणि देशी व्यापाऱ्याला ठार बुडवावें, ही काय स्वतत्रता झाली, असें तेलगानी चक्क विचारले! ते म्हणतात —

"It is a mockery and a delusion to speak of liberty, when the native endeavouring to develop the resources of his country, can be undersold and

commercially ruined by the unlimited competition of the foreigner. You may just as well speak of the prisoner, surrounded by a deep and wide moat which he cannot cross over, as enjoying liberty, because, forsooth, he has no fetters on his person. We must have a more real liberty than unlimited competition can give us. And we must also be artificially nourished and protected, till we are able to stand with our own strength; and then throw the doors open for the bracing air of Free Trade"

चोहोबाजूनीं मोठा व खोल खदक खणून त्या जागेंत एकाद्या कैद्याला— ज्याला तो खदक ओलाडून जाता येणार नाहीं—ठेवला आणि त्याच्या फक्त हातापायात बेड्या नाहींत म्हणून त्याला स्वतत्रता आहे असे कोणी म्हटले तर ती त्याची थट्टा होणार नाही काय? हिंदुस्थानाला खरी खुरी स्वतत्रता पाहिजे आहे. इतकेच नव्हे तर सरक्षक जकातीच्या अगर इतर मार्गांनीं, त्याला आपल्या पायावर उभें राहण्याची शक्ति येईपर्यंत, त्याचे पोषण केलें गेले पाहिजे, आणि इतकें झालें म्हणजे मग खुल्या व्यापाराचे दरवाजे सताड उघडा!

तेलगानीं मिल्टनच्या "मुद्रण स्वातत्र्या" वरील भाषणातून एक उतारा देऊन इग्लिश लोकाना असें स्पष्ट म्हटलें कीं, "खुल्या व्यापाराचा जो तुम्हास प्रकाश मिळाला आहे तो केवळ त्याकडेच पाहात राहून अध होण्याकरिता नसून त्याच्या साह्याने लाबवरच्या गोष्टी शाहाणपणाने पाहून त्याविषयी विचार करावा म्हणून" अर्थशास्त्राचे सिद्धात हे सर्व काळी व स्थळीं सारख्याच महत्वाचे— [illegible]च्छिन्न—नसतात. म्हणजे त्या सिद्धाताप्रमाणें जी गोष्ट एका देशाच्या बाबतींत खरी अस[illegible] ती दुसऱ्या कोणत्याही देशाच्या बाबतींत खरीच असेल असें धरून चालता येत नाहीं

तेलग शेवटी आपल्या [illegible]र्व विवेचनाचा समारोप करून म्हणतात कीं, सरक्षण-पद्धतीला इतर देशात जी अ[illegible]चण भासत असेल ती आपल्या (हिंदुस्थान) देशात नाहीं केवळ अर्थशास्त्राच्या द[illegible]ष्टीनें पाहिल्यास हिंदुस्थानाच्या प्रस्तुत स्थितींत त्याच्या उद्योगधद्याला सरक्षणपद्ध[illegible] लागू करणें हें इष्टच नव्हे, तर अत्यत आवश्यक आहे. आणि याहीपेक्षा उच्चत[illegible] दृष्टीनें—देशाची भरभराट व्हावी, त्याला जगांत उच्च-

स्थान मिळावें या उदारभावनेनें—विचार केला तर प्रस्तुतच्या बिकट स्थितींत हिंदुस्थानातील उद्योगधद्याना—सरक्षक जकातीच्या मार्गानें—उत्तेजन दिल्याशिवाय गत्यतर नाही, असेच म्हटलें पाहिजे तेलगाचें म्हणणें पुन्हा असे असे कीं, इकडच्या सर्वच धद्याना कायमचा सरक्षणपद्धतीचा फायदा द्या असें आमचें मागणें नाहीं. ती पद्धत इकडे प्रथम सुरू करून या देशाची परिस्थिति कोणत्या प्रकारच्या धद्याला अनुकूल आहे हें पहा व मग त्या धद्याचें तेवढे सरक्षण करा व बाकीच्यांचें करू नका. आणि तो धदादेखील सशक्त होऊन आपल्या पायावर उभा राहू लागला म्हणजे मग खुशाल सरक्षण जकात काढून टाका तेलगाच्याच शब्दात सागावयाचे म्हणजे—

"We have shown that in India, Protection will not lead to the evils which it has led to, in other countries We have shown that here it will not foreclose—as it does elsewhere—any benefits likely to accrue to us but for its operation. Further more, we have shown reasons for holding that it will prove full of positive benefit to us. And, therefore, upon the whole, we maintain, that both on the true principles of economic science, and on principles higher than any which economic science has to deal with, the system of Protectionism is one which ought to receive a fair trial in India."

हा निबध इतका मुद्देसूद, सप्रमाण व साधार होता कीं तो कित्येक युरोपीयन लोकासही पसत पडला त्याप्रमाणें सरकाराकडून लागलीच कृति झाली असें मात्र नाहीं. पण तेलगानीं आपलें काम उत्तम प्रकारें केलें याबद्दल मात्र समजस युरोपीयन लोकांनीं पसती व्यक्त केली आहे. सर रेमड वेस्ट हे त्या निबधासबधानें पुढीलप्रमाणें लिहितात —

"Telang opposed with great vigour and with real force of reasoning Lord Lytton's reduction in 1879 of the duties on Manchester goods. He had

already, in 1877, discussed the question of Free Trade and Protection in an ably argued essay read at the Sassoon Mechanics' Institute."

तो निबंध आमच्या मुंबईतल्या सर्वच पुढाऱ्यांना आवडावा यांत आश्चर्य नाहीं त्या वेळी तेलंगांचें वय सगळें सत्तावीस वर्षांचें, विषय विशेष गुंतागुंतीचा व शास्त्रीय प्रकाराचा, पण तेवढया तरुण वयांतही तसल्या शास्त्रीय महत्वाच्या विषयावर सुंदर निबंध लिहिल्याबद्दल तेलंगांची जिकडे तिकडे तारीफ व्हावी हे साहजिकच आहे सर दिनशा वाच्छा यांना, मुंबईत तरी निदान अर्थशास्त्रविषयांत व आकडेमोडीच्या कामांत शेट दादाभाईनंतरचें स्थान देत असतात, हें प्रसिद्धच आहे त्या सर दिनशा वाच्छांनी सदरील तेलंगांच्या निबंधाविषयीं असे उद्गार काढले आहेत —

" The reader will see for himself in that brilliant essay what penetrative power of analysis and what force of logic he ( Mr. Telang ) had brought to bear on the controversy It is a magnificent dialectical performance which does great credit to the writer, especially having regard to the fact that it was written when he was only twenty-seven On my part, I have not known that any accomplished Indian, in any other part of the country, since 1877, has written on such a controversial economic subject with such vigour, such force and such lucidity as Mr. Telang at that age."

असल्या गुंतागुंतीच्या विषयावर गेल्या पन्नास वर्षांत हिंदुस्थानच्या कोणत्याही भागांत इतक्या मुद्देसूद रीतीनें व इतक्या जोरदार व निःसंदिग्ध भाषेंत दुसऱ्या कोणी लेख लिहिलेला आपणास माहीत नाही असे वाच्छाशेट म्हणतात ! यापेक्षा अधिक चांगलें सर्टिफिकेट तें काय पाहिजे ?

सन १९०८ मध्यें साताऱ्यास न्या. रानडे यांची पुण्यतिथि साजरी करण्यांत आली होती. (ज्ञानप्रकाश, २–२–०८) त्या प्रसंगीं रा. रा. डी. जी. दिवेकर,

वकील, यानीं रानड्यांच्या कामगिरीसबधानें एक निबध वाचला. त्यात तेलगाच्या वरील निबधाचा सहज उल्लेख आला आहे दिवेकर आपल्या निबधात म्हणतात —

" Mr. Ranade and Mr Telang may be called the Fathers of Indian Political Economy. The first protest against the orthodox school of Political Economy was raised by the Hon'ble Mr. Telang in a paper read by him on " Free Trade and Protection " ( in 1877 ) before the Sassoon Mechanics' Institute in Bombay, Mr Ranade took up the theme and laid the foundation stone of the National Political Economy for India ( in 1891 ) "

रा दिवेकरानी " हिंदी अर्थशास्त्रा "च्या जनकत्वाचा मान तेलग व रानडे या दोघाना दिला आहे तो अगदी योग्य आहे ॲडॅम स्मिथ, व इतर काही इग्लिश अर्थशास्त्रज्ञ पडित यानी त्या वेळी " spurious " कृत्रिम किंवा आपमतलबीपणाने त्या शास्त्राचे प्रतिपादन माडून इग्लडच्याच केवळ हितैक दृष्टीने काही सिद्धात ठरविले होते पण त्या सिद्धाताचा फोलपणा फ्रेड्रिक लिस्ट (Fredrick List) नावाच्या एका जर्मन अर्थशास्त्रज्ञ पडिताने जगाच्या निदर्शनास आणला ! त्यामुळें इग्लडाला, खुद्द नेपोलियनपेक्षाही, या फ्रेड्रिक लिस्टची जास्त भीति वाटू लागली जें काम युरोपखडात फ्रेड्रिक लिस्ट याने केले तेच काम हिदुस्थानात प्रथम तेलग यानी व नतर रानडे यानी केले त्यामुळें रा. दिवेकरानी सन १९०८ मध्ये जे पुढील उद्गार काढले ते अगदी यथार्थ होते —

" Mr. Ranade and Mr. Telang may, each, be justly styled to be the Fredrick Lists of India."

रानडे व तेलग हेच आमच्या देशाचे " फ्रेड्रिक लिस्ट " होत यात शकाच नाही ॲडॅम स्मिथ आदिकरून इग्रजी पंडिताचे असे शास्त्र ठरूनच गेले होते की, हिदुस्थान देशाने फक्त शेतकऱ्याचे राष्ट्र बनून इग्लडला कच्चा माल पुरवावा आणि इग्लडने त्या कच्च्या मालाचा पक्का करून पाठविलेला माल या देशाने घ्यावा ! मधला सर्व फायदा इग्लडच्या खिशात, हे उघडच झाले ! हिदुस्थानच्या

बाबतींत तरी निदान हा सर्व उलटा न्याय होता ज्या हिंदुस्थान देशात तयार झालेला रेशमी, कापशी वगैरे पक्का माल कित्येक वर्षे—किंबहुना शतके—इग्लडात खपत असे, त्याच देशाला—अर्थशास्त्राचे एकदेशीय प्रतिपादन करून—शेतकऱ्याचे राष्ट्र बनवून त्याचेकडून कच्चा माल घ्यावयाचा व त्यालाच आपलें कायमचे गिऱ्हाईक करून आपल्या देशातील—इग्लडातील—धद्याची वाढ करावयाची, या प्रकाराला उलटा न्याय म्हणू नये तर काय ? पण आनदाची—व आम्हा महाराष्ट्रीय लोकाना अभिमानाची—गोष्ट ही की, सदहू ॲडम स्मिथ वगैरे पडिताच्या आपमतलबी विचारसरणीतील एकदेशीयता जगास दाखवून प्रथम तेलगानीं व मग रानड्यानी आमच्या देशात आर्थिक दृष्टीनें मोठी क्राति घडवून आणली ! यामुळें त्या उभयता थोर पुरुषाना दिवेकरानी जें " हिंदुस्थानातील फ्रेड्रिक लिस्ट " म्हटले तें अगदी योग्य होते, यात शका नाहीं.

---

## प्रकरण तेहतिसावे.

# आयात जकात व कायद्याचें राज्य.



अखेर लॅंकेशायर परगण्यांतील लोकानीं जोराची चळवळ केल्याचा परिणाम होऊन विलायतेहून आलेल्या कापडावर बसविलेली आयात जकात उठविण्यात आली ! लॉर्ड नार्थब्रुक हे—ते जरी खुल्या व्यापाराचे कैवारी होते तरी—आयात जकात उठविण्याच्या विरुद्ध होते हें मागील प्रकरणात सागितलेंच आहे पण ते आपल्या व्हाइसरॉयच्या जागेचा राजीनामा देऊन इग्लडास निघून गेले व त्याच्या जागी लॉर्ड लिटन हे व्हाइसरॉय होऊन आले. ते आयात जकात उठविण्याचा निश्चय करूनच आले होते, असे स्पष्ट दिसत होते. कारण त्यानीं आपल्या कौन्सिलमधील बहुमताच्या विरुद्ध जाऊन ती जकात उठविली ! याबद्दल निषेध व्यक्त करण्याबाबतचा अर्ज मजूर करण्याकरिता मुबईस सन १८७९ मध्ये ता ३ मे रोजीं रहिवाशी लोकाची जाहीर सभा भरली होती अध्यक्षस्थानी सर मगळदास नथूभाई हे होते ही सभा भरविण्याच्या कामी बऱ्याच अडचणी होत्या. पण त्या दूर करून सभा यशस्वी रीतीनें पार पाडण्याचे ज्यानी श्रेय घेतले, त्यात काशीनाथपत तेलग हे एक होते. याबद्दल मिस्टर एच् पी मोदी हे आपल्या पुस्तकात ( सर फेरोजशहा मेथा याच्या चरित्रात ) म्हणतात —

" In the organisation of this demonstration Pherozshah took a leading part in company with Mr Nanabhoy Byramji Jeejibhoy and Mr. Telang From the correspondence of that period it appears that the three had to encounter apathy on the part of a few, and obstruction on the part of others. These were successfully overcome and the demonstration was a complete success "

सभेंत अर्जाचा मसुदा तयार केलेला सर फेरोजशहा यानीं वाचून दाखविला. तो अर्ज पास करण्याचा ठराव तेलग यानी सभेपुढें माडला त्या वेळी जें त्यानीं भाषण केले ते त्यांच्या उत्तम भाषणापैकीं एक असें गणले गेलेलें आहे. त्याचा साराश असा तेलग म्हणाले कीं अर्जात जकात उठविण्याविरुद्ध जीं कारणें दिली आहेत त्यात या देशातील धद्याना उत्तेजन देण्यासबधाचा प्रश्न मुळींच नसून ती एक जमाखर्चाची बाब या दृष्टीनेंच त्याचा विचार करण्यात आला आहे पार्लमेंटने सदरील जकात सरक्षक स्वरूपाची असेल तर ती उठवावी असा ठराव पास केला आहे. तो ठराव रद्द समजावा असे अर्जात मुळींच सुचविण्यात आलेले नाही सदहू जकात ही सरक्षक जकात आहे असे मुळींच म्हणता येत नाही ती एक सरकारदेण्यापैकी नेहमीचीच बाब आहे इतकेंच आमचे म्हणणें आहे सन १८७० साली मॅंचेस्टर येथील चेबर्स ऑफ कॉमर्स तर्फे आलेल्या प्रतिनिधिमडळास—डेप्युटेशनला—उत्तर देताना लॉर्ड सॅलिसबरी—सेक्रेटरी ऑफ स्टेट यानी—असे म्हटले होतें की ही आयात जकात उठवून हिच्या जागी दुसरा एकादा कर बसवावा लागेल तर ही उठविण्यास आपण केव्हाही मजुरी देणार नाही लॉर्ड लिटन साहेबानीही तिकडे हिदुस्थानात निघून येण्यापूर्वी असेच वचन दिले होते. आमचे म्हणणें इतकेच आहे की, वरील दोघा जबाबदार अधिकाऱ्यानी याप्रमाणे हिंदी लोकास अप्रत्यक्षपणे दिलेली वचनें पाळण्यात आली नाहीत अर्जात नवीन कर बसविण्यात आला नाही असे म्हटलें आहे हे खरे, पण ते म्हणणे अक्षरश घ्यावयाचे नाही. वास्तविक पाहिल्यास या वर्षी नवीन कर बसविला गेलाच आहे. तो कसा ते पाहा गेल्या वर्षी ( १८७८ ) " लायसन्स टॅक्स " कोणत्या कारणाकरिता बसविण्यात आला होता हे सर्वास माहीतच आहे. त्या कराच्या उत्पन्नांतून दुष्काळनिवारणार्थ एक फड ( Famine Insurance Fund ) स्थापन करण्याचा उद्देश होता, व

तो कर त्याच कामाकरिता ( religiously set apart ) वसूल व्हावयाचा होता असें सरकारकडून स्पष्ट सागण्यात आलें होते आता सरकार म्हणतें कीं गेल्या वर्षी दुष्काळनिवारणार्थ असा फड स्थापन करण्यात आलाच नाहीं, व या वर्षीही तो स्थापन करण्याचा विचार दिसत नाही अर्थात् "लायसन्स टॅक्स" हें नाव जरी जुनें असले तरी तो कर या वर्षी नवाच आहे. गेल्या वर्षी तो कर दुष्काळनिवारणार्थ फड जमविण्याकरिता होता या वर्षी तो सरकारच्या चालू खर्चाकरिता आहे. एवच या वर्षी नवीन कर बसविण्यात आलाच आहे.

याशिवाय मिठावरील कर वाढविण्यात आलाच आहे, व नवीन कायद्याप्रमाणें स्टॅंपचे दर वाढविण्यात आल्यामुळें लोकावर कराचा बोजा वाढणारच आहे. तात्पर्य, या वर्षी लोकावर नवीन कर बसविण्यात आलेच आहेत, आणि आयात जकात उठविण्यापूर्वी ज्या अटी पाळण्याविषयी सरकारने वचने दिली होती त्या अटी मुळींच पाळण्यात आल्या नाहीत

तेलगानी आपल्या भाषणात आणखी एका गोष्टीचा प्रामुख्याने उल्लेख केला ती गोष्ट म्हणजे हिंदुस्थानविषयक सरकारी धोरणातील फरक होय या जकातीच्या प्रश्नासबधी पार्लमेटमध्यें झालेल्या वादविवादाच्या वेळी अशी गोष्ट प्रसिद्धीस आली होती कीं, व्हॉइसरायसाहेबानी या बाबतीत आपल्या कार्यकारी कौन्सिलातील बहुमत बाजूस सारून ही आयात जकात उठविली ! खरी हकीकत काय घडली—म्हणजे या प्रश्नाला कौन्सिलात अनुकूल मते किती पडली व प्रतिकूल किती पडली हें समजणें निदान काहीं दिवसपर्यंत तरी शक्य नाही पण असे सागतात की, व्हॉइस-रायाच्या बाजूस फक्त एकच मत पडले बाकी सर्व सभासद विरुद्ध होते ही लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट आहे थोड्या दिवसापूर्वी दुसऱ्या एका बाबतीत सेक्रेटरी ऑफ स्टेट यानी आपल्या कौन्सिलमधील बहुमत धाब्यावर बसविले होते व आता व्हॉ-इसरॉयसाहेबानी आपल्या कौसिलमधील बहुमत एका बाजूस सारले आहे ! याव-रून आम्हाला कसे वाईट दिवस येत आहेत याचे स्पष्ट दिग्दर्शन होते. म्हणजे मत्रिमडळाच्या सल्ल्याने चालणारी राज्यपद्धत आता मागें पडून एकसत्तात्मक राज्य-पद्धत—म्हणजे एका व्यक्तीच्या लहरीप्रमाणें चालणारी राज्यपद्धत—सुरू होत आहे असें उघडच दिसतें.

ज्या ठिकाणीं एखादा मनुष्य—मग तो कितीही मोठ्या अधिकारावर असो—आपल्या सहकारी मडळीपैकीं बहुमत धाब्यावर बसवून आपल्या एका व्यक्तीच्या

मनाप्रमाणें वागू शकतो, तेव्हां ती स्थिति अत्यत असमाधानकारकच नव्हे, तर खोडसाळपणाची आहे असे म्हटलें पाहिजे !

" However exalted the individual officer may be, who sets at naught the opinion of a majority of his colleagues, this condition of affairs is one which is most unsatisfactory and mischievous "

लडन येथील " पच " नामक मासिकाला वस्तुस्थितिदर्शक चित्रें देऊन खरा प्रकार काय आहे हे दाखविण्याची कला उत्तम साधली आहे हें प्रसिद्धच आहे. त्यानें त्या वेळी एका चित्रात हिंदुस्थानातून पेनशन घेऊन विश्राति घेण्याकरिता इग्लडात आलेला एक गृहस्थ आपल्या घाई घाईनें बाहेर जाण्यास निघालेल्या पुतण्यास " इतक्या घाईने चाललास कोठे ? " असे विचारीत असल्याचें दाखविले होते त्या प्रश्नास पुतण्याने उत्तर दिलें की, " हाऊस आफ कामन्समध्यें आज महत्वाचा वादविवाद होणार आहे तो ऐकण्याकरिता मी चाललो आहें " त्यावर वरील वृद्ध पेनशनर गृहस्थ आश्चर्यानें म्हणाला, " काय ? हाउस आफ कामन्स अद्याप जिवत आहे काय ? मला वाटले होते कीं त्या सभेला तुम्ही केव्हाच मूठमाती दिली असावी !" तेलग म्हणाले, ह्याचें तात्पर्य इतकेच कीं हिदुस्थानातील इग्रज अधिकाऱ्याची, कोणतेही नियत्रण न जुमानता, आपापल्या लहरीप्रमाणें सत्ता गाजविण्याची प्रवृत्ति होत चाललेली स्पष्ट दिसत होती

दुसऱ्या एका गोष्टीचा तेलगानी आपल्या भाषणात उल्लेख केला बगालमधील आमच्या काही देशबधूचे प्रतिनिधि मडळ—deputation—त्या सुमारास याच जकातीच्या प्रश्नाविषयी व्हाइसरॉय—लॉर्ड लिटन—याना भेटण्याकरितां गेले होतें त्या वेळीं त्या मडळास उत्तर देताना व्हाइसरॉय यानी त्या आमच्या बधूची निर्भर्त्सना करून त्याचा उपमर्द केला हा सर्व प्रकार शिष्टाचाराच्या विरुद्ध होता त्यात बगाली लोकांचाच केवळ अपमान झालेला नसून तो सगळ्या हिदुस्थानातील लोकाचा होता, व व्हाइसरॉय साहेबाच्या या कृतीचा जितका तीव्र निषेध करवेल तितका करणें जरूर होते. याविषयी शेट दादाभाई नवरोजी यानी थोड्याच वेळापूर्वी केलेल्या भाषणात निषेध व्यक्त करून आमच्या बगाली बंधूविषयीं सहानुभूति दाखविली होती. त्यालाच काशीनाथपत तेलग यानी आपल्या भाषणात दुजोरा दिला. तेलंगांनीं

स्पष्ट म्हटलें कीं, आपण स्वत· एक नम्र नागरिक असून व्हाइसरॉयसारख्या बड्या अधिकाऱ्यासबधानें जरी बोलत असलों तरी, असें म्हणणें प्राप्त आहे की, लॉर्ड लिटन साहेबानीं आमच्या वगदेशीय बधूची केलेली निर्भत्सेना ही केवळ अनावश्यक, अनुदारपणाची व अन्यायाची दर्शक अशी आहे तेलगाचे शब्द असे होते.—

"That rebuke, I venture to say—though I am but a humble individual speaking about the most exalted personage in the Indian Empire—that rebuke was most unmerited, ungenerous, uncharitable, unjust."

लॉर्ड लिटन याचे इग्लिश भाषेवरील प्रभुत्व व त्यांचें भाषासौष्टव या गोष्टी त्याच्या भाषणावरून व लेखावरून सर्वानाच परिचित झाल्या आहेत. पण त्या भाषेचा महाराणी साहेबाच्या प्रजाजनापैकी प्रतिष्ठित लोकाची निर्भर्सना करण्याच्या कामी उपयोग करणें म्हणजे त्या भाषाप्रभुत्वाचा व भाषासौष्टवाचा दुरुपयोग करणें होय !

"Gentlemen, we are pretty familiar with the mastery of English style, that *curiosa felicitas*, which characterises Lord Lytton's speeches and writings. But I make bold to say, that that mastery of style, that *curiosa felicitas*, was never turned to worse use, was never more mischievously employed, than when it was made the vehicle of that rebuke to the members of the Deputation, consisting of eminent subjects of Her Majesty in Calcutta."

लॉर्ड लिटन यानीं बगाली मडळाला दिलेलें उत्तर अगदी अद्वितीय—अश्रुतपूर्व होतें. तें अपूर्वत्व केवळ त्या उत्तरांतील चुकीच्या व निराधार विधानासबधानेंच किवा तें उत्तर देण्याच्या तऱ्हेसबधानेंच नसून तसें उत्तर या देशात ब्रिटिश सत्ता स्थापन झाल्या दिवसापासून कोणत्याही व्हाइसरॉय साहेबानीं—राणी सरकारच्या प्रतिनिधीनें—हिंदी प्रजेला उद्देशून आजपर्यंत दिलेलें नाहीं; या गोष्टीमुळेंच त्याला अपूर्वत्व आलें होतें !

" Lord Lytton's reply to the Deputation is exceptional, not merely for its falacies and incorrect statements, not merely for its spirit and tone, but also because of its being quite unprecedented among the replies of Her Majesty's Representatives to Her Indian Subjects, throughout almost the whole course of British Rule "

बगाली लोकाना दिलेल्या उत्तरात लॉर्ड लिटन साहेबानी म्हटले होते कीं, हा निरर्थक व सतापजनक वाद आपल्याला एकदम बद करावयाचा आहे !

यासबधानें तेलगानी आपल्या भाषणात खुद्द लॉर्ड लिटन याच्याच "Fables in Song " या कवितेंतून एक रूपक घेऊन मोठ्या गमतीचे व चोख उत्तर दिले आहे लॉर्ड लिटन यानी त्या कवितेत "मनुष्य हा एक विचित्र (paradoxical) प्राणी असून तो भाडणे करूनच पुढे शाति मिळविण्याचा यत्न करीत असतो, म्हणून मनुष्याचे सगळे जीवितच एक कविता आहे ( this the poetry of life ) " असें म्हटले आहे तेलगानीं म्हटले की, " बरोबरच आहे लॉर्ड लिटनसाहेबानी तरी सध्या वायव्य दिशेकडील प्रदेशात हिदुस्थानची नवीन सरहद्द हुडकून काढण्याकरिता कलह उत्पन्न करून भावी शातिच मिळविण्याचा प्रयत्न चालविला आहे त्याच प्रमाणे प्रस्तुत आयात जकातीचा वाद उपस्थित करून देखील त्यानी पुढच्या शातीचीच तयारी चालविली आहे ! " असो. तेलगाचे हे एक अत्युत्तम भाषण होते हे सागितलेच आहे सर रेमड वेस्ट यानीं सदरील आयात जकात उठविण्याच्या लॉर्ड लिटन याच्या कृतीस तेलगानी मोठ्या जोराचा व मुद्देसूदपणाने विरोध केला ( with great vigour and with real force of reasoning ) असे म्हटले आहे

त्याच साली—सन १८७९ मध्ये—तेलगानी दुसरा एक अत्यत कडक व वाचनीय असा लेख लिहून त्यात तत्कालीन राज्यपद्धतीचे चागलें दोषाविष्करण केले आहे त्याचा त्या वेळच्या मुबई-पुण्याकडच्या बहुतेक सर्व वर्तमानपत्राशी व मासिकाशी सबध होता हे मागे सागितलेच आहे त्यापैकीं पुण्याच्या सार्वजनिक सभेच्या त्रैमासिकात ( आक्टोबर १८७९ ) " कायद्याचे राज्य " (Reign of Law ) या विषयावर त्यानीं एक चागला लेख लिहून प्रसिद्ध केला आहे.

त्यात तेलग सुरवातीसच असे म्हणतात की सन १८७३ मध्यें एका सार्वजनिक प्रसगीं मुबईचे मिस्टर डब्ल्यू. जी. पेडर, म्युनिसिपल कमिशनर, यानी असें अभिमानानें म्हटलें होते कीं, हिंदुस्थानचे लोक हल्लीं कायद्याचे राज्यात राहात आहेत. तेलग म्हणतात की, बरोबर आहे. लोकानाही आजवर असेच वाटत होते. परतु अलीकडे सरकारने जे कायदे केले आहेत त्याचा विचार केला म्हणजे लोकाची आजपर्यंतची समजूत चुकीची ठरते व पेडर साहेबाचे उद्गार दर्पोक्तीच्या तोडीचे ठरतात ! उदाहरणार्थ, सन १८७९ मध्यें मुबईच्या गव्हर्नरच्या कार्यकारी कौन्सिलमध्यें कायदे जाणणारा—Judicial Member—सभासद नव्हता त्याचा परिणाम असा होई की, हायकोर्ट जज्जाचे कायद्याच्या राज्यात जें उच्च स्थान होतें ते आता खाली आले त्याचप्रमाणें प्रत्येक कायद्यात गव्हर्नरला काही पोट नियम करण्याचे अधिकार दिलेले असतात. परतु ते नियम हल्लीं केव्हा केव्हा कायद्याच्या मर्यादेबाहेर जात असतात म्हणजे ते नियमच "कायदा" होऊन बसतात ! तेलग म्हणतात —

"In truth, we shall not be far wrong, if we say that not a single year has passed since 1867 in which there have not been enacted several regulations containing such a surrender by the Legislature of its own proper and peculiar functions And we must say that the extreme frequency of such provisions in our Statute Book renders us particularly anxious about our boasted "Reign of Law""

असा प्रकार सन १८६७ सालापासून चालू असल्यामुळें हिंदुस्थानच्या लोकास प्रस्तुत आपण खरोखरीच कायद्याच्या राज्यात आहो कीं काय याची शका वाटू लागली आहे ! सन १८७० च्या १८ ॲक्टाप्रमाणें "गव्हर्नर जनरल इन कौन्सिल" याला त्या कायद्यात सागितलेल्या जकातीशिवाय कोणताही माल सोडण्याचा अधिकार आहे. त्या अधिकाराचा उपयोग करून लॉर्ड लिटन साहेबानीं—आपल्या कौन्सिलर लोकाचीं मतें धाब्यावर बसवून—विलायतेतील सर्व माल जकातीवाचून घेण्याचा हुकूम सोडला ! यावरून तेलग म्हणतात.—

" And thus we have come down from the secure heights of the Reign of Law, down the shelving beech of executive rules, into the deep sea of Personal Government The moral is plain. Adhere to the correct principle, do not permit yourself to be tempted away by what you consider to be the exigencies of the fleeting moment Once you cut off the moorings of principle, you know not where you may get benighted and tempest-tossed "

म्हणजे आम्ही जे कायद्याच्या राज्याच्या उच्च शिखरावर होतों ते खालीं येत येत, आता एकसत्तात्मक राज्याच्या खोल समुद्रात येऊन पडलो आहो! याचें तात्पर्य उघडच आहे खऱ्या तत्वास चिकटून रहा तात्पुरत्या किंवा क्षणभगुर अशा तुम्हास वाटणाऱ्या सुखसोयीच्या मोहास बळी पडू नका एकदां तत्वाचा आधार तुटला की तारू कोठे भडकेल किंवा कोठे तुफानात सापडेल हें तुम्हास समजणार सुद्धा नाहीं!

काही बडे अमलदार म्हणत असतात की हिंदुस्थानातील लोकास ( Personal Government ) एकसत्तात्मक राज्यच आवडतें, पण तें खरें नाही. सर हेनरी मेन याने सन १८६७ साली असे लिहिले आहे की —

" I do not admit the proposition, which is sometimes advanced, that the natives of India dislike the abridgment of official discretion "

खरा प्रकार असा आहे की हिदु लोकास जुन्या परिस्थितीत एकाच मनुष्याचा अमल पसत पडला असता खरें पाहिल्यास जुन्या परिस्थितीत राजा आपल्या प्रजेला मुलाप्रमाणें समजत असे व तो तसा वागत असे अर्थात् प्रजा त्याला पित्याप्रमाणें समजत असे. कालिदासाने रघुवशात म्हटले आहे —

"प्रजानां विनयाधानाद्रक्षणाद्भरणादपि।
स पिता पितरस्तासां केवलं जन्महेतवः॥"

अशा स्थितींत हिंदु लोकास एका मनुष्याचा अमल कदाचित् पसत पडला असता; पण तशी स्थिति आता राहिली नाहीं. आता इग्रज अमलदाराची नजर असते इग्ल-

इच्या हिताकडे आणि तीही हिंदी लोकाच्या हिताकडे केवळ दुर्लक्ष करून ! अशा स्थितीत हिंदी लोकास एकसत्तात्मक राज्यपद्धती आवडते असे म्हणणे म्हणजे खऱ्या वस्तुस्थितीचा विपर्यास करणें होय आता इकडे कायद्याचे राज्य सुरू झालें आहे असे पुष्कळ इग्रज अधिकारी लोकच सागत असतात. अर्थात् कायद्याच्या राज्यातच राहाणे आता हिंदी लोकास आवडते, व त्यातच आपला फायदा आहे असें त्यास वाटते असो. तेलगानी सदर्हू लेखाचा पुढीलप्रमाणें समारोप केला आहे —

" Upon the hole, therefore, we contend, *first*, that under present conditions, it is not correct to say that the people esteem Personal Government above the Reign of Law "

*Secondly*, that Reign of Law, which we are living under, is a very imperfect one, indeed, while all the indications about the future point rather to its probable curtailment than to its extension

*Lastly*, that the tendency thus manifested is a retrograde and mischievous one and not consistent with those principles which have received the high sanction of Eminent Statesmen — of Mount Stuart Elphinstone and others—who founded the Empire and also of still higher authorities "

तेलग म्हणतात कीं सर्व गोष्टींचा विचार केला असता एकदरींत असा निष्कर्ष निघतो कीं, प्रस्तुतच्या स्थितींत लोकाना कायद्याच्या राज्यापेक्षां एकसत्तात्मक राज्य पसत आहे हें म्हणणें बरोबर नाही. बरें, प्रस्तुत—पन्नास वर्षांपूर्वीच्या—स्थितींत जें कायद्याचें राज्य आम्ही अनुभवीत होतों, तें पूर्ण स्वरूपाचें नसून अगदीं अपूर्ण होतें इतकेंच नव्हे तर त्या वेळच्या सरकारच्या काहीं कृतींवरून पाहता त्या कायद्याच्या राज्याचा विस्तार होण्याच्या ऐवजीं ते सपुष्टात येण्याचाच जास्त सभव होता पण तें कांहींही झालें तरी कायद्याच्या राज्याचे क्षेत्र दिवसें-दिवस सकुचित करण्याची सरकारची जी प्रवृत्ति त्या वेळीं स्पष्ट दिसत होती ती

अत्यत पिछेहाटीची व खोडसाळपणाची होती, इतकेंच नव्हे तर ती मॉउट स्टुअर्ट एल्फिन्स्टन व इतर मुत्सद्दी लोक—की ज्यांनी परिश्रमपूर्वक या हिंदी साम्राज्याची स्थापना केली—त्यानीं व त्यांच्याहीपेक्षा थोर पुरुषानी घालून दिलेल्या तत्वाच्या अगदीं विरुद्ध होती.

---

## प्रकरण चवतिसावें.

# इल्बर्ट बिल.

सन १८८० मध्ये लॉर्ड रिपन यासारखे उदारधी गृहस्थ हिंदुस्थानचे व्हाइसरॉय होऊन आल्यामुळें त्यानीं इकडे आल्याबरोबरच लोकहिताच्या दृष्टीनें काहीं महत्वाच्या गोष्टी हातात घेतल्या. त्यानीं प्रथम लॉर्ड लिटन यानी केलेला मुस्कटदाबीचा ( Gagging Act ) कायदा रद्द केला. मग त्यानीं आपला स्थानिक स्वराज्याविषयीचा ठराव प्रसिद्ध केला. शिक्षणाच्या बाबतीत चौकशी करून त्याचा देशात प्रसार करण्याच्या हेतूनें एक कमिशन नेमिलें; व सन १८५८ मध्ये महाराणी सरकारनें प्रसिद्ध केलेल्या जाहीरनाम्याला अनुसरून युरोपियन व हिंदी याजमधील कायद्याच्या दृष्टीनें असलेला विषमभाव दूर करण्याच्या हेतूनें " इल्बर्ट बिल " कायदे-कौन्सिलापुढे आणलें. ते बिल " इल्बर्ट " या नावाच्या अधिकाऱ्यानें पुढे आणल्यामुळें ते त्याच्याच नावाने प्रसिद्ध आहे. असो. त्या बिलातला हेतु एवढाच होता कीं, आसाम, बिहार वगैरे लाबच्या व मागसलेल्या काही प्रांतांत एकादा युरोपीयन आरोपी आढळून आल्यास त्याची हिंदी मॅजिस्ट्रेटपुढे चौकशी व्हावी. पण बिल प्रसिद्ध झाल्याबरोबर युरोपीयन लोकानी त्याविरुद्ध एकच ओरड करून जगी चळवळ केली. वस्तुत हे लोक अशी ओरड करून अशा उग्र स्वरूपाची चळवळ करतील ही कल्पनाच लॉर्ड रिपन व त्याची सल्लागार मडळी याच्या डोक्यात प्रथम आली नाही ! पण या कामीं सर्व युरोपीयन—अधिकारी व बिन अधिकारी, लहान व थोर—एक झाले व सर्वांनीच मोठी चळवळ आरंभिली. ॲग्लो-इडियन वर्तमानपत्रानीं तर त्या आगींत पुन्हा तेल ओतलें. कडक लेख, लहान लहान हस्तपत्रकें, पुस्तकें, व सभा याना या वेळीं जणू ऊतच आला. आणि हा क्रम बिल प्रसिद्ध झाल्या दिवसापासून पुढे कित्येक दिवसपर्यंत सारखा चालू होता. युरोपीयन लोकाचीं डोकीं त्या वेळीं ठिकाणावर नव्हतीं आणि एकादा

मुस्कटदाबीचा कायदा करण्याची सरकारला जरूरच वाटली असती तर तो कायदा त्या वेळीं जरूर पाहिजे होता लॉर्ड कर्झन हे हिंदी लोकास अत्यत अप्रिय झाले होते, व ते विलायतेस परत जाण्यास निघाले तेव्हा लोकानीं त्याजवर कडक टीका करून आपला सताप व्यक्त केला, हें प्रसिद्धच आहे पण ती सर्व लोकांनीं केलेली टीका लॉर्ड रिपनच्या वेळीं युरोपीयन लोकानीं पत्रात केलेल्या टीकेपुढें फिक्कीच पडली असती ! असो इतकी चळवळ दुसऱ्या एकाद्या देशात झाली असती तर तिकडे नुसती आपआपसात यादवी—civil war—माजून तो देशही दुभगला गेला असता ! पण इल्बर्ट बिलासबधींच्या या सर्व गोष्टीचा आसाम व बगाल या दोन प्रातात तर कळस झाला होता. अखेर लॉर्ड रिपन याच्या कार्यकारी कौन्सिलमधील एका गृहस्थानीं—सर ऑकलड कॉल्व्हिन यांनीं—थोडीशी तडजोड सुचवून युरोपीयन लोकाचीं मनें शात केल्यावर मग त्याची चळवळ थडावली

या सर्व प्रकारात युरोपीयन लोकाच्या मनाची स्थिति काय होती, याचे सर फेरोजशहा मेथा हे केव्हा केव्हा फार चटकदार वर्णन करीत असत. याविषयीं त्याचे चरित्रकार एके ठिकाणीं म्हणतात —

" In the opinion of Pherozasha, the attitude of the Europeans on this question Ilbert Bill ) almost seemed to justify the striking language in which Mr. John Bright once defined the position taken up by certain Anglo-Indians, which was that 'having won India by breaking all the ten commandments, it was too late now to think of maintaining it on the principles of the Sermon on the Mount.' The conclusion, Phirozasha went on to argue, which would force itself upon all thinking minds would be that India had never been and never would be held by the sword, and that the policy of righteousness adopted by the wisest among English Statesmen was not only a policy of justice but also of enlightened self-interest."

तात्पर्य, तरवारीच्या जोरावर राज्य करण्याबाबतच्या अविचारमूलक कल्पनेचा कांहीं युरोपीयन लोकाच्या मनावर जो पगडा बसला होता तो सर ऑकलॅड कॉलव्हिन याच्या तडजोडीनें कमी होताच त्यांचीं मनें शात झालीं व मग नित्याप्रमाणें स्वस्थपणें राज्यकारभार चालू झाला.

पण जनतेचीं मनें अत्यत अस्वस्थ करून टाकणाऱ्या असल्या चळवळीच्या दिवसांत शात मनानें सर्व गोष्टीचा विचार करून इल्बर्ट बिलाविषयीं आपलें मत लोकानीं जर कोठे सरकारास कळविलें असेल तर ते मुबईतच होय, व त्यामुळेंच सर एवलेन बेअरिंग—नतरचे लॉर्ड क्रोमर—यानीं मुबईला "Centre of political sobriety" "राजकीय दृष्टीनें परिपक्व विचाराचें केंद्र" अशी अन्वर्थक संज्ञा दिली होती! आणि त्याबद्दलचें सर्व श्रेय या वेळचे मुबईचे जे तीन मुख्य पुढारी—Triumvirate (त्रिमूर्ति) तेलग, मेथा व तय्यबजी यासच दिलें पाहिजे

सदहू इल्बर्ट बिलासबधीं सरकारी धोरणाला पाठिबा देण्याकरिता मुबईच्या नागरिकाची ता २८-४-८३ रोजी टाउन हॉलमध्ये सभा भरविण्यात आली होती. अध्यक्षस्थानीं सर जमशेटजी जीजीभाई हे होते. जमलेल्या सभेपुढे काशीनाथपत तेलग यानी पुढील ठराव माडला —

"That the Committee of the Bombay Branch of the East India Association be also requested to take steps to have the Memorial, with the necessary alterations, forwarded to the Honourable the House of Commons in England."

या ठरावावर तेलगानीं जें भाषण केलें त्याच्या सुरवातीलाच त्यानी एका गोष्टीविषयीं खुलासा केला त्यावरून तेलगांचे ठिकाणीं असलेली उदार भावना व आपल्या देशबाधवाविषयींचा खरा अभिमान हे गुण चागलेच व्यक्त होतात. त्या वेळीं युरोपीयन लोकानीं बगाली लोकाविषयीं वाटेल ते लिहावें किंवा बोलावें व वाटेल ती हूल उठवावी असा प्रकार चालला होता. त्यातच एक "बगाली लोक हे इंग्लिश लोकाविषयीं मनांत नेहमी वैरभाव बाळगीत असून ते त्याचा द्वेष करीत असतात" अशी एक कडी उठविण्यात आली होती. पण ती अगदी निराधार होती असें तेलगानी आपल्या प्रत्यक्ष अनुभवावरून सागितलें. तेलग हे लॉर्ड

रिपन यानीं नेमलेल्या एजुकेशन कमिशनचे एक सभासद होते हें प्रसिद्धच आहे. थोड्याच दिवसापूर्वी कमिशनच्या कामासबधाने त्याचें कलकत्ता येथे काही महिने-पर्यंत रहाणें झाले होते त्या मुदतींत त्याना बगालमधील अनेक पुढाऱ्याशीं व सार्वजनिक कामात पडणाऱ्या लोकाशीं अत्यत निकट सबध येऊन सभाषणप्रसग आलेले होते. इतकेच नव्हे तर त्याचे एकदर विचार, वर्तन व कल्पना याविष-यींची सर्व अतस्थ माहिती तेलगाना सहज झालेली होती. पण त्यात इग्लिश लोकाविषयींच्या द्वेषासबधाने नुसता लेशही आपणास आढळून आला नाहीं असें त्यानी स्पष्ट रीतीने सागितले, आणि बगाल प्रातात आपण असलेल्या मुदतींत तिकडील लोकानीं आपणास अत्यत प्रेमळपणानें वागविले असल्यामुळें त्याच्या-संबधाची खरी वस्तुस्थिति काय आहे हे जाहीर रीतीने कळविणें आपलें कर्तव्य आहे, असेही तेलगानी म्हटलें आहे.

सदरील बिलासबधाने सर फिट्झ जेम्स स्टीफन या गृहस्थानी लडनच्या टाइम्समध्यें एक पत्र लिहून त्यात बरीच टीका करून हिंदुस्थानसरकारला दोष दिला होता. तेलगानीं आपल्या भाषणात सदहू स्टीफन साहेबाच्या पत्रातील मुद्याचाच मुख्यतः विचार केला असून, त्या साहेबाची सर्वच विचारसरणी कशी दूषणीय व इग्लडच्या इभ्रतीस न शोभणारी अशी होती हें उत्तम रीतीने दाखविलें आहे

सर फिट्झ जेम्स स्टीफन—(Sir Fitz James Stephen)—हे हिंदु-स्थानात एक बडे कामगार होऊन गेले असून त्यानी कायदा व राजकीय विषय यावर तत्वविवेचनात्मक काहीं ग्रथ लिहिलेले होते अर्थात् त्याचा एरव्हीं देखील अधिकार फार मोठा होता आपण त्यास नमून वागतो असे तेलगानीं प्रथमच सागितलें. परंतु प्रस्तुत—इल्बर्ट बिलाच्या—प्रकरणी ( तेलगाच्या मतें ) आपण ( युरोपीयन लोकाप्रमाणें ) बिलाच्या विरुद्ध पक्षात असतो तरी देखील स्टीफन साहेबाची तरफदारी आपणास कबूल झाली नसती असें ते म्हणाले. त्या साहेबानी कांहीं वर्षापूर्वी "स्वातत्र्य, समता व बधुभाव" ( Liberty, Equality and Fraternity ) या नावाचें एक पुस्तक लिहिलें होतें. त्याचा चार शब्दात मथितार्थ सागावयाचा म्हणजे त्यांत त्यानीं इकडे जवळ जवळ दडुकेशाही चालविण्याविषयीं आपल्या जातभाईंना उपदेश केला होता. म्हणजे हिंदुस्थानचा राज्यकारभार चालविण्याकरितां ज्या उदार तत्वाचा महाराणी सरकारच्या ( सन

१८५८ सालांतल्या ) जाहीरनाम्यांत उल्लेख केलेला आहे व जी अभिवचनें त्यात दिली गेलीं आहेत, त्याच्याविरुद्ध किंबहुना ती उदार तत्वें व वचनें एका बाजूस गुडाळून ठेवण्याबद्दल त्या पुस्तकात उपदेश होता ! अशा प्रकारची साहेबमजकूर याची एकदरीत विचारसरणी असल्यामुळें, त्यानी हिंदुस्थान सरकारच्या कोणत्याही कृतीला—जिच्या मूळाशी सदरील जाहीरनाम्यातील उदार तत्वाचा आधार घेत-लेला असेल अशा—पाठिंबा दिला तरीदेखील त्यापासून काहीं तरी पुढे अड-चणच—embarrassment—उत्पन्न होण्याचा जास्त सभव होता ! असो.

आता स्टीफनसाहेबाच्या पत्रातील काहीं मुख्य मुद्याचा विचार करू त्याचा पहिला व महत्वाचा मुद्दा हा होता कीं लॉर्ड रिपनसाहेबाच्या कारकीर्दीचें एकदर राजकीय धोरण—policy—हे या देशातील इग्लिश राजसत्तेचा पायाच कम-कुवत करीत होते म्हणजे ज्या तत्वाच्या पायावर इकडील ब्रिटिश सत्ता त्या वेळपर्यंत उभी राहिली होती त्याच्याशी ते धोरण अगदी विसगत होते ! तेलग म्हणाले कीं, हें स्टीफन ह्याचे म्हणणें आपणास अगदी कबूल नाहीं. रिपनसाहेबाच्या कृतीचें स्वरूप अर्जात—इकडून पार्लमेंटकडे जात असलेल्या अर्जांत—वर्णिलेलेंच होते. त्याचा अर्थ इतकाच की हिदुस्थानच्या राज्यपद्ध-तीचीं जीं अत्यत उदार तत्वे पार्लमेंट व ब्रिटिश मुत्सद्दी लोक यानीं घालून दिलीं होती व ज्याची इतकीं वर्षे अमलबजावणी होत आली होती, त्याच उदार तत्वाला अनुसरून रिपनसाहेबाचें राजकीय धोरण होतें इतकेच नव्हे तर त्या वेळपर्यंतचा इतिहास जें सागत होता त्यालाही अनुसरून ते धोरण होतें. तेलग म्हणाले कीं, काहीं थोड्या दिवसापूर्वी आपण रोमन साम्राज्याचा इतिहास वाचीत होतो. त्यात त्या इतिहासकर्त्यानें असे स्पष्ट सागितले होतें कीं, रोमन लोकाच्या इतिहासापासून जर कोणती महत्वाची गोष्ट शिकावयाची असेल, तर ती हीच कीं जेत्या राष्ट्रानीं जित राष्ट्रात आपली सत्ता कायमची बसवावयाची असेल, तर आपले काही विशिष्ट प्रकारचे हक्क सोडलेच पाहिजेत व ते जित लोकास दिले पाहिजेत साप्रत इग्लिश लोक आपणास या काळातले "रोमन लोक" म्हणवीत असतात व आपले साम्राज्य हे या काळातले "रोमन साम्राज्य" च आहे असें म्हणत असतात. मग त्यानीही प्राचीन रोमन लोकाप्रमाणें आपले काहीं हक्क सोडण्यास तयार व्हावें असे आम्ही म्हटल्यास त्यात वावगे तें काय ? ज्या देशातील थोर पुरुषाची नामावलि क्लार्कसन—विल्बरफोर्स—ग्लॅडस्टन—ब्राइट अशा प्रसिद्ध लोकानीं अलकृत केली आहे, त्या देशातील

लोकानीं मेरियस, सिल्ला किंवा ट्रायमवीर्स, सीझर यांच्या देशबधूप्रमाणेंच वागावें किंबहुना त्याच्याही पेक्षा चार पावलें पुढें जावे असें आम्ही म्हटल्यास त्यांत अयोग्य तें काय ? प्रस्तुत इग्लिश लोकानीं, सधि आली असूनही रोमन लोकाचे अनुकरण न केल्यास, ते भावी इतिहासकाराच्या मतें इग्लडाला कमीपणाचे होईल; आणि असें खरोखरीच घडून आल्यास ब्रिटिश सरकारचा एक राजनिष्ठ प्रजाजन या नात्याने मला अत्यत खेद होईल, असें तेलगानीं म्हटले तेलगाच्या भाषणातील हा भाग अति सुदर वाटत असल्यामुळें तो जशाचा तसा येथे देणें इष्ट वाटते. तो असा —

"I remember being struck many years ago, in reading the History of the Romans under the Empire, with a passage in which the author said that one great lesson to be deduced from the History of Rome was that all conquering nations, in order to render their Government in the conquered countries stable and permanent, must divest themselves of their peculiar privileges by sharing them with the conquered peoples. Now, gentlemen, we all know that it is the proud and just boast of the English men that they are the Romans of the Modern World, and that the British Empire is in modern days what the Roman Empire was in ancient times. If so, are we wrong, are we unreasonable in asking that the lessons of Roman History and × × × the lessons of the history of other ancient Governments also, should be adopted by our British Rulers ? Is it not quite proper and reasonable for us to ask that the countrymen of Clarkson and Wilberforce, of Gladstone and John Bright—should not only adopt those lessons but improve upon them and rise superior to the countrymen of Marius and Sylla, the Triumvirs

and Cæsar ? I venture to say, gentlemen, that if Britons are now content to fail to carry out those lessons, and to fall short of the generosity of the Romans it will be regarded as not creditable to them by the future historian. And as a loyal subject of the British Government I should be sorry for such a result "

स्टीफन साहेबाच्या पत्रातील दुसरा मुद्दा वरीलपेक्षाही अधिक नमुनेदार होता. ते म्हणाले की, इल्बर्ट बिलानें युरोपियन लोकाचे काही विशेष हक्क काढून घ्या असे म्हणणें फार सोपे आहे ! पण हिंदु लोकाचे काही विशेष हक्क कायद्यानेंच राखले जात नव्हते काय ? मुसलमान लोकाचे नव्हते काय ? हिदु लॉ व महोमेडन लॉ हे काय आहेत ? हिंदु-मुसलमान याजमधील मिळकतीसबधाचे, विभागणीसबधाचे व वारसाहक्कासबधाचे निरनिराळे कायदे नाहीत काय ? तेलग म्हणाले की, असले भलत्याच प्रकारचे साम्य दाखविणें समजसपणाचे कसे म्हणता येईल ? हे व्यक्तिविषयक किंवा जातिविषयक खासगी स्वरूपाचे हक्क होत. एकाद्या रामाची अगर मचरजीची किंवा अहमदची मिळकत त्याच्या पश्चात् मुलास, बायकोस अगर आईस मिळाली तर त्याचे जॉनला किंवा जोन्सला सुखदु ख कसलें ? पण फौजदारी कायद्याची गोष्ट निराळी तो सर्व जातीच्या व धर्माच्या लोकास सारखाच लागू व्हावयाचा असतो. त्यामुळे भलत्याच ठिकाणी भलत्याच प्रकारची तुलना करणे अगर साम्य दाखविणे बरोबर नाही. ते असो पण तेलग म्हणाले कीं, स्टीफनसाहेबानी आपल्या पत्रात दुसऱ्या एका गोष्टीचा उल्लेख केला नाही याबद्दल आश्चर्य वाटते त्यानी मागे सागितलेल्या आपल्या पुस्तकात स्पष्ट म्हटले होतें कीं, ब्रिटिश सरकार हे एतद्देशीय लोकाच्या काही काही धर्मसमजुतीत हात घालून त्याना हल्लीच्या परिस्थितीप्रमाणे इष्ट असे वळण लावण्याचा प्रयत्न करीत असते म्हणजे खुद्द सरकारच देशात एक प्रकारची क्रांति घडवून आणीत आहे. याप्रमाणे सरकार जर हिंदु लोकासारख्या अशिक्षित व मागासलेल्या वर्गाच्या विशिष्ट प्रकारच्या बाबतीत हात घालण्यास मागेपुढे पाहात नाही तर त्याने इग्लिश लोकासारख्या चागल्या सुधारलेल्या व पुढे गेलेल्या देशातील लोकाचे काहीं हक्क काढून घ्यावे असे म्हटले तर त्यात वाईट ते काय ? युरोपीयन व हिंदी यास एकाच मापाने मोजा असे म्हटले तर त्यात वावगे ते काय ?

स्टीफन हे म्हणतात कीं, तुर्कस्थानात व इतर काही देशात युरोपियन लोका-करिता निराळीं कोर्टें आहेत तेलग म्हणाले कीं ही गोष्ट खरी आहे; पण त्यातील महत्वाचा फरक सागितला पाहिजे तुर्कस्थानात तिकडील तुर्क लोकाच्या न्याय-कोर्टापासून युरोपीयन लोकाचें सरक्षण करावयाचें होते व म्हणून तिकडे निराळ्या कोटाची स्थापना करण्यात आली होती इकडे मुळीं सर्वच कोर्टें इग्लिश सरकारनें स्थापिली होती मग त्यापैकीं एका कोर्टापासून युरोपीयन लोकाचे सरक्षण करा व त्याची चौकशी दुसऱ्या कोर्टाकडून करवा हें म्हणणें समजसपणाचे कसे म्हणता येईल ? भलल्या ठिकाणी भलतेच साम्य घेऊन कसें चालेल ?

स्टीफन साहेब म्हणतात कीं, एकाद्यानें गुन्हा केला तर आपली चौकशी आपल्या जातवाल्याकडून व्हावी असें त्याला वाटणें साहजिक आहे तेलग म्हणाले कीं, गोष्ट खरी आहे पण तशी इच्छा एकाद्या एतद्देशीय आरोपीला देखील होईल मग त्याचीही इच्छा पूर्ण करणें न्याय्य नव्हे काय ? परतु युरोपीयनातर्फे स्टीफन साहेबानीं सुचविलेला उपाय मात्र मोठा मासलेवाइक होता ! त्याचे म्हणणें असे कीं, खटला इग्लिशमध्ये चालविण्याइतके इकडील मनुष्याचे इग्लिश भाषेचे शिक्षण झालेले नसते व देशी भाषा युरोपीयन लोकास शिकविण्याचे नेहमी **प्रयत्न** चाललेले असतात ! तेलग म्हणतात कीं, वरीलपैकी पहिल्या विधानात वस्तु-स्थितीचा विपर्यास झाला आहे व दुसरें विधान तर केवळ हास्यास्पद आहे ! हिंदी मनुष्याच्या इग्लिश ज्ञानासबधानें तेलग—आपल्यावर धाष्टर्याचा येणारा आरोप पतकरूनही—म्हणाले कीं, देशी भाषेंत खटला चालविणारा जर एक युरोपीयन मिळाला तर इग्लिशमध्यें खटला चालविणारे हिंदी निदान शभर तरी खास मिळतील अर्थात् स्टीफनसाहेबाचें पहिलें विधान खरें नाहीं दुसऱ्या विधानासबधानें तेलगानीं एका सिव्हिलियन मनुष्याचाच दाखला दिला. काही वर्षांपूर्वी बगालमधील एका युरोपीयन सिव्हिलियन मनुष्यानें " Life in the Mofussil " या नावाचें एक पुस्तक लिहून प्रसिद्ध केलें होते. त्यात त्यानें प्राजलपणें कबूल केलें होतें कीं, आपण जरी बगाली भाषेंत परीक्षा पास झालों असलों तरी आता आपणास ती भाषा मुळींच समजत नाही ! यापेक्षा याविषयीं अधिक काय लिहावयाचें ? असो. तेलगानीं येथपर्यंत स्टीफनसाहेबाच्या कोटि-क्रमातील दोषाविष्करण केलें

तदनतर त्यानीं आणखी एका गोष्टीचा उल्लेख केला. इल्बर्ट बिलासबधानें वादविवाद चालू असतांना कोणी एकानें " मराठा " या सहीनें " टाइम्स आफ

इडिया " मध्यें एक पत्र लिहिलें होतें पण पत्रातील अत प्रमाणावरून पाहता हा लेखक जातीनें मराठा नसून युरोपीयन होता हें स्पष्टच दिसत होते पण तें असो त्या पत्रातील कोटिक्रमाचा आपणास विचार करणें प्राप्त आहे, असें तेलग म्हणाले त्या पत्रलेखकाचे म्हणणें असें होतें कीं, हिंदी लोक हे मुळीं युरोपीयन लोकाचे योग्य व न्यायी असे जज्जच होऊ शकत नाहींत! कारण आमचे वर्तमानकर्ते हे नेहमीं लिहीत असत कीं, युरोपीयन लोक हे नेटिवाना मुद्दाम निष्काळजीपणानें ठार मारीत असतात व त्याची प्लीहा वाढलेली होती अशी खोटीच सबब पुढें आणीत असतात पण असल्या लिहिण्याचा निषेध कोणीही सुशिक्षिताने आज पावे तोंपर्यंत केलेला नव्हता! तेलगानी यावर म्हटलें कीं प्लीहावृद्धीची सबब ही नेहमीच खोटी नसेल, काही बाबतींत ती खरीही असेल; व काही वर्तमानपत्रकर्त्ते अतिशयोक्तीनें लिहीतही असतील. परतु तेवढयावरून " मराठा "च्या पत्रातील तर्कपद्धत बिनचूक ठरत नव्हती. त्या तर्कपद्धतीसबधानें विशेष काही न सागता तेलग म्हणाले की, आपण त्याच्या उलट एक उदाहरण देतो काही युरोपीयन लोक नेहमीं म्हणत असत व उघड उघड म्हणत असतात की, हिंदी लोक हे खोटी साक्ष देण्यात तरबेज आहेत. परतु त्याच्या म्हणण्याचा निषेध दुसऱ्या युरोपीयन लोकानीं कधींच केला नाहीं म्हणजे " मराठा " च्या तर्कशास्त्राप्रमाणें युरोपीयन लोक हे नेटिवाचे न्यायी व लायक असे जज्ज होऊ शकत नव्हते! पण मग ही भानगड कशी मिटवावयाची? या उदाहरणात सागितल्याप्रमाणें युरोपीयन हे हिंदी लोकाचे जज्ज होऊ शकत नव्हते व " मराठा " नें म्हटल्याप्रमाणें हिंदी लोक हे युरोपीयनाचे जज्ज होऊ शकत नव्हते. मग न्यायकोर्टें चालावयाची कशीं? आणि न्यायदान होणार कसे?

याप्रमाणें भाषण करून तेलग शेवटी म्हणाले कीं, आपली बाजू बळकट आहे. हा अर्ज पार्लमेंटपुढे जाऊ द्या. तिकडे योग्य तोच न्याय होईल.

तेलगाची सगळीच भाषणें चागलीं असत, पण त्यापैकीं वरील भाषण हें एक उत्तमातलें उत्तम होतें असे सर्वतोमुखीं ऐकू येते. त्यापैकी येथे फक्त दोनच दाखले देतो

"टाइम्स ऑफ इडिया" म्हणतो —" One thing is certain that Mr Telang had risen to the occasion and that the rare eloquence he displayed, the orderly arrange-

ment of arguments, the lucid marshalling of facts, and the correctness of diction proved beyond doubt that Mr. Telang was one of the best orators in India."

सर दिनशा वाच्छा म्हणतात —" Mr. Telang's speech * * * will at once inform the reader as to the ability, tact and judgment displayed therein. I am quite sure that if all his other writings are forgotten, that particular utterance in the Town Hall will stand the test of time and bear impartial witness to the political sagacity and sobriety of thought of the speaker."

यापेक्षा तेलंगाच्या वरील भाषणासंबधानें दुसरीं सर्टिफिकिटें तीं काय द्यावयाचीं ?

---

प्रकरण पस्तिसावें.

## लॉर्ड रिपन यांचें प्रयाण.



वाईट माणसास वाईट म्हणणें व चांगल्यास चांगलें म्हणणें हें सरळच आहे. परंतु मोठ्या माणसाचा संबंध आला म्हणजे त्याच्यासंबधानें सुजाण व जबाबदार मनुष्याला आपलें वर्तन किंवा बोलणें हें मुद्देसूद, साधार व कोणासही सहज पटण्यासारखें असें ठेवावें लागतें. या दृष्टीनें विचार केला म्हणजे काशीनाथपंत तेलंग यांच्या सार्वजनिक कामांतील बहुतेक सर्व कृति बिनचूक दूरदर्शीपणाच्या व देशाच्या दृष्टीनें अत्यंत हितकर अशा असत. सर रेमंड वेस्ट यांनी तर म्हटलें आहे की,

"Telang showed remarkable sagacity and judgment in taking up his positions."

जे तेलंग लॉर्ड लिटनसारख्या अनुदार व जुलमी वृत्तीच्या अधिकाऱ्याच्या काहीं कृतींवर निर्भीडपणें कोरडे ओढण्यास मागें सरले नाहींत ते लॉर्ड रिपनसारखे उदारश्री व्हाइसरॉय आपली कारकीर्द संपताच विलायतेस परत जाण्यास निघाले

तेव्हां मुबई शहरात त्यांच्या सन्मानार्थ सर्वत्र उत्सव करून त्याना प्रेमाचा निरोप देण्याकरिता जी जगी चळवळ झाली त्यात सामील झाले यात आश्चर्य वाटण्यासारखें काहीं नाहीं दुसरें एक लहानसें अशाच प्रकारचें उदाहरण आहे सर रिचर्ड टेपल मुबईचे गव्हर्नर असताना तेलंगानीं जर यांच्या अनेक जुलमी कृतींवर कडक टीका केली, तर त्यांनीं लॉर्ड रे याजसारख्या उदारधी गव्हर्नर साहेबाच्या कृतीचे समर्थन करण्यासही कमी केलें नाहीं. क्रॉफर्ड प्रकरणात इकडच्या व विलायतेतल्या इग्लिश पत्रानी लॉर्ड रे याजवर इतकी कडक टीका चालविली होती कीं, दुसरा एकादा गव्हर्नर असता तर तो घाबरूनच गेला असता पण लॉर्ड रे पडले खबीर हृदयाचे ! त्यानीं तो स्वजनाकडून होत असलेला सर्व छळ सोसला पण हातातलें काम तडीस लाविल्याशिवाय सोडलें नाही ! तशा ऐन आणीबाणीच्या वेळीं तेलगानी "लडन टाइम्स" मध्ये आपल्या सहीचे पत्र लिहून लॉर्ड रे याच्या कृतीचे समर्थन केलें होते. असो रिपन साहेबाचा घरी परत जाण्याचा बेत जाहीर झाल्यावर त्याचा जो सिमल्याहून कलकत्यापर्यंतचा—कलकत्ता हे त्या वेळीं राजधानीचे शहर होते—प्रवास झाला तो लोकप्रियतेच्या दृष्टीनें एकाद्या दिग्विजय करून परत फिरणाऱ्या राजाच्या सचाराच्या तोडीचा होता तिकडून मग ते साहेब मुबईस यावयास निघाले तेव्हा वाटेत ठिकठिकाणीं त्याच्या सन्मानार्थ मानपत्रे, कृतज्ञतादर्शक सभा इत्यादिकाची गर्दी उडाली होती रिपन साहेबाची कारकीर्द लौकिक दृष्टीने अत्यत यशस्वी झाल्यामुळें जनतेने त्याबद्दल आपली हरएक मार्गानें कृतज्ञता प्रकट करावी यात नवल नाहीं. तेलगाना अशा योग्य माणसाचा सन्मान करण्याच्या कामीं इतका उत्साह वाटत असे कीं, दुसऱ्या कोणीही तरुण मडळींनीं त्याच कार्याकरिता उपक्रम आरभिलेला त्याना समजल्यास ते ( तेलग ) त्याचे कौतुक करीत व त्याना आनदानें मदत करीत असत लॉर्ड रिपन हे मुबईस आल्यावर तेथील निरनिराळ्या सस्थानीं सभा भरवून, मानपत्रे देऊन त्याचा सन्मान केला ते ठीकच झाले पण एल्फिन्स्टन कॉलेजचे त्या वेळचे प्रिन्सिपॉल वर्डस्वर्थ याच्या पुरस्कर्तृत्वामुळें मुबई युनिव्हर्सिटीनें लॉर्ड रिपन याना एल्‌ एल्‌ डी ची पदवी देण्याचा ठराव केल्याकारणानें त्या उत्सवात आपणही आपल्या सामर्थ्याप्रमाणे भाग घ्यावा असें त्या कॉलेजातील तरुण विद्यार्थ्यांना वाटणें साहजिक होतें त्या वेळी एल्फिन्स्टन कॉलेजांतील विद्यार्थ्यांचे, हल्लींचे रावबहादुर दामोदर गणेश पाध्ये, प्रोफेसर, ह प्रा. कॉलेज, नाशिक, हे एक पुढारी होते. त्यानीं इतर मित्राच्या सहाय्याने काहीं रक्कम

जमविली व सदरील यूनिव्हर्सिटीच्या पदवीदानसमारंभाचे दिवशीं होणाऱ्या उत्सवप्रदर्शनांत—demonstration मध्यें—तरुण मंडळीला शोभेल अशा विशिष्ट प्रकारें भाग घेण्याचे ठरविलें. पण त्या कामीं त्यांना आपणास मुबई शहरातील एकाद्या प्रमुख पुढारी गृहस्थाचा सल्ला घ्यावा हें योग्य वाटल्या-वरून रा. पाध्ये यानी आपले दुसरे दोन मित्र मिस्टर पादशाहा ( पारशी ) व व मिस्टर टन्ना ( गुजराथी हिंदु ) याना बरोबर घेऊन नामदार काशीनाथपत तेलग याची गाठ घेतली व त्याना आपला मनोदय कळविला. तेलगाना ती सर्व हकीकत ऐकून फार आनद झाला व त्यानीं त्या तरुण मडळीला योग्य असे द्रव्य-सहाय्य करून "make the demonstration effective" असें म्हणून त्याना अधिक प्रोत्साहन दिलें. इतकेंच नव्हे तर विद्यार्थ्यांनीं काय काय कामे करावयाचीं हेंदेखील तेलगाच्याच घरीं ठरविण्यात आलें, व ठरलेल्या दिवशी परळपासून ( एल्फिन्स्टन कॉलेज त्या वेळीं भायखळयावर मध्यतरीं व्हि जु. टेक्निकल इन्स्टिटयूट असलेल्या इमारतीत होते हें सर्वविश्रुत आहे ) विद्यार्थ्यांनीं दिवसा बावटे पताकासह मशाली घेऊन जी मिरवणूक—torch-light procession—काढली ती मुबई शहरातील अगदी मध्यवस्तींतून सुमारें दोन तीन मैल चालत येऊन पदवीदानसमारभाचे वेळीं थेट युनिव्हर्सिटीच्या हॉलपुढे येऊन थडकली! हा सर्व प्रकार पाहून सर्वांनाच त्या विद्यार्थ्यांच्या उत्साहपूर्ण वर्त-णुकीबद्दल कौतुक वाटलें हें सागावयास नकोच पण सार्वजनिक कामात योग्य प्रसगीं तेलग हे लहान मोठ्या मनुष्याना कसे अत करणानें प्रोत्साहनपूर्वक मदत करीत असत, याचें एक लहानसें उदाहरण या दृष्टीनें खुद्द रा. ब. पाध्ये याजकडून समजलेल्या या हकीकतीचे आम्हास विशेष महत्व वाटलें, म्हणूनच ती इकडे थोड-क्यात दिली आहे

लॉर्ड रिपन साहेबाच्या सन्मानार्थ मुबईतील शहरवासीय लोकाची ता. २९ नोवेंबर १८८४ रोजीं शेरीफकडून टाऊन हॉलमध्यें एक मोठी जाहीर सभा भर-विण्यात आली होती अध्यक्षस्थानीं सर जेमशेटजी जीजीभाई हे होते. त्यांत अठरा मुख्य वक्त्याचीं भाषणें झालीं त्यात दादाभाई नवरोजी, रा सा मडलीक, बद्रुद्दीन तय्यबजी, तेलग, फेरोजशहा मेथा ही मडळी अर्थात् होतीच. त्या वेळी तेलगानीं केलेलें भाषण नेहमींप्रमाणें चांगलेंच होतें. त्यातील साराश पुढे दिला आहे.

प्रथम लॉर्ड रिपन यानी आपल्या कारकीर्दीत हिंदी लोकाच्या हितैकदृष्टीनें देशाचा राज्यकारभार चालविल्याबद्दल मुबईच्या शहरवासी लोकाच्यातर्फे त्याचे अत करणपूर्वक आभार मानण्याबाबतचा ठराव रा. सा. मडलीक यानी सभेपुढे माडला त्याला काशीनाथपत तेलग यानी अनुमोदन दिलें. त्यानीं सुरवातीसच सागितलें की, आजच्या सारख्या सभेत भाग घेण्यास आपणास केवळ आनद वाटत आहे इतकेच नसून त्यात आपल्याला एक प्रकारचा मान मिळाला असेही वाटत आहे त्यानी सागितलें कीं, आधल्याच दिवशीं आपणास आपल्या दोन मित्रानीं विचारलें होते कीं, तुम्ही रिपन साहेबाच्या सन्मानार्थ चाललेल्या चळवळींत भाग घेणार की काय ? व तसा भाग घेणार असल्यास त्याबद्दलचीं तुमचीं कारणें काय आहेत ? पहिल्या प्रश्नाचे तेलगानी लागलेच असें उत्तर दिलें कीं, प्रस्तुतच्या चळवळींत आपण सामील झालों आहों इतकेच नाहीं तर त्यात आपण अत करणपूर्वक—heart and soul—भाग घेत आहो तेलग म्हणाले कीं, दुसऱ्या प्रश्नाचे उत्तर आपण त्या सभेतच देतों ते म्हणाले की, एकाद्या गृहस्थाची इकडील लोकावर राज्यकारभार चालविण्याकरिता मुख्य जागेवर नेमणूक झाली असता त्यानीं आपल्या राज्यपद्धतीनें त्या लोकाच्या कृतज्ञतेस आपणास पात्र करून घेतलें कीं नाहीं हें ठरविण्याच्या दोन कसोटी आहेत ज्या लोकावर त्या गृहस्थानें आपली सत्ता चालविली असेल त्या लोकास त्यासबधानें काय वाटते हें पाहणें ही एक कसोटी व त्या गृहस्थाच्या एकदर राज्यकारभाराचें किंवा निरनिराळया कृत्याचें गुणदोषविवेचनात्मक पृथक्करण करून अखेर लोकहिताच्या दृष्टीने देशाच्या पदरात काय पडलें, हें पाहणें ही दुसरी कसोटी तेलग म्हणाले की, या दोन्ही कसोटी लावून पाहिल्यास लॉर्ड रिपन याची कारकीर्द ही सर्वोत्कृष्ट ठरते रिपन साहेबाच्या लोकप्रियतेसबधाने तर प्रश्नच नाही गेल्या सुमारें पधरा वीस दिवसात त्यानीं जो सिमल्याहून कलकत्त्यापर्यंत प्रवास केला त्या वेळीं लोकानीं ठिकठिकाणी सभा, मानपत्रें वगैरेंच्या रूपानीं त्याचा जो सन्मान केला त्यावरून व देशातील इतर भागात देखील त्याच्या सन्मानार्थ अनेक चळवळी चालल्याच्या ज्या बातम्या येत आहेत, त्यावरून त्याची लोकप्रियता व त्याच्याविषयीं लोकास वाटत असलेला आदर हीं चागलींच व्यक्त होतात. त्यात आणखी एक गोष्ट सागण्यासारखी आहे. आमच्यामध्यें काही मडळी अशी आहे की त्याना आमचे टीकाकार ( Critics ) सरकारचे—मग त्या सरकारच्या मुख्य जागेवरील अधिकारी कॉन्सर्व्हेटिव्ह असो किंवा लिबरल असो—कायमचे प्रतिपक्षी ( opposition ) म्हणत असतात. पण ते एरव्हीं सरकारचे

प्रतिपक्षी म्हणून गणले जाणारे लोकदेखील प्रस्तुत रिपन साहेबांच्या सन्मानार्थ चाललेल्या चळवळीत सामील होत आहेत ! ही गोष्ट परकीय मुख्य अधिकाऱ्याच्या बाबतीत काही लहानसहान नव्हे

पण कित्येक म्हणतील की, लोकप्रिय होणें ही माणसाची काहीं खरी पारख नव्हे गोष्ट खरी आहे परतु त्यांतही पुन्हा दुसरा एक विचार आहे विलायतेंतील उत्तम न्यायाधीश म्हणून प्रसिद्ध असलेले सर जॉन कॉलेरिज ( Sir John Coleridge ) यानीं दोन प्रकारची लोकप्रियता असते असें म्हटले आहे. केवळ लोकानी आपणास बरें म्हणावे म्हणून झटून सपादन केलेली एक लोकप्रियता व एकाद्याने आपलें काम चोख केल्यामुळें त्याला आपण होऊन प्रयत्नाशिवाय प्राप्त झालेली ही दुसरी लोकप्रियता यात पहिली कनिष्ठ प्रकारची असून दुसरी उच्च दर्जाची लोकप्रियता हें उघडच आहे पहिलीत मनुष्याच्या अगच्या खऱ्या गुणाची पारख होत नसून दुसरीत त्या गुणाची तावून सुलाखून परीक्षा झालेली असते ! किंबहुना या दोन्हीमधील फरक हा भवभूतीने दुसऱ्या एका जोडीतील वर्णन केलेल्या फरकाप्रमाणेंच आहे असे म्हटल्यासही अतिशयोक्ति होणार नाहीं. भवभूतीचे वचन येणेंप्रमाणे —

लौकिकानां हि साधूनामर्थं वागनुवर्तते ।
ऋषीणां पुनराद्याना वाचमर्थोऽनुधावति ॥

असो, लॉर्ड रिपन याना प्राप्त झालेली लोकप्रियता ही दुसऱ्या प्रकारची होती ती कशी हें त्याच्या कारकीर्दीतील काही सरकारी कृत्याचा निर्देश केल्यास सहज स्पष्ट दिसून येईल मबब त्याच्या कारकीर्दीला आता वर सांगितलेल्या दोन कसोटींपैकीं दुसरी कसोटी लावून पाहू लॉर्ड रिपन यानी चार वर्षांत केलेल्या सर्व कृतीचा अगर अनुसरलेल्या धोरणाचा आज विचार करता येणें शक्य नाहीं त्यामुळे फक्त जमाबदीशीं (Fiscal administration) ज्याचा प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष सबध आला आहे अशाच काहीं थोड्या गोष्टींचा आजच्या प्रसगी विचार करू, म्हणजे "शितावरून भाताची परीक्षा" या न्यायानें रिपन साहेबाच्या सर्वच कारकीर्दीसबधानें लोकास कल्पना येईल यात पहिली गोष्ट सागितली पाहिजे ती ही कीं, लॉर्ड रिपन साहेबांच्या कारकीर्दीत इकडील देशी धद्याना उत्तेजन देण्याबाबतचे सरकारी धोरण निश्चित करण्यात आलें. दुसरें, जमिनीची नवीन पाहणी ( सर्व्हे ) करून योग्य प्रमाणात जमीनधाऱ्याची आकारणी करण्याबद्दलचे सरकारी हुकूम

सुटले होते तेलगांनीं म्हटलें की ह्या हुकुमांची योग्य अमलबजावणी झाल्यास रयतेला जो वरचेवर धारावाढीचा त्रास सोसावा लागतो तो बद होईल आजपर्यंत रयतेशीं या बाबतीत सरकारची शाब्दिक सहानुभूति असे तिला कृतीचें स्वरूप देण्याची योजना रिपन साहेबाच्या कारकीर्दीत झाली तिसरी गोष्ट, गोरगरीबाच्या नेहमीं उपयोगी पडणाऱ्या जिनसावरील—मीठावरील—कर कमी (अडीचाचे दोन रुपये) करण्यात आला यायोगानें ज्या गरीब लोकाना स्वत चे सामर्थ्य असे फार अल्प असते व ज्याना ओरड करून आपली दु खे वेशीवर टागण्याची कला माहीत नसते अशाना खरी खुरी मदत झाली हे धोरण म्हणजे त्याच्याही काही दिवसापूर्वी "सवड मिळेल तेथें कर वाढवीत सुटावयाचे" (carrying taxation along the line of least resistance) हे जें धोरण कित्येक बऱ्या (लॉर्ड लिटन) अमलदाराचे प्यार होऊन बसलें होते त्याच्या अगदी उलट होते येथे तेलगानी दुसऱ्या एका गोष्टीचा उल्लेख केला त्यासबधाने लॉर्ड रिपनवर कित्येक मडळी टीका करीत असत पण न्यायदृष्टीनें त्यात रिपन साहेबाचा काहींच दोष नव्हता त्या साहेबाच्या कारकीर्दीत मॅचेस्टरच्या कापडावरील जकात उठविण्यात आली व लिटनसाहेबाच्या वेळी जसा अशाच कृतीचा निषेध करण्यात आला तसा रिपन साहेबाच्या वेळीं करण्यात आला नाहीं, या गोष्टी खऱ्या होत्या पण त्याला तशी कारणें होतीं त्याचा विचार केला असता सदरील प्रकरणी रिपन साहेबाकडे मुळीच दोष नव्हता, हें सहज कोणाच्याही लक्षात आले असते लॉर्ड लिटनच्या वेळीं विलायती कापडावरील जकात उठविण्यात आली, ती केवळ त्या साहेबाच्या स्वयस्फूर्तीनें उठविण्यात आली रिपन साहेबाच्या वेळी त्याचेवर मागील अधिकाऱ्याचे वजन पडल्यामुळे ती जकात उठवावी लागली दुसरें असे कीं, लिटन साहेबांच्या वेळीं विलायतेत पार्लमेंटची निवडणूक जवळ आलेली असल्यामुळें तिकडील लोकास खुष करण्याच्या हेतूने त्यानी ही जकात उठविण्याचा घाट घातला होता रिपन साहेबाच्या वेळी निवडणुकीचा प्रश्नच नव्हता तिसरी व महत्वाची गोष्ट ही की, लिटन साहेबानी सदरील जकात तिकडे काहीं इग्लिश कारखानदाराना खुष करण्याकरिता उठवून त्यायोगाने इकडील तिजोरीत पडणारी तूट नवीन कर—लायसन्स टॅक्स—बसवून भरून काढली होती रिपन साहेबानीं असे मुळींच केलें नाहीं उलट लिटन साहेबाच्या वेळीं मिठावरील कर जो वाढविण्यांत आला होता तो यानी कमी केला साराश, लॉर्ड लिटन याची कृति जशी

लोकास फार जाचक होऊन निषेधार्ह झाली होती तसा प्रकार लॉर्ड रिपन यांच्या वेळीं झाला नव्हता सबब त्यांच्या कृतीचा निषेध करण्याचें कारण नव्हतें असो आणखीही अशाच दुसऱ्या ( १८८०–८४ ) या चार वर्षांत घडलेल्या गोष्टींचा उल्लेख करता आला असता पण तेलगानीं तो विस्तार केला नाहीं तथापि लॉर्ड रिपन याच्या सर्व कारकीर्दीतून जो एक उदार भावनेचा धागा स्पष्ट दिसून येत होता त्याचा उल्लेख करणें जरूर होतें तेलंग म्हणाले,

" I will rather say a word on the general tone and spirit of liberalism which has been a pervading characteristic of Lord Ripon's rule".

मुस्कटदाबीचा कायदा रद्द करणें, सरकारी धोरण व त्यातील काही कृत्याचे हेतु याची जनतेंत शक्य तितकी प्रसिद्धि करणें, काही महत्वाच्या बाबतींत लोकाच्या पुढाऱ्याचीं मतें विचारणें, स्थानिक स्वराज्याची योजना करणें, क्रिस्टोदास पाल याच्या सारख्या लायक माणसाची वरिष्ट कायदे कौन्सिलात ( पहिल्यादाच ) नेमणूक करणें वगैरे कोणत्याही गोष्टीचा विचार करून पाहिल्यास त्यात लॉर्ड रिपन साहेबाच्या उदार धोरणाचें प्रतिबिंब उमटलेलें चक्क दृष्टीस पडत होतें तात्पर्य, लॉर्ड रिपन याच्या कारकीर्दीचें खरें वैशिष्टय त्यानीं पुढें आणलेल्या उदार भावनाप्रेरित कायद्यात किंवा प्रसिद्ध केलेल्या ठरावातच केवळ नसून त्यानीं सबध हिंदुस्तानच्या राज्यकारभारात व तन्निगडित निरनिराळ्या खात्यातील अधिकाऱ्यात जी उदार भावना जागृत केली त्यात होतें. त्यामुळेंच त्याच्या कारकीर्दीचें आम्हा हिंदुस्थानवासी लोकास महत्व वाटलें व त्याबद्दल आम्हांस अत्यत कृतज्ञता वाटली त्यासबधानें तेलगानीं त्या वेळचा इग्लडचा जो प्रसिद्ध राष्ट्रकवि लॉर्ड टेनिसन याच्या काव्यातील महाराणी व्हिक्टोरिया याच्या राज्यासंबधाच्या कांहीं अर्थपूर्ण दृष्टाताच्या ओळी घेऊन लॉर्ड रिपन याच्या कारकीर्दीचें जें चार शब्दात गौरवयुक्त वर्णन केलें तें फार हृदयगम होतें त्यांतील इकडे फक्त काहीं वाक्येंच देता येणें शक्य आहे तीं हीं —

" Lord Ripon has made the bounds of freedom wider, by shaping diverse august decrees which have not only left Queen Victoria's throne unshaken in this land, but have made it even more broad-based

upon the people's will. × × × It is that on which, in my humble judgment, rests most firmly Lord Ripon's claim upon our gratitude × × × It is that which justifies the remark that, summing up the result of Lord Ripon's rule, you may say again borrowing the language of the Pœt Laureate that "He wrought his people lasting good."

तात्पर्य, लॉर्ड रिपन यानीं आपल्या उदार राज्यधोरणानें महाराणी व्हिक्टोरियाचें आसन इकडील प्रजेच्या अतःकरणात पक्कें केलें आहे एवढेंच नव्हे, तर त्यानीं आपला राज्यकारभार सहानुभूतिपूर्ण रीतीनें चालवून इग्लड व हिंदुस्थान या दोन्ही देशाचें कल्याण साधले आहे अशा सद्गृहस्थाच्या प्रयाणसमयीं त्याना प्रेमाचा निरोप देण्याच्या हेतूनें मुबईच्या पुढाऱ्यानीं जे थोडेसे प्रयत्न केले होते ते त्यानी केलेल्या कामगिरीच्या महत्वाच्या मानाने काहींच नव्हते असें तेलगानीं शेवटीं स्पष्ट सागितलें.

---

प्रकरण छत्तिसावें.

## राष्ट्रीय सभेची स्थापना व पूर्वचिन्हें.



लॉर्ड रिपन यांची कारकीर्द हिंदुस्थानच्या इतिहासात अनेक दृष्टींनीं संस्मरणीय झाली यात शका नाहीं सर दिनशा वाच्छा यानीं एकदां अगदीं अन्वर्थक भाषेंत म्हटलें आहे कीं,

"The Viceroyalty of Lord Ripon, × × × had proved in every way, a memorable and an epoch-making one."

याचें मुख्य कारण हें कीं, ते विलायतेंतील उदारमतवादी ( Liberal ) पक्षाचे एक पुढारी असून प्रसिद्ध ग्लॅडस्टन साहेबांचे अनुयायी होते. त्या पक्षाचें मुख्य लक्षण एकदा ग्लॅडस्टन साहेबानींच सांगितलें आहे ते लक्षात ठेवण्यासारखें आहे. तें असेः—

"Liberalism × × × meant trust in the people, bounded by prudence, while Toryism represented distrust of the people, checked by fear."

या लिबरल पक्षाच्या मुख्य लक्षणाचें रिपन साहेबाच्या कारकीर्दीतील बहुतेक सर्व सरकारी ठराव, कायदे, हुकूम वगैरेमधून स्पष्ट दिग्दर्शन झाल्यामुळेंच त्या कारकीर्दीचे महत्व आहे रिपन साहेबाच्या कारकीर्दीत लोकहिताच्या अशा पुष्कळच गोष्टी घडल्या, बरेच कायदे झाले, अनेक ठराव प्रसिद्ध झाले व कित्येक हुकूम सुटले या गोष्टी खऱ्या आहेत, परतु त्यानी उदारभावनेनें प्रेरित होऊन काहीं बाबतींत लोकावर विश्वास टाकण्याचा जो पाया घातला व जनतेस सहानुभूतीनें वागवून तिच्या ठिकाणीं ज्या आकाक्षा उत्पन्न केल्या, त्याची किंमत अधिक आहे. त्यांच्या वेळेपर्यंत सार्वजनिक कामात लोकास विचारण्याकडे सरकारची प्रवृत्तिच नव्हती सरकारानें किंवा त्याच्या अधिकाऱ्यानीं वाटेल ते करावें, वाटेल तसें वागावें आणि लोकानीं किंवा त्याच्या पुढाऱ्यानीं त्याबद्दल हवें तर चरफडत बसावे असा प्रकार कमीअधिक प्रमाणात चालत आला होता. फार काय पण लॉर्ड लिटन साहेबानीं प्रसग आल्यास प्रत्यक्ष आपल्या कार्यकारी कौन्सिलमधील युरोपीयन अधिकाऱ्याचे बहुमत देखील धाब्यावर बसवून मन मानेल तसा राज्यकारभार चालविण्याची सुलतानी पद्धत सुरू केली होती अशा स्थितीत थोड्याच दिवसानीं लॉर्ड रिपन यानीं हिंदुस्थानचीं राज्यसूत्रें हातीं घेताच जिकडे तिकडे त्याच्या सहानुभूतियुक्त धोरणामुळें परिस्थिति बदलल्याचीं चिन्हें दिसू लागावीत, व आपण केवळ मोंगलाईंत नसून सुधारलेल्या इग्रजी राज्यात आहोंत व आपणास या राज्यांत काहीं हक्क आहेत अशी लोकात जाणीव उत्पन्न व्हावी यात आश्चर्य नाही. म्हणजे रिपन साहेबाच्या कारकीर्दीनें लोकाच्या आकाक्षा जागृत करून राजकीय दृष्टीनें हल्लींच्या काळात हिंदुस्थान देशात नवीन मन्वतर सुरू केलें यात शका नाहीं. त्याचा पुढें लोकस्थितीवर काय परिणाम झाला, कोणकोणत्या सार्वजनिक सस्था निर्माण झाल्या व त्या संस्थांत काशीनाथपत तेलग यांचें कसें प्रमुखत्वानें अग होतें, याचें आतां थोडक्यात विवेचन करू

तेलगाच्या आयुष्यांतील, आपल्या शक्तीप्रमाणें व सवडीप्रमाणें कांहीं तरी उपयुक्त सार्वजनिक काम करावें, हें एक मुख्य तत्व असल्यामुळें ते सन १८७२ सालीं आपल्या धद्यास लागतांच त्यांचें लक्ष त्या दिशेनें वळावें हें साहजिक आहे.

त्या वेळेपर्यंत मुबईंत सार्वजनिक कामें अगावर घेऊन करणाऱ्या सस्था म्हणजे "बॉम्बे असोशिएशन" व "ईस्ट इडिया असोशिएशन"ची मुबई येथील शाखा, ह्या होत्या. पहिली " Bombay Association " ही डॉ. भाऊ दाजी, व डॉ ब्रुइस्ट ( Dr. Bruist ) यानी सन १८४८ सालीं स्थापन केली होती. पण ती सन १८६० मध्यें बद पडली. पुढे लागलीच (लडन येथील East India Associationची एक शाखा म्हणून) दुसरी सस्था शेट दादाभाई नवरोजी यानीं सन १८६८ मध्यें स्थापन केली तिचीही पुढे पहिलीच्या सारखीच स्थिति झाली असती. परतु तिच्यामध्ये दादाभाईनी काही ताज्या रक्ताची तरुण मडळी सामील करून घेऊन तिला अधिक कार्यक्षम केली या दोन्ही सस्थाचे तेलग हे बरेच दिवस सेक्रेटरी होते तेलगानी या सस्थात आपलें काम फार आस्थेवाईकपणानें केल्याकारणानें त्याना प्रथमपासूनच अग मोडून सार्वजनिक कामें करण्याची सवय झाली व त्यामुळेंच ते पुढे मुबईतील एक प्रसिद्ध पुढारी झाले यासबधानें सर दिनशा वाच्छा यानी एके ठिकाणी असें लिहिलें आहे —

" The papers and memorials submitted to the Government by the Bombay Branch of the East India Association between 1880 and 1885 bear the impress of Telang's Roman hand. The students of politics of the present generation should carefully study them as published in the journals of the Association of that important epoch."

सदरील सस्थेकडून १८८०–८५ या मुदतींत सरकारकडे अनेक अर्ज, अनेक पत्रकें व अनेक ठराव वगैरे पाठविण्यात आले होते, ते बहुतेक सर्व तेलगाच्याच हातचे होते त्या सर्वाचाच इकडे विस्तारानें उल्लेख करता येत नाहीं फक्त काहीं अर्जांचा व ठरावांचा मात्र निर्देश करतों सन १८८१ मध्यें अफगणिस्थानच्या लढाईवर हिंदुस्थानातून सैन्य पाठविल्याबद्दलचा सर्व खर्च इकडच्या तिजोरींतून करावा असे पार्लमेंटकडून ठरविण्यांत आलें होतें त्याबद्दल निषेध करण्याबाबतचा एक अर्ज सदहू सस्थेनें त्या वेळचे मुख्य प्रधान मिस्टर ग्लॅडस्टन यांजकडे पाठविला होता तसेच सन १८७८ मध्यें लोकाच्या म्हणण्याकडे केवळ दुर्लक्ष करून मुबई सरकारनें अबकारी ॲक्टच्या दुरुस्तीचें बिल

( Bombay Act II of 1878 ) पास केलें. त्याबद्दल सदरील संस्थेनें जोराची तक्रार केल्यावरून लॉर्ड रिपन यानीं त्या बिलाला मजुरी देण्याचें नाकारलें. त्याबद्दल हिंदुस्थान सरकारचे ( लॉर्ड रिपनचे ) त्या सस्थेनें एका ठरावांत आभार मानले आहेत

तदनतर सन १८८२ सालीं सदहू मुबई शाखेनें " एजुकेशन कमिशन " ला एक मानपत्र देऊन काहीं उपयुक्त सूचना केल्या होत्या. त्याचप्रमाणें ईजिप्तला हिंदुस्थानातून सैन्य पाठविण्याचा खर्च इकडच्या तिजोरींतून न घेता तो ब्रिटिश तिजोरींतून घ्यावा असें दुसऱ्या एका अर्जाच्या द्वारें सुचविण्यात आलें होते. तसेंच लॉर्ड रिपन याच्या कारकीर्दीची मुदत वाढविण्याबद्दल पार्लमेंटला अर्ज करण्यात आला होत, व अखेर सर इवलिन बेअरिंग ( नतरचे लॉर्ड क्रोमर ) हिंदुस्थानसरकारचे फडणीस, याच्या प्रयाणसमयीं त्याना एक मानपत्र देण्यात आलें होते असो याप्रमाणें तेलगानीं मूळपासूनच प्रास्ताविक वगैरे —spade work—कामें केल्यामुळें त्याना अधिकाधिक सार्वजनिक कामाचा अनुभव आला व त्याच्या ठिकाणीं कार्यक्षमता वाढत्या प्रमाणात येऊ लागली. मुबईच्या ईस्ट इडिया असोशिएशयनचे तेलगाबरोबरच सर दिनशा वाछा हेही एक सेक्रेटरी होते. अर्थात् तेलग हे सार्वजनिक कामें कसे आस्थेवाईकपणें करीत असत याचा त्याना प्रत्यक्ष अनुभव होता. ह्यामुळें वाच्छा याच्या एतद्विषयक उद्गाराचें महत्व विशेष आहे. ते म्हणतात कीं,

" The guiding spirits of the Working Committee of the B. B. of the E. I Association from 1880 were Telang and Mehta They were both conspicuous in the internal direction of the Association On Telang fell the brunt of the harder work "

मुबई इलाख्यातील म्युनिसिपालिट्याचें बिल व लॉर्ड रिपन यांचा स्थानिक स्वराज्यासबधाचा ठराव व पुढें इल्बर्ट बिल याविषयींची कलमवार 'भवति न भवति' कमिटींत कित्येक दिवसपर्यंत चालली होती. त्या संबधात कमिटींत खरे दूरदर्शी मार्गदर्शक असे स्वतः तेलगच होते अशीं अस्सल—original—कामें करीत असतानाच तेलगांमधील जे काहीं अत्युत्तम गुण—त्याची शांतवृत्ति, त्यांची कसलेंही स्वतः काम करण्याची तयारी, त्यांचा विनयशील स्वभाव व त्यांचें दुरा-

ग्रहशून्यत्व—आपल्या दृष्टीस पडलें तें पाहून आपण अगदी आश्चर्यचकित झालों असें वाच्छा म्हणतात. त्यांचे स्वत.चे शब्द असे आहेत —

" It was this work that I saw him do there which informed me at once that I was in contact with a master-mind, both of principles and details, of great ability, of inexhaustible patience, of extreme modesty, and above all, free from dogmatism. I also discovered his persuasive powers and his debating strength. They were such as to do credit to the most practised debater in a Select Committee of the House of Commons." " It is in this respect that Mr Telang's character as a practical and successful politician comes out with irresistible force. It is this aspect of his public life which needs to be well studied by the rising generation of educated men. "

आमच्या तरुण मडळींनीं सार्वजनिक कामात स्वत खपून काम करण्याचा धडा तेलगाच्या चरित्रापासून जरूर घ्यावा असे वाच्छा शेटजी म्हणतात.

स्वत काहीं एक काम न करता काम करणाऱ्या माणसावर टीका करणारे लोक त्या वेळींही होते. अशी फुकाची टीका करणाऱ्या मनुष्याचा तेलगाना केव्हा केव्हा राग येत असे. त्याबद्दल वाच्छा शेट म्हणतात —

" He ( Mr. Telang ) had no patience with those, who sitting astride on the fence of politics, were the foremost to hurl their ill-disguised criticism behind the back of unselfish workers and would yet decline to co-operate when repeatedly asked to do so. Himself a man, who never shirked any drudgery, however taxing and fatiguing, Mr. Telang worked at any cause on hand with cheerfulness and with a ten mules' dogged industry. "

याप्रमाणें धीमेपणाने सार्वजनिक कामें करीत असतानाच लॉर्ड रिपन याच्या कारकीर्दीनें देशात नवजीवन सचरू लागलेलें दिसू लागल्यामुळें, तेलगाना आढ-ळून आलें कीं यापुढे सार्वजनिक काम सतत चालू ठेवण्याकरिता दुसऱ्या व अधिक जोमदार सस्थेची आवश्यकता आहे मुबईच्या ईस्ट इडिया असोशिएश-नची व्यवस्था काही अशीं लडन येथील त्याच नावाच्या मुख्य सस्थेवर अवलबून असल्यामुळें, तेलग व त्याचे मदतगार याना ही परावलबी स्थिति पसंत पडेना. त्यामुळें त्यानी एक नवीन स्वतत्र सस्था स्थापन केली. याला रिपन साहेबाचीच कारकीर्द कशी कारण झाली याचे वाच्छा शेटजीच्याच शब्दात दिग्दर्शन करणे बरें दिसते ते म्हणतात —

"At the date of the departure of Lord Ripon in December 1884, India had entered on a new and a most encouraging stage of her existence * * * The whole nation was pulsating with a consciousness of greater social, intellectual and material progress. It was under such bright and cheerful conditions that it was deemed expedient by the three great leaders of thought ( Telang, Tyebji and Mehta ) in the city to found a new political institution which should materialize the new sentiments and aspirations which had taken such strong hold of the entire Indian Community." "And thus it was that the Bombay Presidency Association was established at the commencement of 1885."

प्रथम या ( बॉ. प्रे. असोशिएशन ) सस्थेशीं मि बद्रुद्दीन तय्यबजी याचा सबध नव्हता स्वतत्र सस्था काढण्याची कल्पना ही तेलग व मेथा या दोघांचीच होती पुढें या दोघानीं बद्रुद्दीन याचें मन कसे वळविलें हें मेथा याच्या शब्दातच सागतों. त्याबद्दलचा "टाइम्स आफ इडिया" च्या ता. ११–१०–१९०६ च्या अकात पुढीलप्रमाणें रिपोर्ट आहे —

"When in 1884, Mr. Telang and the speaker ( Mr. Mehta ) made up their minds that the Presi-

dency required a political Association of an active character, it was to Mr Badruddin that they applied, as the representative of the third community to which he belonged, to join them in establishing and organising it. Mr. Badruddin had no hesitation, at a time when he had begun to lay the foundation of a large practice, in placing himself into their hands and joining the Association. He began his political career as Chairman of the Council of the Bombay Presidency Association."

याप्रमाणें सन १८८५ च्या सुरवातीस "बांबे प्रेसिडेन्सी असोशिएशन" या सस्थेची स्थापना झाली सर दिनशा माणकजी पेटिट हे तिचे पहिले अध्यक्ष झाले व मेथा, तेलग, व वाच्छा हे तिचे तीन सेक्रेटरी झाले कौन्सिलचे अध्यक्ष बद्रुद्दीन होते हे वर सागितलेच आहे या सस्थेच्या द्वारें पुढे सार्वजनिक कामाची कसकशी उठावणूक झाली व त्यात तेलगाचें कसे मुख्य अग होते याचे पुढील एकाद्या प्रकरणात विवरण येईल

लॉर्ड रिपन याच्या स्फूर्तिदायक कारकीर्दीच्या योगाने दुसरी जी महत्वाची सस्था जन्मास आली ती "**राष्ट्रीयसभा**" ही होय सदरहू कारकीर्दीतील इल्बर्ट बिलाच्या विरुद्ध युरोपीयन लोकानी जी जगी चळवळ करून सारा देश हालवून टाकला, त्याच्या योगाने सर्व हिंदी लोकाना आपल्या खऱ्या राजकीय स्थितीची जाणीव उत्पन्न झाली व ती स्थिति सुधारण्याकरिता सर्वानीच—जात किवा धर्म याकडे न पाहता—एक जूट करून झटले पाहिजे असे त्याच्या लक्षात आले त्या वेळपर्यंत देशात जरी इग्लिश शिक्षणाचा थोडा बहुत प्रसार होऊन लोकाच्या मनात नवीन कल्पना येऊ लागल्या होत्या तरी बगाली, पजाबी, गुजराथी, महाराष्ट्रीय, मद्रासी अशा सर्व प्राातातील लोकात अजून बधुभावना उत्पन्न झाली नव्हती ती राष्ट्रीय भावना इल्बर्ट बिलाच्या चळवळीनें उत्पन्न केल्यामुळे त्या वेळी सर्व प्रातातील लोक एक झाले व त्यानी शिकस्तीचे प्रयत्न करून युरोपीयन लोकानीं त्याजवर केलेले हल्ले परतविले अर्थात् याप्रमाणे तापलेल्या तव्यावर भाकऱ्या भाजून घेण्याचें कित्येकास सुचावे यात आश्चर्य नाहीं या मडळीमध्ये मग बराच विचार-

विनिमय होऊन अखेर सर्व राष्ट्राची एक संस्था स्थापन करावी असें ठरलें. या राष्ट्रीय संस्थेची कल्पना ज्याना सुचली त्यात प वा. ए. ओ. ह्यूम याचे नांव प्रथम सागितले पाहिजे वाच्छा शेटजी म्हणतात कीं,

" We must not forget to relate here his ( Mr. Telang's ) continuous and fervent devotion to the cause of the Congress which was founded in 1885. He was one of the earliest as well as one of the most earnest of the collaborators of Mr Hume in his great political work with which his name is now imperishably associated "

याप्रमाणें सर्व प्रातातील पुढारी एके ठिकाणीं जमतील अशा प्रकारची एक राष्ट्रीय सस्था स्थापन करावी असें जरी ठरलें तरी सगळ्यानीं एकत्र जमून काय करावें हें निश्चितपणें ठरलें नव्हतें. कित्येकाच्या मतें प्रथम सामाजिक प्रश्न हातीं घ्यावेत दुसरे कित्येक म्हणत कीं, राजकीय प्रश्न प्रथम हातीं घ्यावेत अशा स्थितींत ह्यूमसाहेबानीं ही सर्व योजना त्या वेळचे व्हाइसरॉय लॉर्ड डफरीन याच्यापुढें ठेवून त्यावर त्याचा सल्ला विचारला लॉर्ड डफरीन यानीं ह्यूम साहेबास निक्षून सागितलें कीं, पुढारी लोकानीं वर्षातून एक वेळ एके ठिकाणीं जमून सरकारी अधिकाऱ्याचे दोष जरूर दाखवावे त्यायोगे राज्यकारभारात सुधारणा करण्यास ठीक पडेल कारण इग्लडात जशी " opposition " ( प्रतिपक्षी ) ही पार्लमेंट मध्यें कायमची सस्था आहे तशी हिंदुस्थानात नाहीं. तशी एकादी सस्था इकडे उत्पन्न झाल्यास चागलें होईल डफरीन साहेब म्हणाले,

" The newspapers, even if they really represented the views of the people, were not reliable and the English were necessarily ignorant of what was thought of them and their policy in the native circles " "The Indian politicians should meet yearly and point out to the Government in what respect the administration of the conntry needed reform to bring it in a line with the wishes of the people. "

ह्यूमसाहेबाची पहिली सूचना अशी होती कीं अशी सभा प्रथम मुबई इलाख्यांत भरावी व तिचे लॉर्ड रे—त्या वेळचे मुबईचे गव्हर्नर—अध्यक्ष असावे. ही सूचना डफरीन साहेबानीं मान्य केली नाहीं त्यानीं म्हटलें कीं, जमलेल्या सभत जर सरकारी धोरणावर टीका व्हावयाची आहे—आणि अशी टीका अवश्य झाली पाहिजे—तर त्या सभेचे अध्यक्ष खुद्द एकादा इलाखाधिपतिच झाल्यास अडचण उत्पन्न होईल आणि जी टीका होईल ती निर्भीडपणाची होणार नाहीं. याप्रमाणें डफरीन साहेबाचा सल्ला मिळताच ह्यूम साहेबानीं तो सर्व प्रातातील प्रमुख पुढाऱ्यास कळविला व त्याप्रमाणें पहिली राष्ट्रीय सभा सन १८८५ च्या नाताळात पुण्यास भरवावी असें ठरलें. याबद्दलचा पहिल्या राष्ट्रीय सभेच्या अहवालात असा उल्लेख आहेः—

"In March 1885, it was decided to hold a meeting of representatives from all parts of India at the then coming Christmas. Poona was considered suitable."

पण पुढें काही अडचणी उपस्थित होऊन पहिली राष्ट्रीय सभा पुण्यास न भरता मुंबईस भरल्याचें प्रसिद्धच आहे नतर राष्ट्रीय सभेचीं अधिवेशने निरनिराळ्या ठिकाणीं दरसाल कशीं भरत गेलीं व तेलगानीं कोण कोणत्या साली त्या सभेत भाग घेतला हें पुढील एकाद्या प्रकरणात सागू.

याप्रमाणें सन १८८५ सालीं राष्ट्रीय सभेचा जन्म होऊन, सनदशीर राजकीय चळवळीचा हिंदुस्थान देशात पाया पडलेला पाहून, कित्येक अदूरदृष्टि युरोपीयन लोकास ( विशेषेंकरून हिंदी प्रजेशीं नेहमींच अविश्वासानें वागणाऱ्या कॉन्सर्व्हेटिव्ह पक्षातील काहीं लोकास ) वाईट वाटावे—किंबहुना ही चळवळ वटवृक्षाप्रमाणें वाढून पुढें मागें आपल्या—इग्लड—देशास जाचक होईल अशी त्याना भीति वाटावी यात आश्चर्य नाहीं अर्थात् राष्ट्रीय सभा व तिच्या द्वारानें इकडे होणारी चळवळ या गोष्टींसबधानें कॉन्सर्व्हेटिव्ह पक्षाची साधारणत वक्रदृष्टी व लिबरल पक्षाची सहानुभूति याही मनोवृत्ति बहुधा ठरून गेल्यासारख्याच झाल्या होत्या त्याचप्रमाणें ही चळवळ करण्याची प्रवृत्ति हिंदी लोकांत लॉर्ड रिपन याच्या कारकीर्दीमुळें उत्पन्न झाली ही मनाशीं खूण गाठ बाधून, कॉन्सर्व्हेटिव्ह पक्षाचे पुढारी मधून मधून लिबरल पक्षावर आडून गोळ्या मारीत असतच. सन १८९५ ते १९०५ पर्यंत कॉन्सर्व्हेटिव्ह पक्ष विलायतेंत अधिकारारूढ होता व लिबरल पक्षाचे

लोक प्रतिपक्षी होते. सन १८९९ ते १९०५ पर्यंत लॉर्ड कर्झन हे आमचे व्हाइ-सरॉय होते व पहिलीं काहीं वर्षे लॉर्ड जॉर्ज हॅमिल्टन हे सेक्रेटरी ऑफ स्टेट होते. त्या मुदतीत लॉर्ड जॉर्ज हॅमिल्टन यानीं हाउस ऑफ कामन्समध्यें एकदा दुसराच विषय निघाला असतां जाता जाता हिंदुस्थानातील सर्व राजकीय भानगडीबद्दलचें खापर लॉर्ड रिपन याच्या माथ्यावर फोडलें! त्याबरोबर जॉन मोर्ले—हे त्या वेळीं हाउस आफ कॉमन्सचे सभासद होते—अगदीं संतप्त होऊन उठले व त्यानीं लॉर्ड जार्ज हॅमिल्टन याच्या भाषणाबद्दल तिकडच्या तिकडे निषेध केला' त्यानी म्हटलें "लॉर्ड रिपन याच्या धोरणाबद्दल भलत्याच वेळी टीका कर-ण्याचें तुम्हास कारण नाहीं त्याच्याबद्दल तुम्हाला निंदाव्यजक ठराव आणावयाचा असेल तर खुशाल आणा आम्ही आपल्या शक्तीची शिकस्त करून, लॉर्ड रिपन याच्या धोरणाचें समर्थन करू. पण आम्ही असला आडून गोळ्या मारण्याचा प्रकार चालू देणार नाहीं" लॉर्ड जॉर्ज हॅमिल्टन मग खजील होऊन काहीं बोलले नाहींत' तात्पर्य, काहीं युरोपीयन बडे लोक व त्याचे इकडील साथीदार यानीं जरी राष्ट्रीय सभेसबधानें टीका, अडथळे वगैरे आरभले तरी अखेर त्या चळवळीचें काम जोरानें चालू लागलें व राष्ट्रीय सभेचे उत्तरोत्तर महत्व वाढून काहीं काहीं सुधारणा देशाच्या पदरात देखील पडू लागल्या सन १८९२ चा कायदा, सन १९०९ च्या मोर्ले-मिंटो याच्या नावानें प्रसिद्ध असलेल्या सुधारणा व सन १९१९ सालातला मॉटेगु साहेबाच्या सुधारणा, इतक्याचा तर—हिंदी लोकांच्या सनदशीर चळवळींचीं मुख्य फळें म्हणून—निर्देश करण्यास हरकतच नाहीं

---

प्रकरण सदतिसावें.

# सन १८८५ सालांतल्या कांहीं चळवळी.



सन १८८५ मध्यें मुबईस बॉ प्रे असोशिएशनची व सर्व देशाची एक मुख्य संस्था म्हणून राष्ट्रीय सभेची कशी स्थापना झाली हें मागील प्रकरणात सांगितलें. त्याच सालीं विलायतेंतील पार्लमेंटची निवडणूक व तत्सबधाची धामधूम सुरू झाली होती. अशा वेळीं इकडून काहीं हुशार असे प्रतिनिधि विलायतेंत पाठवून निवड-णुकीच्या वेळीं इंग्लिश जनतेपुढें हिंदुस्थानचीं गाऱ्हाणीं मांडण्याचे प्रयत्न झाल्यास त्याचा बराच उपयोग होईल असें काशीनाथपंत तेलग व त्यांचे कांहीं सहकारी

मित्र यांना वाटलें व त्या दिशेनें प्रयत्न करण्याचें ठरलें. या गोष्टीला देखील इकडे कित्येकाचा विरोध होताच तथापि हिंदुस्थानचे काहीं प्रतिनिधि पाठविण्याचें अखेर ठरलें. या संबधात तेलगाविषयीं चुनीलाल पारेख हे आपल्या पुस्तकात म्हणतात कीं,

"Mr. Telang was the life and soul of the Delegation and Congress movements"

त्याच्याही पूर्वी हिंदुस्थानमधून काहीं लोक अनेकदा इग्लडला गेले होते व त्यानीं तिकडील लोकास इकडच्या काहीं गोष्टीसबधानें माहिती करून दिली होती. पण ते व्यक्तिश प्रयत्न होते त्यातही बऱ्याच वेळा तें काम खुद्द शेट दादाभाई नवरोजी यानी केलें होते पण या खेपेस इकडील लोकांत जागृति उत्पन्न होऊन त्यानीं निवडलेले प्रतिनिधि विलायतेस पाठवावयाचे होते हाच त्यातला भेद होता. याप्रमाणें "बॉम्बे प्रेसिडेन्सी असोशिएशन" तर्फे सर नारायण (हे त्या वेळीं मिस्टर होते) चदावरकर, कलकत्त्याचे मिस्टर मनमोहन घोस व मद्रासचे मि. रामस्वामी मुदलीयार याना हिंदुस्थानचे प्रतिनिधि म्हणून पाठविण्यात आले त्यानीं इग्लडात जाऊन तिकडील प्रमुख पुढाऱ्याची—उदाहरणार्थ, जॉन ब्राईट याची—सहानुभूति संपादन केली व ठिकठिकाणीं सभामधून भाषणें करून त्यानीं तिकडील लोकास हिंदुस्थानविषयक बरीच उपयुक्त माहिती सागितली सदहू तीन गृहस्थानीं इग्लडात त्या वेळी केलेल्या भाषणाचा इकडे गोषवारा देऊन जागा अडविण्याचें कारण नाही. परतु चदावरकर यानीं तिकडे केलेल्या एक दोन भाषणातील मतितार्थ चार शब्दात देऊन नुसते येथे त्याचे दिग्दर्शन करणें इष्ट दिसतें. चदावरकरांनीं एका भाषणात इग्लिश लोकास स्पष्ट सागितलें कीं, हिंदुस्थानांतील इग्लिश जज्ज "नेटिव्ह—नेटिव्ह" याजमध्यें न्याय उत्तम रीतीनें करीत असले तरी युरोपीयन आणि हिदी याजमध्यें न्याय करण्याचा प्रसग आला तर मात्र त्या जज्जाच्या मनाचा कल बहुधा युरोपीयनाच्या बाजूस होतो व आमच्या लोकाच्या बाबतींत अन्याय होतो सबब ही वस्तुस्थिति जरूर बदलली पाहिजे या बाबतींत गेल्या चाळीस—पन्नास वर्षांत जरी थोडीबहुत सुधारणा झाली आहे, तरी तसले अन्यायाचे प्रकार अद्यापि कित्येक वेळा घडत असतात, हें नाकबूल करता येत नाहीं.

दुसऱ्या एका भाषणात चदावरकरानीं हिंदुस्थानातील लष्करी खर्च कसा भराभर वाढत आहे हें सांगून तो कसा कमी करतां येईल हेंही दाखविलें. खर्चात

बचत करण्याचा मुख्य उपाय म्हणजे सरकारी मोठमोठ्या पगाराच्या जागावर युरोपीयन लोकाना न नेमता पगाराचे प्रमाण जरा कमी करून हिंदी लोकाना नेमणें हाच होय. याबद्दल नोकरीवरील युरोपीयन लोकानीं कुरकुर केल्यास सरकारानें तिकडे का लक्ष द्यावें ? एकदरींत चदावरकरानी म्हटलें कीं,

"Parlıament ought to take up Indıan questıons much more serıously than ıt had done, and follow the example of Mr. Brıght and the late Mr. Fawcett"

या दोन उदारमनस्क गृहस्थानीं लायक हिंदी लोकाना मोठ्या पगाराच्या जागावर नेमण्याविषयीं अनेकदा भाषणें केलीं होतीं.

चदावरकरानीं तिसऱ्या एका भाषणांत ब्रिटिश लोकास सागितलें कीं, त्यानीं—इग्लिश लोकानीं—हिंदुस्थानास सन १८३३ मध्यें, १८५३ मध्यें, १८५८ मध्यें, १८६१ मध्यें व १८७६ मध्यें दिलेलीं अभिवचनें अद्यापि पूर्णपणें पाळण्यात आली नाहींत एकतत्री राज्य चालविण्याचा प्रयोग पूर्वी करण्यात आला आहे. पण तो प्रयत्न अयशस्वी ठरला आहे! त्यामुळें राज्यपद्धत अशी असली पाहिजे कीं, राजा व प्रजा—शासित व शास्ते—हे एकच आहोंत असे शासित लोकास वाटलें पाहिजे आणि या मार्गानें इग्लड व हिंदुस्थान या दोन देशाचा जो परमेश्वर-कृपेनें सबध जडला आहे तो दृढ झाला पाहिजे!

याप्रमाणें इग्लंडमध्यें आपल्या देशासाठीं महत्वाचें काम करून सदहू प्रतिनिधि हिंदुस्थानात परत आल्यावर मुबईत त्याचा सत्कार करण्याकरिता जाहीर सभा भरविण्यात आली होती. त्याची हकीकत ता. १८-१-८६ च्या "इदुप्रकाश" मध्यें प्रसिद्ध झाली आहे त्या वेळीं रा चदावरकर, मि. मनमोहन घोस व मि. राम-स्वामी मुदलियार यानीं आपापले इग्लडमधील अनुभव सागून आपण केलेल्या कामाची थोडक्यात हकीकत सागितली. त्या वेळीं "हिंदुस्थानविषयक प्रश्न हा इग्लडातील एकाद्या पक्षानें आपल्या कार्यक्रमात घ्यावा कीं काय ?" अशी एकानें पृच्छा केली. त्यासबधीं जमलेल्या मंडळींत बरीच चर्चा झाली. त्या प्रश्नाचें खरें उत्तर शेट दादाभाईनीं कधींच देऊन टाकलें होतें इग्लडमध्येंच एका सार्वजनिक प्रसंगीं जेव्हा एकानें दादाभाईस विचारलें कीं "तुम्हास (हिंदुस्थानच्या लोकांस) कोणता पक्ष—लिबरल कीं कॉन्झर्व्हेटिव्ह—आवडेल ?" तेव्हा दादाभाईनीं लाग-

लंच उत्तर दिलें कीं, " जो हिंदुस्थानच्या बाबतींत न्याय करील तो पक्ष आम्हास आवडेल." ( We would like that Party which would do justice to India. ) सदहू प्रश्नावर तेलगानी फक्त "त्याबद्दल आपण जरूर विचार केला पाहिजे" एवढेंच म्हटलें.

वर सागितल्याप्रमाणें तिन्ही प्रतिनिधींची भाषणें झाल्यावर तेलग म्हणाले —

But from the Mission of the Indian Delegates to England and the results achieved by them we have learnt several useful lessons which it may be useful to enumerate here. In the first place the natives of India have begun to realise the value of united action.

आपणास पहिली गोष्ट ही समजली की, तिन्ही इलाख्यातील लोकात बधुभावना उत्पन्न झाली असून ते तसे वागत आहेत दुसरी गोष्ट ही कीं, काही स्वार्थपरायण व विघ्नसतोषी लोकाचें जनतेवर काही एक वजन पडत नसून, त्याना सुशिक्षित लोकात फूट पाडण्याच्या कामात यश आलें नाहीं. तिसरी गोष्ट ही की, इग्लिश लोकास इकडील प्रजाजनाविषयींची खरीखुरी व निश्चित प्रकारची माहिती प्रथमच त्याच्या प्रतिनिधींकडून ऐकावयास मिळाली चवथी गोष्ट, विलायतेतील मजूर पक्षांत हिंदुस्थानाविषयीं सहानुभूति उत्पन्न झालेली असून आमचे काहीं तरी हित करावें अशी त्या पक्षाची इच्छा आहे पाचवी गोष्ट, "हिंदुस्थान देश हा तरवारीच्या जोरावर मिळविला आहे व तो तसाच राखावयाचा आहे" हें रावणी तत्व किंवा रानटी ( barbarous ) लोकास शोभणारें तत्व इग्लिश लोकास मान्य झालेलें दिसत नाहीं. फार काय, पण मॅक्लीन व पेली ( Mr. J. Maclean and Sir Lewis Peily )—कीं ज्यानी त्या आसुरी मताचा या देशात पुरस्कार केला होता—त्यानीं देखील आपल्या निवडणुकीच्या पत्रकात ( Election Manifestoes ) त्या मताचा आधार घेतलेला नाहीं. उलट, हिंदुस्थानचे राज्य उदार तत्वाच्या पायावरच उभारले पाहिजे असे त्यानीं स्पष्ट म्हटलें आहे. सहावी गोष्ट, ज्या लोकाना " Delegation " ( प्रतिनिधि पाठविण्याची ) कल्पना प्रथम पसत नव्हती त्यांनादेखील आता आढळून आल्याचें दिसतें कीं, हिंदुस्थानच्या लोकाना केवळ लहान मुलाप्रमाणें वागवून इतःपर चालावयाचें नाहीं. तेलग म्हणाले की,

These are distinct gains to our cause, and we may fairly say that the mission of the Delegation has performed a better and and greater work than we can accurately estimate." "He that has eyes to see, let him see"

त्याच सालीं ( १८८५ ) निवडणुकीच्या वेळी इग्लिश जनतेत सरसहा वाटण्याकरिता बारा पत्रकें ( leaflets ) प्रसिद्ध करण्यात आली होतीं त्यापैकीं तीन तेलगाच्या हातचीं होती "India's Appeal to the English Electors" हें पत्रक न्या रानड्यानी लिहिलें होते या सर्व पत्रकाचा निवडणुकीच्या वेळीं इग्लिश लोकावर चागला परिणाम झालेला दिसून आला ती सर्व पत्रके कलकत्ता, मुबई ( प्रे असोशिएशन ), मद्रास, कराची व सुरत येथील कित्येक राजकीय सस्थाच्या तर्फे म्हणून विलायतेत वाटण्यात आली होती. त्यापैकीं पत्रक न २, पत्रक न ६ व पत्रक न. ८ हीं तेलगानी लिहिली होती. त्याचा अगदी थोडक्यात येथे साराश देतों

**पत्रक नं. २:**—याचा "Is India lightly taxed ?" हिंदुस्थानात सरकारी देणें कमी आहे काय ? असा मथळा होता त्यात तेलगानी इतकेच दाखविलें होतें की, इग्लडातील लोकास हिंदुस्थानातील हकीकतीची फक्त एक बाजू समजते. म्हणजे बड्या युरोपीयन कामगारानी इग्लिश लोकापुढे माडलेली तेवढी बाजू दिसते, जनतेची बाजू दिसत नाही कारण ही दुसरी बाजू ते बडे कामगार सागत नाहींत अर्थात् इग्लिश लोकास यासबधी माहिती झालेली नसते याचा अर्थ असा होतो कीं, हिंदुस्थानातील सरकार देणें खाऊन बसणाऱ्या लोकाचे (tax-eaters) म्हणणें तेवढें इग्लिश लोकापुढे येते व तें देणें देणाराचें ( tax-payers ) म्हणणें काय आहे हें पुढे येत नाहीं तेलगानीं सागितलें कीं, थोड्याच दिवसापूर्वी सर जेम्स फर्ग्युसन—मुबईचे एक माजी गव्हर्नर—यानी इग्लडमध्यें एका भाषणात म्हटलें होतें कीं "हिंदुस्थानातील लोकास सरकार देणें फार द्यावें लागत नाहीं, ( not heavily taxed ) हें एकाद्या गव्हर्नर होऊन गेलेल्या गृहस्थास बोलणें सोपें आहे कारण ते आपल्या कामावर असताना त्याच्या तनख्यात कांहीं एक कमी पडत नाहीं. त्याना आपले दरसाल १०,००० पौंड पगार व ४,००० पौंड इतर खर्च, इतके पैसे बिनतक्रार मिळतात ! मग लोकास सरकार देणें भारी पडतें असें त्याना का वाटावे ?" परंतु खरी वस्तुस्थिति काय होती,

याबद्दलचे तेलगांनीं सदरील पत्रकात थोडेसे आकडे दिले होते. त्यावरून हिंदुस्थानची खरी स्थिति कोणासही समजण्यासारखी होती

प्रथम हिंदुस्थानच्या लोकाचें उत्पन्न पहा व त्यांच्या वरील सरकार देण्याचें प्रमाण पहा त्या वेळीं इग्लडची लोकसख्या तीन कोटी साठ लक्ष होती व तिचें वार्षिक उत्पन्न १ अब्ज वीस कोटि पौंड होते म्हणजे दर माणशीं शेंकडा ३३ पौड उत्पन्न झाले या उत्पन्नावर तिकडील सरकारी वसूल ८ कोटि ७२ लक्ष होता. म्हणजे वरील उत्पन्नावर सरकारी देण्याचें शेकडा ७½ टक्के इतके प्रमाण बसलें. तीच हिंदुस्थानची स्थिति पहा ब्रिटिश इडियाची लोकसख्या वीस कोटि होती व तिचे वार्षिक उत्पन्न चाळीस कोटि पौंड होते म्हणजे दर माणशीं सालीना २ पौड उत्पन्न झालें यावरील सरकारी वसूल सात कोटि पौड होता म्हणजे सरासरी प्रमाण शेंकडा १७ बसलें यावर तेलगानीं म्हटले की, वार्षिक दोन पौंडावर हिंदुस्थानचा रहिवासी जिवत कसा राहू शकतो याचा इग्लिश लोकानीच विचार करावा व असल्या दरिद्री उत्पन्नावर तो निष्काचन हिंदी मनुष्य, सधन इग्लिश मनुष्याच्या मानाने दुप्पटीपेक्षाही अधिक सरकार देणे भरत असताना हिंदुस्थानात सरकार देणें भारी आहे कीं नाही हेही त्यानीं पाहावे ! वर दिलेले सर्व आकडे इकडे तेलगानीं सुमारें चाळीस वर्षापूर्वी प्रसिद्ध केलेल्या पत्रकावरून दिले आहेत. हल्लींचे आकडे दिलेले नाहीत ते दिले असते तरी लोकाच्या हल्लीच्या एकदर सापत्तिक स्थितीत मोठासा फरक पडलेला दिसेल अस वाटत नाहीं

आता हिदुस्थानातील लोक खाऊन पिऊन कसे राहतात तें पहा त्याचे दरमाणशीं वार्षिक उत्पन्न २७ रुपये बसते, असा सर एवलिन बेअरिंग यानीच सरकार तर्फे अदाज केला आहे खरें पाहिल्यास हें उत्पन्न २० रुपये (३० शिलिंग) पर्यंत खालीं उतरेल असे मानण्यास जागा आहे पण ते असो त्याचप्रमाणें जमीनधारा व मिठावरील कर हे अगदीं गरीब लोकानांच भरावे लागतात मिठाशिवाय शाकाहारी हिदी मनुष्य तर राहूच शकत नाहीं अर्थात् त्या पदार्थाचें त्याला विशेष महत्व आहे हे उघडच आहे तरी त्यावरील कर किती जबरदस्त आहे ते पहा. प्रो. हेन्री फॉसेट यानीं बरोबर हिशोब करून असें ठरविलें आहे कीं, मीठ उत्पन्न करण्यास दरमणीं जर एक रुपया खर्च आला तर त्यावरील कराचे प्रमाण शेंकडा ५०० ते २५०० रु पर्यंत बसते ! इकडील लोकसख्येपैकीं बराच भाग नुसते जगण्याला पुरेल इतके अन्न खाऊन राहतो. डॉ हटर — सरकारचे आंकडेपंडित — त्यानीं लिहून ठेविलें आहे कीं, सुमारें चार कोटि लोक पुरेसें

अन्न न मिळाल्यामुळें अर्धपोटीं जेवून राहतात ! ह्या सर्व गोष्टींचा इंग्लिश लोकांनीं जरूर विचार करावा

तेलग याचे म्हणणें कीं, खरा प्रकार असा होता हिंदुस्थान देशाचा खराखुरा राज्यकारभार सरकार देणें सगळे खाऊन टाकणारे—tax-eaters—लष्करी व दुसरे सरकारी कामगार लोक हेंच चालवीत असत व सरकार देणे देणारे जे लोक—tax-payers—आहेत त्यांचें म्हणणें कोणीच ऐकत नसे ! म्हणूनच लॉर्ड रॅंडॉल्फ चर्चहिलसारखे बडे लोक हिंदुस्थानावर आणखी दोन कोटी रुपयाचा कायमचा लष्करी खर्च लादावा असें बिनदिक्कतपणें म्हणत होते ! हा पैसा दरसाल २ पौंड उत्पन्न असलेल्या, अर्धपोटीं जेवून रहाणाऱ्या रयतेपासून वसूल व्हावयाचा होता ! हा प्रकार चालू देणें इंग्लिश लोकाना आवडेल काय ? प्रोफेसर फॉसेट म्हणतात कीं,

"The great mass of her (India's) people are in such a state of impoverishment that the Government will have to contend with exceptional difficulties, if it becomes necessary to procure increased revenue by additional taxation."

म्हणजे असल्या अत्यत दारिद्र्यावस्थेंत राहणाऱ्या रयतेवर आणखी कराचें ओझें वाढविणें हें इंग्लिश लोकासारख्या दयाळू सरकारास आवडावें काय ?

**पत्रक नं. ६** याचा "Imperial Stock-taking" (हिंदी साम्राज्याचा आढावा) असा मथळा आहे यात महत्वाची गोष्ट ही कीं, हिंदुस्थानच्या जमाखर्चाची चौकशी करून आढावा काढण्याच्या प्रश्नासबधानें बर्क, फॉसेट, ब्राइट व बीकन्स्फील्ड या सर्वांमध्यें एकवाक्यता होती. पण एकादी पार्लमेंटची कमिटी नेमून घेऊन हिंदुस्थान सरकारच्या जमाखर्चाची चौकशी करण्याचें मात्र कोणीच जबाबदार माणूस मनावर घेईना फॉसेट साहेबांनीं एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं, हिंदुस्थानचा राज्यकारभार जेव्हा कपनी सरकारच्या हातातून काढून राणीसरकारनें आपल्या ताब्यात घेतला तेव्हां खर्चाच्या बाबतींत काटकसर करण्याबद्दलचें कपनी सरकारवर एक प्रकारचें जें नियत्रण होतें तें निघून गेलें व त्याचे जागीं जीं दुसरीं बधनें घालण्यांत आलीं, त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं.

त्यामुळें प्रस्तुत हिंदुस्थान सरकारच्या जमाखर्चाची चौकशी होणें अगदीं जरूर आहे. कपनीच्या कारभाराची सन १८५३ सालीं जी चौकशी झाली तीच शेवटची होय. त्या नतर चौकशीच झाली नाहीं. त्यामुळें हिंदुस्थान सरकारचें काटकसर करण्याबाबतचें नियत्रण निघून जाऊन, खर्चाच्या बाबी कशा वाढू लागल्या हें तेलगानीं त्या वेळच्या सरकारी रिपोर्टांतून काहीं आकडे घेऊन सिद्ध केलें आहे. लष्कर व इमारती वगैरेंचा खर्च वगळून हिंदुस्थान सरकारचा बाकीचा खर्च सन १८५६ मध्यें १,४९,६४,८६७ पौंड होता तो सन १८७१ मध्यें २,३२,७१,०८२ पौंड झाला व सन १८७९ सालीं ३,३३,५२,८५२ पौंड झाला. म्हणजे पचवीस वर्षांच्या आत हिंदुस्थान सरकारचा खर्च दुपटीपेक्षा अधिक वाढला. तसेंच लष्करी खर्च व कर्ज वाढ ह्या बाबी त्याच सालात पुढीलप्रमाणें होत्या —

| | १८५६ | १८७१ | १८७९ |
|---|---|---|---|
| | पौंड | पौंड | पौंड |
| लष्कर | १,२०,००,०००. | १,६०,७४,८००. | १,७०,९२,४८८. |
| कर्ज वगैरे | ५,७७,६४,२३९. | ११,९०,००,४७६. | १४,५८,३६,४४०. |
| व्याज(दरसाल) | २३,३२,६२०. | ५०,००,४७४. | ६२,२९,७९२. |

पचवीस वर्षांच्या आंतच हा जो इतका अवाढव्य खर्च वाढला याची चौकशी होणें अत्यत जरूर आहे, आणि ही चौकशी हिंदुस्थानातल्या हिंदुस्थानात केव्हाही समाधानकारक रीतीनें होणार नाहीं याचें जॉन ब्राइट यानीं असें कारण दिलें आहे —

"All the people with white faces, English, Scotch, Irish and so forth, are nearly all in the service of Government. +++ They are all in favour of, and have an intesest in, patronage, promotion, salaries and ultimately pensions."

सगळेच कामगार वरपासून खालपर्यंत गोरे असल्यावर सरकारच्या जमाखर्चाची बरोबर चौकशी त्याच्या हातून होणार कशी ? याचे एक उदाहरणही तेलगानीं दिलें आहे. सन १८७९ सालीं व्हाइसरॉय व सेक्रेटरी ऑफ स्टेट या दोन्ही बड्या अधिकाऱ्यानीं जाहीर केलें कीं,

"Immediate measures must be taken for the reduction of public expenditure in all its branches."

म्हणजे सरकारी खर्चाची वाढ थांबविण्याकरितां कांहीं तरी उपाययोजना ताबडतोब केली पाहिजे परंतु ही उपाययोजना मुळींच का झाली नाहीं याचें बरोबर कारण ब्राइटसाहेबानींच वर दिलें आहे! ते म्हणतात कीं सगळे गोरे कामगार!

" They are not the payers of the taxes; they are the spenders and the enjoyers of the taxes; × × × The great body of the people of India have, as we all know, no control in any way over the Government."

हिंदुस्थान देशातील रयतेपासून वसूल केलेला पैसा खर्च कसा करावा एवढेंच त्या कामगारास माहीत! तो खर्च वाटेल तसा करावा त्याबद्दल त्यांस विचारणारा कोणीच नाहीं लॉर्ड बीकन्सफील्ड यानींही एकदा असें म्हटलें आहे कीं,

"It is impossible to deny that if they (Anglo-Indians) have a deficiency, the quality in which they are deficient × × × is an absence of that feeling of responsibility, which, we, from our training in this House, all of us, to a great or less degree, must possess."

तात्पर्य, गोरे कामगार केवळ खर्च करणारे असल्यामुळें त्याच्यावर कसलीच जबाबदारी नव्हती मग खर्च कसा वाढणार नाहीं? म्हणूनच तेलगानीं म्हटलें कीं, वरील सर्व गोष्टींचा विचार करता जमाखर्चाची ताबडतोब चौकशी होणें अगत्याचें आहे.

" An investigation has now been long overdue. And the new Parliament cannot do a better thing than direct such an inquiry at the very outset of its career."

तेव्हा नवीन निवडून आलेल्या पार्लमेंटनें या देशाच्या राज्यकारभाराची तशी चौकशी करण्याची जरूर तजवीज करावी.

**पत्रक नं. ८:—**याचा " Manchester's interest in India" ( मँचेस्टरच्या व्यापाराला हिंदुस्थानचें महत्व ) असा मथळा होता त्यांत तेलगानीं इंग्लिश लोकांचे एक दोन भ्रम दूर करून हिंदुस्थानापासून इग्लंडचा कसा फायदा होत होता व तो पुढें कसा चालू राहणार होता हें दाखविलें होतें.

कित्येक इंग्लिश लोकाची अशी समजूत होती व अजून आहे कीं, हिंदुस्थानापासून इग्लडाला काहीं एक फायदा नाहीं. फक्त मोठेपणाकरिता तो देश इग्लडला ठेवावयाचा आहे पण ही समजूत चुकीची आहे. हिंदुस्थानचें राज्य इग्लडच्या हातीं आल्यापासून व खुल्या व्यापाराचें तत्व हिंदुस्थानला लागू केल्यापासून, त्या काळींदेखील इग्लडचा मनस्वी व्यापार वाढला होता, व इग्लडचा पुष्कळसा माल हिंदुस्थानातच खपत होता इग्लडच्या व्यापाराला युरोपमधील इतर राष्ट्रात किंवा अमेरिकेंत कदाचित् सरक्षक जकातीच्या रूपानें अगर इतर मार्गांनीं काहीं आडकाठी येण्याचा सभव असेल, पण हिंदुस्थानातील व्यापाराचें धोरण ठरविणें हे मुळीं इग्लडमधील सत्ताधारी लोकाच्याच हाती असल्यामुळें, इग्लिश व्यापाराला इकडून आडकाठी येण्याचा सभवच नव्हता त्यामुळें इग्लडचा माल इतर देशापेक्षा हिंदुस्थानातच जास्त खपत होता फक्त कपड्याचाच विचार केला तरी तेलगानी सरकारी रिपोर्टाच्या आधारानेंच असें सिद्ध केलें की, सन १८८० साली हिंदुस्थानात इग्लडात उत्पन्न झालेला माल १,८१,२०,००,००० यार्ड किंवा १०,२९,५५८ मैल इतक्या लाबीचा खपला! तरी तेलग म्हणतात कीं हा व्यापार आणखी किती तरी वाढण्यासारखा होता. सन १८८१ च्या खानेसुमारीप्रमाणें हिंदुस्थानची लोकसख्या २५ कोटि होती. यापैकीं फक्त दहा लक्ष लोकानीं जरी प्रत्येकीं एकच यार्ड लाबीचें कापड वापरण्याचे मनात आणलें तरी त्यायोगें ४००० मैल लाबीच्या कापडाला मागणी उत्पन्न होईल पण ती पुरवून घेण्याइतके आर्थिक सामर्थ्य हिदी लोकात आलें पाहिजे. तें त्याच्या अगीं सामर्थ्य आणण्याचे कामीं मॅचेस्टरच्या—इग्लडच्या लोकाना—बरीच मदत करता येण्यासारखी आहे म्हणूनच तेलग म्हणतात कीं,

"Manchester's interest lies directly in promoting the prosperity of her Indian customers"

खुद्द मेकॉलेनेंही एकदा असे म्हटले आहे कीं हिंदुस्थानच्या राज्यसत्तेपेक्षां त्या देशात इग्लडचा व्यापार वाढल्यानेच आपला अधिक कायदा होणार आहे. मेकॉलेचा उतारा जरा लाब असला तरी तो अर्थपूर्ण आहे, सबब इकडे देतों.—

"On the most selfish view, it would be far better for us that the people of India were well-governed and independent of us than ill-governed and subject

to us; that they were ruled by their own kings but wearing our broad-cloth and and working with our cutlery, than that they were performing their *salaams* to English Collectors and English Magistrates, but were too ignorant to value or too poor to buy English manufactures. To trade with civilized men is infinitely more profitable than to govern savages. That would be doting wisdom which would keep a hundred millions of men from being our customers in order that they might be our slaves."

तात्पर्य, मेकॉलेला हिंदुस्थानच्या राज्यापेक्षा हिंदुस्थानचा व्यापार अधिक पसत होता, आणि यात त्याच्या दृष्टीनें इग्लडचा व हिंदुस्थानचा फायदा होता. पण ही उदारदृष्टि त्याच्या मागून येणाऱ्या राजकारणी पुरुषाची राहिली नाहीं. प्रस्तुतच्या काहीं इग्लिश लोकाना हिंदुस्थानची राजसत्ता व व्यापार हीं दोन्ही आपल्या हातात ठेवावीं असें वाटत असतें !

असो, याप्रमाणें सन १८८५ सालच्या इग्लडातील निवडणुकीच्या वेळीं तिकडील जनतेला हिंदुस्थानच्या खऱ्या राजकीय स्थितीचें ज्ञान व्हावें, म्हणून तत्कालीन परिस्थितीच्या दृष्टीनें सदरील तीन पत्रकें तेलगानीं लिहिलीं होतीं. त्यांचा साराश वर दिला आहे

त्याच सालीं मुबईत प्रिन्सिपाल वर्डस्वर्थ याच्या सहानुभूतीनें एक कमिटी नेमण्यात आली होती तिचा उद्देश असा होता कीं, त्या वेळीं कलकत्त्याचा एक युरोपीयन बातमीदार इग्लडमधील लडन टाइम्स वगैरे पत्राना इकडील चळवळींसंबंधीं चुकीची बातमी देऊन इग्लिश लोकात गैरसमजुती उत्पन्न करीत असल्याचा अनुभव आला होता तो प्रकार बद करून हिंदुस्थानविषयक खरी माहिती इग्लडमधील जनतेला पुरविण्याच्या हेतूनें, मुबईत या इलाख्यापुरती कमिटी नेमण्यात आली होती. तिचे दादाभाई नवरोजी, काशीनाथपत तेलंग व बद्रुद्दीन तय्यबजी असे सभासद होते. यासंबंधीं तपशीलवार हकीकत "केसरी"च्या ता. २५ जानेवारी १८८५ च्या अकांत प्रसिद्ध झाली आहे. त्याप्रमाणें इकडील बातमी इंग्लंडला बिनचूक रीतीनें पुरविण्याचें काम सदर कमीटी बरेच दिवस करीत होती.

## १८८९ सालीं मुंबई येथें भरलेली ५ वी "राष्ट्रीय सभा."



**स्वागत मडळ** —खुर्चीवर बसलेले–डावीकडून–(२) मि विठ्लदास ठाकरसी (३) ना का. त्रिं तेलंग (४) नामदार फेरोजशहा मेथा (५) मि बद्रुद्दीन तय्यबजी (६) मि. दिनशा ए वाच्छा

[ पृ ४११

## प्रकरण अडतिसावे.

# राष्ट्रीय सभा व तिजवरील हल्ले.



सन १८८५ च्या मार्चमध्यें ठरल्याप्रमाणें पुण्यास त्या सालच्या नाताळात पहिली राष्ट्रीय सभा भरविण्याबद्दलची तयारी चालली होती इतक्यात त्याच्याच थोडे दिवस पूर्वी थडीच्या दिवसात पुण्यास कॉलरा (पटकीची साथ) सुरू होऊन त्याचा झपाट्यानें प्रसार होण्याची चिन्हें दिसू लागलीं. त्यामुळें राष्ट्रीय सभा पुण्यास भरविण्याचा बेत आयत्या वेळीं रहित करून, ती मुबईस भरविण्याची तजवीज करावी लागली. ही सर्व व्यवस्था आयत्या वेळीं करावी लागल्यामुळें व ती राष्ट्रीय सभेची पहिलीच बैठक असल्यामुळें, ती यशस्वी रीतीनें पार पाडण्याबद्दल मुबईच्या पुढारी मडळीला बरेच परिश्रम करावे लागले. त्यातूनही श्रमाचा बराच मोठा भाग काशीनाथपत तेलग याच्याच वाट्यास आला होता. यासबधात सर दिनशा वाच्छा म्हणतात कीं,

"None took a more active part in making all the necessary preparations for the holding of the Congress than Mr. Telang owing to the original place, Poona, having had to be abandoned on account of the prevalence of Cholera there."

याप्रमाणें सर्व तयारी झाल्यावर मुबईस गवालिया टॅकवरील गोकुळदास तेजपाळ यांच्या संस्कृत कॉलेजाच्या दिवाणखान्यात ता. २८-१२-८५ रोजीं राष्ट्रीय सभेची पहिली बैठक सुरू झाली. लॉर्ड रिपन यांच्या उदार धोरणामुळें हिंदी लोकाच्या मनांत नवीन राजकीय आकांक्षा उत्पन्न झाल्या हें पाहून कित्येक युरोपीयन लोकांस देखील समाधान वाटलें. ह्यूम साहेब राष्ट्रीय सभेचे जनकच असल्यामुळें ते प्रथमपासून हजर होतेच. पण बाकी तशा युरोपीयन लोकांपैकीं काहींनीं राष्ट्रीय सभेच्या पहिल्याच दिवशीं बैठकीस हजर राहून आपली सहानुभूति व्यक्त केली. त्यात प्रिन्सिपाल वर्डस्वर्थ, सर विल्यम वेडर्बर्न, जस्टिस जार्डीन वगैरे युरोपीयन मडळी होती. त्या सभेच्या अध्यक्षस्थानीं बाबू उमेशचंद्र बानर्जी यांची योजना करण्यांत आली होती. त्यांचें अध्यक्षस्थानावरून फार चांगलें भाषण झालें.

सभेंत अनेक ठराव पास झाले. त्यातला तिसरा—म्हणजे कायदेकौन्सिलें सुधारण्याबद्दलचा—ठराव सभेपुढे माडण्याचें काम तेलगाकडे आलें होतें त्यानीं तो ठराव सभेपुढें ठेवताना जें भाषण केलें त्यात त्यानीं बऱ्याच महत्वाच्या गोष्टींचा ऊहापोह केला त्याच्या भाषणांत मुख्यत पुढील तीन गोष्टींचें विवेचन आलेलें होते —

( १ ) कायदेकौन्सिलात लोकानीं निवडलेले सभासद नेमणें, ( २ ) सरकारचें वार्षिक जमाखर्चाचें अदाजपत्रक कौन्सिलपुढे ठेवून त्यावर सभासदाना वादविवाद करू देणें, व ( ३ ) सभासदाना राज्यकारभारासबधीं वाटेल ते प्रश्न विचारण्यास मुभा असणें. तेलगानीं सन १८७६ मध्यें एका भाषणात "चालू कौन्सिलें म्हणजे एक फार्स आहे " असे स्पष्ट म्हटलें होते. सबब त्या वेळच्या परिस्थितीप्रमाणें वरील मागण्या पुरेशा होत्या असो ते पुढे म्हणाले —

"These reforms, I venture to think, are in themselves quite reasonable, they are thoroughly practicable, and, not in the least revolutionary, and they are calculated on the one hand, to facilitate the work of the Government and on the other, to afford a fair scope for the aspirations of the people in the direction of public usefulness "

कदाचित् कायदेकौन्सिलाचें मत व खुद्द सरकाराचे मत याचेमध्यें विरोध उत्पन्न झाल्यास तें प्रकरण विलायतेंत पार्लमेंटपुढे जावे असें तेलगाचें म्हणणें होतें. त्याकरिता हाउस ऑफ कॉमन्सची एक स्टॅंडिंग कमिटी असावी आणि इकडील सरकाराविरुद्ध कायदे कौन्सिलास—बहुमतानें—काहीं बाबतींत अपील ( तक्रार ) करावेंसें वाटल्यास त्याना तें सदहू स्टॅंडिंग कमिटीपुढें करण्यास सवड असावी. ती कमिटी निकाल देईल तो कायमचा मानण्यास हरकत नाहीं. तेलगाचें म्हणणें कीं,

"The protests recorded by a majority in the Council must go for final decision to the House of Commons."

याच कारणांकरितां लडनमधलें "India Council" बद करावें असें तेलगाचें स्पष्ट मत होतें. त्या कौन्सिलमध्यें फार करून इकडून पेनशन घेऊन

गेलेले बडे युरोपीयन कामगारच सभासद म्हणून नेमलेले असतात. त्याचा इकडे नोकरीवर असताना बनलेला स्वभाव किंवा मतें हीं थोडींच बदललेलीं असतात! अर्थात् त्याचे पुढें इकडील कामगाराविरुद्ध अगर सरकाराविरुद्ध अपील करणें म्हणजे जवज जवळ "गुळाचा गणपति व गुळाचा नैवेद्य" असाच प्रकार व्हावयाचा. अशा स्थितींत त्या कौन्सिलचा इकडील कारभारात काहीं सुधारणा घडवून आणून देशाचे पाऊल पुढें पडण्याच्या कामीं काहीं एक उपयोग होण्याचा सभव नाहीं. सबब "इडिया कौन्सिल"च काढून टाकावे असें तेलगाचें मत होतें त्याच्या मतें,

The system, Mr. Telang considered, as vicious in itself and had in actual working failed to influence the administration for good. From these facts, Telang concluded that "the India Council should go, leaving not a wrack behind"

त्याच प्रमाणें त्या इडिया कौन्सिलमध्यें एक दोन हिंदी सभासद नेमल्यानें किवा हाउस आफ कॉमन्समध्ये देखील एकादा दुसरा हिंदी सभासद निवडून आल्यानें हिंदुस्थानच्या राजकीय प्रगतीस मोठीशी मदत होईल असे तेलगास वाटत नसे त्याच्या मते इकडील कायदेकौन्सिलाची सुधारणा करून त्यात लोकमताचें प्रतिबिंब उत्तम तऱ्हेने उमटेल अशी तजवीज करावी व मागे सागितल्याप्रमाणें कौन्सिले व सरकार याजमध्यें विरोध आल्यास त्याचा हाउस ऑफ कॉमन्सच्या कमिटीनें निकाल लावावा, म्हणजे राजकीय दृष्टीने देशाचे पाऊल बरेंच पुढे पडेल.

पार्लमेटकडे शेवटचा निकाल सोंपविला गेल्यास तो प्रश्न तिकडे निरनिराळ्या पक्षाच्या ताब्यात जाण्याचा व त्याला पक्षाभिमानाचें स्वरूप येण्याचा सभव असतो ही गोष्ट खरी, पण त्याला उपाय काय? हल्लीं तरी खरा प्रकार जवळ जवळ तसाच घडत असतो. कॉन्सर्व्हेटिव्ह पक्ष अधिकारावर असला म्हणजे हिंदी प्रश्नाचा निकाल त्याच्या तत्वाप्रमाणें होत असतो, व लिबरल किंवा लेबर पक्ष अधिकारारूढ असला तर त्याच्या धोरणाप्रमाणें लागत असतो. अशा स्थितीत हिंदुस्थानविषयक प्रश्नाचा विलायतेतील एकाद्या विशिष्ट पक्षाच्या कार्यक्रमात समावेश झाला तर त्यात अनिष्ट असें काय मानावयाचें? तेलग म्हणाले,

"I go further and say that the intervention of Parliament in our affairs asked for by the present resolution will not throw us more into English party strife than we are already under present circumstances "

आता इग्लडातील पक्षापैकीं तरी कोणत्या पक्षाकडे तेलगांच्या मनाचा कल होता याचा विचार केल्यास त्याना लिबरल पक्षालाच आपण मिळावे असे वाटलें असतें हें न सागताही समजण्यासारखें आहे ज्या पक्षाला शेट दादाभाई मिळाले असते, ज्या पक्षाची फेरोजशाहा यानीं अनेकदा स्तुति केली आहे व ज्या पक्षातील प्रमुख पुढाऱ्याची--ग्लॅडस्टन, ब्राइट, क्लार्कसन व विल्बरफोर्स याची--खुद्द तेलगानीं देखील वेळोवेळ आपल्या भाषणातून आदरयुक्त तारीफ केली आहे त्याच पक्षाला तेलग मिळाले असते हें उघड आहे

गेल्या चाळीस पचेचाळीस वर्षांत देशाची जी प्रगति झाली आहे त्यात तेलगानीं मागितलेल्या सर्व गोष्टी येऊन गेल्या आहेत इतकेंच नव्हे तर, त्या वेळीं जें स्वराज्याचें ध्येय केवळ कल्पनासृष्टींत होतें तें प्रस्तुत काळीं बरेंच जवळ आणलें जाऊन त्याचा एक हप्ताही देशाच्या पदरात पडला आहे. मात्र तेलगानीं ज्या "इडिया कौन्सिल" सबधानें पहिल्याच राष्ट्रीय सभेमध्यें जोराचा आक्षेप घेऊन तें नष्ट करावें असें प्रतिपादन केलें होतें तें कौन्सिल अद्यापि अस्तित्वांत आहे. फरक इतकाच झाला आहे कीं त्या वेळीं त्या कौन्सिलात जो एकही हिंदी मनुष्य सभासद नव्हता, तेथें आज तीन हिंदी सभासद नेमले गेले आहेत पण त्यायोगें देशाच्या प्रगतीस मोठेंसें सहाय झालें आहे असें मानण्यास मात्र आधार दिसत नाहीं जर सेक्रेटरी ऑफ स्टेट हा चागला खदा व उदारमनस्क असला तरच देशाचें पाऊल पुढें पडण्यास खरी मदत होते, हा गेल्या सुमारें पचवीस वर्षांचा अनुभव आहे मग इडिया कौन्सिलमध्यें हिंदी सभासद असोत वा नसोत.

राष्ट्रीय सभेसारखी नवीन राजकीय संस्था स्थापन झाल्यावर तिजवर बरी वाईट टीका व्हावी यात आश्चर्य वाटण्यासारखें काहीं नाहीं. हिंदी लोकांना—विशेषेंकरून सुशिक्षित व सार्वजनिक कामांत लक्ष घालणाऱ्या लोकांना—नवीन सस्था निघालेली पाहून आनद झाला, पण तसा युरोपियन लोकास होणें संभवनीय नव्हतें. जे काहीं उदारमनस्क युरोपियन लोक होते त्यांना आनंद झालाच.

त्यांपैकीं कांहींच्या नावांचा मागें उल्लेख आलाच आहे. पुढील ( १८८६ ) सालची राष्ट्रीय सभा कलकत्त्यास झाली, त्या वेळी शेट दादाभाई नवरोजी हे अध्यक्षस्थानीं होते कलकत्त्यास झालेल्या राष्ट्रीय सभेच्या बैठकीचा विशेष हा कीं त्यातील प्रमुख पुढाऱ्याना त्या वेळचे व्हाइसरॉय लॉर्ड डफरीन यानीं गार्डन पार्टीला बोलावून त्यानीं आरंभिलेल्या कार्याविषयीं आपली सहानुभूति व्यक्त केली. सन १८८७ ची राष्ट्रीय सभा मद्रासेस झाली. त्या सभेसबधाचा विशेष हा कीं तिचे अध्यक्ष मिस्टर बद्रुद्दीन तय्यबजीसारखे उदार मताचे मुसलमान गृहस्थ असल्यामुळें साहजिकच तिचें महत्व होतें त्या राष्ट्रीय सभेच्या प्रमुख पुढाऱ्यानाही त्या वेळचे मद्रासचे गव्हर्नर लॉर्ड कॅनेमारा यानी पार्टीला बोलावून त्यानी चालविलेल्या कामाबद्दल आपली सहानुभूति व्यक्त केली या दोन्ही १८८६ व १८८७ सालच्या—राष्ट्रीय सभाना तेलग हे प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें हजर राहू शकले नाहींत. ते सन १८८८ मध्यें अलाहाबादेस भरलेल्या राष्ट्रीय सभेस हजर होते.

मध्यतरींच्या चार वर्षांत हिंदुस्थानच्या हितशत्रूनी राष्ट्रीय सभेविषयीं इकडे व इग्लडमध्यें खोट्यानाट्या बातम्या पसरून इकडील निरनिराळ्या धर्मांच्या व जातींच्या काहीं लोकाना फोडण्याचा प्रयत्न करून व अन्य उपायानीं राष्ट्रीय-सभेच्या पक्षाला कमकुवत करण्याचे व त्याचे पाय मोडण्याचे यत्न चालविलेच होते. सदरील हितशत्रूनीं पसरलेल्या जाळ्यात सापडण्यासारख्या मुबईच्या बाजूच्या मुख्य जाति म्हणजे पारशी व मुसलमान ह्याच होत. पण मुबईतील पारशी मडळीं-पैकीं दादाभाई, फेरोजशाह मेथा व दिनशा वाच्छा हे आरंभापासूनच राष्ट्रीय सभेचे पुरस्कर्ते असल्यामुळें त्या जातीच्या लोकसमाजावर पूर्वोक्त विघ्नसतोषी लोकानीं चालविलेल्या प्रयत्नाचा फारसा परिणाम झाला नाहीं तसेंच बद्रुद्दीन तय्यबजी व रहिमतुला सयानी यासारखे मुसलमान पुढारी राष्ट्रीय सभत पहिल्यापासूनच सामील झाल्यामुळें, ॲग्लो-इडियन लोकाच्या काव्यास एकदरींत मुसलमानजात ही त्या वेळीं बळी पडली नाहीं. साराश, राष्ट्रीय सभेच्या शत्रूच्या हातून मुबईच्या पुढाऱ्यांमध्यें फारसा बुद्धिभेद होऊ शकला नाहीं. पण अन्य प्रातातील वस्तुस्थिति निराळी होती. उत्तर हिंदुस्थानाच्या काहीं भागात मुसलमान लोकाचें प्राबल्य असल्यामुळें व त्यांच्यात हिंदुलोकांच्या मानानें इग्रजी शिक्षणाचा प्रसारही कमी झालेला असल्यामुळें, तिकडचे बरेच, सर सय्यद अहमद सारखे परप्रत्ययनेयबुद्धि मुसलमान लोक युरोपीयन लोकाच्या शब्दजालात सांपडत असत. मुसलमानच कशाला, कांहीं ( बनारसचे राजा शिवप्रसाद सारखे ) स्वार्थसाधु हिंदु लोकही

त्यांच्या जाळ्यांत अडकून पडत असत. यामुळें अशा प्रकारचे प्रयत्न जे ॲंग्लो-इंडियन लहान थोर मनुष्य—ज्ञानत वा अज्ञानत.—त्या वेळीं करीत असत त्याचा योग्य रीतीनें समाचार घेऊन त्यानीं अवलबिलेल्या कुटिल नीतीचें दोषाविष्करण कोणी तरी पुढाऱ्यानें करावयास हवें होते ते काशीनाथपत तेलग यानीं उत्तम रीतीनें करून त्यानीं राष्ट्रीय सभेच्या बाल्यावस्थेत देशाची अत्यत सस्मरणीय व बिनमोल सेवा केली राष्ट्रीय सभा अगर राजकीय चळवळ देशभर फोंफावत जाण्याचीं स्पष्ट चिन्हें दिसू लागताच ज्या इग्लिश लोकाची मनें जरा अस्वस्थ झालीं, जे लोक अमळ सतप्त होऊन ती चळवळ चालविणाऱ्यावर साधार निराधार टीका करण्यास प्रवृत्त झाले, त्यात मोठमोठे अधिकारी लोक होते पैकी सर ऑकलड कॉल्व्हिन व लॉर्ड डफरीन याचीं नावें प्रथम सांगितलीं पाहिजेत पहिले गृहस्थ हे प्रथम व्हाइसरॉय याच्या कार्यकारी कौन्सिलचे एक सभासद असून नतर ते सयुक्त प्राताचे ले गव्हर्नर झाले लॉर्ड डफरीन हे तर व्हाइसरॉयच होते. या दोन्ही बड्या अधिकाऱ्यानीं राष्ट्रीय सभेवर केलेल्या टीकेस तेलगानीं समर्पक उत्तरें दिलीं. तीं त्याचीं भाषणें तेलगाच्या उत्तमोत्तम भाषणात गणलीं गेलीं आहेत हिंदी पुढाऱ्याना उद्देशून सर ऑकलड कॉल्विन यानीं एकदा असे उद्गार काढले होते कीं, "तुम्ही प्रथम राजकीय बाबी मोडून सामाजिक बाबी घ्या सामाजिक दृष्टीनें हीनावस्था पावलेलें राष्ट्र राजकीय दृष्टीनें उन्नतीच्या मार्गास लागून पुढे जाणें शक्य नाहीं." या उद्गाराम तेलग यानीं सन १८८६ मध्यें मुबईस एक जाहीर व्याख्यान देऊन सणमणीत उत्तर दिलें पण तें व्याख्यान जरा विस्तृत असल्यामुळें त्याविषयीं पुढील प्रकरणात स्वतत्र रीतीनें विवेचन करू तदनतर सन १८८८ मध्यें राष्ट्रीय सभा अलाहाबादेस भरावयाच्या सुमारास—कॉल्विन साहेब तेव्हा त्या प्राताचे लेफ्टेनट गव्हर्नर झाले होते—त्यानीं राष्ट्रीय सभेच्या काहीं—ठरावाविषयीं टीका करून जरा नाक मुरडलें होतें ! या टीकेस व त्याच सुमारास लॉर्ड डफरीन यानीं राष्ट्रीय सभेच्या कार्यक्रमावर केलेल्या टीकेस काशीनाथपत तेलग यांनीं अलाहाबादेच्या राष्ट्रीय सभेंत भाषण करून उत्तर दिलें

सन १८८८ च्या नाताळात अलाहाबादेस चवथी राष्ट्रीय सभा भरविण्यांत आली होती. त्या सभेतला विशेष हा कीं त्या सभेचें अध्यक्षस्थान मिस्टर जॉर्ज यूल यांच्या सारख्या थोर व समंजस युरोपियन माणसांस देण्यात आलें होतें यासबधाची लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, यूलसाहेब हे सरकारी वळणातले नसून अगदीं स्वतंत्र बाण्याचे होते व ते व्यापारी पेशांतले होते दुसरें असें कीं त्याची अध्य-

क्षांचे जागेवर सर्व प्रातातील लोकांच्या मतानीं नेमणूक झाली होती. वाच्छा शेट म्हणतात कीं,

" He was the first European who was by the unanimous voice of the Indian Community, elected President of the Fourth Indian National Congress. "

त्याच सुमारास मागें एकदा सागितल्याप्रमाणें लॉर्ड डफरीन यानीं सर्व गोष्टींची चौकशी न करता केवळ अज्ञानानें राष्ट्रीय सभेवर आग पाखडली होती. त्याबद्दल जॉर्ज यूल साहेबानीं अध्यक्ष या नात्यानें केलेल्या आपल्या भाषणात त्या बड्या लाट साहेबाची सणसणीत रीतीनें हजेरी घेतली. याविषयीं वाच्छा शेट म्हणतात,

"It was George Yule who echoed the true sentiments and feelings of India on that regrettable speech of Lord Dufferin, which did no credit either to his statesmanship or to his sense of justice and impartiality as a Viceroy. "

लॉर्ड डफरीन यानीं राष्ट्रीय सभेवर केलेला हल्ला यूल साहेबाना आवडला नाहीं तें ठीकच झालें पण तसलें अनुदार कल्पनानीं भरलेलें भाषण खुद्द ग्लॅडस्टन साहेबाना देखील आवडले नाहीं. याविषयीं डॉ. अॅनी बेझट ह्या बाई " कॉमनवील " च्या एका अकात ( ता २०-८-१९१५ ) असें म्हणतात —

" Lord Dufferin's attack had reached the English Nation and Mr. Gladstone, who three months before, had not known the programme of the Congress, had said speaking at a great meeting, 'It will not do for us to treat with contempt or even with indifference the rising aspirations of this great people.' "

लॉर्ड डफरीन यांच्या किंवा मागें सांगितलेल्या सर ऑकलड काल्विन याच्या भाषणांचा सारांश इकडे देण्याचें कारण नाहीं. त्या दोन्ही भाषणांतील मुख्य मुद्यांची तेलंगांच्या उत्तरावरून सहज कल्पना होऊं शकेल.

अलाहाबाद येथील सदर्हू राष्ट्रीय सभेत काशीनाथपंत तेलंग यानींच पहिला—कायदेकौन्सिले सुधारण्याबाबतचा—ठराव जमलेल्या मंडळीपुढें मांडला. या कौन्सिलांत कोणकोणत्या सुधारणा झाल्या पाहिजेत याविषयींचा खुद्द तेलंगाच्या पूर्वीच्या (१८८५) भाषणातूनच उल्लेख आला आहे त्याविषयीं फिरून सन १८८६ सालच्या व सन १८८७ सालच्या राष्ट्रीय सभामधून बराच ऊहापोह झालेला होता. तेव्हां तेलंगाच्या मते त्यासंबधाने नवीन असे काहीं सांगण्यासारखें नव्हतें. फक्त त्या ठरावांत नमूद झालेल्या हिंदी लोकांच्या मागण्यासंबधानें जो कित्येक बड्या लोकांचा गैरसमज झालेला होता त्यासंबधानें थोडेसे बोलणें जरूर होतें.

तेलंग म्हणाले कीं, आमचे त्या वेळचे एक टीकाकार त्या प्रांताचे (संयुक्त प्रांताचे) लेफ्टेनंट गव्हर्नर हे होते ते एका भाषणांत म्हणाले होते की, राष्ट्रीय सभेनें सुचविलेल्या कौन्सिलच्या सुधारणेमध्यें नवीन असें काहींच नव्हतें तशी सुधारणा कॉंग्रेसचा जन्म होण्यापूर्वीच इतरानीं सुचविली होती असें असेल तर, तेलंगाच्या मतें तें एक कॉंग्रेसला सर्टिफिकिटच मिळाल्यासारखे होईल कारण कोणतीही सूचना एकाच्याच डोक्यातून निघून पुढें येण्यापेक्षा जर ती अनेकांच्या डोक्यातून आणि विचारपूर्वक निघाली असेल तर तो त्या सूचनेंतील दोष नसून गुणच ठरेल! सर ऑकलंड कॉल्विन याच्या मतें कदाचित् तो दोष असेल पण आपल्या मतें तें राष्ट्रीय सभेला तिच्या कामाबद्दल सर्टिफिकिटच दिल्यासारखें होते असें तेलंगानीं सांगितलें

दुसरे टीकाकार हिंदुस्थानचे त्या वेळचे व्हाइसरॉय, लॉर्ड डफरीन साहेब, हे होते त्यानीं थोड्या दिवसापूर्वी "सेंट ॲंड्रयूस"च्या मेजवानीच्या वेळी कलकत्त्यास भाषण करून राष्ट्रीय सभेवर टीका केली होती ती टीका, तेलंग म्हणाले कीं, आपण मित्रत्वाच्या नात्यानेंच केली आहे असे समजू पण त्यांत लाट साहेबाची बरीच गैरसमजूत झालेली दिसत आहे ते आपल्या भाषणात असें म्हणाले होते —

"And now, gentlemen, some intelligent, loyal, patriotic and well-meaning men are desirous of taking, I will not say a further step in advance, but a very big jump into the unknown, by the application to India of democratic methods of Government and the adoption of a Parliamentary

system which England has reached by slow degrees and through the discipline of many centuries. The ideal authoritatively suggested, gentlemen, as I understand, is the creation of a representative body or bodies in which the official element shall be in a minority, who shall have what is called the power of the purse, and who, through this instrumentality, shall be able to bring the British Executive into subjection to their will "

यातील प्रत्येक विधान चुकीचें होतें लॉर्ड डफरीन म्हणाले कीं, आम्ही राष्ट्रीय सभेच्या मुखानें लोकशाही—democratic methods—मागत होतों पण हे म्हणणे अगदी निराधार होते, असे राष्ट्रीय सभेचे मागचे रिपोर्ट पाहिल्यास सहज दिसून आले असते लाट साहेब पुढे म्हणाले कीं आम्ही इग्लडासारखें पार्लमेंट—जे स्वत इग्लडालाच कैक शतकाच्या परिश्रमानें मिळाले आहे तसें—मागत होतो याला देखील राष्ट्रीयसभेच्या कोणत्याच रिपोर्टांत आधार मिळाला नसता या सगळ्यावरून स्पष्ट दिसत होते की डफरीन साहेबानीं राष्ट्रीय सभेचे रिपोर्टच वाचले नव्हते, व त्यानी आपल्या भाषणाची सर्व इमारत ऐकीव माहिती-वर रचिली होती ' लॉर्ड डफरीन म्हणाले की, राष्ट्रीय सभा एक प्रतिनिधि मडळ ( a representative body ) मागत होती, व त्यात सरकारी कामगार अगदी अल्पसख्याक असावेत, पैशाच्या पिशवीच्या दोऱ्या आपल्या हातात असाव्यात व मुख्य ब्रिटिश कार्यकारी मडळ आपल्या तत्राने वागले पाहिजे इतक्या गोष्टी यावयाच्या होत्या पण हे लाट साहेबाचे सगळें बोलणे निराधार होते. राष्ट्रीय सभेने सरकारी वार्षिक बजेट कौन्सिलपुढे आणावे अशी मागणी केली होती. तेवढयाचाच कदाचित् लाट साहेबानी आधार घेऊन आपले वरील भाषण केलें असेल ते काहीही असले तरी साहेब मजकूर यानी केलेल्या विधानाला राष्ट्रीय सभेच्या आरभापासूनच्या कोणत्याही रिपोर्टात आधार मिळाला नसता. राष्ट्रीय सभेनें एकदा नाहीं, दोनदा नाही तर तीनदा म्हटले होते की, कौन्सिलचा एकादा ठराव कार्यकारी मडळास योग्य न वाटल्यास त्यानी तो बाजूस सारावा ! अशा स्थितींत राष्ट्रीय सभेने वरील मार्गे मागणे केले होते असे कसे म्हणता येईल ? या सगळ्या गोष्टीवरून एवढेच स्पष्ट दिसत होते की लॉर्ड डफरीन यानी राष्ट्रीय सभेच्या कार्य-क्रमासबधी पुरी चौकशी केली नव्हती, की तिचे रिपोर्ट वाचण्याची तसदी घेतली नव्हती त्याच्या भाषणावरून एकाने सेकड्याची केलेल्या व्याख्येची व त्यावर

दुसऱ्या एकानें केलेल्या भाष्याची मात्र आठवण होते ती व्याख्या अशी. खेकडा हा एक तांबड्या रंगाचा मासा आहे, व त्याची गति पाठीमागच्या बाजूने असते. व त्यावरील भाष्य असे व्याख्या अगदीं बरोबर आहे, पण इतकेच की, खेकडा हा मासा नव्हे त्याचा रंग तांबडा नसतो, व त्याची गति पाठीमागच्या बाजूनें नसते! तेलंग म्हणाले कीं, या दृष्टांतातील तत्वाप्रमाणें पाहता लॉर्ड डफरीन यानी केलेली टीका बरोबर होती. फक्त इतकेच कीं, राष्ट्रीय सभेने लोकशाही कधीं मागितली नव्हती, प्रतिनिधि मडळ—Parliamentary System—जें इंग्लंडला अनेक शतकानीं मिळालें तसें—मागितलें नव्हतें तिजोरीच्या किल्ल्या किंवा पिशवीच्या दोऱ्या—मागितल्या नव्हत्या व ब्रिटिश कार्यकारी मंडळानें आमच्या तंत्रानें चाललें पाहिजे असेंही केव्हा म्हटलें नव्हतें! तेलंगाच्या भाषणातील हा भाग जशाचा तसा द्यावा हें इष्ट वाटतें. तो असा होता —

"The various charges which His Lordship makes against the Congress are charges which remind me of a certain definition which was once given of a crab; viz that a crab is a red fish which walks backwards, and the criticism made upon that was that the definition was perfectly correct, except that the crab was not a fish, that it was not red, and that it did not walk backwards. Now, I may say that Lord Dufferin's criticism is perpectly correct, except that we have not asked for democratic methods of Government, we have not asked for Parliamentary Institutions which England has got after many centuries of discipline; we have not asked for the power of purse, and we have not asked that the British Executive should be brought under subjection to us.."

लॉर्ड डफरीन पुढें म्हणाले होते कीं,

"I am afraid, the people of England will not be readily brought to the acceptance of this programme, or to allow such an assembly, or a number of such assemblies, either to interfere with its armies, or to fetter and circumscribe the liberty of action, either of the Provincial Governments or of the Supreme Executive."

यांतलें तात्पर्य असे कीं, वरील सारखें मागणें इग्लडचे लोक कबूल करतील असे वाटत नाहीं, व ते लोक कोणत्याही कायदेकौन्सिलास लष्कराच्या कारभारात किंवा प्रांतिक सरकाराच्या अगर वरिष्ठ सरकाराच्या कामात हात घालू देणार नाहींत पण तेलग म्हणाले कीं, राष्ट्रीय सभेनें असलें मागणें कधीं केलें होतें व कोठें ? राष्ट्रीय सभेनें राज्यकारभाराच्या कोणत्याही खात्यासबधाने प्रश्न विचारण्याचा—interpollation—हक्क मागितला होता खरें, पण तो हक्क लष्करी कारभारात गाजविला जाणार नाही असेही तिने प्रथमपासूनच म्हटलें होतें. मग लाटसाहेबाच्या टीकेला आधार काय ? पुढे लॉर्ड डफरीन म्हणाले होते कीं,

"In the first place, the whole scheme is eminently unconstitutional. for the essence of Constitutional Government is that responsibility and power should remain in the same hands, and the idea of irresponsible councils whose members could never be called to account for their acts in the way in which an opposition can be called to account in a constitutional country, arresting the march of Indian Legislation, or nullifying the policy of the British Executive in India, would be regarded as an impracticable anomaly."

जबाबदारी व अधिकार या दोन्ही गोष्टी एकाच्याच हाती असल्या पाहिजेत वगैरे जें वर म्हटले होते, ते तेलग म्हणाले कीं, आपणास कबूल आहे. पण त्याचा व राष्ट्रीय सभेच्या कार्यक्रमाचा सबध काय ? जबाबदारी व अधिकार ह्याची फारकत ( divorce ) करावी असे राष्ट्रीय सभेने कधींच मागितलें नव्हते उलट, खरी जबाबदारी कार्यकारी मडळावरच असली पाहिजे व त्याकरिता कायदेकौंसिलची एकादी सूचना त्याना अव्यवहार्य वाटल्यास ती त्यानीं बाजूस सारावी, असेंच राष्ट्रीय सभेने म्हटले होते थोडक्यात सागावयाचें म्हणजे लॉर्ड डफरीन साहेबांची सर्व टीका अनाठायीं होती त्यांतील विधानांचा व कॉंग्रेसच्या ठरावांचा कांहीं एक संबध नव्हता. साहेबमजकूर यांनीं अपुऱ्या किंवा चुकीच्या माहितीच्या आधारानें, मनांत कोणती तरी एकादी संस्था व तिचा कार्यक्रम कल्पून, त्यावर त्यांनीं टीका केली होती असें उघडच दिसत होतें. अर्थात् ती टीका कॉंग्रेस किंवा तिचा कार्यक्रम याला मुळींच लागू नव्हती.

हें तेलगाचें भाषण उत्तमांपैकीं होते हें मागें सागितलेच पण त्यातला विशेष हा कीं, लॉर्ड डफरीन याच्या टीकेस उत्तर काय द्यावयाचे याचा त्यानीं पूर्वी विचार केलेला नव्हता त्या राष्ट्रीय सभेस सर नारायण चदावरकर हे हजर होते. अर्थात् तेथील खरा प्रकार त्याना माहित होता त्यानीं एकदा मुबईच्या "सोशल रिफार्म असोशिएशन"मध्यें बोलताना सहज सागितलेली हकीकत त्या वेळी हजर असलेल्या एका मित्रानी (रा पा भा. गोठस्कर यानी) आम्हास थोड्या दिवसापूर्वी सागितली ती अशी सन १८८८ मधल्या अलाहाबादेच्या राष्ट्रीय सभेच्या वेळीं तिचे काम चालू असतानाच अध्यक्षाच्या नावाचे काही टपाल आले त्यात काहीं इग्रजी वर्तमानपत्रे होतीं. त्यापैकीं कित्येकात, लॉर्ड डफरीन यानी राष्ट्रीय सभेवर केलेल्या हल्लयासबधाने वादविवाद चालू होता तो वाचून पाहताच मडळीला सहज वाटलें की, लॉर्ड डफरीन याच्या टीकेस खुद्द राष्ट्रीय सभेच्या प्लॅटफॉर्मवरून चोख व अधिकारयुक्त असे उत्तर मिळाले पाहिजे असे ठरताच ते उत्तर कोणी द्यावें याविषयीं चर्चा सुरू झाली जो तो आपले नाव वगळून दुसऱ्याचीं नावे सुचवू लागला याप्रमाणें बरीच वाटाघाट झाल्यावर सर्वाचीच नजर तेलगाकडे गेली व ते नको नको म्हणत असता "ते उत्तर तुम्हीच दिले पाहिजे" अशी सर्व मडळीनी त्याना गळ घातली! तेव्हा मग त्यानी वरील भाषण केले पूर्वी विचार करण्यास फारसा वेळ मिळाला नसताना तेलगानी इतकें उत्तम भाषण केलेले ऐकून आपण अगदी आश्चर्यचकित झालो असे चदावरकरानी म्हटल्याचे आमच्या मित्रानी सागितलें असो त्याच भाषणासबधानें डॉ ॲनी बेझन्ट यानी "कामन वील" पत्राच्या एका ( २०-८-१९१५ ) अकात असा शेरा मारला आहे —

"The Resolution on the reform of Councils was moved by the Hon Mr K. T Telang who in moving it effectively answered Sir Aucland Colvin's and Lord Dufferin's attacks"

तेलगाचे भाषण चालू असताना श्रोते तर तें लक्षपूर्वक ऐकत होतेच, पण त्यानीं डफरीन साहेबाच्या भाषणाला खेकड्याच्या व्याख्येची अगदी समर्पक उपमा देऊन जेव्हा त्या भाषणातील काही भागाचें पृथक्करण चालविलें, तेव्हा तर सर्व मडळींची हंसता हंसता मुरकुडीच वळली! त्या भाषणासंबधानें मिस्टर जॉन ॲडम पुढीलप्रमाणें लिहितात —

"No one who was present at Allahabad when all India was reeking with the exuberant verbosity of the St. Andrew's

Dinner speech can forget how the passage in which Telang compared the remarks of Lord Dufferin on the Congress proposals to somebody's definition of a crab brought down the house, and the way in which the speaker's eye suggested that the fable of the crab might be given a slightly different application".

सदर्हू राष्ट्रीय सभेंत दुसऱ्या एक दोन गोष्टी घडल्या त्यावरून काहीं महत्वाच्या गोष्टींसबधानें तेलग हे किती पूर्णपणें विचार करीत असत व एकदा त्याच्या मनाची खात्री झाल्यावर ते आपलें मत कसें निर्भीडपणें बोलून दाखवीत असत हें स्पष्ट दिसून येते एका बाबतीत तर त्याचा सर फेरोजशहा मेथा याच्याशीं देखील तीव्र मतभेद झाला त्याबद्दल खुद्द मेथा यानी कॉंग्रेसमध्ये असे उद्गार काढले —

" It is always with the greatest regret that I differ from any view which is taken by my friend, Mr. Telang.

इतकेच नव्हे तर आपलें मत बऱ्याच लोकाना पसत पडणार नाही हे त्याना पक्कें माहीत होते, तरी तेलगानी आपल्या सदसद्विवेक बुद्धीस जें पटले तेच बोलून दाखविण्यास कमी केले नाही प्रश्न हत्याराच्या कायद्यासबधाचा होता ठरावाचे तात्पर्य असे होते की, सरसहा सर्वांना हत्यारे वापरण्याची परवानगी असावी, व एकाद्या वर्गाला तशी परवानगी सरकारच्या मनातून देण्याची नसेल तर त्यानी त्याबद्दलचीं कारणें सागितली पाहिजेत हा ठराव—जशाचा तसा—पास व्हावा असें सर्वांनाच वाटत होते. काही थोड्याना तो आहे त्या भाषेत नको होता. तेलग या पक्षातले होते अखेर ठराव होता तसा पास झाला परतु व्यावहारिक दृष्टीनें तेलगानी दिलेली कारणेही विचार करण्यासारखी होतो ती कारणे अशी. ते म्हणाले.—

" As a practical body of men dealing with practical affairs of the administration, we should not be governed by merely sentimental considerations. You cannot deny that there are some classes of people in the country who are turbulent and under the terms of the resolution, as it is framed, every body would be entitled to bear arms. Unless specially debarred

it is quite possible that weapons might go into the hands of the turbulent classes, in which case peaceful people might not find themselves in such a position of security as at present. × × × I cannot agree to throw this burden of stating their reasons upon the responsible executive".

याप्रमाणें तेलगांचें प्रामाणिक मत होतें वास्तविक त्याना लष्करी शिक्षण देणाऱ्या शाळा ( Military Colleges ) पाहिजे होत्या आपल्या देशबाधवांना " व्हालटीअर " होण्याचा हक्क असावा असें त्याना वाटत असे. हत्यारें सर्वांनीं वापरावीं हें खरें, पण कित्येक वर्गांच्या बाबतीत त्यासबधानें काहींतरी नियत्रण असावे इतकेंच तेलगांचें म्हणणें होतें

दुसरा प्रश्न सरकारी हुद्याच्या नोकऱ्यासबधाचा होता. निरनिराळ्या खात्यातील वरिष्ठ जागाकरिता ठरविलेल्या परीक्षापैकीं काहीं विलायतेंत होत असत. तशाच त्या या देशातही ( Simultaneous Examinations ) घेण्यात याव्या असा कॉंग्रेसपुढे ठराव होता. पण त्याच्यापूर्वी या प्रश्नाचा विचार करण्याकरिता सरकारनें एक " Public Service Commission " नेमलें होतें. व त्याचा रिपोर्ट सरकारपुढे येऊन पडला होता त्यासबधाने सरकारचा विचार चालू होता, व थोड्याच दिवसात त्यावरचा सरकारी ठराव बाहेर पडावयाचा होता. तो ठराव बाहेर पडेपर्यत कॉंग्रेसनें समकालीन परीक्षासबधाचा आपला ठराव पास करू नये अशा अर्थाची एक उपसूचना राष्ट्रीय सभेपुढें आली होती तेलगानीं या उपसूचनेला दुजोरा दिला. त्याचें म्हणणें असे होतें कीं, सरकार जर त्याच विषयाचा विचार करीत आहे तर राष्ट्रीय सभेनें आपला ठराव पास करून घेण्याची घाई करू नये. सरकारचा ठराव एकदा बाहेर पडला म्हणजे त्या दृष्टीनें थोडासा विचार करून कॉंग्रेसनें आपला ठराव पास केला तर त्यास साहजिकच चांगली बळकटी येईल. इतकेंही करून राष्ट्रीय सभेचा ठराव सरकारानें मान्य न केल्यास सर्व प्रकरण पार्लमेंट पुढें नेण्याचा मार्ग आम्हास मोकळा आहेच. व्यवहाराच्या दृष्टीनें तेलगांचें म्हणणें बरोबर होतें.

तिसरा प्रश्न कायम जमीनधाऱ्यासंबधाचा (Permanent Settlement) होता. त्या विषयासंबधीं पूर्वी सूचना कोणालाच दिलेली नव्हती. आणि तत्संबधाचा ठराव तिकडच्या तिकडे राष्ट्रीय सभेपुढें आणून कित्येक मडळीच्या मनांतून तो घाई-

घाईनें पास करून घ्यावयाचा होता तेलगांनीं या पद्धतीविषयीं आपली नापसंति दर्शविली आणि सांगितलें कीं हा ठराव सर्व प्रांतिक कमिट्याकडे विचाराकरिता पाठवून त्यांचीं मतें रिपोर्टांच्या रूपानें पुढील सालच्या कॉंग्रेसमध्यें मागवा, म्हणजे राष्ट्रीय सभेच्या ठरावाला अधिकारयुक्तता प्राप्त होईल व त्याला महत्व येईल आज घाईनें पास केलेल्या ठरावास हें महत्व येणार नाहीं.

तेलग प्रत्यक्ष भाग घेऊ शकले अशी ही अलाहाबादची राष्ट्रीय सभाच शेवटची होय. सन १८८९ सालची कॉंग्रेस मुबईस भरण्यापूर्वीच त्याची हायकोर्ट जज्जाचे जागीं नेमणूक झाली होती ते त्या सभेस हजर राहिले होते पण तिच्या कामात त्यांनीं प्रत्यक्ष असा भाग घेतला नाहीं त्या राष्ट्रीय सभेची तयारी करण्याच्या कामीं तेलगानीं शक्य ती मदत केली होतीच त्याविषयीं वाच्छा शेटजी म्हणतात·—

"I must mention here that for ten months before the session was held, he (Mr Telang) had worked exceedingly hard with the Working Committee to make the Congress that eminent success it was."

राजकीय बाबतीत तेलगाच्या प्रत्यक्ष सहाय्याला आपण आचवलों याबद्दल मेथा व वाच्छा अशा उभयताना वाईट वाटणें साहजिक होते वाच्छा म्हणतात —

"To Sir Pherozeshah as to myself, it had always been a subject of profound regret that Mr Telang's elevation to the Bench greatly diminished his political activities of which he had given such a remarkable evidence."

सदहू सहकारी मित्राना असे वाईट वाटणें अगदीं स्वाभाविक होते तसेंच इतर सार्वजनिक कामे करणाऱ्या काहीं गृहस्थानाही वाईट वाटले पण हायकोर्टातील जज्जाची जागा तेलगांनी का पतकरली याचीं कारणें मागील एका प्रकरणात आलीं असल्यामुळें, त्याची पुनरुक्ति इकडे करीत नाहीं.

---

## प्रकरण एकोणचाळिसावे.

# सामाजिक सुधारणा आधीं काय ?



एकोणिसाव्या शतकाच्या शेवटच्या चरणात हिंदुस्थानच्या लोकात जागृति उत्पन्न होऊन ते लोक जेव्हा राजकीय हक्काकरिता चळवळ करू लागले, तेव्हा काही युरोपीयन लोकाची मने अस्वस्थ होऊ लागली व ते संधि मिळेल तशी येनकेनप्रकारेण आपली नापसती प्रकट करू लागले लोकामध्ये जागृति उत्पन्न करण्याचे श्रेय लॉर्ड लिटन याच्या अनुदार व बऱ्याच अशी जुलमी कारकार्दीस दिलें पाहिजे. पण त्या वेळी क्षुब्ध झालेली लोकाची मने शात करून, त्या लोक-जागृतीला इष्ट प्रकारचे वळण देऊन जनतेत राजकीय आकाक्षा उत्पन्न करण्याचें महत्वाचें काम लॉर्ड रिपन यानी केले त्याच्याच उदार धोरणामुळें लोकास राज-कीय चळवळ करण्याचे प्रोत्साहन मिळाले व त्याचे मग राष्ट्रीयसभेच्या स्थापनेंत पर्यवसान झाले, हे मागील काही प्रकरणात सागितलेच आहे अशा वेळी जे बडे अधिकारी लोक आमच्या राजकीय चळवळीवर चागल्या किंवा वाईट हेतूनें हल्ले करण्यास प्रवृत्त होत असत, त्याच्या कोटिक्रमाचे चागले दोषाविष्करण करून ते हल्ले परतविण्याचे काम आमच्या पुढारी मडळीला करणे प्राप्त होतें, व ते त्यानीं चागल्याच रीतीने केले पण हे काम उत्तम रीतीनें करून ज्यानी त्या बड्या अधिकाऱ्याची तोंडें अगदी बद करून टाकली, त्यात काशीनाथपत तेलग याचा नबर फार वर लागेल तेलगानी सर ऑकलड कॉल्विन व लॉर्ड डफरीन यानीं राष्ट्रीयसभेवर केलेल्या टीकेला समर्पक उत्तरें देऊन कसे त्याना गप्प बसविले हें मागच्याच प्रकरणात दाखविले आहे प्रस्तुत प्रकरणात तेलगानी सर ऑकलड कॉल्विन यानी दुसऱ्या एका प्रसगी केलेल्या टीकेला कसे सणसणीत उत्तर दिले हें निर्दिष्ट करावयाचे आहे सन १८८४ साली मि. मलबारीनी आपली "बाल-विवाह व असमत वैधव्य" या विषयावरील दोन पत्रके प्रसिद्ध केल्याचें व त्यावर वर्तमानपत्रातून वादविवाद झाल्याचे मागे एकदा सागितलेच आहे. त्या पत्रकाला उत्तर देताना सर ऑ कॉल्विन यानी, आमच्या पुढाऱ्यानी सामाजिक बाबी सोडून राजकीय चळवळीकडेच सगळें लक्ष दिल्याबद्दल त्याना दोष दिला होता. कॉल्विन साहेब हे व्हाइसरॉय यांच्या कार्यकारी कौन्सिलचे एक मुख्य सभा-सद असल्यामुळे अर्थात् त्याच्या वरील उद्गारांना थोडेंस महत्व होतें. पण तें मत

आपल्यास कबूल नसल्याचें तेलगांनी मि मलबारीना लिहिलेल्या--व वर्तमानपत्रात प्रसिद्ध झालेल्या--उत्तरात पूर्वीच कळविले होतें. पण तो विषय व्यापक स्वरूपाचा व महत्वाचा असल्यामुळे तेलगानीं कॉल्विन साहेबाच्या कोटिक्रमाचे जरा बारीक रीतीने परीक्षण करून त्यातील विरोधाभासाचे चागले आविष्करण करण्याचें ठरविलें व त्यांनी तोच विषय आधारास घेऊन, सन १८८६ च्या फेब्रुवारीमध्ये मुबईस स्टु लि. ॲड सा सोसायटीच्या विद्यमाने चाललेल्या व्याख्यानमालेंत एक व्याख्यान दिले. तें व्याख्यान बरेंच विस्तृत असून त्याने व त्याला जोडलेल्या छोट्या प्रस्तावनेने मिळून चाळीस पाने भरली आहेत त्याचे रूपातर करून इकडे विस्तृत विवेचन करणे शक्य नाही म्हणूनच त्यातील मुख्य मुद्याचे विवरण करून तेलगानी सर ऑ कॉल्व्हिन यास बिनतोड उत्तर देऊन कसे निरुत्तर केले एवढेच दाखविण्याचे योजिले आहे

सर ऑकलड कॉल्विन याचा मुख्य मुद्दा एवढाच होता की, हिंदी पुढारी सामाजिक बाबी सोडून राजकीय चळवळीकडेच—राज्यकर्त्यांना त्याची कामे शिकविण्याकडे—जास्त लक्ष देत होते तेलगाच्या शब्दात सागावयाचे म्हणजे,

"The view has been expressed that we ought to turn our attention to social reform, in preference to the endeavours we were making to teach our English Rulers what their duties were in the Government of the country "

या विषयाचा विचार करताना तेलगानी प्रथम असे विचारले की सार्वजनिक हिताच्या कामात सामाजिक प्रश्न निराळे व राजकीय निराळे असे आधी भाग तरी पाडता येतील काय ? सोयीच्या दृष्टीने कदाचित् तसे भाग पाडता येतील. परंतु तर्कशुद्ध रीतीने तसे भाग पडणार नाहीत. इतकेच नव्हे तर काही प्रश्न प्रथम दर्शनी सामाजिक स्वरूपाचे दिसले तरी पुढे त्यास राजकीय स्वरूप प्राप्त होतें शिक्षणच घ्या शिक्षण हे सामाजिक सुधारणा करण्याला जितके एक पोषक कारण होऊ शकेल तितकेच, किबहुना त्यापेक्षा अधिक पोषक ते राजकीय सुधारणेला साधन होऊ शकेल दुसरा प्रश्न परदेशगमनाचा घ्या. समुद्रपर्यटण ही वस्तुत सामाजिक बाब हिचें कदाचित् प्रस्तुत काळी फार महत्व नसले तरी, ते तेलगाच्या वेळीं होतें. त्या वेळीं तर (१८८५ साली) आमचें प्रतिनिधिमडळ इग्लड मधील आपली

राजकीय कामगिरी करून मुबईस नुकतेंच परत आले होतें. त्यावरून त्या प्रश्नाचें राजकीय दृष्ट्या महत्व उघडच होते. तिसरा प्रश्न बालविवाहाचा घ्या. तो सोडविण्याकरिता जे उपाय सुचविण्यात आले होते, त्यांत फिरून कायदा करण्याचा —State Legislation—सबध येतच होता. म्हणजे त्याला राजकीय स्वरूप आलेच यावरून हे उघडच होत आहे कीं सार्वजनिक हिताच्या दृष्टीनें काहीं काहीं सामाजिक व राजकीय प्रश्न इतके परस्पर निगडित—interlinked—असतात की त्याचे तर्कशुद्ध रीतीने भाग पाडणें शक्यच नाहीं. अर्थात् एक सुधारणा आधी व दुसरी मग हे म्हणणें कदाचित् तात्विक दृष्ट्या निर्दोष दिसलें तरी त्याप्रमाणें व्यवहारात वागून चालावयाचेच नाही.

बरें, राजकीय बाबी सोडून सामाजिक सुधारणेलाच अधिक महत्व द्यावयाचें हें क्षणभर कबूल केलें तरी तसें का करावयाचे? त्याची कारणमीमासा काय हे पाहू. या विषयावर त्या वेळी वर्तमानपत्रांतून जो वादविवाद चालला होता त्यात तेलगाना वरील प्रकारची निवड करण्याची फक्त दोनच कारणें दिसून आलीं. पहिले कारण हें की घरात गुलामगिरी आणि बाहेर राजकीय स्वातत्र्य ह्या दोन परस्पर विरुद्ध गोष्टी आहेत गुलामगिरी म्हणजे अर्थात् आम्ही स्त्रियांना गुलामाप्रमाणें वागवितों, हीच बरें, तेलग म्हणाले की, तात्विक दृष्ट्या वरील कारण बरोबर आहे कारण आम्ही घरातच जर गुलामगिरी चालू ठेविली अगर कोणत्याही तत्वावर तिचे जर समर्थन करू लागलो तर ते तत्व राजकीय स्वातत्र्य मिळविण्याच्या कामी अगदीच निरुपयोगी ठरेल पण या तत्वप्रतिपादनात एक अट असणें जरूर आहे. गुलामाना आपण गुलामगिरीत आहों अशी जाणीव असली पाहिजे व तसें त्यांना वागविणाऱ्याना आम्ही खरोखरीच जुलूम करीत आहो अशी जाणीव असणें जरूर आहे अशी उभयपक्षी जाणीव असल्याशिवाय वरील तत्व लागू होणार नाहीं. पण खरा प्रकार असा आहे काय? आमच्या घरात गुलामगिरी आहे हें कबूल करतो पण ती तुम्हीं समजता तशी गुलामगिरी नसून आम्ही सर्व गतकालाचे गुलाम होऊन बसलों आहोंत! प्रस्तुत वादविवादात—बालविवाह, विधवाविवाहनिषेध वगैरे सबधात—आम्ही ज्या व्यक्तींना गुलाम म्हणून गृहीत धरून चालतों त्याच आमच्या खऱ्या मालक आहेत! आम्ही त्यांच्या पायांतल्या शृखला तोडण्याचा प्रयत्न करीत असतों, पण त्या म्हणतात कीं, हें तुमचें शृखळा तोडणें आम्हाला नको. त्यायोगें तुम्ही प्राचीनकाळापासून चालत आलेली रूढि मात्र मोडीत आहां! खरा प्रकार असा असल्यामुळें प्रस्तुत वादांत गुलामगिरी हा

शब्दच मुळी अर्थशून्य ठरतो. सामाजिक सुधारणेच्या बाबतीत तुम्ही ज्याना गुलाम म्हणता त्याच आमच्या मार्गात मोठ्या अडचणी आहेत. अर्थात् वरील प्रकारची "गुलामगिरी" ही राजकीय स्वातंत्र्याशी विसंगत ठरू शकत नाहीं खरी वस्तुस्थिति अशी आहे. वादविवादाच्या सोयीकरिता आम्ही असें समजू कीं, आम्हाला दोन भिन्न क्षेत्रात सुधारणा करावयाची आहे गुलामगिरी ही दोन्ही क्षेत्रात आहे आणि आम्ही जशी एका क्षेत्रांतली गुलामगिरी घालविण्याचा यत्न करीत आहों, तशीच दुसऱ्या क्षेत्रातलीही गुलामगिरी काढून टाकण्याचा यत्न करीत आहो. या मार्गाला काही आक्षेप घेतां येतील असे वाटत नाही. हा मार्ग सरळ आहे व तो हर्बर्ट स्पेन्सर याच्या तत्वशास्त्राप्रमाणें तर्कशुद्धही आहे.

राजकीय सोडून सामाजिक सुधारणेची निवड करण्याकरिता तेलगाना जें दुसरें कारण दिलेलें आढळून आलें त्याचा आता विचार करू ते कारण हे जें राष्ट्र सामाजिक दृष्टीनें खालच्या पायरीवर आहे तें राजकीय दृष्टीने उच्च पदावर राहू शकत नाहीं निदान तसा इतिहासाचा दाखला नाही तेलग म्हणाले की, याचा अर्थ जर असा असेल की, कोणत्याही देशांत राजकीय तशी सामाजिक सुधारणाही झाली पाहिजे, तर तें म्हणणें आपणास कबूल आहे. पण ऑ. कॉल्व्हिन हे एवढयावरच थाबले नाहीत त्याचे म्हणणें असें की, ज्या देशात सामाजिक दृष्टीने स्थिति असमाधानकारक आहे तो देश राजकीय दृष्टीने उत्तम स्थितीस पोचणार नाही त्या देशात राजकीय प्रगति होणार नाही तेलग म्हणाले की, याला आधार काय ? या म्हणण्याला अन्य देशाचा दाखला मिळत नाही इतिहासाचा मिळत नाही. इतिहासाचा दाखला पाहिला तर तो (वरील विधानाच्या) उलट प्रकारचा मात्र मिळतो. आमच्या देशातील मराठेशाहीचेंच उदाहरण घ्या त्या वेळची सामाजिक स्थिति हल्लीच्यापेक्षा फारशी भिन्न अगर उच्च प्रकारची होती असे नाही बालविवाह त्या वेळीं प्रचारात होता. विधवाविवाहाची चाल प्रचारात नव्हती. स्त्रीशिक्षण अगदीं तुटपुजें (imperfect) होतें सतीची चाल—सार्वत्रिक नसली तरी—अस्तित्वांत होती. तेव्हा मलबारी शेटजींनीं सुरू केलेल्या वादाच्या दृष्टीनें पाहिलें तर लोकांची हल्लींच्यापेक्षां सामाजिक स्थिति मराठेशाहीत अधिक चांगली अशी मुळींच नव्हती. पण राजकीय दृष्टीनें मात्र देशाची स्थिति चागली—किंबहुना संस्मरणीय अशी होती. बरें, त्याच्याहीपेक्षा एक हजार वर्षें मागें जा. तरी तुम्हांस तोच प्रकार दिसून येईल. ख्रिस्ती शकाच्या सातव्या शतकांत हुएन सग

हा प्रसिद्ध चिनी प्रवासी हिंदुस्थानांत येऊन सर्व देशभर फिरून गेला हे सर्व विश्रुत आहे त्याने आपला प्रवासवृत्तात लिहून ठेविला आहे, त्यावरून पाहिल्यास त्या वेळी हिदुस्थानची राजकीय दृष्टीनें स्थिति फार भरभराटीची असून सामाजिक स्थिति हल्लीच्यापेक्षा फारशी चागली होती असे दिसून येत नाही ! त्या वेळीं विधवाविवाहाची चाल प्रचारात नव्हती, असे हुएन सॅग याने स्पष्ट रीतीनें सागितले आहे म्हणजे कॉल्विन साहेबाच्या म्हणण्याप्रमाणे " कौटुबिक गुलामगिरी " ( household slavery ) त्या वेळी अस्तित्वात होती. परतु हर्षवर्धन राजाच्या त्या वेळी चालू असलेल्या कारकीर्दीत उत्तर हिदुस्थानदेशाची व पुलकेशीच्या—त्याच वेळी चालू असलेल्या—कारकीर्दीत आमच्या महाराष्ट्राची स्थिति राजकीय दृष्टीने हीन प्रकारची नव्हती पण कदाचित् कोणी म्हणेल की हिदुस्थानच्या त्या वेळच्या इतिहासाची साधनें अपुरी असल्यामुळे, त्यावर बसविलेली अनुमाने बिनचूक असू शकणार नाहीत तेलग म्हणाले, कबूल ! परतु इग्लडचा इतिहास पहा आणि त्यातूनही सतराव्या शतकातल्या घडामोडीची हकीकत पहा. त्या काळचा इतिहास हॅलॅम व मेकॉले याजसारख्या प्रसिद्ध इतिहासकारानी लिहिलेला आहे तेव्हा त्याच्या विश्वसनीयत्वाविषयी कोणीच शका घेणार नाही. त्याविषयीचा विस्तार इकडे करण्याचे कारण नाही पण त्या शतकात राजाची अनियत्रित सत्ता हळू हळू कमी होत येऊन लोकसत्ता मात्र वाढत गेली हे निर्विवाद आहे म्हणजे इग्लडची त्या काळात राजकीय दृष्टीनें अश्रुतपूर्व भरभराट झाली होती यात शका नाही पण तीच त्या देशाची तत्कालीन सामाजिक स्थिति पहा याबद्दलचेंही वर्णन मॅकॉलेच्या इतिहासात केलेलें आढळून येते त्यातून फक्त दोन बाबीचाच इकडे उल्लेख करतो त्या वेळच्या स्त्रीशिक्षणाच्या स्थितीचे द्योतक असे मॅकॉलेने एक उदाहरण दिले आहे विल्यम ( तिसरा ) राजाची राणी मेरी हिचे इग्लिशचे—लॅटिन, ग्रीक तर राहोतच—( मातृभाषेचे ) ज्ञान किती इयत्तेचे होते ते पहा कोणी एकाने राणीला एक बायबलची प्रत नजर केली त्याच्या मुखपृष्ठावर राणीने स्वत च्या हस्ताक्षरात मारलेला शेरा असा होता " This book was given the king and I at our crownation." हे राणीचें इग्लिश ! याविषयी जास्त लिहिण्याचे कारणच नाही ही स्त्रीशिक्षणाची स्थिति झाली सामाजिक सुस्थितीतील पहिली गोष्ट म्हणजे पति-पत्नीसबध ही गोष्ट जिकडे चागली तिकडची सामाजिक स्थिति चागली हे ओघानेच सिद्ध होते मेकॉले सागतो की, इग्लडात चागल्या सुस्थितीतील कुटुबात देखील त्या

काळीं नवरा आपल्या बायकोला निर्दयपणें मारीत असे! मॅकॉलेचे ( तेलगाच्या व्याख्यानात घेतलेले ) शब्द असे आहेतः—

"Husbands of decent station were not ashamed in those days of cruelly beating their wives."

पण ही गोष्ट सतराव्या शतकातली तेलग म्हणतात—हल्लीची स्थिति पहा इग्लड हा देश प्रस्तुत काळी राजकीय दृष्टीनें अत्युच्च शिखरावर चढलेला आहे याबद्दल कोणीच कसली शका घेणार नाही पण तिकडची सामाजिक स्थिति पहा. स्त्रियाच्या परवशतेवर मिल्लने लिहिलेला ग्रथ तर प्रसिद्धच आहे पण मिल्ल याला इग्लिश लोकानी त्या वेळी वेड्यात काढला होता त्याच्या ग्रथाचा परिणाम इग्लडात अद्यापि पूर्णपणे झालेला दृष्टीस पडत नाही दुसरी गोष्ट तेलगाचे व्याख्यान झाले त्याच सुमारास ( १८८५ ) इग्लडाहून परत आलेल्या आमच्या प्रतिनिधिमडळाने जी तिकडील प्रत्यक्ष पाहिलेली हकीकत सागितली त्यावरून असे स्पष्ट दिसत होते की, तिकडील श्रीमत व गरीब याचे सबध अगदी समाधानकारक नाहीत त्याचप्रमाणे तेलगानी—व्याख्यानाच्या दिवशीच प्रसिद्ध झालेल्या—तारेचा उल्लेख करून म्हटले की आदल्याच दिवशी लडन येथे हाइड पार्क ( Hyde Park ) मध्ये झालेल्या वीस हजार लोकाच्या प्रचड सभेत एकानें स्पष्ट बोलून दाखविले की, सामाजिक सुधारणा—म्हणजे इग्लिश समाजाच्या निरनिराळ्या भागामध्ये समाधानकारक स्थिति उत्पन्न करण्याचे प्रयत्न—लवकर न झाल्यास रक्तपात होईल! इग्लडातली सामाजिक दृष्टीने ही स्थिति चागली म्हणता येईल काय? तिसरी गोष्ट, मेलेल्या बायकोच्या बहिणीशी लग्न करण्यासबधाचा प्रश्न पाहा (marriage with a deceased wife's sister) हा वाद फार फार जुना आहे पण तो तेलगाच्या वेळी मिटला नव्हता त्या कायद्याला मुख्य हरकत घेणारे म्हणजे Bishops, Archbishops धर्मोपदेशकच होते कारण तो प्रश्न धर्ममूलक सामाजिक स्वरूपाचा होता असो याप्रमाणें खुद्द इग्लडची—की ज्या देशाच्या राजकीय उन्नतस्थितीविषयी प्रश्नच नाही—सामाजिक स्थिति आहे, तर देशाची सामाजिक स्थिति चागली असली तरच त्याची राजकीय उन्नति होत असते, या सर ऑकलड कॉल्विन याच्या म्हणण्याला आधार काय? आणि त्याला पोषक असा इतिहासाचा दाखला तरी कोठे आहे? तेलगाचे शब्द असे होते —

" Where, then, is the lesson of History which we are asked to deduce and act upon ? "

वरीलप्रमाणें इग्लडातील सामाजिक वस्तुस्थितीचा उल्लेख करण्यात पर्यायानें आमच्या देशातील स्थिति चांगली आहे असे ध्वनित करण्याचा आपला बिलकूल हेतु नाही असे तेलगांनीं स्पष्ट सागितलें. आमच्यामध्यें सामाजिक दोष अनेक असले तरी ते काढून टाकण्याचे प्रयत्न चाललेच आहेत. परतु सामाजिक सुस्थिति प्राप्त झाल्याशिवाय देशाची राजकीय दृष्टीनें ऊर्जित स्थिति होऊ शकत नाही, हें जें कॉल्विन साहेबांचें प्रमेय, त्याला इतिहासाचा अगर दुसरा कसलाही आधार नाहीं. इतकेच तेलगाचें म्हणणें होतें.

एथपर्यंत " अस्ति " पक्षी ( affirmative )—राजकीय सुधारणेच्यापूर्वी सामाजिक सुधारणा झाली पाहिजे काय, या प्रश्नासबधाने—सर ऑकलड कॉल्विन यांनीं पुढें आणलेल्या कोट्यांचा तेलगानी थोडक्यात विचार केला. त्यानतर त्यांनी " नास्ति " पक्षी ( negative ) आपल्याला योग्य वाटलीं तीं कारणें दाखविलीं तेलग म्हणाले की, मनुष्यस्वभावाचा विचार केला तर असें दिसून येते कीं, जो फायदा किंवा जी सुधारणा फार त्रासाशिवाय, अडचणीशिवाय अगर अल्प आयासाने साध्य होण्याजोगी असेल, तिलाच मनुष्य प्रथम हात घालतो. यात अन्य सुधारणेच्या आवश्यकतेस अगर तत्प्रीत्यर्थ कराव्या लागणाऱ्या श्रमाचा प्रश्न नाहीं. सुधारणा ही—मग ती कोणत्याही बाबतींतील असो—सदैव इष्टच आहे; व प्रत्येक बाबतींतील सुधारणेला कमी अधिक श्रम हे करावे लागणारच. सर्वच बाबतींतील सुधारणाना एकदम हात घालावा की प्रथम काहीं सुधारणा हातीं घ्याव्या व त्या आवाक्यात आल्यावर दुसऱ्यांना हात लावावा, एवढाच काय तो प्रश्न असतो. अनेक सुधारणाना एकाच काळीं हात घालण्याला मनुष्याच्या अगीं असामान्य कार्यक्षमता, विशाल बुद्धि वगैरे गुण असावे लागतात. तसे गुण महाराष्ट्रात पाहू गेल्यास आपणास फक्त न्या. रानड्यामध्यें दिसतात असें तेलगानीं त्या सभेंत प्राजलपणें कबूल केलें. तें सामर्थ्य आपणांसारख्यांत नाहीं असें त्यानीं सागितलें. आपणांस सामाजिक सुधारणाही पाहिजे व राजकीय सुधारणाही पाहिजे. फक्त आपणांमध्यें जें सामर्थ्य आहे त्याचा कितवा हिस्सा कोणत्या सुधारणेला वाहावा एवढाच प्रश्न आहे. त्या दृष्टीनें विचार केला म्हणजे आपल्यामधील सामर्थ्याचा मोठा हिस्सा राजकीय सुधारणेला द्यावा असें आपणांस वाटतें

असे तेलगानीं सांगितले. याची त्यांनी जी कारणें सांगितली तीं खरोखरीच विचार करण्यासारखी होती. अशा प्रसगी तेलग फक्त समाजसुधारकानाच “ सुधारक ” ही सज्ञा देत नसत. कोणत्याही बाबतीत श्रमपूर्वक पुढे पाऊल टाकणाराला ते सुधारक म्हणत असत त्या अर्थीच त्यानी या व्याख्यानांत सुधारक ( army of reform ) हा शब्द वापरला होता. असो. ते म्हणाले की, समजा की सुधारक सेनेला दोन विरुद्ध बाजूच्या दोन शक्तीशी ( forces ) लढावयाचे आहे. किंवा याहीपेक्षा समर्पक दृष्टात म्हणजे समजा की त्या सैन्याला दोन बाजूचे दोन किल्ले ( एक राजकीय व दुसरा सामाजिक ) घ्यावयाचे आहेत. एका बाजूच्या किल्ल्यात अत्यत सुधारलेले, सनदशीर रीतीने भाडणारे, वचनबद्ध असलेले असे लोक आहेत, व दुसऱ्या बाजूच्या किल्ल्यात फार शिक्षण न घेतलेले, परंपरेला फार मानणारे, रूढीलाच देव समजणारे व काहीसे दुराग्रहानें पीडलेले असे लोक आहेत. अशा स्थितीत सुधारकसेनेला कोणता किल्ला शीघ्रतर हस्तगत करून घेता येईल ? राजकीय सुधारणारूप किल्ला, वरील सैन्याला लवकर घेता येईल हें उघडच आहे. अर्थात् त्या किल्ल्याकडे मोर्चा फिरविणे हेच त्या सैन्याला अधिक सोयीचें होईल

दुसरे एक कारण आहे, राजकीय बाबतीत वादविवादाचा, तर्कपद्धतीचा, उपयोग होण्यासारखा असतो त्यायोगे प्रतिपक्ष्याला आधार दाखवून व प्रमाणें देऊन त्याची खात्री करण्याचा मार्ग मोकळा असतो. आणि प्रतिपक्षी निरुत्तर झाला म्हणजे तो आपल्याला लवकर वश होण्याचा सभव असतो राजकीय बाबतीत सर फिट्सजेम्स स्टीफनसारखे कट्टे ॲंग्लोइडियन देखील प्रतिपक्ष्याशी वादविवाद करावयाला व चर्चा करावयाला तयार आहेत, आणि या रीतीने हिंदुस्थानच्या लोकानी जर स्वतत्र सस्था मागितल्या तर त्या त्याना देण्यास स्टीफनसाहेब कबूल आहेत असे कार्यकर्ते गृहस्थ आम्हास पाठराखे असल्यास तर्कशुद्ध वाटाघाटीने आमचे काम झाल्याशिवाय राहणार नाही.

पण उलट सामाजिक बाबतीत या पद्धतीचा काही एक उपयोग होणार नाहीं. येथे लोक मनोवृत्ति, पूर्वपरपरा, रूढि वगैरे गोष्टीना वश झालेले असतात इकडे तर्कशास्त्राचा किंवा वादविवाद करून खात्री करण्याच्या मार्गाचा उपयोग फार कमी होत असतो या पद्धतीचा कदाचित् उपयोग होईल. पण तो गौण प्रकारचा उपयोग होईल. लोकमत तयार करून त्याच्या मनोभावना बदलणे म्हणजे हे काम अर्थात् कालावधीचे असते.

राजकीय बाबीकडे जास्त लक्ष देणें कां जरूर आहे याचे एक तिसरें कारण आहे. या बाबतींत आम्ही सर्व हिंदु, मुसलमान, पारशी, ख्रिस्ती वगैरे लोक एक होऊ शकतो ही केवळ कल्पना नसून सगळ्या मडळीनी याप्रमाणें एकत्र होऊन एकजुटीने राष्ट्रीय सभा स्थापन केली आहे, व तिचे काम उत्तम रीतीने चाललें आहे याचे मुख्य कारण म्हणजे सर्वांचींच गाऱ्हाणी एक, अडचणी सारख्या; उपाययोजनाही तीच, इकडे पूर्वपरपरेचा किंवा रूढीचा सबध येत नाही, अर्थात् सर्वांचे एकमत होण्याला उशीर लागत नाही, म्हणजे आपले ध्येय लवकर गाठणें अधिक सोपे सामाजिक बाबतीत या सर्वच गोष्टी उलट, त्यात जातीचा, धर्माचा, प्राताचा विचार केला पाहिजे. यात रूढीचें व परपरेचे प्राबल्य जास्त सारखेच उपाय सर्व बाबतीत उपयोगी पडत नाहीत. अर्थात् एकमत होणे कठीण. या सर्व कारणाकरिता आपला मुख्य हेतु लवकर साध्य होणें शक्य नाही.

राजकीय बाबतीत एकमत होण्याची, एकोपा करण्याची, एकमेकाविषयी सहानुभूति वाटण्याची सवय झाली म्हणजे त्यायोगे सामाजिक सुधारणेलाही सहाय्य होण्याचा सभव असतो राजकीय बाबतीत आम्हांला एकोप्याने वागण्याचा, क्षुल्लक मतभेद विसरण्याचा, प्रतिपक्ष्याची समजूत काढण्याचा धडा मिळतच आहे त्याचा आपणास सामाजिक प्रश्न सोडविताना उपयोग होणारच व आम्ही तसा उपयोग करणारच. राजकीय स्वातत्र्य मिळाले म्हणजे सामाजिक बाबतीतही त्यापासून पुढे पाऊल पडण्यास मदत झाल्याशिवाय राहात नाही ही केवळ कल्पना नव्हे याला ऐतिहासिक आधार आहे सर हेनरी मेन यानें एके ठिकाणी म्हटलें आहे की, हल्ली ब्रिटिश सरकारच्या कोर्टांतून जे हिंदु लॉचे खटले चालविण्यात येतात त्यात जो एक प्रकारचा कृत्रिमपणा दिसून येतो, जो लवचीकपणाचा अभाव आढळून येतो तसा ब्रिटिशसत्तेपूर्वीच्या अमदानीत नव्हता पेशवाईचा काल म्हणजे केवळ अनुदार किंवा सकुचित कल्पनाचा द्योतक असें सामान्यत मानण्यात येत असतें. पण तें सर्वांशीं सत्य नाही. त्या कालात देखील परिस्थितीप्रमाणें काही काहीं बाबतींत जनतेंत हळू हळू उदार भावना जागृत करण्याचें काम—liberalising process—चालूच होते. तें इतके की ते पाहून हल्लीच्या पिढीतील काहीं लोकाच्या तोंडास पाणीच सुटेल! त्यावेळचे प्रसिद्ध शिपाईगिरी गाजविलेले व मुत्सद्दी गृहस्थ परशुरामभाऊ पटवर्धन याची गोष्ट सर्वांनाच श्रुत आहे. त्याची अत्यत प्रिय अशी तरुण व गतभर्तृका कन्या होती. तिचा पुनर्विवाह लावून द्यावा असा भाऊचा बहुतेक निश्चय झाला होता. त्याला प्रसिद्ध रामशास्त्री प्रभुणे यांची—फार काय पण खुद्द काशीच्या

पंडिताची देखील–समंति होती. परतु जवळपासची आप्तमडळी रूढीच्या मगरमि-ठीनें इतकी बद्ध झाली होती कीं त्यांच्यानें भाऊंच्या कृतीस रुकार देववेना ! सबब त्यांना आपला स्तुत्य बेत रहित करावा लागला ! परंतु पेशवाईच्या काला-तील एका प्रसिद्ध पुरुषाच्या डोक्यात अशी उदार भावनाप्रेरित कल्पना उत्पन्न व्हावी व तिला शास्त्री पडितांची अनुमति मिळावी या गोष्टी नि सशय लक्षात ठेवण्यासारख्या आहेत. त्याचप्रमाणें सवाई माधवरावाच्या लग्नाच्या वेळीं हिंदु-मुसलमान पाहुण्याचे एका ठिकाणी व एकाच वेळी भोजनसमारभ होणें हीदेखील सस्मरणीय गोष्ट आहे. तसेच पेशवे व नानाफडणवीस यानी बरोबरच्या मडळीसह प्रसिद्ध बक्षीबहाद्दर जिवबा दादा बक्षी केरकर ( सारस्वत ब्राह्मण ) याचे घरीं भोजन करणें व बाळाजी बाजीराव पेशवे यानी देशस्थ ब्राह्मण जातीत एका कन्येशीं विवाह करणें या गोष्टी काय सुचवितात बरें ? या सर्व गोष्टींपासून तेलग असा निष्कर्ष काढतात की, पेशवाई आणखी काहीं कालपर्यंत राहती, तर हल्लीं ज्या प्रश्नांमुळें सरकार किंवा लोक यामध्यें रणें माजलीं आहेत त्यापैकीं बरेचसे प्रश्न आपोआप बिनबोभाट सुटले असते तेलगाचे शब्द असे आहेत —

"I am inclined strongly to draw the inference, which I have held for a long time that if Peshva rule had continued a little longer, several of the social reforms which are now giving us and the British Government so much trouble would have been secured with immensely greater ease."

यासबधाचा—पेशवाईतील सामाजिक स्थितीविषयींचा—ज्याला विस्तार पाहावयाचा असेल त्याना तो तेलगाच्या ( Gleanings from Maratha Chronicles ) निबधाचे जे मागील एका प्रकरणात रूपातर दिले आहे त्यात मिळेल.

तेलग म्हणाले की, आता एकाच मुद्याविषयीं खुलासा करावयाचा राहिला तो मग थोडक्यात त्यानीं केला सर ऑकलड कॉल्विन यांनीं प्रस्तुत विषयावर जे उद्गार काढले होते त्यांवरून त्यानीं असे गृहीत धरलेलें दिसत होते की, त्यावेळचे लोकनायक आपलें सगळें लक्ष राजकीय चळवळीकडेच लावीत व ते सामा-जिक सुधारणेची केवळ उपेक्षाच करीत असत. पण खरा प्रकार तसा नव्हता.

आतां कॉल्विन साहेबासारख्याचा तसा समज होणें संभवनीय होतें हें कबूल केलें पाहिजे. कारण एक तर लोकसमाजात काय खळबळ चाललेली असते याचें ज्ञान सरकारी अधिकाऱ्याना वरवरचेच—बाहेरून होत असतें दुसरे, राजकीय बाबीचा जसा वर्तमानपत्रातून, प्लॅटफार्मवरून वगैरे ऊहापोह होत असतो तसा सर्वच सामाजिक बाबीचा होत नसतो निदान तेलगाच्या वेळी तरी तो होत नसे अर्थात् याबद्दलची पूर्ण माहिती सरकारी अमलदाराना असणें सभवनीय नव्हते, त्यामुळें त्यावेळी सामाजिक सुधारणेच्या बाबतीत पुढाऱ्याचे काय काय प्रयत्न चालले होते, याचे यथार्थ ज्ञान कॉल्विन साहेबाना नव्हते हें उघडच दिसत होते तेलग म्हणाले की आम्ही म्हणजे सामाजिक बाबतीत फार पुढे पाऊल टाकले आहे असें नव्हे झालेली प्रगति अल्पच होती. राजकीय बाबतीत तरी—परिस्थिति अधिक अनुकूल असूनही—आमची फार मोठी प्रगति झाली होती असे नाही पण सागावयाचे एवढेच की पुढाऱ्यानीं सामाजिक सुधारणेकडे दुर्लक्ष केलेले नव्हते. कसे ते पहा. सामाजिक सुधारणेची मुख्य बाब व मुख्य साधन म्हणजे स्त्रीशिक्षण होय त्या बाबीला तेलग तर जास्त महत्व देत होते. कारण तें एक अस्त्र आमच्या हातात आले म्हणजे त्याचा दुसरे बरेच सामाजिक प्रश्न सोडविण्याच्या कामी उपयोग होईल असें त्याचे मत होते स्त्रीशिक्षणाच्या बाबतींत आमच्या लोकानी थोडेंसे तरी पुढेच पाऊल टाकले होते तेलग म्हणाले की, आमच्या पारशी बधूनी परमपूज्य दादाभाईच्या नेतृत्वाखाली स्त्री-शिक्षणाच्या बाबतीत जी स्तुत्य प्रगति केली होती ती पाहिली म्हणजे आपण हिदूनी केलेल्या प्रगतीच्या अल्पत्वाबद्दल लाज वाटते तेलगाचे म्हणणे की, आम्ही अगदीच मागें राहिलो होतो असे नाही. आम्हीदेखील त्या दिशेने प्रयत्न चालविलेच होते हें निदान स्टु लि ॲड सा सोसायटीच्या सभासदास तरी माहीत होतेच. सोसायटीच्या शाळातून येणाऱ्या मुलीची सख्या वाढत होती शाळेस इग्रजी वर्ग जोडण्यात आले होते तेलग म्हणाले, एवढयाने म्हणजे आम्ही स्वर्ग गाठले असे नव्हे पण अल्प का असेना, लोकाना दिसण्यासारखी आमची प्रगति झाली होती असें म्हणण्यास तरी हरकत नाहीं. तसेच मुसलमान बधूचेही प्रयत्न पहा असें ते म्हणाले मुसलमान लोक प्राय· आधुनिक सुधारणाना विरुद्ध असतात असें मानण्यात येत असतें. परंतु प्रसिद्ध बॅरिस्टर बद्रुद्दीन तय्यबजी व त्याचे काही मित्र यानीही मुसलमान लोकामध्ये सामाजिक सुधारणेकरिता खटपट चालविलीच होती या सगळ्याचा अर्थ एवढाच की पुढाऱ्यानीं सामाजिक बाबतीत देखील शक्य

ती चळवळ चालविलीच होती. दुसऱ्याही बाबी पहा. विधवाविवाहाची त्याच्याही वीस वर्षापूर्वीच्या मानानें, बरीच प्रगति झाली होती. जातिबधनें शिथिल होत चालली होती परदेशगमनाला आता फारसा विरोध उरला नव्हता. मुलामुलींच्या विवाहाच्या वयाची मर्यादा हळूहळू वाढत चालली होती. या सर्व गोष्टीचा विचार केल्यास पुढारी लोक सामाजिक सोडून राजकीय सुधारणेच्याच मार्गे लागले होते असें म्हणतां येत नव्हते. व त्याना तसा दोषही देता येत नव्हता तेलगाचे उद्गार असे होते —

" And all these facts being such as I have pointed out, I venture to repeat that we cannot fairly be censured for giving too exclusive attention to political at the expense of social reform.

शेवटी तेलगानी सागितले कीं सार्वजनिक हिताच्या दृष्टीनें सुधारणाक्षेत्राचे सामाजिक व राजकीय असे दोन निराळे भाग पाडताच येत नाहींत दोन्ही दिशानी सुधारणा झाली पाहिजे. (The two must go hand in hand) दोन्हीमध्यें कदाचित् प्रगतीचें सारखेंच प्रमाण रहाणार नाहीं. एकात प्रगति जास्त होईल, दुसऱ्यात कमी होईल पण मागे सागितल्याप्रमाणें सर्व गोष्टींचा विचार केल्यास राजकीय बाबीकडेच आम्हीं आपल्या सामर्थ्याचा जास्त हिस्सा दिला पाहिजे असे जरी आहे तरी सामाजिक सुधारणेविषयींही मनात कळकळ बाळगिली पाहिजे; आणि हाच सिद्धात सर्वांस मान्य होईल असें वाटतें. तेलग म्हणाले,

" We must and ought to devote the greater portion of our energy to political reform, but so as to keep alive a warm sympathy for social reform. To one like myself × × this conclusion is not only a correct one, but almost the only one possible. × × Let us then all devote the bulk of our energies to political reform. Let us keep alive our sympathies with social reform and those who undertake them and let us all help them to the extent of our powers.

At all events, for God's sake, let us not set ourselves in antagonism to social reform. In this way only, shall we best discharge the whole of the duty which lies upon us, the duty of reform in social as well as political matters. For I must repeat that in my judgment they are both duties and must both be fairly attended to and discharged according to our circumstances and opportunities"

तेलगांची ही विचारसरणी आमच्या अल्पसमजुतीप्रमाणें तर्कशुद्ध व शास्त्रशुद्ध असल्यामुळें ती अगदीं निर्दोष होती. त्यात त्यानी आपल्या स्वत च्या वर्तनाचेही स्पष्टीकरण केलें असें स्पष्ट दिसत होतें

तेलगांच्या व्याख्यानांवर मग वर्तमानपत्रातून–इग्लिश व देशी–बरीच टीका झाली त्यात कित्येक युरोपीयन व त्यांच्याच मताची "री" ओढणारे काहीं हिंदी लोक असून त्याना तेलगांनीं राजकीय सुधारणेची तरफदारी केलेली पसंत पडली नाहीं व सामाजिक सुधारणा आधी झाली पाहिजे असेच त्याचे मत पडलें. दुसऱ्या बाजूचे–नेटिव्ह ओपिनियन वगैरे—जे काही टीकाकार होते त्याना तेलगांनी राजकारणाची केलेली तरफदारी पसंत पडून आणखी त्यांच्या व्याख्यानांत सहज आलेले "along the line of least resistance" शब्द त्याना मिळाले आणि त्यांच्या जोरावर त्यानी सामाजिक सुधारणेचें काम पुढे ढकलण्याबद्दलचें—तेलगांच्या नावाच्या आधारावर–प्रतिपादन चालविलें, वस्तुत. दोन्ही बाजूच्या टीकाकाराचें प्रतिपादन चुकीचें होतें. आता तेलगांच्या व्याख्यानाचा मुख्य उद्देश व त्यात दोन्ही ( राजकीय व सामाजिक ) प्रकारच्या सुधारणांच्या आवश्यकतेचें केलेलें समर्थन, हीं पुष्कळाच्या लक्षांतच आलीं नाहींत! हा सर्व प्रकार सर फेरोजशहा मेथा यांनीं "बॉबे गॅझेट" मध्यें ( इदुप्रकाश, ता. १५–३–८६ पहा. ) उघडकीस आणून तेलगांचा खरा हेतु काय होता हें विशद करून सांगितलें. मेथांनीं आपल्या पत्रांत म्हटलें कीं,

"It was not to oppose or let alone social reform ( no body is more eager about it than Mr. Telang himself ) but it was to combat the insidious advice

given by those who do not look with favour upon the aspirations of natives to take a larger share in the administration of their country, and which is now repeated in his letter by Mr. Dosabhai (Framji in the garb of their own particular friend and candid adviser, that political advancement should stand still like Joshua's Moon in Ajalon, till Hindu society had reformed itself."

" लघुतम प्रतिकाराच्या " मार्गाचें निमित्त पुढें करून सामाजिक बाबतीत काहीच हालचाल न करणाऱ्या टीकाकाराच्या माहितीकरिता तेलगाच्या व्याख्या-नासंबधाचा खरा प्रकार कै सर नारायण चदावरकरांनीं जनतेपुढें माडला. पण त्याचे विवरण मागील एका प्रकरणात येऊन गेलें असल्यामुळें त्याची येथे पुन-रुक्ति करीत नाही.

वरील दोन्ही प्रकारचे टीकाकार वगळले तर तेलगाचें व्याख्यान बाकी सर्व मड-ळीना आवडलें याबद्दल शकाच नाही. त्याबद्दल फक्त इदुप्रकाशाचा (ता. १–३–८६) व केसरीचा ( ता. २–३–८६ ) इतकेच अभिप्राय येथे देतों —

इदुप्रकाश म्हणतो —" तेलग यानी फार सुरस व्याख्यान दिलें. + + सगळा दिवाणखाना श्रोत्यानीं अगदीं भरून गेला होता + + व्याख्यानकार सुमारें चार घटका एकसारखे अस्खलित बोलत होते वक्ते उत्तम असून विषय अत्यत अगत्याचा असल्याकारणानें सगळी मडळी चित्रासारखी स्वस्थ बसून भाषण लक्षपूर्वक ऐकत होती. "

केसरी म्हणतो —" काशीनाथपताची वाक्शैली, विचारसरणी, कोटिक्रम, वाचनव्याप्ति, व विनय याविषयीं येथें पुनरुक्ति केली पाहिजे असे नाही त्याच्या अगचे हे गुण सर्वत्र प्रसिद्ध झाले आहेत. त्यांचें भाषण जिभेला जसे द्राक्ष तसें कानाला लागतें. तें ऐकताना मजुळ शब्द करीत वाहणाऱ्या स्वच्छ जलप्रवाहाची आठवण होते ! त्याच्या प्रतिपक्ष्यांना सुद्धां त्याचें बोलणें लक्ष देऊन ऐकावेंसें वाटतें. सोमवारच्या ( ता. २२–२–८६ ) व्याख्यानांत हे गुण विशेष प्रतिबिंबित झाले होते असें ज्यांनीं तें खुद्द ऐकलें आहे त्यांचें मत आहे. "

नाशिकचे रा. ब. प्रो. पाध्ये हे तेलगांच्या सदहू व्याख्यानास हजर होते. त्यांनीं ह्या व्याख्यानाच्या योगानें आपल्या मनावर ( deep ) दृढ परिणाम

झाल्याचें आम्हांस थोड्या दिवसांपूर्वी सांगितलें. विशेषत. तेलंगांनीं त्याप्रसंगीं केलेली विषयाची माडणी ( marshalling of facts ) पाध्याच्या मतें अप्रतिम होती त्यांची पद्धत अशी असे की, त्यांनीं प्रथम प्रतिपक्ष्याच्या कोटिक्रमांतील हळूहळू एकामागून एक दोष दाखवून त्याला हतबल करावयाचा व मग ऐतिहासिक प्रमाणें व दृष्टात देऊन त्यानीं आपल्या एकावर एक अशा इतक्या कोटि ( arguments ) चढवून द्यावयाच्या कीं, कसलाही प्रतिपक्षि असला तरी तो चीत झालाच पाहिजे ! इतके सर्व करून पुन्हां गमत ही की, त्या सबध व्याख्यानांत प्रतिपक्ष्याला झोबेल असा एकही शब्द नव्हता ! ! न्या. रानड्याचाही जवळ जवळ असाच प्रकार असे. परतु त्यांच्याही भाषणात एकादे वेळीं एकादा रागाचा शब्द मिळेल. पण तेलगांच्या भाषणात तोही नसावयाचा ! असें रा ब पाध्ये यानी सागितले.

---

## प्रकरण चाळिसावें.

# कायदेकौन्सिल व म्युनिसिपालिटी.



काशीनाथपत तेलग याचा मुबईतील कोणकोणत्या सार्वजनिक राजकीय सस्थाशी सबध होता व त्यांनी कोणकोणत्या चळवळीत भाग घेतला होता, हें मागील काही प्रकरणांत सागितलें. आता त्यांनी कायदेकौन्सिलमध्ये व म्युनिसिपालिटीमध्यें केलेल्या कामासबधाने थोडेंसें लिहावयाचे आहे. काशीनाथपतांची सर जेम्स फर्ग्युसन यानी सन १८८४ मध्ये मुबईच्या कायदेकौन्सिलमध्यें नेमणूक केली त्या कौन्सिलमध्यें नेमले गेलेले युनिव्हर्सिटीचे पदवीधर असे तेलगच पहिले होते. त्याच्या पूर्वी कोणी पदवीधर नेमले गेले नव्हते. तेलग जे त्या वेळीं कौन्सिलचे सभासद झाले ते, त्यांची नेमणूक नतर लॉर्ड रे यांच्या कारकीर्दीत पुन्हां दोन वेळां झाल्या कारणानें, पुढें पांच वर्षे होते. असा मान फार थोड्यांना मिळतो मग सन १८८९ सालीं ते हायकोर्टचे जज्ज झाले. काशीनाथपतांची कौन्सिलांत प्रथम नेमणूक झालेली समजतांच सर्वांना आनद झाला व त्याप्रमाणें सर्व इग्लिश व देशी वर्तमानपत्रांतून तेलगांविषयीं अभिनंदनपर लेख आले. त्यांपैकीं आम्ही इकडे फक्त "केसरीं"तील तेवढा एक लहानसा उतारा देतों·—

" रा. रा. काशीनाथपंत तेलंग यांस सर जेम्स फर्ग्युसन हे " ऑनरेबल " करणार हें ऐकून आम्हास फार संतोष होतो. आमच्या समाजात मि तेलंगहून या मानास सध्यां पात्र असा दुसरा इसम नाही हें कोणीही कबूल करील मि. तेलंग याच्या आजपर्यंतच्या लौकिकावरून पाहता त्यांना हा मान मिळाल्यानें या इलाख्याचा पुष्कळ फायदा होईल असे आम्हांस खात्रीने वाटते " ( केसरी ता. २६–२–८४ ).

तेलंग कौन्सिलचे सभासद होते त्या मुदतीत बरेच कायदे पास झाले पण त्यात " लॅडरेव्हिन्यु कोड " दुरुस्तीचा १८८५ चा कायदा, मुबई ( शहर ) म्युनिसिपालिटीचा १८८८ चा कायदा, खेडेगावातील आरोग्यासबधी व्यवस्था ( Village Sanitation ) व मिठाचा कायदा, हे मुख्य होते यापैकी प्रत्येक कायद्याच्या मसुद्यावरील वादविवादात तेलगानी भाग घेतला होता व त्यात त्याचें नेहमी धोरण शक्य तेवढें नोकरशाहीची सत्ता कमी करून ती लोकाच्या हातात देण्याकडे असे. इतकेच नव्हे तर ते आपलें म्हणणें कौन्सिल पुढे माडताना सरकारी बड्या अधिकाऱ्याच्या निर्भीडपणें चुका दाखविण्यास यत्किंचितही कमी करीत नसत.

लड रेव्हिन्यू सबधाचे बिल पुढे आणताना नामदार पीलसाहेबानी पूर्वीच्या राज्यातील जमीनधाऱ्याच्या पद्धतीशी हल्लीच्या पद्धतीची तुलना करून त्यापेक्षा पुष्कळच अशानें ही श्रेष्ठ प्रकारची आहे असे आपल्या भाषणात म्हटले होतें. ही तुलना तेलगाना रास्त वाटली नाही व त्यानीं ( प्रथम वाचनावरील ) आपल्या भाषणांत पुढीलप्रमाणें आपली नापसती व्यक्त केली·—

" With reference to the comparisons made by the Hon. Mr. Peile between the pressure of the land revenue under British Rule as compared with that under native rule, there might be said something on the other side. × × × I should say that the British Government ought in this matter to rise superior to the practice of the native government, during the periods to which the Hon'ble Member has referred. In

those periods, according to my understanding of the subject, the native governments were themselves deviating from their own traditions of past times, and the system of those degenerate days should not be pointed to for comparison, for the British Government would not be worthy of its position, unless it rose superior to the system prevailing in those days. A fairer comparison would be one with the native governments as they were in times much earlier than those to which the Hon'ble Member has alluded "

त्याच सुमारास मि हार्टडेव्हीस नावाच्या दुसऱ्या एका सिव्हिलियन अधिकाऱ्यानें मुंबई इलाख्यांतील जमीनधाऱ्याच्या पद्धतीसबधाने आपले अनुभव व सर्वेखात्याच्या जुलमी कृतीविषयी आपणास असलेली माहिती एका लहानशा पुस्तकरूपानें (pamphlet) (खासगी रीतीनें) प्रसिद्ध केली होती. त्याचा तेलगानी उपयोग करून हार्ट डेव्हीसचे शब्दच कौन्सिलमध्ये सागितले. ते असेः

" The well-meaning Government resolution which enacted that an enhancement should only bear a certain percentage on the old revenue, has not, as far as the cultivator can see, been very productive of results nor has it operated as a binding check on the operations of the Survey. The fact is that every separate department—and this is one of the chief causes of the unpopularity of the action taken by the Forest Department—has in the nature of things a tendency to try to justify its existence and expenditure by increased returns, a tendency, I may observe, accentuated in last year's General Administration Report."

सदरील बिलाच्या दुसऱ्या वाचनाच्या वेळीं तेलगांनी बऱ्याच उपसूचना आणल्या त्यांपैकीं कांहीं पास झाल्या, कांहीं झाल्या नाहींत जमिनीचे पुनर्वर्गीकरण करून धारा जास्त न वाढविण्याबद्दल तेलगाची एक उपसूचना होती तिला पीलसाहेबांनीं हरकत घेतली. तेलग आपलें म्हणणें सोडीनात. तेव्हा अध्यक्ष लॉर्ड रे यांनीं तेलगांना आश्वासन दिलें की,

" Not the slightest apprehension need be entertained that in leaving the clause as it stands now reclassification will be an element in future revisions of assessment."

गव्हर्नरसाहेबांनी आश्वासन दिलें कीं, धाऱ्याची पुन आकारणी करण्याच्या वेळीं पुनर्वर्गीकरण करणार नाही. पण यावर तेलगानी स्पष्ट म्हटलें की, हें आश्वासन त्या वेळच्या ( लॉर्ड रे यांच्या ) कारकीर्दीत चालेल पुढची वाट काय ? तेलगानी म्हटले,

" The assurance is quite sufficient so long as the present Government is in office But we cannot be sure what may be done by their successors."

पीलसाहेबांनी सांगितलें की, आमच्या म्हणण्याला "सेक्रेटरी ऑफ स्टेट"ची मजुरी आहे. पण तेलगानी त्याना पटकन् पुढील उत्तर देऊन त्याचें तोंड बद केले.

" I cannot admit that the Secretary of State's orders are always final in Indian Administration. Sir Charles Wood in 1862 directed a Permanent Settlement throughout the country and we know the result "

सन १८६२ मध्यें ( सेक्रेटरी ऑफ स्टेट ) सर चार्लस वुड यांनी सर्व हिंदुस्थान देशांत कायमधाऱ्याची पद्धत सुरू करण्याबद्दल मजुरी दिली होती. पण तिचें पुढें काय झालें ? याप्रमाणें टीका करून तेलगानी सदहू बिलांत कांहीं सुधारणा करून घेतल्या.

तदनतर कांही दिवसानी मुबई (शहर) म्युनिसिपालिटीच्या कायद्याचा मसुदा कौन्सिलमध्यें आला सर फेरोजशहा मेथा यांचे चरित्रकार मि. एच. पी. मोदी म्हणतात की,

" The draft bill was the handy work of Mr. (afterwards Sir Charles) Ollivant and was conceived in a most illiberal and reactionary spirit."

मूळ बिलातील धोरण किती अनुदारपणाचें किंबहुना पिछेहाटीचे होतें याची वाचकाना साधारण तरी कल्पना यावी म्हणून त्यातून फक्त दोन चार मुख्य बाबीचा तेवढा उल्लेख करतों. बिलांत असे सुचविलें होतें की,

( १ ) म्युनिसिपल कमिशनर हा खुद्द म्युनिसिपालिटीचा (corporation चा) सभासद असावा !

( २ ) कॉर्पोरेशनपुढें येणाऱ्या कामाची व्यवस्था करणें, हें काम वास्तविकपणें म्युनिसिपालिटीच्या अध्यक्षाचे पण तें बिलाप्रमाणें कमिशनरकडे सोंपविले होतें. म्हणजे कॉर्पोरेशनवर त्याची हुकमत !

( ३ ) अर्थात् हें स्थानिक स्वराज्य नसून एकमुखी सत्तात्मक राज्य ( autocracy ) झालें !

कलम ३३६ पासून कांहीं पुढील कलमांमध्यें इमारतीसबधाचे नियम दिले होते त्यात सगळी सत्ता कमिशनरच्या हातांत ठेवण्यात आली होती. ती इतकी कीं, त्या बिलाच्या योगानें म्युनिसिपालिटीचें मुख्य तत्व जें "स्थानिक स्वराज्य" तेंच काढून टाकण्यांत आलें होतें असें एकाद्याला वाटेल ! त्या भागाचें हास्यास्पद स्वरूप तेलंगांनी अगदीं उघड रीतीनें कान्सिलमध्यें मांडलें ते म्हणाले:—

" Section 336 and following sections relating to building regulations can, in my judgment, be only characterised as providing, not for local self-government, but for autocratic government run mad. The Commissioner has power to decide how I shall build my house, of what materials, to what height, what shall be the situation and size of the rooms in it, and

after all has been done, whether I shall live in it or not. I will venture to say that autocratic government could not be reduced to absurdity more clearly. When such interference with individual liberty was attempted under bye-laws proposed under the Municipal Commissionership of Mr. Peddar, I was one of those outside the Corporation who took part in the popular protest against it. ××× my general idea is that those bye-laws were not more objectionable than these regulations."

तेलगाचे म्युनिसिपालिटीच्या सबधाचे मुख्य ध्येय हे होते की, कॉर्पोरेशन अगदी स्वतत्र सस्था असावी आणि तिच्या हुकमतीखाली कमिशनरनें काम करावे. खरी सत्ता कॉर्पोरेशनच्या हातांतच असली पाहिजे ती जर तशी ठेवावयाची नसेल, तर म्युनिसिपालिटी तरी कशाला आणि तिचा फार्स तरी कशाला ? 'जास्त सत्ता लोकाच्या हातात ठेवल्यास चुका होतील, पण चुका हातून होणें हेदेखील एक प्रकारचे स्थानिक स्वराज्याच्या बाबतीतलें शिक्षणच आहे बरें, एकादा सर्व-सत्ताधारी एकच अधिकारी नेमला तरी त्याच्या हातून मुळीच चूक होणार नाही, अशी तरी हमी घेतां येईल काय ? अर्थात् प्रथम प्रथम चुका झाल्या, तरी पुढील सुपरिणामाकडे लक्ष देऊन त्या पतकरल्या पाहिजेत. यासबधातले तेलगाचे भाषण लक्षांत ठेवण्यासारखे आहे —

"My *beau-ideal* of Municipal Government includes a strong executive responsible to the Corporation, and an enlightened Corporation watching over its executive."

"If the pre-eminent position of Bombay, to which reference has been made in the speech of the Hon'ble Member, requires a special code of Government, let us by all means consider that point. If popular

Government cannot be trusted to cope with all the necessities of that pre-eminent position, let us abolish the municipality altogether and let us have a strong administration, and rule by means of the Governor-in-Council."

"*If* we are *to* have popular Government, let us have it in a genuine form with power and responsibility in the hands of those who represent the people × × × There may have been blunders, but these blunders are a necessary part of our municipal education, and are not always absent under autocratic rule We must be prepared to put up with occasional blunders to secure eventual good Government."

त्या वेळी लॉर्ड रे याची कारकीर्द होती. त्यानी या कामाकरिता सर फेरोजशहा मेथा यानाही कायदेकौन्सिलचे सभासद नेमलें होतें. म्हणजे मुबईच्या म्युनिसिपालिटीच्या बिलाचा कौन्सिलात विचार चालला असतां तेलग व मेथा अशा वजनदार पुढाऱ्याना कौन्सिलात आणण्यात लॉर्ड रे याचा खरोखरीच थोडा दूरदर्शीपणा दिसून येत होता दुसरी गोष्ट अशी की, तेलग व मेथा असे दोघेही त्या वेळी मुबईच्या म्युनिसिपालिटीचे सभासद असल्यामुळें लोकाची बाजू कौन्सिलात माडण्याकरिता किंवा त्याच्या हक्कासाठीं भाडण्याकरिता दुसरे अधिक लायक पुढारीच मिळणें शक्य नव्हतें प्राथमिक शिक्षणाच्या बाबतीतील तेलग व मेथा याच्या कामगिरीविषयीं सर रेमड वेस्ट यांनीं असें लिहिलें आहे

"The important enactment by which primary education was made a statutory duty of the municipality was the fruit of a half-hour's conference in an interval of the debate between a member of the Government on the one hand and Telang and the Hon'ble Mr. Mehta on the other."

बिलावरील सिलेक्ट कमिटीत दोघाचाही सबध होता त्यामुळे त्यानीं मूळ बिलांत महत्वाचे फेरफार केले. ते इतके की बिलाचे मूळचे स्वरूपच पार बदलून गेलें. मि एच पी मोदी लिहितात,

"It (Bill) naturally evoked considerable protest and public feeling was so much irritated and such strong representations were made to the Bombay Government that Lord Reay thought it wise to leave it (bill) into the hands of Sir Pherozeshah and Mr Justice Telang to amend it as they might The bill was so considerably changed that the father of it could not recognize in it his own child"

म्हणजे मुबईची म्युनिसिपालिटी जी अशेष हिदुस्थान देशात अत्यत नमुनेदार सस्था म्हणून मानण्यात येत आहे, त्याचे बरेचसे श्रेय तेलग व मेथा या दोघास दिले पाहिजे याबद्दल सर दिनशा वाच्छा म्हणतात,

"One of the earliest acts of his (Lord Reay's) administration was the nomination of Sir P Mehta and Mr. Telang as members of the Legislative Council to assist that body in framing the new Municipal Bill which was then on the anvil, and which after two years' vicissitude under the able and active guidance of those two leaders supported by the liberalism of an able non-official member in the person of Sir Frank Forbes Adam passed into law, and became what has since been known as Bombay's *Civic Magna Charta.*

तेलग कौन्सिलमध्ये होते त्या मुदतीत खेड्यापाड्यातून आरोग्याची काहीं व्यवस्था करण्याबाबतचे एक बिल कौन्सिलात आणण्यात आले होते त्या बिलावर भाषण करताना तेलगानी दोनच सूचना केल्या पहिली—नवीन कर न बसविण्यासबधाची होती, आणि दुसरी—असले काम खेड्यातील कमिट्यांकडे सोपविण्याबाबतची होती त्याचें म्हणणें असे होतें की, सरकारी कामगाराकडे हें काम नेहमीप्रमाणे सोपविल्यास ते चागल्या रीतीने होईल पण स्थानिक बाबी आपल्या आपण पहाव्या अशा प्रकारचे लोकास शिक्षण देण्याची जी ही एक सधि मिळत आहे ती व्यर्थ घालविली असे होईल यासबधाचे तेलगाचे शब्द लक्षात ठेवण्यासारखे आहेत. पहिल्या सूचनेविषयी—नवीन कर बसविण्याच्या सबधात —ते असें म्हणाले,

"I think there would be more chance of sanitary improvement becoming more popular, being more generally acquiesced in and accepted, if at the first start, it was not associated with the unpleasant presence of the tax-gatherer in the villages."

आणि दुसऱ्या सूचनेविषयी ते असे म्हणाले —

"I take the same view with regard to sanitation as in regard to all local matters, namely, that it is desirable to make a beginning of popular administration in whatever work is to be done."

यावरून तेलगाचे एकदरीत धोरण काय होतें हें उघडच दिसतें त्याच मुदतींत मिठाच्या कायद्याचा एक मसुदा कौन्सिलात आणण्यात आला होता. त्या वेळीं मिठाच्या आगरवाल्यानी ज्या तक्रारी केल्या होत्या, त्या सगळ्याच काहीं निराधार नव्हत्या असे तेलगानी सागितले त्यावर प्रिचर्ड साहेबानी म्हटले की, "मी सर्व आगरवाल्या–मालकास ओळखतो. पण पहिल्या सहा महिन्यानतर त्यापैकी कोणीच तक्रार केली नाही. ते सर्व सतुष्ट आहेत"

तेलगानी उत्तर दिले —"साहेब बहादुर फार कडक अमलदार असल्याचें प्रसिद्ध आहे, आणि सदहू मालकाचे अर्ज एक वेळ नामजूर झाल्यावर त्याच्या स्वस्थ बसण्याचे हेच कारण असेल." असो.

याप्रमाणे तेलगाच्या कौन्सिलमधील कामाचे थोडक्यात दिग्दर्शन केले. तेलग हे पाच वर्ष कौन्सिलचे सभासद होते हें मागे सागितलेच आहे. सन १८८९ आक्टोबरमध्यें ते हायकोर्टाचे जज्ज झाले. तेव्हा त्यानी कौन्सिलमधल्या आपल्या जागेचा राजीनामा दिला. मध्यतरी काही दिवस ते मुबई म्युनिसिपालिटीचे सभासदही होते प्रथम सन १८८३ मध्ये ते "जस्टिस ऑफ धि पीस" याजकडून निवडण्यात आले होते, व मग ते गिरगांव वॉर्डतर्फे निवडून आले ते पांच वर्षेपर्यंत म्युनिसिपालिटीत होते व त्या मुदतीत ते बहुधा कोणत्याही महत्वाच्या वादविवादात भाग घेत असत. सन १८८८ मध्यें ते स्कूल्स कमिटीचे सभासद झाले व त्या वेळी सरकारने कमिटीजवळ सन १८८९ सालाबद्दलचे बजेट (अदाजपत्रक) मागितल्याबद्दल कमिटी व मुबई सरकार याजमध्यें बराच कडाक्याचा ( पत्रव्यव-

हारानें ) वादविवाद चालला होता. त्यात कमिटीतर्फे मुख्य अग तेलगांचेंच होतें. कमिटींतील तेलगाच्या कामासबधानें सर रेमड वेस्ट यानीं असे नमूद केले आहे.–

" As a member of the Joint Schools Committee he ( Mr. Telang ) afterwards had an opportunity of giving effect to the Provisions which owed their existence, in part at least, to his own labours. * * * But the spirit of Telang is alive, and there is a gradual movement towards the improved and wider instruction, which he would have gladly accepted as the worthiest memorial of his life and influence "

---

## प्रकरण एकेचाळिसावे.

# जज्ज झाल्यानंतर.



सरकारी नोकरी पत्करल्यावर मनुष्यानें सार्वजनिक कामासबधानें जवळ जवळ आपल्या तोंडाला कुलूप घातले पाहिजे अशी सामान्यत. लोकाची समजूत असते, ती केव्हा केव्हा चुकीची ठरते. निदान काशीनाथपताच्या बाबतीत तरी ती चुकीची ठरली त्याच्या सर्व सार्वजनिक चरित्रक्रमासबधानें एका लेखकानें "केसरी"च्या ता. २४–१२–८९ च्या अकात जें लिहिलें ते अगदी सत्य होते. त्या लेखकाचे म्हणणें असें होतें —"मुबई इलाख्यांत किंवा इतरत्र जी जी सस्था अगर चळवळ निघेल त्यात तेलगाचे अग असेच. ते केवळ वरपागी नव्हे, तर त्यास उपदेशद्वारा, द्रव्यद्वारा, मेहनतीने ते मदत करीत असत सार्वजनिक कामाचा सबध घडला की विटाळ मानून स्नान करणाऱ्या लोकानी आणि आपल्या शहाणपणाच्या तोऱ्यात धुद होऊन अलग राहणाऱ्या लोकानी तेलगाच्या या स्वभावापासून किती तरी बोध घेण्यासारखा आहे. "

तसेच तेलगांनी जज्जाची जागा पत्करली म्हणून राष्ट्रीय सभेचें फार नुकसान झाले असेंही कित्येकांस वाटले. त्यासबधानेही खुद्द केसरीकर्त्यांनी ( ता. १५–१०–८९ ) तशा लोकाचे पुढीलप्रमाणे लिहून समाधान केलेः—" नामदार

तेलग याची हायकोर्टात नेमणूक झाल्याचे ऐकल्यापासून कित्येकाना अशी भीति उत्पन्न झाली आहे की राष्ट्रीय सभेचा एक पाय मोडला त्याचे स्वातत्र्य जाऊन ते आता रुपेरी शृखलेच्या जख्ख बधनाने आवळले गेले व त्याचा आता आम्हाला पूर्वीसारखा उपयोग होणार नाही आम्हाला वाटते की नामदारसाहेबाना जे आता उच्च पद मिळाले आहे, त्यापासून तर आम्हास अधिक उपयोग झाला पाहिजे हायकोर्टचा जज्ज म्हणजे केवळ स्वतत्र अधिकारी असतो. × × × तर मग ही नोकरी पत्करून काशीनाथपतानी आपले स्वातत्र्य गमावले असे नसून, त्याना ते आता त्या थोर व सन्माननीय पदाच्या योगाने विशेष जोरदार रीतीने दाखविता येईल, आणि ते त्याप्रमाणे दाखवितील अशी आशा आहे ”

तेलगानीं प्रकृतीला थोडीशी विश्राति मिळावी व धद्याचे श्रम जरा कमी पडावे म्हणून नोकरी पत्करली हे मागील एका प्रकरणात सागितलेच आहे तरी त्याची सार्वजनिक कामाची आवड कमी झालीच नव्हती ती कमी होणे शक्यही नव्हते. ज्याची वीस वर्षे अनेक सार्वजनिक क्षेत्रातून कामे करण्यात गेली होती, त्याची त्या कामासबधाने किंवा त्यानिमित्तानें सहकार्यबद्ध झालेल्या मित्रासबधानें, जसे आपण साधारणत. आगगाडीच्या प्रवासात तात्पुरत्या मिळालेल्या मित्राना अगर त्याच्याशी झालेल्या भाषणातील अनेक विषयाना आपल्याला उतरावयाच्या स्टेश-नावर गाडीतून उतरल्यावर विसरून जातो, तशी स्थिति होणें शक्य नव्हते राष्ट्रीय सभेंत भाषणद्वारा वगैरे प्रामुख्यानें भाग घेणे, त्याना शिस्तीच्या दृष्टीने शक्य नव्हते, ही गोष्ट खरी. परतु त्याच्या एका चरित्रकर्त्याने व “ इडिया ” कर्त्याने—यातील जरूर ते उतारे मागील एका प्रकरणात दिले आहेत—म्हटल्याप्रमाणे, तेलगाच्या अनेक मित्रानी त्याना वरचेवर सार्वजनिक कामासबधी भेटावें व त्याचा सल्ला घ्यावा ही कामें चाललीच होती इतकेच नव्हे तर ज्या सस्थाच्या स्थापनेच्या कामी त्याचें स्वत चे प्रमुखत्वानें अग होते त्या “ प्रेसिडेन्सी असोसिएशन ” व “ कॉंग्रेस ” या दोन सस्थाच्या कामाकडे तेलगाचे किती लक्ष वेधलेलें असे हें वाच्छा शेटजीच्या पुढील उद्गारावरून दिसून येईल·—

“ How sad it is to say that when he looked forward with the keenest interest to the Lahore Congress of 1893, at which Mr. Dadabhai was to preside, the cruel hand of Death should have snatched him away

from us. The satisfaction he felt at the election of Mr. Dadabhai as M P and the great interest he evinced in his career in the House of Commons are perhaps, known only to a few ”

तात्पर्य सार्वजनिक कामात काशीनाथपताचें पूर्वीप्रमाणेंच—फक्त उघड रीतीने प्लॅटफार्मवरून भाषणें करण्याव्यतिरिक्त—अग होते याबद्दल सशयच नाही

तेलग हे सन १८८९ च्या अखेरीस जज्ज झाले त्याच वर्षी पाचवी राष्ट्रीय सभा मुबईस झाली तिजसबधाची जी पूर्वतयारी मुबईस चालली होती, त्यात तेलग सुमारे दहा महिनेपर्यंत नेहमीप्रमाणे परिश्रमपूर्वक मदत करीत होते असे वाच्छा शेट यानी अनेकदा सागितले आहे पुढे तेलगाची जज्जाचे जागी नेमणूक झाली; परतु ते राष्ट्रीय सभेस प्रेक्षक या नात्याने हजर होते हे आम्ही पाहिले आहे. ते सन १८९३ या सबध वर्षात आजारी होते त्या साली ते कोर्टात काही दिवसपर्यंत कसेबसे जात असत नतर अशक्ततेमुळे ते जात नव्हते मधली तीनच वर्षे—१८९०, १८९१ व १८९२ काय ती त्याना सार्वजनिक कामाकडे—शक्य तेवढी—देता येण्यासारखी होती पैकी १८९२ च्या उत्तरार्धात ते काहीसे आजारीच होते. कारण त्यानी लिहिलेला “Gleanings from Maratha Chronicles” यावरील निबध त्याच साली (१७-९-९२ रोजी) डेक्कन कॉलेज यूनियन पुढे--ते स्वतः हजर राहू न शकल्यामुळें--दुसऱ्याच गृहस्थानी (डॉ भांडारकरानी) वाचला होता म्हणजे फक्त सन १८९० व १८९१ या दोनच सालात तेलगानी काय काय सार्वजनिक कामें केली इतकेच पाहिले पाहिजे १८९० मध्ये त्याचे एल्फिस्टन हायस्कुलात समेलनाचे वेळी (Elphinstonian Gathering) एक व्याख्यान झाले व त्याच साली कै यशवत नागेश रानडे या तरुण पण अत्यत उत्साही गृहस्थाबरोबर व दुसऱ्या एका गृहस्थाबरोबर “ राजकीय व सामाजिक ” बाबीवर पत्रव्यवहारद्वारा त्याचा झालेला महत्वाचा वादविवाद टाइम्स व गॅझेट मधून प्रसिद्ध झाला आहे पुढील वर्षी (१८९१ मध्ये) समति वयासबधाचा वाद, दुसरें एल्फिस्टन हायस्कूलमधील समेलन, व एल्फिस्टन कॉलेजातील ॲक्वर्थ साहेबाच्या व्याख्यानाचे वेळी (अध्यक्ष या नात्याने) झालेले भाषण हीच सार्वजनिक प्रकारची कामे होत सन १८९२ मधल्या “ Gleanings ” वरील निबधाचा उल्लेख वर आलाच आहे त्याचप्रमाणे त्या दोनतीन वर्षात हिंदु यूनियन

क्लबमधील हेमतोत्सव व्याख्यानमाला व त्यांत त्या वेळी सुरू असलेल्या वादविवादात तेलगानी शक्य तेवढा भाग घेणे या गोष्टी चालल्याच होत्या.

सन १८९० च्या एप्रिल १२ रोजीं एल्फिन्स्टन हायस्कूलमध्ये नव्या व जुन्या विद्यार्थ्यांचे समेलन भरले होते त्या प्रसगीं न्या तेलगाचे मुख्य भाषण झालें. प्रो वर्डस्वर्थ हे अध्यक्षस्थानी होते तेलग आपल्या व्याख्यानात म्हणाले, " ब्रिटनने हिंदुस्थान देशांत आपली नवीन शिक्षणपद्धत सुरू केल्यापासून इकडील लोकाच्या बुद्धीस चालन मिळाले आहे व एकदरीत त्याचा चागलाच परिणाम झाला आहे वाङ्मयाची वाढ होत आहे हरएक बाबतीत त्या नवीन पद्धतीने लोकास विचार करावयास लाविले आहे ब्रिटिशसत्तेखालीं आपल्यास जसे काही हक्क आहेत तशीच आपलीं काही कर्तव्येही आहेत, याची लोकात जाणीव उत्पन्न झाली आहे थोडक्यात सांगावयाचे म्हणजे जुन्या सत्तेच्या वेळी जी परिस्थिति होती ती पार बदलली आहे धर्माच्या बाबतीत देखील हिंदु, पारशी, मुसलमान कोणीही असोत त्याच्या मनात आजपर्यंत आपण जे सत्य म्हणून मानीत आलो आहोत, ते खरोखरी सत्यच आहे काय याबद्दलची विचारजागृति उत्पन्न झाली आहे या दिशेने मोठीशी अद्याप प्रगति झाली आहे असे नाही, पण त्याबद्दल लोकात चौकसबुद्धि उत्पन्न झाली आहे यात मात्र शका नाही एकदरीत नवीन शिक्षणपद्धतीनें देशात नवे मन्वतर सुरू केल्यामुळें तीच पद्धत चागली व तीच चालू राहावी असे लोकास वाटू लागले आहे क्वचित् ठिकाणी यासबधानें काही लोकात खळबळ सुरू झाली आहे हे खरे पण ती फार दिवस टिकणारी नाही. थोडे दिवस निघून गेल्यावर नवीन पद्धत चागली असेच सर्वाना वाटेल.

आता आम्ही आपले कर्तव्य केले आहे काय याचा विचार केला तर ज्याना उच्च शिक्षणाचा लाभ झाला आहे त्यानी तो लाभ खालच्या—गरीब—वर्गांतील लोकास करून देण्याचे कामी फार श्रम घेतले आहेत असें दिसत नाही सन १८५४ च्या खलित्याचा तसाच उद्देश आहे सरकार शिक्षणाबाबतची जबाबदारी आपल्या डोक्यावरील कमी करणार आहे व मग ती लोकानी आपल्या डोक्यावर घेतली पाहिजे सबब त्याच्या तयारीला आतापासूनच आपण लागलें पाहिजे

राजकीय बाबतींत लोकास एक इशारत देणे इष्ट वाटतें कोणत्याही राजकीय प्रश्नाचा विचार करताना आपण केवळ विकारवश होऊन जाता उपयोगी नाहीं. आपण शातचित्त राहिलें पाहिजे, नेमस्त राहिले पाहिजे, आणि चिकाटीनें उद्योग

करण्यास शिकलें पाहिजे या कामीं आम्ही इग्रज लोकाचेच अनुकरण केले पाहिजे. तेलग म्हणाले,

" We must try to cultivate the spirit of sobriety and imitate the virtues of the British Nation Some people think that we are at present competent to enjoy the highest rights of citizenship. But nothing is farther from the truth "

आपल्यापैकी पुष्कळास वाटते की राज्यकारभाराचे आम्हास ज्ञान झाले आहे आपण वाटेल ते काम करू पण ही चुकीची समजूत आहे चिकाटीच्या उद्योगाशिवाय राजकारण फळास येत नाही हें सत्य आम्ही अद्याप आत्मसात् केलेलें नाही तें आम्ही नजरेपुढे ठेवून

विघ्नैः पुनः पुनरपि प्रतिहन्यमानाः ।
प्रारब्धमुत्तमजना न परित्यजन्ति ॥

या भर्तृहरीच्या वचनाप्रमाणें वागल्याशिवाय राजकारणात यश येण्याची आशा नको तेलग म्हणतात,

" The great failing of the Indian people was a want of perseverance and yet without that, they could not possibly expect to succeed in politics "

तेलगानी, आम्ही चिकाटीने उद्योग करण्यास शिकले पाहिजे--दीर्घ परिश्रम करण्यास शिकले पाहिजे—असें जे वरचेवर व जोराने सागितले त्यात खरोखरीच मोठा अर्थ होता ते स्वत तसे परिश्रम तर करीतच असत पण त्याचा हा उपदेश व ब्रॅडलॉ यानीं सागितलेली गोष्ट—in England great reforms have always been slowly won—इतकीं आपण लक्षात ठेवून वागलो तर आमचें बरेंच काम होईल व आम्हास कोणत्याही कार्यात--राजकीय व दुसऱ्या—यश आल्याशिवाय रहाणार नाही. याचे दोन गोष्टीत आम्हास पूर्वीच प्रत्यतर आलेलें आहे त्या दोन गोष्टी म्हणजे समकालीन परीक्षा ( Simultaneous Examinations ) आणि इकडच्या गिरण्यात उत्पन्न होणाऱ्या कापडावरील जकात ( Excise Duty ). यापैकीं प्रत्येक बाबतींत आम्हास तीस वर्षाच्या खटपटीनतर यश आले ! समकालीन परीक्षांचा ठराव पार्लमेंटनें १८९३ मध्ये

पास केला पण त्याची कांहीशी अंमलबजावणी १९२३ पासून होऊ लागली आहे ! तसेच Excise Duty चे ती जकात १८९४ साली बसविली, पण ती हल्ली चार वर्षापूर्वी उठविण्यात आली ! हें दीर्घ परिश्रमाचे फळ ! ! असो.

नुसत्या राजकीय सुधारणा मिळून उपयोगी नाहीत त्यांची आम्ही चांगली अमलबजावणी केली पाहिजे

"There is nothing positively to take exception to talking of systems of election to the Legislative Councils, but we must know that to work a system of election there must be life. There should be intellectual life to support and nourish the elected Councils. The electors and the elected should have their respective duties to perform. There ought to be political feeling behind to animate those who take part in the Congress."

नुसतें निवडणुकीचे तत्व व त्या तत्वावर तयार झालेली कायदेकौन्सिले मिळून उपयोगी नाहीत. जनतेत तेवढी जागृति उत्पन्न झाली पाहिजे त्याना आपले हक्क काय आहेत ते समजलें पाहिजे, व ते हक्क समजसपणाने बजावण्याइतकें देश-कार्याचें ज्ञान व महत्व त्याना समजलें पाहिजे. याप्रमाणें जनतेचा पाठिंबा मिळाला म्हणजे कॉंग्रेसमध्यें कामे करणाऱ्यांना जास्त हुरूप वाटेल

सरकारनें आमच्या मागणीप्रमाणें सर्व दिलें तर ठीकच, तेवढे सगळें न मिळाले तर जेवढें ते देतील तेवढे घ्या व त्याचा उपयोग करा, आणि अधिकासाठी यत्न चालू ठेवा व सर्व मिळाल्याशिवाय मग स्वस्थ बसू नका.

सामाजिक बाबींकडेही लक्ष पुरवा. स्त्रीशिक्षणाचे महत्व लक्षात आणा स्त्रिया सुशिक्षित झाल्याशिवाय, त्याच्या बुद्धीचा विकास झाल्याशिवाय, देशाची पुरी प्रगति झाली असें म्हणता येणार नाही. स्त्रीशिक्षण नको म्हणणारे किंवा स्त्रियास स्वयपाक करण्यापलीकडे शिक्षण कशास पाहिजे असें म्हणणारे लोक—तेलगाच्या मतें—स्वत शिक्षणास अगर कोणत्याही हक्कास पात्र आहेत असें म्हणतां येणार नाहीं तेलगानीं शेवटीं इतकेंच सांगितलें—

" What he would impress on them was that they should endeavour to learn all they could from the Europeans. He did not say that the wisdom and ideas of their ancestores should never be studied. But as the condition of things was entirely changed since the date of their existence, it was hardly sufficient to guide the man who lived in these present days of enlightenment. "

हे तेलगाचें म्हणणें अगदी समजसपणाचे होतें आम्ही आपल्या पूर्वजाच्या उदाहरणापासून जितके शिकण्यासारखें असेल तितकें जरूर शिकलें पाहिजे इतकेंच नव्हे तर पूर्वजाचे विचार, त्याच्या कल्पना, याविषयीं ज्ञान करून घेणे हें आपले कर्तव्य आहे परंतु हजार वर्षापूर्वीची परिस्थिति जशीची तशी आज प्राप्त होणें शक्य नाहीं पूर्वजाच्या कल्पनाना नवीन परिस्थितीप्रमाणें वळण देणें हेच शक्य आहे व इष्टही आहे याच कारणाकरिता युरोपीयन लोकापासून बऱ्याच नवीन इष्ट गोष्टी सधि मिळेल तशा शिकणे आमचें कर्तव्य आहे.

सदहू तेलगाच्या भाषणावर कित्येकानी टीका केली. त्या वेळी काही लोक असे होते—तसे काही थोडे अद्यापि मिळतील—की त्याना राजकीय हक्क लवकर लवकर मिळावे असे वाटत असे व तेवढयाचकरिता शिकस्तीची चळवळ करावी असे त्याचें मत असे त्या हक्काच्या प्राप्तीकरिता आपल्याला काहीं कर्तव्येही करावयाचीं असतात किंवा अगी पात्रता यावी म्हणून काही सामाजिक सुधारणा केल्या पाहिजेत या गोष्टीची जाणीव मात्र सदरील टीकाकाराना नसे. तेलगाचें प्रथमपासूनच, मत असें होते की राजकीय सुधारणेकरिता व सामाजिक सुधारणेकरिता खटपट बरोबरच झाली पाहिजे. त्यामुळें तेंच तत्व ज्या व्याख्यानातून गोवलेले होतें त्या व्याख्यानावर, वरील वर्गांतील टीकाकाराची काहीं तरी टीका झाली नसती तरच आश्चर्य ? असो तेलगाच्या व्याख्यानावर मुबईच्या " नेटिव ओपीनियन " पत्रात (ता २४-५-९०) टीका आली. आमच्या मतें त्या टीकेत जीवच नव्हता. शिक्षण, व धर्म याविषयी व्याख्यानात केलेल्या विवेचनात टीकाकारास काहीच आक्षेपार्ह वाटलें नाहीं. फक्त त्याला स्त्रीशिक्षणाशिवाय राजकीय सुधारणा पूर्ण होणार नाही हें तेलगाचें आताचे ( १८९० ) मत हे त्यांनी सन १८८६ सालातील व्याख्यानात प्रतिपादन केलेल्या तत्वाशीं

विसगत दिसलें; आणि १८८८च्या राष्ट्रीय सभेत तेलगांनी राजकीय बाबतींत काढलेले उद्गार हे आताच्या उद्गारांशीं जुळत नाहींत असें त्या टीकाकारानें म्हटलें. तेलग आपल्यावर झालेल्या टीकेकडे प्राय फारसे लक्ष देत नसत. पण याखेपेस त्यानीं "नेटिव ओपिनियन" कर्त्याला ( १–५–९० ) मराठींत पत्र लिहून उत्तर दिलें त्याचा तात्पर्यार्थ इतकाच कीं, त्यानीं त्या पत्रकर्त्याला त्याचीं ( तेलगाचीं ) दोन्ही वेळचीं—१८८६ व १८८८ ची—भाषणें आणखी एक वेळ वाचा असें सुचविलें. त्या भाषणातील विचाराशीं १८९० मधल्या भाषणात विसगत असें काहींच नव्हते राजकीय सुधारणेकडे आधीं लक्ष दिलें पाहिजे; पण सामाजिक सुधारणेकडेही दुर्लक्ष करिता कामा नये असेंच तेलगानी १८८६ सालातल्या भाषणात म्हटले होते ( Political reform and Social reform should go hand in hand ) आणि त्याचाच जवळ जवळ अनुवाद १८९० मधल्या भाषणात त्यांनीं केला. यात विसंगत तें काय झाले? तसेंच १८८५ सालातल्या राष्ट्रीय सभेतील भाषणात कौन्सिलाच्या सुधारणाविषयीं तेलगांनीं प्रतिपादन केले होते. त्याचाच अनुवाद १८९० सालातल्या भाषणात करून, आणखी असें जास्त सागितलें कीं, "निवडणुकीचें तत्व सरकारनें दिलें तर बरेंच झालें, न दिल्यास इतर फायदे होतील ते गमाऊ नका; आणि तें तत्व नुकतें सरकारानें कबूल केले तरी तेवढयानें आमचा ऊर्जितकाळ अगदीं नजीक आला असें समजू नका तुमच्या कौन्सिलातील कामाला लोकमताची पुष्टि मिळावी म्हणून ते लोकमत तयार करण्याकरिता तुम्हास झटत राहिलें पाहिजे." हें म्हणणें अगदीं सुसगतपणाचें होते. मग विसगत ते काय? "तेलगानीं आपल्या उत्तरांत फक्त स्त्रीशिक्षणासबधाचें आपलें मत मात्र अधिक स्पष्ट शब्दात सांगितले. ते म्हणाले कीं, "माझा असा स्पष्ट अभिप्राय आहे कीं, स्त्रियास शिक्षण दिलें असतां त्या आपले हक्क मागतील म्हणून त्यास शिक्षणच देऊ नये असें म्हणणारे किंवा ज्यांच्या मतें स्त्रियांचें कर्तव्य-क्षेत्र म्हणजे काय तें देवघर किंवा स्वयपाकघर, अशाच्या हातात राजकीय अधिकार दिला तर फायद्यापेक्षां नुकसानच अधिक होण्याचा सभव आहे." तेलगांचे पूर्वीचे व नतरचे हे उद्गार अगदीं सुसगतच होते.

सन १८९० सालीं रा. यशवतराव रानडे व दुसरे एक गृहस्थ यांनीं तेलगांशीं पत्रव्यवहार करून त्यांचें खरें खुरें मत काढून घेण्याकरितां जो प्रयत्न केला त्यांत त्याना यश आलें; कदाचित् तेलग हे सरकारी नोकरीवर असल्यामुळें राजकीय बाबींवर मोकळेपणानें मत देतात किंवा नाहींत हें पहाण्याचाही रानड्यांचा व त्या

दुसऱ्या गृहस्थांचा हेतु असेल ते कसेंही असलें तरी विचारलेल्या प्रश्नांवर तेलगानीं आपले मत अगदी मोकळेपणानें व निर्भीडपणानें दिले व दोन्ही गृहस्थाबरोबर झालेला तो सर्व पत्रव्यवहार मग टाइम्स व बॉम्बे गॅझेटमध्यें प्रसिद्ध करण्यात आला.

सदर्हू दोन्ही गृहस्थानी आपल्या पत्रव्यवहारांत राजकीय व सामाजिक सुधारणेविषयीं तेलगाना आपले विचार प्रदर्शित करून त्यावर त्याचे मत विचारले होते. विचारलेल्या प्रश्नावर तेलगाचे मत काय होते त्याचा उल्लेख करण्यापूर्वी त्या वेळच्या सामान्य परिस्थितीविषयीं दोन शब्द लिहिणें जरूर आहे खरा प्रकार असा आहे हल्ली राजकीय बाबतीत आमचे विचार बरेच पुढें गेले आहेत व त्याप्रमाणें आमची खटपट, आमच्या चळवळी चालल्या आहेत. प्रस्तुत आमचे ध्येय वसाहतीच्या बरोबरीचे स्वराज्य हें बहुतेक ठरलेलेच आहे म्हणजे हें स्वराज्य आम्हास इंग्लिश लोकापासून मिळवावयाचे आहे अर्थात् आम्हास ब्रिटिश साम्राज्यातच राहावयाचे आहे. त्या साम्राज्याच्या बाहेर पडून अगदी स्वतत्र व्हावे असें म्हणणारा एक नवीन पक्ष हल्ली अस्तित्वात आला आहे पण ते ध्येय सर्वसमत होण्याला बऱ्याच अडचणी आहेत तेव्हा तो पक्ष तूर्त विचारात घेण्याचे कारण नाहीं तूर्त ब्रिटिश साम्राज्यातलें स्वराज्य हेंच आमचे ध्येय आहे, व त्याला सुरवात म्हणून—किंबहुना स्वराज्याचा पहिला हप्ता म्हणून—सन १९१९ चा सुधारणा कायदा आम्हास मिळाला आहे, व त्याप्रमाणे लोकपक्षाचे ज्यात बहुमत आहे अशीं कायदे कौन्सिलें, इतर प्रात व दिल्ली येथे स्थापन झालीच आहेत त्याच्याही पुढचा दुसरा हप्ता काय द्यावयाचा याबद्दलही हल्ली चौकशी चालू आहे तेव्हा तूर्त इतकाच विस्तार पुरे हे हक्क आम्हास पचेचाळीस वर्षाच्या चळवळीनतर मिळाले आहेत, व ह्या कामी आम्हास बऱ्याच इंग्लिश लोकाचा—त्यातही लॉर्ड मॉर्ले व मिस्टर मॉटेगु याजसारख्या दोन फार उदारमनस्क व खद्या गृहस्थाचा—फार उपयोग झाला आहे यापैकी तेलगाच्या वेळीं कोणत्याच गोष्टी घडल्या नव्हत्या. त्या वेळी देशात स्वराज्याची केवळ अस्पष्ट कल्पना असल्यामुळें स्वराज्य म्हणजे मनोराज्य असाच जवळ जवळ प्रकार होता ! सन १८८५ मध्ये जेव्हा राष्ट्रीय सभा स्थापन झाली तेव्हापासून पहिलीं पाच चार वर्षेपर्यत लेजिस्लेटिव कौन्सिलांच्या सुधारणेचाच प्रश्न आमच्या पुढाऱ्यानीं मुख्यत हातात घेतला होता. त्या वेळीं कौन्सिलमध्यें लोकांनीं निवडलेला एकही मनुष्य नसे. फक्त सरकारनेच नेमलेले कांहीं बिन-अधिकारी असे लोक सभासद असत वार्षिक बजेट कौन्सिल पुढें येत नसे. कोणत्याही खात्याच्या कामाविषयीं अगर कारभाराविषयीं लोकास कौन्सिल-

मध्ये प्रश्न विचारण्याचा हक्क नव्हता म्हणजे त्यावेळी सरकारी बड्या अधिकाऱ्यांच्या हातात अनियत्रित सत्ता असे त्यांना पुसता किंवा विचारता, तशाच वरच्या दुसऱ्या बड्या वरिष्ठ अधिकाऱ्याशिवाय, कोणीच नसे. लोकाच्या इच्छा किंवा भावना याना त्या व्यवस्थेत वावच नसे. तसेच सरकारी मोठमोठ्या जागावर सगळे युरोपीयन लोकच असत अर्थात् या अवस्थेत सुधारणा होऊन लोकमताचा त्या जबरदस्त नोकरशाहीच्या कोटात काही तरी शिरकाव व्हावा एतदर्थच त्या वेळी पुढाऱ्याची किंवा राष्ट्रीय सभेची खटपट असे, आणि तेलगानी वरील काही गृहस्थाच्या प्रश्नास दिलेल्या उत्तराचा त्याच दृष्टीने विचार केला पाहिजे सन १८८५ ते १८८८ मध्ये राष्ट्रीय सभेतील कौन्सिल सुधारण्याबाबतच्या ठरावावरील तेलगाचे विचार, त्याची भाषणे याबद्दलचे विवेचन मागील एका प्रकरणात आलेलेच आहे.

त्याच प्रमाणें सामाजिक सुधारणेसबधानें हल्ली सामाजिक बाबतीतसुद्धा आमचे विचार फार पुढे गेले आहेत स्त्रीशिक्षणाचा—त्या वेळच्या मानाने—हल्ली मनस्वी प्रसार झाला आहे व होत आहे फार काय पण हल्ली वर्षातून पाचपचवीस तरी स्त्रिया मुबई युनिव्हर्सिटीतून पदवीधर होऊन सहज बाहेर पडत आहेत, व त्या बहुतेक अविवाहित असतात कित्येक थोड्या विधवाही असतात. म्हणजे इतर सुधारणेच्या बाबी सोडून दिल्या तरी, फक्त स्त्रीशिक्षणाच्या दृष्टीनेच पन्नास वर्षापूर्वीच्या मानानें महाराष्ट्रात सामाजिक बाबतीत केवढी तरी क्राति झाली आहे, याची कोणासही सहज कल्पना होईल पण पन्नास वर्षांपूर्वी—इतर सुधारणा असोत—आम्हास स्त्रीशिक्षणच नको अस म्हणणारे चागले चागले पदवीधर विद्वान् असे असख्य लोक होते! अद्यापि तसे काही लोक आहेत. पण ते शिक्षणाकडे नि सशय आज तरी क्षम्य दृष्टीनें पहात असतात; आणि मागील अनुभवावरून पाहता, हळू हळू त्याच्याही दृष्टींत फरक पडून ते पुढे खात्रीनें स्त्रीशिक्षणाचे पुरस्कर्ते होतील. असो पण स्त्रीशिक्षण किंवा सामाजिक सुधारणा नको म्हणणारे त्या वेळीं राजकीय बाबतींत मात्र फार उत्साहानें झटत असत! हे खऱ्या सुधारणेच्या दृष्टीनें जरा विसगत होते किंबहुना सुधारणेच्या मार्गानें एक डोळा उघडा ठेवून व दुसरा मिटून जाण्यासारखे तें होतें. पण तसाच प्रकार कित्येकाच्या बाबतीत होता यात शका नाहीं. तेलग यांना देशाची सुधारणा हवी होती. पण ती त्याना एकांगी नको होती. ते सर्वांगीण सुधारणेचे पुरस्कर्ते होते. अर्थात् त्या दृष्टीनें त्यानीं वरील पृच्छकांच्या प्रश्नांस उत्तरें दिलीं. इतका खुलासा येथे बस्स आहे. आता तेलगानीं आपल्या पृच्छकांना दिलेल्या उत्तरांचा विचार करू.

एका पृच्छकानें तेलगाना १८८९ च्या राष्ट्रीय सभेनें पास केलेल्या कौन्सिल सुधारणेच्या ठरावाविषयी त्यांचे मत विचारले त्यानी सागितले की आपण आपले विचार सन १८८५ व १८८८ या सालातल्या राष्ट्रीय सभेच्या वेळी आपल्या भाषणात स्पष्ट रीतीनें पुढें ठेवलेच होते. तेच आपले विचार अद्याप ( १८९० ) जशाचे तसे आहेत त्यामुळें १८८९ सालातला राष्ट्रीय सभेचा ठराव—जशाचा तसा—आपणास पसत नाही असें त्यानी म्हटले. आणि अखेर पार्लमेंटनें त्या ठरावाचा विचार न करता लॉर्ड क्रॉस ( सेक्रेटरी ऑफ स्टेट ) याच्या बिलाप्रमाणें काही सस्थाना—म्युनिसिपालिट्या, लोकलबोर्डें, युनिव्हर्सिटी वगैरेनांमात्र सन १८९२ च्या कायद्यात निवडणुकीचा हक्क दिला तेलगानी आपले मत पुढील शब्दात दिले —

" All that we should ask for, all that, as I understand it, we have asked for is that the British Government, having the responsibility of administration, must retain all direct power in its own control, it should, in the interests of good progressive administration, receive advice in an organised and responsible constituted mode, not only from such of our countrymen as the Government thinks fitted to give such advice, but also from some who are designated for the purpose by their own fellow-subjects."

तेलगाचे लक्ष हक्क मिळविण्यापेक्षा—चळवळीनें ते मिळू शकतील—ते मिळाल्यावर पाळण्याकडे जास्त असे. हक्क राखण्याची पात्रता जर आम्ही आपल्या अगी आणली नाही तर ते हक्क व त्यासाठी करावी लागलेली सर्व खटपट ही फुकट जाण्याचा सभव. आमचे होते काय कीं, आम्हाला हक्क मात्र हवे असतात, पण पुष्कळदा जबाबदारी किंवा कर्तव्ये नको असतात. या आमच्या लोकाच्या सामान्य प्रवृत्तीबद्दल तेलगानींच दुसऱ्या एका प्रसगी अस म्हटले आहे,

" In politics you complain of Government, in social matters in the narrower sense, you complain of our so-called leaders, in educational matters you

complain of the University. And for the rest why, everything is as it should be, a great advance is made and is being made, and therefore, the community need do nothing. Consciously whatever we may do or fail to do, this is not an elevating ideal to place before ourselves "

हे तेलगाचे उद्गार अगदीं सत्य आहेत. हक्क मिळाले किंवा सरकारानें निवडणुकीचें तत्व कबूल केले म्हणजे आमचें काम झालें असें समजू नये. खरें काम पुढेच असते तेलग म्हणतात की,

" Even if a system of election were now conceded to us by our rulers, we should still have a great duty to discharge on our part—in fact, the duty will be all the greater and more exacting for such a concession "

राजकीय हक्काची अमलबजावणी चागल्या रीतीने व्हावयाची असेल तर त्यासबधाची आपली कर्तव्ये आपण चागल्या रीतीनें केली पाहिजेत. विशेषत आमची सामाजिक स्थिति सुधारण्याकरिता जी आवश्यक अशी सामाजिक कर्तव्यें असतील ती आम्हीं बजावलीं पाहिजेत तेलग म्हणतात की,

" To discharge that duty most properly and efficiently, I hold that our social conditions must be changed in many respects "

सदहू पृच्छकाच्या आणखी एक दोन चुकीच्या समजुती झालेल्या होत्या. त्यासंबधानेंही तेलगानीं त्या सधीचा फायदा घेऊन थोडासा खुलासा केला. पुष्कळांची अशी समजूत होती कीं सामाजिक सुधारणा म्हणजे युरोपीयन लोकांचें अनुकरण करणें होय तेलगांनीं आपल्या पृच्छकास सांगितलें कीं, ती त्यांची चुकीची समजूत होती. तेलगाचे असे शब्द आहेत,

" I entirely agree that the remedy, * * * for removing India's social ills does not lie in anglicising India. But to say or suppose, as so many at present do,

that those who desire social reform want to anglicise the country socially, is at least as great and as injurious a mis-apprehension as to say that those who want political reforms want to anglicise the country politically, "

दुसरी एक चुकीची समजूत कित्येकांची होती तिजबद्दलही तेलगानी थोडासा खुलासा केला. सुधारक लोक हे सामाजिक सुधारणा ताबडतोब लोकाच्या समजुतीं-कडे वगैरे लक्ष न देता करण्याचा प्रयत्न करीत असत, असा एक सुधारणाद्वेष्टयाचा नेहमींचा आरोप असे त्यावर तेलगानी असा सरळ प्रश्न त्याना विचारला कीं, युरोपीयन लोकदेखील नेहमी म्हणत असतात की, तुम्ही राजकीय सुधारणा— ज्याकरिता इतर देशातील लोकास शतकाचीं शतके लढावे लागले आहे त्या— ताबडतोब घडवून आणवू पाहात आहात, हे तुम्हास माहीत आहे काय ? त्याना तुमचे उत्तर काय आहे ? तेलग म्हणाले,

" I would wish those of us, who are perpetually reminding the adherents of social reform that it is not * * * ' to be carried out at a moment's notice.' to remember, on their part, that exactly the same remarks can be made with about equal justice, and have often been actually made in reference to the political reforms about which they are so very keen. "

तेलगाना आपल्या वेळच्या कांही लोकाच्या उद्गारावरून, लेखावरून व वर्तना-वरून असे आढळून आले की, राजकीय सुधारणांविषयीं वाटाघाट करताना त्याचीं जी तत्वे पुढें करण्यात येत असत, ती सामाजिक सुधारणेच्या बाबतीतल्या तत्वां-हून अगदी भिन्न असत म्हणजे राजकीय सुधारणेच्या बाबतीत जर ते या टोकास असले तर सामाजिक सुधारणेच्या बाबतीत ते दुसऱ्या टोकास असत तेलगाच्या मते असा विरोध असणें हें देशाच्या खऱ्या प्रगतीस हानिकारक आहे. वस्तुतः आमच्यात जी थोडी बहुत जागृति झाली आहे ती इंग्लिश वाङ्मयाच्या अभ्यासानें झाली आहे हें कोणासही कबूल केले पाहिजे पण त्या जागृतीचा उपयोग आम्ही

फक्त राजकीय सुधारणा करण्यात करणार व सामाजिक सुधारणेच्या बाबतीत करणार नाही असे म्हटल्यास ते देशाला हितकारक कसे म्हणता येईल ? व मग त्या पाश्चात्य सस्कृतीचे मर्म आम्हास पूर्णपणें समजले नाहीं असे होणार नाही काय ? तेलग स्पष्ट म्हणतात की,

"In my judgment, the anglo-phobia, if I may so call it, which is so conspicuous in our discussions, when viewed in connection with the eager adoption of the externals of English political life, which is visible side by side with it, is a true index of the imperfections in the assimilation and appreciation of Western culture, which is now-a-days the subject of so much comment in our Hindu newspapers from opposite points of view."

तेलगाना युरोपियन लोकाचे ततोतत अनुकरण करावयाचे होते किंवा प्रत्येक बाबतीत इग्लिश लोकाचेच उदाहरण पुढे ठेवून वागावयाचे होते असे कोणीही म्हणणार नाही. परतु सामाजिक बाबतीत—उदाहरणार्थ, स्त्रीशिक्षणाच्या बाबतीत काही लोक जे उघड उघड विरोध करीत होते, त्याचे करणें मात्र त्याना पसत नसे याबद्दल त्यानी एका पृच्छकास लिहिलेल्या पत्रात आपले मत स्पष्ट रीतीने कळविलें. ते म्हणाले —

"Several years ago I delivered in Bombay a public lecture on the question whether social reform should precede political reform in India. I answered the question in the negative adding that both were necessary and both must be zealously pursued; in view of the available resources and opportunities my answer to that question is still the same But in view of the extraordinary change which has come over some parts of our community and of the aggressive attitude visible in some quarters against social reform, it is

now become necessary not to discourage interest in politics, but to emphasize more and more strongly, more and more frequently, our heavy duties in the social sphere."

राजकीय सुधारणेकरिता चळवळ चालविलीच पाहिजे त्यात कमी पडू देता येतच नाही, पण त्याबरोबरच सामाजिक सुधारणेकडेही लक्ष पुरविणें जरूर आहे तिकडे दुर्लक्ष करून चालावयाचे नाही या गोष्टीकडे दुर्लक्ष करून पहिलीच तेवढी हाती घेणे म्हणजे एक डोळा उघडा ठेवून व दुसरा मिटून सुधारणेच्या मार्गानें जाण्यासारखे आहे व ते देशाच्या हिताच्या दृष्टीने इष्ट नाही दोन्ही प्रकारच्या सुधारणा घडवून आणणें हे आपले कर्तव्य आहे. ते आपल्यापैकी प्रत्येकाने यथाशक्ति केले पाहिजे, तरच तरणोपाय आहे

याप्रमाणे सन १८९० साली तेलगानी केलेल्या सार्वजनिक कामासबधाचा उल्लेख झाला सन १८९१ साली त्यानी केलेल्या कामाचा उल्लेख मागे निरनिराळ्या प्रकरणातून आलाच आहे समतिवयाचा वाद, एल्फिन्स्टन हायस्कूलमधील समेलन व एल्फिन्स्टन कॉलेजातील मि ॲक्वर्थ साहेबाच्या व्याख्यानाच्या वेळचे तेलगाचे भाषण, हीच ती कामे होत. त्याचप्रमाणे सन १८९२ साली तेलगानीं लिहिलेल्या "Gleanings from Maratha Chronicles" या निबधासबधाने मागील एका स्वतत्र प्रकरणात विवेचन आलेच आहे त्याचप्रमाणे (१८९०, ९१, ९२ मध्ये) त्यानीं हेमतव्याख्यानमालेत केलेल्या कामासबधाने मागील काही प्रकरणात उल्लेख आला आहे पुढच्या वर्षी म्हणजे सन १८९३ मध्ये तेलग स्वर्गस्थ झाले असो

आणखी एक प्रश्न केव्हा केव्हा पुढे येत असतो त्यासबधाने येथे दोन शब्द लिहिणें इष्ट दिसते तो प्रश्न असा तेलग आज हयात असते तर ते कोणत्या पार्टीत—पक्षात—सामील झाले असते त्याच्या वेळी हल्लीच्या इतक्या पार्ट्या नव्हत्या ही गोष्ट खरी, त्या वेळी राजकीय बाबतीत फक्त सरकारी अधिकाऱ्याचा—किंवा अधिकारी, बिनअधिकारी युरोपियन लोकाचा—पक्ष व लोकाचा पक्ष इतकेच दोन पक्ष होते यापैकी लोकाच्या पक्षातले तेलग एक प्रमुख पुढारी होते सामाजिक बाबतीत नवा ( सुधारणा पाहिजे म्हणणारा ) व जुना ( त्याच्या विरुद्ध ) असे दोन पक्ष होते. त्यापैकी तेलग हे नव्या पक्षातले होते. इतकेच नव्हे

तर सामाजिक सुधारणेची जी मुख्य बाब—स्त्रीशिक्षण—तिचे तर ते मुख्य पुरस्कर्ते होते. हल्ली मामाजिक व राजकीय या दोन्ही बाबी आवश्यक सार्वजनिक कामांत मोडतात अर्थात् हल्लीच्या राष्ट्रीय सभेत तसेच लिबरल फिडरेशनमध्यें देखील सामाजिक प्रश्नाचा अतर्भाव झालेला असतो अशा स्थितीत तेलग हे कोणत्या पक्षात सामील झाले असते याची कल्पना करणे कठीण नाही. तेलगाच्या वेळचे काही त्याचे सहकारी मित्र किंवा त्याचेबरोबर सार्वजनिक कामे करणारे सर फेरोजशहा मेथा, शेट दादाभाई नवरोजी, सर दिनशा वाच्छा, वगैरे मडळी परवां परवापर्यंत सार्वजनिक कामात भाग घेत होती. वाच्छा शेटजी अद्यापि तसा भाग घेत असतात अर्थात् याचा जो पक्ष त्यातच, तेलग हयात असते तर, नि सशय सामील झाले असते, हे उघड आहे

---

प्रकरण बेचाळिसावें.

## धर्मसंबंधीं मतें.



काशीनाथपत तेलगानी त्यांना परमेश्वराने दिलेल्या अल्प आयुष्यात निरनिराळया क्षेत्रातून कशी भरीव व महत्वाची कामगिरी केली याचे मागील काही प्रकरणात विवेचन केले आहे आता त्याची धर्माच्या बाबतीत काय मते होतीं याविषयीं थोडेंसें लिहावयाचे आहे तेलग हे अनीश्वरवादी अगर नास्तिक होते अशी कित्येकाची समजूत झालेली दिसते पण आमच्या मतें ती उपपत्ति बरोबर बसत नाही. या सबधानें कै सर नारायण चदावरकर यानीं एक दोन ठिकाणी उल्लेख केलेला आहे त्याचप्रमाणें खुद्द तेलगाचें अथपासून इतिपर्यंतचें वर्तन व त्यानी वेळोवेळी, निरनिराळ्या विषयासबधानें काढलेले उद्गार, यावरून तेलगाच्या धर्मविषयक मताविषयी बरोबर कल्पना करता येण्यासारखी आहे एका शब्दात सागावयाचे म्हणजे इदुप्रकाशकर्त्यांनी एकदा ( ता. ४-९-९३ ) म्हटल्याप्रमाणें तेलग हे धर्मभोळेही नव्हते व नास्तिकही नव्हते. ते अगदी जुन्या मताच्या कुटुबात वाढलेले असल्यामुळें त्याचें प्रथम प्रथम त्या परिस्थितीला अनुरूप असेंच वर्तन होते एकदा मागें सागितल्याप्रमाणें, तेलग हे हायस्कुलात विद्यार्थी होते तेव्हा नित्यनेमाने शेजारीच असलेल्या मारुतीचें दर्शन घेऊन मग शाळेंत जात असत. त्याचप्रमाणें ते बी ए च्या परीक्षेला बसण्यापूर्वी ती पास झाल्यास मी अमुक दिवस उपवास

करीन असा त्यानी नवस केला होता. पण पुढें हें सारें बदललें. त्यांनीं आपल्या दृष्टीपुढें त्याना चागलें समजू लागल्यापासून कशीं उच्च ध्येये ठेविलीं होतीं व त्याप्रमाणें ती गाठण्याकरिता त्यानी विशेष परिश्रम घेऊन कशी तयारी केली होती हे मागील एका प्रकरणात सागितलेच आहे ती त्याची तयारी चालली असतानाच त्यानी अनेक ग्रथ लक्षपूर्वक वाचले होते. त्यांतच त्यानीं शाकरभाष्य वाचले होते. ते वाचल्यापासूनच त्याचा धर्मभोळेपणा थोडथोडा कमी होऊन ते विवेकप्रधान बनू लागले पुढे त्यानी मिल्ल, हर्बर्ट स्पेन्सर, हक्सले, टिंडल याचे ग्रथ वाचले. त्या वेळी त्याच्या मनाची अनेक प्रकारच्या सशयानीं चलबिचल झाली. पण पुढे त्यानी इग्लिश कवि वर्डस्वर्थ व टेनिसन याची कविता वाचली व त्याविषयी ते विचार करू लागले. त्यातच पुन्हा त्याना कै. मामा परमानद व डॉ. भाडारकर याच्या सहवासाचा लाभ झाला. हे दोन गृहस्थ फार धार्मिक वृत्तीचे होते, व त्याच्याशी "थीइस्टिक असोसिएशन"च्या सभामधून धर्मसबधी वादविवाद करण्याचे तेलगाना अनेक प्रसग आले होते. या सर्व गोष्टीमुळे तेलगाच्या विचाराना थोडेंसे धार्मिक वळण लागलें व धर्मासबधानें ते फार आदरयुक्त अत करणानें विचार करू लागले. जे तेलग प्रथम काही दिवस शकराचार्याच्या अद्वैतमताप्रमाणें वागत होते, त्यानीच पुढे एक वेळ डॉ. भाडारकराची प्रेमळ उपासना श्रवण करताच आपला Personal God वर (सगुण ईश्वरावर) विश्वास बसू लागला असे कबूल केल्याचे डॉ. देवदत्तराव भाडारकरानी परवा एका लेखात जाहीर केले आहे. म्हणजे जे तेलग प्रथम अगदी धर्मभोळे होते, ते अखेर—त्याच्या बुद्धीचा विकास होत होत—अगदीं समदृष्टि झाले व सर्व धर्मात काही ना काही तरी सत्य आहे अशी त्याची भावना झाली व त्याप्रमाणे ते बोलताना आपले विचार व्यक्त करू लागले हीच मनोवृत्ति डॉ भाडारकर व न्या रानडे याची होती व तीच श्रीरामकृष्ण परमहस व स्वामी विवेकानद याचीही होती. याबद्दल त्याच्या लेखात किंवा उद्गारात सहज दाखले मिळू शकतील

डॉ. भाडारकर व मामा परमानद याचा सहवास तेलगाच्या विचारांना धार्मिक वळण लावण्याला बऱ्याच अशी कारणीभूत झाला असे वर सागितले. याबद्दल सर नारायण चदावरकर म्हणतात —

"A life of Telang would be barren of a good deal that is instructive and good, unless the names of Nulkar, Parama-

nand and Bhandarkar figured in it largely." "The company and friendship of the two good and righteous men—Mr Parmanand and Dr Bhandarkar—profited him in that it confirmed in him that reverential spirit created in his mind by thoughtful reading "

त्याचप्रमाणे तेलगाच्या ठिकाणी दुसरा एक विशेष होता तो हा की, ते आपलींच—हिंदूचीं—तेवढी धर्मपुस्तके वाचून राहात नसत अन्य धर्मांचीं पुस्तकेही ते वाचीत असत व त्यात काही चागले आढळल्यास त्याचाही ते स्वीकार करीत असत त्यामुळें त्याचे ठिकाणी धर्मोच्या बाबतीत एककल्लीपणा किंवा दुराग्रह बिलकूल नसे त्याची दृष्टी नेहमी उदार असे बायबलसबधाने बोलताना त्याचे मुखातून एकदा असे उद्गार निघाले —

"I remember the time when the older generation of our students read the Bible more carefully than is now the case Take our friend, Ranade, for instance He has the Bible at his finger's ends as it were. Now-a-days we are too much for our books We think we have nothing to learn from the West I should be the last to under-value the study of our own religious literature In fact, it is our duty to study it but I should always like to see that study combined with a study of other religions, for it is only in that way that we may hope to correct what is bad, while retaining what is good in that religion" "Europeans are trying to acquaint themselves with our religious literature I think we should follow their example and try to acquaint ourselves with theirs."

आमच्या धर्मपुस्तकाचे आम्ही अध्ययन तर केलेच पाहिजे. तें आमचें कर्तव्य आहे पण त्याबरोबर दुसऱ्या धर्मांचीही आम्ही माहिती करून घेण्यास झटले पाहिजे. तरच आमच्या बुद्धीचा विकास होईल, आमची दृष्टि फांकेल व एकदरींत आमचा फायदा होईल. आमचेच घेऊन बसणें अगर दुसऱ्यापासून आम्हास काय शिकावयाचें आहे असें म्हणणें कोतेपणाचें होईल

अशी तेलगाची विचारसरणी असल्यामुळें त्याना वर्डस्वर्थ व टेनिसन याच्या कवितेविषयीं बोलतांना फार आनद वाटे. बायबलांतील "Book of Job"

( जॉबचे प्रकरण ) याविषयीं सभाषण करताना व त्यापासून होणाऱ्या बोधाविषयी विवेचन करताना तर त्याना फारच समाधान होत असे जॉबची गोष्ट म्हणजे जवळ जवळ आमच्या भागवत पुराणातील ध्रुव व प्रल्हाद याच्या गोष्टी सारखीच आहे त्या जॉबवर अनेक सकटे आली तरी त्याची परमेश्वरावरची श्रद्धा ढळली नाही, या गोष्टीपासून मनुष्याने कितीतरी बोध घेण्यासारखा आहे एकदा वर्ड-स्वर्थच्या कवितेसबधानें बोलताना तेलगाच्या तोडून असे उद्गार निघाले —

" You feel, in spite of all your doubt and uncertainties, that there is something in you which is not human, and that something calls for faith "

याचप्रमाणे तेलगानी दुसऱ्या एका प्रसगी भाषण करिताना कार्डिनल न्यूमन याच्या कवितेसबधाने "I regard him as the best religious poet" असे म्हटले आहे तसेच टॉमस केम्पीस याच्या "Imitation of Christ" या पुस्तकासबधानें देखील तेलगाना अत्यत आदर वाटून, त्यानी त्या पुस्तकाचे मराठीत भाषातर करण्याचेही मनात आणले होते पण तो योग घडून आला नाही !

विस्तृत वाचन झालेले असले आणि धर्माविषयी बराच विचार केलेला असला म्हणजे मनुष्याची प्रायः उदार दृष्टि होते व तो कोणत्याही धर्माविषयी आदरानेच बोलतो तोच प्रकार तेलगाचा सर्व धर्मांत सत्य आहे हें महत्वाचे तत्व सामान्य वाचकास समजावे म्हणूनच त्यानीं " शहाणा नेथन " हे पुस्तक लिहिले होते. त्यांतले मुख्य प्रमेय हे गीतेतील—

**यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति ।**
**तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम् ॥**
**येऽप्यन्यदेवताभक्ता यजंते श्रद्धयान्विताः ।**
**तेऽपि मामेव कौन्तेय यजन्त्यविधिपूर्वकम् ॥**

या श्लोकात गोविलेल्या तत्वाला अनुसरूनच होते श्रीशकराचार्य याना देखील मूर्तिपूजा–मनुष्याच्या विवक्षित स्थितीमध्ये–मान्य नव्हती पण त्याची कारणें मात्र मुसलमानी धर्म अगर यहुदी धर्म यात सागितलेल्या कारणासारखी नाहीत. या धर्मातील माणसाना देवाच्या मूर्ति दृष्टीसमोर नको असतात्त शकराचार्यांचा त्यावर एवढा कटाक्ष नव्हता तेलगच एका लेखात म्हणतात कीं,

" Shankaracharya dıd not object to ıdolatry on the same grounds as Jewısh or Mahomedan relıgıons"

आचार्यांचे

प्रतिपादिषु विष्ण्वादि बुध्य ध्यासः।

असे वचन आहे त्याचा अर्थ असा की, विष्णूची एकादी प्रतिमा घेतली तर त्यात " विष्णु " ही देवता बसून असते अशी भक्ताची समजूत होते असे नव्हे, तर ते एक प्रतीक किंवा विष्णूची खूण समजावयाची असते, आणि ती भक्ताचें एकाग्रचित्त होईपर्यत जरूर असते त्या मूर्तीमध्ये ब्रह्माडनायक ईश्वर येऊन बसलेला असतो अशी सुबुद्ध हिंदु मनुष्याची प्राय भावना कधीही नसते. अज्ञ मनुष्याची कदाचित् ती तशी असेल

तात्पर्य, शेवटी शेवटी तेलगाची ईश्वरावरची श्रद्धा दृढ होत चालली होती ते नित्य सकाळी जेवावयाचे पूर्वी भगवद्गीता वाचीत असत व इतर धर्माविषयी अगर पथाविषयी आदराने बोलत व वागतही असत आपल्या मातापितराशी अत्यत प्रेमाने व आदराने वागणे व त्याच्या इच्छेविरुद्ध होता होईल तो न जाणे, हे एक तेलगाच्या सर्व आयुष्यातील मुख्य तत्व होते "मातृदेवो भव," " पितृदेवो भव " ही आपल्या प्राचीन ऋषीची व साधुसताची शिकवण आहे. तेलग त्याप्रमाणे अक्षरश वागत असत इतकेच नव्हे तर त्या त्याच्या वागणुकीमुळे कोणी कदाचित् काही म्हटलें तरी ते सहन करण्याची त्याची तयारी असे चौपाटीवरील नवीन बगला जेव्हा त्यानी विकत घेतला व सर्व मडळी आपल्या कादेवाडीतील जुन्या घरातून नव्या घरात राहावयास जाण्यासाठीं निघाली, तेव्हा काशीनाथपत तेलग यानी पीताबर नेसून शाल पाघरून, डोक्यास शेला गुडाळून आपल्या घरातले देव हातात घेऊन ते कादेवाडीतून चौपाटीपर्यंत सुमारें मैल भर उघड्या पायानी चालत गेले व तेथें जाऊन त्यानी ते नव्या देवघरात प्रस्थापिले ! त्याचे मातापितर सतुष्ट झाले ही पन्नासपेक्षाही अधिक वर्षाची गोष्ट त्या वेळच्या परिस्थितीप्रमाणें पुष्कळास काशीनाथपताच्या या वागणुकीविषयी कौतुक वाटले

तरी तेलग मागे सागितल्याप्रमाणें " थीइस्टिक असोशिएशनच्या " सभातील धर्मसबधीं वादविवादाकरिता जातच असत प्रार्थनासमाजातील उपासनेलाही ते हजर असत इतकेच नव्हे, तर थिऑसॉफिकल सोसायटीशी देखील त्याचा हितचिंतक या नात्यानें सबध असे त्यानीं सन १८७० साली जें " शकराचार्यांचे

चरित्र " लिहिलें, तें प्रथम " Theosophist " या मासिकात प्रसिद्ध करण्या-करिता त्याच्या चालकाच्या—कर्नेल ऑल्काट याच्या—विनतीवरून लिहावयास घेतलें होते पण तसा योग घडून आला नाही. पुढें त्यानी तेंच चरित्र लिहून स्टु लि सोसायटीपुढे वाचले हा सर्व खुलासा त्यानीं त्या चरित्राच्या आरभीं केला आहे पुढें सन १८८४ सालच्या डिसेबर मध्यें मद्रासनजिक अड्यार येथे जी " Convention of the Theosophical Society " नावाची परिषद भरली होती तीत एक हितचिंतक म्हणून तेलग हजर होते. त्या प्रसगी हजर असलेल्या मडळीची कलकत्त्याचे बाबू नरेंद्रनाथ सेन यानी आपल्या " Indian Mirror " मध्ये नावे प्रसिद्ध केली असून त्याजविषयी त्यानी असें म्हटलें आहे,

" The delegates who attended the Convention were most of them men, who socially and intellectually. are the leaders of the Society in which they move in different parts of the country."

मुबईहून हजर असलेल्या मडळीत रा. सा. मडलीक, नामदार तेलग व शेट दादाभाई नवरोजी हे तिघे गृहस्थ होते.

तेलग हे मुसलमानी धर्मासबधाने देखील आदरानें बोलत असत. एकदा ते मुबईतील हिंदुमुसलमानांच्या दग्याविषयी बोलताना त्या धर्मासबधाने असे म्हणाले –

" It is wonderful how the religion of Mahomed has come to be associated with bloodshed and massacre I do not suppose Mahomed could have originally intended it to be so associated The unfortunate thing was that his religion fell upon a soil congenial to cruelty. It would have perhaps been a greater power for good if it had fallen upon a more congenial soil than that of Arabia."

कोणीही विचारी मनुष्य झाला तरी त्याचें वाचन चागलें विस्तृत झालेलें असलें व त्याची विचारशीलता वाढलेली असली म्हणजे त्याचे मन उदार होते, दृष्टि समत्व पावते, व त्याला सर्व धर्माविषयीं किंवा धर्मपथांविषयीं आदर वाटू लागतो. न्या. रानडे हे वारकरी पथाविषयी किंवा पढरीच्या यात्रेविषयीं व त्यातील लोकाचे ठिकाणीं दिसून येणाऱ्या भक्तिभावाविषयीं नेहमीं आदरानें बोलत असत. डॉ. भाडारकर याच्या धर्मनिरूपणात भागवतांतील प्रल्हादाचे उद्गार,

" या प्रीतिरविवेकानां विषयेष्वनपायिनी ।
त्वामनुस्मरतः सा मे हृदयान्माऽपसर्पतु ॥ "

हे नेहमी येत असून ते वरचेवर बाहेर गावी गेल्या वेळी एकाद्या देवळात खुशाल उतरत असत. न्या. रानड्यानी अशा देवळामधून तर व्याख्यानें दिलीं आहेत सर नारायण चदावरकर हे एकदा आर्यसमाजाचे सन्यासी स्वामी नित्यानद याच्या व्याख्यानप्रसगीं अध्यक्षस्थानी विराजमान झाले होते. सन १९०२ साली स्वामी विवेकानद याच्या स्मारकाकरिता मुबईस भरविण्यात आलेल्या सभेच्या वेळी चदावरकरानी सहानुभूतीचा सदेश पाठविला होता तात्पर्य, भाडारकर, रानडे व चदावरकर हे प्रार्थनासमाजाचे प्रमुख पुढारी होते व त्यामुळें त्याच्या वृत्तीत किंवा उदार दृष्टीत केव्हाही कमी पडले नाही हें वरील गोष्टीवरून स्पष्ट होते तीच वृत्ति तेलगाची होती. ते प्रथम प्रथम थोडेसे धर्मभोळे होते पुढे त्यानी घर बदलताना वडील माणसाच्या सतोषाकरिता घरचे देव हातात घेऊन नव्या घरी नेले तरी सतत वाचनानें व विचारानें त्याची वृत्ति उदार झाली होती, व पुढें तर सर्व धर्मांत सत्य भरले आहे अशी त्यांची भावना झाली आपल्या धर्मपुस्तकाचा अभ्यास करणें हें आपले पहिलें कर्तव्य आहे असें ते म्हणत असत. तरी दुसऱ्या धर्माविषयींही माहिती करून घेण्यास ते तयार असत त्यामुळें त्याची सर्व धर्मांविषयी व पथाविषयीं पूज्यबुद्धि असे पण कोणत्याही विशिष्ट पथाचे ते सभासद झाले नव्हते याला मुख्य कारण त्याच्या घरची परिस्थिति असावी ते प्रार्थना समाजात उपासनेला हजर रहात असत. ते उत्सवप्रसंगी कीर्तनास जात असत. समाजाची ते वर्गणी देत असत, व हरएक प्रकारें समाजकार्यास ते हातभार लावीत असत. तात्पर्य, इदुप्रकाशकर्त्यांच्या म्हणण्याप्रमाणें ते धर्मभोळेही नव्हते व नास्तिकही नव्हते धर्माविषयीं ते वेळोवेळ विचार करीत असत व धर्मश्रद्धेला पोषक असे ग्रथ ते वाचीत असत चदावरकराच्या भाषेत सागावयाचें म्हणजे—

" He did not care for the dogmas of any religion, nor did he talk as effusively on the subject of religion as he did on other topics, but when latterly he spoke of it, he spoke with reverence. And that word *reverence*, be it said, formed the very guiding principle of his life "

तेलग हे धर्माच्या एकाद्या विशिष्ट पथाला महत्व देत नसत व ते इतर विष" याप्रमाणें धर्माविषयीं मोकळेपणानें भरभर बोलतही नसत. पण पुढें पुढें ते धर्माविषयी फार आदरानें बोलत असत. आदराने वागणे हें तर त्याच्या सबध आयुष्यातील मुख्य तत्व होतें

आणखी एक धार्मिक वृत्तीचे लक्षण तेलगाचे ठिकाणी असे त्याना सृष्टीचे चमत्कार, सृष्टीचे देखावे किंवा सृष्टीतल्या घडामोडी याचे निरीक्षण करणें, त्याच्या कर्त्याविषयी—ईश्वराविषयी—त्याच्या अगाध लीलेविषयी विचार करणे व त्यातच रगून जाणें या गोष्टी तेलगाना आवडत असत याबद्दलचा चदावरकराच्या आठवणीत तर उल्लेख आहेच, पण तसा सर रेमड वेस्ट याच्याही एका लेखात उल्लेख आहे त्यातून फक्त एक दोनच वाक्ये येथे देतो —

" He sought communion with nature and with a mind full of the suggestions of the great poet Wordsworth—he found a response and a stimulus to all his higher thinking in the revelation of the Creator's power and goodness in earth made beautiful for our delight. The companions of his walks were struck with the influence of scenery on his phase of meditation and his love of conversation "

---

## प्रकरण त्रेचाळिसावें.

# तेलंग–रानडे संप्रदाय.



तेलग यानी आपला अर्धा जन्म सार्वजनिक कामात घालविला. पण त्यात त्याचे स्थान कोणते होते हें न्या रानड्यासारख्या अधिकारी गृहस्थानीं ठरविलें आहे तेलगांच्या सबधाने अनेक गृहस्थानी अनेक प्रसगी लेख लिहिले आहेत व भाषणेंही केली आहेत पण त्यातूनही रानड्यानीं " तेलंग संप्रदाय " ( Telang School of Thought ) यासबधानें दिलेल्या व्याख्यानाचें महत्व विशेष आहे रानडे हे तेलगाना ते कॉलेजांत विद्यार्थी होते तेव्हांपासून ओळखीत होते. म्हणजे त्याच्यामध्ये गुरु शिष्याचे नातें होते. यामुळें व तेलगाची कारकीर्द आरंभापासून त्याना पूर्ण माहीत असल्यामुळें रानड्याना त्या विषयावर

बोलण्याचा एक प्रकारें अधिकार प्राप्त झाला होता, व त्या दृष्टीनें त्यांचें सदरील भाषण महत्वाचे होतें. तेलगासंबधानें बोलण्याचा केव्हाही प्रसग आला तरी त्यांच्या कारकीर्दीविषयीं, " His short but brilliant career " अशा गौरवयुक्त व साभिमान भाषेंत बोलल्याशिवाय रानडे सहसा कधीं रहात नसत.

तेलग हे सन १८९३ मध्यें स्वर्गवासी झाले पुढें पाच वर्षें तशीच गेलीं. नतर सन १८९८ सालीं " हिंदु यूनियन क्लबचे तर्फे " त्याची पुण्यतिथि पाळण्याविषयींची कल्पना निघून पहिल्याच पुण्यतिथीच्या दिवशी न्या रानडे याचे भाषण झालें. तें भाषण म्हणजे त्यापूर्वींच्या सुमारें पन्नास वर्षांतील प्रगमनशील मडळीच्या चळवळीचा त्रोटक इतिहासच होय. इकडे इग्रज लोकांची सत्ता सुरू झाल्यापासून ज्या मडळींनीं लोकजागृति करून देशाची हरएक दृष्टीनें उन्नति घडवून आणण्याकरिता चळवळ सुरू केली, त्यांना " उदार मत सप्रदाय " ( Liberal School of Thought ) म्हणण्यास हरकत नाही त्यांत अनेक गृहस्थाचा समावेश होत असे मुबई इलाख्यापुरतें पाहिले तर त्यात बाळशास्त्री जांभेकर, दादाभाई नवरोजी, डॉ भाडारकर, न्या. रानडे, सर फे. मेथा, न्या. तेलग हे तर येत असतच. आणखीही काही गृहस्थाची नावे सागता येतील दुसरी काही रानड्यानीं आपल्या वरील भाषणात सागितली आहेत. पण त्याचा विस्तार इकडे करीत नाहीं असो. वरील सर्व मडळीमध्ये एक प्रकारचे तात्विक दृष्टीनें कुटुबसाम्य ( family likeness ) असे व तदनुसार त्यांच्या चळवळी चालत असत. त्याबद्दलचें रानड्यांनीं वरील भाषणात अति सुदर रीतीनें विवेचन करून सदर्हू सप्रदायास " तेलग संप्रदाय " ही सज्ञा दिली भाषणाचा प्रसग तेलगाची पुण्यतिथि असल्यामुळें रानड्यानीं उदार मनानें त्या सप्रदायास तेलगांचें नाव दिलें तें योग्यच झालें. पण खुद्द रानडेही त्याच सप्रदायांतील एक प्रमुख असल्यामुळें व ही नामकरणाची कल्पना स्वत· त्याचीच असल्यामुळें त्या संप्रदायास आमच्या मतें "रानडे संप्रदाय" असें म्हणण्यासही हरकत नाही. असो.

रानडे यांचें भाषण अत्यत उत्साहकारी झालेलें असून तें आशावादानें पूर्ण भरलेलें होतें. त्यांत त्यांनीं तेलगाचें जें गुणवर्णन केलें तें बरोबरच होतें. पण " परगुणकथनैः स्वान् गुणान् ख्यापयतः " या भर्तृहरीच्या वचनात गोविलेलें तत्वच इकडे लागू असल्यामुळें, या भाषणांत खुद्द रानड्याचेच काहीं गुण सहज

दृग्गोचर होतात. कारण, उदारमत सप्रदायाविषयीं बोलतांना रानड्यानी आपल्या भाषणात जे सहजगत्या आपला आशावाद, आपला देशाभिमान, आपली लोकहिताविषयींची कळकळ इत्यादि गुण व्यक्त केले आहेत त्यावरून खुद्द रानड्याच्याच विचाराचें व कृतीचे स्पष्ट चित्र वाचकवृंदापुढें उभें राहाते, व रानड्यानीं त्यात केलेलें तत्वविवेचन अत्यत बोधपर वाटतें त्या तत्वाबरहुकूम—कालवशात् त्या तत्वाचा विकास झाला तरी—आम्ही वागत राहिल्यास निराशेस केव्हाही जागा रहाणार नाही व देशाचें पाऊल एकसारखें पुढे पुढेंच पडल्याशिवाय रहाणार नाही

रानड्यानी तेलगांना सदरील पथाचे पुढारी म्हटलेले असून त्यांच्या अनेक गुणांचे आपल्या भाषणात वर्णन केले आहे तेलगाकडे ते पुढारीपण कसे येत होते, हें रानड्यानीं पुढीलप्रमाणे दाखविलें आहे —

" Our friend, Mr Telang, was not a man whose reputation was confined to this City or this Presidency He was India's representative, the type, I may say, of New-India "

तेलग हे आधुनिक हिंदुस्थानचे एक नमुनेदार प्रतिनिधि होते त्याचे इतर काहीं गुण असे होते —

" His simplicity of life was exemplary, his sympathies were always foremost in the support of every thing that was good and true Noble in mind himself, contact and converse with him made every one, even a stranger who visited him for the first time, discover in the man the nobility of character which only those that have this magnetic power developed in them by the gift of nature can realise "

साधी राहणी व कोणत्याही सत्कार्याविषयी उपजतच सहानुभूति हे गुण तर तेलगामध्ये होतेच, पण त्याचे ठिकाणीं उदारमनस्कताही इतकी उत्कट असे की, त्याच्याशी ज्यांचा ज्यांचा सबध येई, त्याना त्याना ती सहज पटत असे. तेलगाच्या भावी उत्कर्षाविषयीं, ते कॉलेजात शिकत असतांनाच, आपण कसें भाकित केलें होतें हें सागून रानड्यानीं मग त्यांचे गुण थोडक्यांत सांगितले. ते असे —

" I noticed in the young man who then attended the college, there was a power and force concealed which would

carry him up to the very highest stages of our social and political life. There were lines in that countenance which marked him out as an intellectual giant, before whom all our modest performances would look as if we were only trying to follow him, but could never get up to him Those who heard him speak × × × will remember his silver voice, his persuasive and earnest eloquence; it was all one sweet flow of reason. × × × As a scholar, as a politician, as a judge, as a member of our political and official bodies, his services are on record"

तेलगाचें बुद्धीसामर्थ्य अचाट ( intellectual giant ) होतें असे रानड्यानी म्हटलें, तसेच रे. डॉ. मॅकिकन वगैरे इतर लोकानीही अनेकदा कबूल केले आहे. परंतु तेलगानी त्या बुद्धिसामर्थ्याचा उपयोग करून अनेक क्षेत्रातून वाङ्मय, कायदा, राजकारण वगैरे क्षेत्रातून—चिरस्मरणीय अशी जी देशाची कामगिरी केल्याचे रानड्यानी सांगितलें त्याचेच विशेष महत्व आहे याप्रमाणें तेलगाच्या योग्यतेविषयीं थोडेंसें बोलल्यावर, ते ज्या सप्रदायाचे किंवा पथाचे पुढारी होते त्या पथाची मुख्य लक्षणें काय होती किंवा आहेत हे सागण्याकडे रानडे वळले.

सदहू सप्रदायाचें पहिलें लक्षण हें कीं, त्यातील सर्व मडळी पूर्ण आशावादी असावयाची. आपला गतकाळ अत्यत वैभवशाली होता, व आपल्याला प्रस्तुतकाळी, जरी ( मध्यतरी अनेक कारणें घडून ) अवनत स्थिति प्राप्त झाली आहे, तरी आपल्या लोकामध्यें पूर्वीचें तेज अद्यापि समूळ नष्ट झालेले नाहीं. किंबहुना तें भस्मांतर्लीन झालेलें आहे अशा स्थितींत आम्ही जागें व्हावे, आपला आळस झाडून टाकावा, नैराश्य साफ सोडून द्यावें व इतर पुढे. गेलेल्या राष्ट्रांचें उदाहरण पाहून आम्ही उद्योग करावा या हेतूनेंच कदाचित् परमेश्वरानें आमचा इग्लडशीं सबध जुळवून दिला असेल त्या देशापासून आम्हास शिकण्यासारख्या पुष्कळच गोष्टी आहेत त्या आम्ही शिकून जर उद्योग केला तर आमच्या देशालाही फिरून चागले दिवस खात्रीनें येतील व आमची इतर सुधारलेल्या राष्ट्रांत गणना होईल. इतर राष्ट्रांना कधीं मिळणार नाहीं असा आम्हाला गतकालाच्या इतिहासाचा आधार आहे. अर्थात् आम्हाला निराश होण्याचें बिलकूल कारण नाहीं. अश

प्रकारची तेलगसप्रदायातील मडळीची भावना असल्यामुळें, तिला अनुसरूनच त्याच्या सर्व चळवळी चालल्या होत्या व अद्यापि चालत आहेत यासबधानें रानड्यांनी आपल्या भाषणात केलेले विवेचन सार्वजनिक कामात पडणाऱ्या सर्व लोकास अत्यत प्रोत्साहक असे झालेले आहे त्यातून फक्त आम्ही काही उतारे येथ देतो आम्ही का निराश होण्याचे कारण नाही, याबद्दल रानडे म्हणाले —

"We should be unworthy of ourselves, if we are not hopeful with our traditions which transcend the traditions of every other nation of the world"

म्हणजे इतकी प्रोत्साहक आमची परपरा असूनहि जर आम्ही उत्साहानें कामास लागलो नाही, तर तें आमच्या आर्यत्वास कमीपणाचे होईल.

रानडे पुढे म्हणाले की, ईश्वरानें आमच्याकडे एक मोठी कामगिरी सोपविली आहे व ती आम्ही बजावलीच पाहिजे –

"India is favoured that not-with-standing its abasement in many other particulars, the people of this country have been preserved from dangers as though they were a people with a special mission entrusted to them"

रानडे यानी मग आमच्या पूर्वजानी काय कामगिरी केली आहे हे थोडक्यात सागितले —

"Still there is the fact that we represent a continuity of creed, of traditions, of literature, of philosophy, of modes of life and forms of thought which are peculiar to this land, and which have been carried to other countries by our illustrious ancestors in the past from this land"

अशी उज्वल प्रकारची आमच्या पूर्वजानी कामगिरी केली असल्यामुळें आम्हांला आशा करण्यास पुष्कळच जागा आहे प्रस्तुत, आम्ही ईश्वरी योजनेप्रमाणें इग्लिश लोकाचे शिष्य बनून त्याच्यापासून नवीन प्रकारचे ज्ञान सपादन करीत आहो हा काल निघून गेल्यावर आमच्या हातून खात्रीनें मोठी कामगिरी होणार आहे असा तेलगसप्रदायातील मडळींचा पूर्ण विश्वास आहे. यासबधानें रानडे म्हणाले —

"They were hopeful men, they felt proud of the past and they were hopeful of the future. They were hopeful

that if they lived under this discipline, they might in time be fitted to take their proper place in history

पण हल्लीच्या परिस्थितीत आम्हांला भावी कालाविषयी आशा बाळगण्यासारखे काय आहे यासबधानें रानडे म्हणाले —

" All the creeds and civilizations are gathered in this land ; all the spiritual forms and beliefs are here; all social and political experiments are being tried here on a large scale; and this is the only land where you will find all these creeds represented by hundreds and thousands, and millions, living peaceably together and partaking of the same charities, learning, and excellence of each, in a spirit of toleration for all, which you will nowhere find on the broad face of this earth "

इकडे सर्व धर्माचे लोक मिळतात सर्व संस्कृतीचे नमुने एके ठिकाणी जमा झालेले दिसतात. सर्व सामाजिक व राजकीय प्रश्न इकडे सोडविले जात आहेत, व निरनिराळ्या धर्मांचे व निरनिराळ्या सस्कृतीत वाढलेले असे हजारों–लाखो लोक इकडे अगदी एकोप्यानें व शाततेने रहात आहेत असा प्रकार तुम्हाला पृथ्वीच्या पाठीवर दुसऱ्या कोठेही दिसणार नाही.

पण या सप्रदायांतील लोकाच्या आशावादामध्ये व दुसऱ्या काही उतावीळ झालेल्या लोकाच्या आशावादामध्यें फरक आहे जसे आमच्यामध्यें कांहीं लोक निराश होऊन प्रगतीविषयीं अगदीं अनास्थ असे आहेत, तसेच दुसरे काही लोक—एकाद्या कामात थोडेंस यश आल्याबरोबर—हर्षभरित होऊन मोठमोठ्या गोष्टी आम्ही अल्पकालात करू असें त्याना वाटत असतें व त्यामुळें ते भावी काळाविषयीं फार उत्सुक किंबहुना उतावीळ झालेले असतात. म्हणजे एक वर्ग एका टोंकाला, तर दुसरा वर्ग उलट बाजूच्या दुसऱ्या टोंकाला, असा प्रकार होतो. या दोन्ही टोंकामधील जो मध्यबिंदु किंवा सुवर्णमध्य ( golden mean ) तोच तेलग संप्रदायातील लोकाचा आशावाद होय. रानडे म्हणाले कीं,

" You will recognize that this sturdy hopefulness is the golden mean between stolid indifference to change and the sanguineness of temper which desires to accomplish the work

of centuries in as many decades, and the work of decades in as many years and the work of years in as many days."

वर जी एक प्रकारची—काही लोकाच्या बाबतींतली—उत्सुकता किंवा उतावीळपणा सागितला त्याच्या बुडाशी सामान्यत आपल्या मार्गातील अडचणीची अथवा शिरावरील जबाबदारीची जाणीव नसते त्यामुळे त्याच्या यत्नाना लवकर यश येण्याचा सभव नसतो. तेलग सप्रदायातील लोकाना मार्गातील अडचणीची किंवा आपल्यावरील जबाबदारीची पूर्ण जाणीव असते त्यामुळें ते आपली उपाययोजना साधारणत फार जपून करतात व त्या मार्गाने यश-प्राप्तीला जरी कदाचित् थोडे जास्त दिवस लागले तरी ती बहुतकरून खात्रीनें होते

खऱ्या अडचणी या आमच्या मधल्याच आहेत कोठल्या बाहेरच्या नाहीत आम्हाला मुख्यत खरी आस्था नाही, कळकळ नाही आमच्यामध्ये मनाचा दुबळेपणा मात्र भरपूर भरला आहे आम्हास काम करावयाला नको, बसल्या ठिकाणचे हलावयाला नको आणि महत्वाच्या कामाकरिता पुष्कळ परिश्रम—दीर्घ परिश्रम करावयाला तर बिलकूल नकोत त्यामुळे आमची स्थिति जवळ जवळ लहान पोरासारखी झाली आहे जरा काही मनाजोगे झाले नसले की आम्ही निराश होतो किंवा चडफडत बसतो एकदा निराशा झाली तरी फिरून कबर बाधून कामाला लागू आणि काम फत्ते केल्याशिवाय मागे फिरणार नाही असे म्हणण्याइतकी चिकाटी आम्हामध्ये राहिली नाही. खरी अडचण ही आहे ती दूर केली पाहिजे रानडे म्हणाले —

"Our difficulties are really not outside us, but inside us, the difficulties are in us, in our inertia, in our weakness, in our physical inability to sustain hard work, in our inaptitude to work long for great results by great toil Old habits are to be changed × × × We should learn to be men, stalwart puritan men, battling for the right, not indifferent nor sanguine, trustful but not elated, serious but not dejected. That is the change in character which has to be accomplished."

रानडे यानी दुसरी एक आमच्या लोकाना इशारत दिली आहे, तीही आम्हीं लक्षात ठेविली पाहिजे. ज्या गतकालाविषयी आम्हाला अभिमान वाटला पाहिजे

किंवा ज्याबद्दल तेलग सप्रदायांतील मडळीला अभिमान वाटत असतो तो अगदी अलीकडचा गतकाल नसून फार प्राचीन काळचा, हे विसरू नये. रानड्याचे शब्द असे आहेत —

" It is not the immediate past of which we are to feel proud, but of the past of our great ancestors in whose time our philosophies were developed, our literature and science grew up, and our people went to foreign lands, far off to Java, to the East and far away beyond Mongolia to the North. About these times we ought to have intense reverence The more immediate past has brought us to our present position and stranded us into the difficulties in which we find ourselves We are creatures of that more immediate past, we are suffering the penalty of our weakness, hesitation and self-seeking and mutual jealousies "

या जवळच्या गतकालात देखील आमच्या लोकानी काही कामगिरी केली आहे, हे रानड्याना कबूल आहे पण ती इतकी अल्प होती व खरे करावयाचे काम इतके प्रचड होते की, त्यापुढे त्या कामगिरीचे महत्व रहात नाही असो

तेलग सप्रदायातील लोकाचे पहिलें लक्षण म्हणजे देशाच्या भावी स्थितीविषयी पूर्ण आशावादीपणा हें सागितलेच या सप्रदायाचे दुसरें मुख्य लक्षण म्हणजे आपल्याला देशाचे काम करावयाचे ते एकाच बाजूने करावयाचें नसून अनेक दिशानी करावयाचे आहे, हे ध्येय आपल्यापुढें ठेवणे रानडे म्हणाले—

" There is this further common feature—that they all agreed in holding that the work to be accomplished is not one-sided work The liberation that has to be sought is not in one department of life, or one sort of activity, or in one sphere of thought, but it is an all-round work in which you cannot dissociate one activity from another."

सर्व बाजूनी चळवळ करावयाची हे एकदा तत्व ठरल्यावर ती चळवळ कोणत्या कोणत्या बाबतीत करावयाची याविषयीं रानड्यांनी मग आपल्या भाषणात ऊहापोह केला. प्रथम त्यानी आमच्या लोकाचें शरीरसामर्थ्य वाढविण्याच्या आवश्यकतेविषयीं विवेचन केलें पण नुसते शरीरसामर्थ्यच वाढवून आपल्याला स्वस्थ

बसता येत नाही त्याबरोबरच आपल्याला आपली समाजस्थिति सुधारण्याचे प्रयत्न केले पाहिजेत हें काम कित्येकास वाटतें तितके सोपें नाहीं व क्षुल्लकही नाही ते फार महत्वाचें व अवघड आहे हिंदुसमाजाचें खरें पाहिल्यास सबध वातावरणच इतके दूषित झाले आहे की, त्यायोगे आमची सर्वतोपरी वाढच खुटली आहे असे म्हणण्यास हरकत नाही त्यामुळें ते वातावरण शुद्ध करण्याबद्दलचे प्रयत्न प्रथम झाले पाहिजेत म्हणजे समाजाच्या इतर बाजूनी होणाऱ्या वाढीलाही त्यापासून सहाय झाल्याशिवाय राहणार नाही रानडे म्हणतात —

"These environments have to be, in a sense, re-ordered in a way that would help not merely our physical growth, but also our intellectual and moral growth"

बरे, शरीरसामर्थ्य वाढविण्याकडे व समाजसुधारणेकडेच तेवढें लक्ष देऊन भागत नाही धर्मासबधीही आम्ही आपल्या काही कल्पना बदलल्या पाहिजेत. याकरिता आपणास परक्या देशात गेले पाहिजे, अगर परकीय गुरुजीपासून आम्हाला धर्म आणावयाचा आहे, असे नव्हे तर आमच्या प्राचीन शुद्ध धर्मावर जो अनेक कारणानी गज चढलेला आहे तो काढून टाकून त्या धर्माचे शुद्ध स्वरूप पुनरपि ओळखण्यास आम्ही शिकलें पाहिजे रानडे म्हणतात –

"Not that we need go to a foreign country and borrow our faith from foreign masters Spiritual life was developed into the highest perfection, not merely in the writings, but in the actual existence of great men who flourished in the past We have to revive that life in us"

याशिवाय आर्थिक अगर औद्योगिक दृष्टीनेंही आमच्या लोकाची सुधारणा झाली पाहिजे देशातील चारपचमाश लोक शेतकीच्या धद्यावर रहात असतात. त्या धद्यात पुष्कळच सुधारणा झाली पाहिजे. सरकार आपल्या दृष्टीनें त्या धद्यात हळू हळू सुधारणा करीत आहे पण ते काम इतके प्रचड आहे की त्यात आमच्या लोकानी इष्ट ती मदत केल्याशिवाय त्या धद्याची भरभराट व्हावयाची नाही. शेतकीशिवायही देशात जे दुसरे धदे असतील, त्यातही सुधारणा झाली पाहिजे व नवीन धदे निघाले पाहिजेत. तात्पर्य, या विषयासबधानें पुष्कळ ऊहापोह झाला पाहिजे व लोकजागृतिही झाली पाहिजे. हा प्रश्न केवळ लोकाच्या पोटापा-

ण्याचाच असल्यामुळें तो सोडविण्याच्या कामांत प्रत्येक मनुष्यानें शक्य तें सहाय केलें पाहिजे

शेवटी रानड्यानी राजकीय सुधारणेविषयीही थोडासा उल्लेख केला आहे राजकीय सुधारणेचा प्रश्न कित्येकास फार सोपा व सोयीचा वाटतो. त्याबद्दल जरा चळवळ केली, फार तर वर्तमानपत्रातून त्याचा ऊहापोह केला किंवा मोठमोठ्या सरकारी अमलदारावर टीका केली म्हणजे तो प्रश्न सुटेल असे कित्येकास वाटत असते पण ती चूक आहे. तो प्रश्न सोडविणे हे एकट्या दुकट्याचे काम नव्हे, तो सर्वानी मिळून सोडविला पाहिजे, त्या कामाकरिता पुस्तके वाचली पाहिजेत, सरकारी रिपोर्ट वगैरे वाचले पाहिजेत, जरूर ती माहिती मिळविली पाहिजे इतकी तयारी झाल्याशिवाय त्या कामात हातच घालता येत नाहीं, व घातला तर त्यापासून उपयोग होत नाही, शिवाय राजकीय सुधारणा पूर्ण व्हावयाला, इतर वर सागितलेल्या उपयुक्त सुधारणा झाल्या पाहिजेत, हेही लक्षात धरले पाहिजे. रानडे म्हणतात –

"Though it (political well-being) is thought to be a very easy lesson to learn, it is one which is most difficult to accomplish unless ordinated with it we secure the regular development of other useful activity in us"

या सर्व गोष्टी सागून रानडे म्हणाले कीं, सर्व काही करता येईल पण सार्वजनिक कामे अत करणपूर्वक मन घालून करणारी माणस कोठून आणावयाची ? त्याचीच मोठी वाण आहे रानडे म्हणतात,

"You cannot manufacture men in the way in which you can manufacture dead machines You must have men to deal with the system etc"

माणसे तयार झाली पाहिजेत ती झाली म्हणजे देश सुधारणेची कामे उठल्याशिवाय रहाणार नाहीत

देशांत दुसरेही अनेक सप्रदाय अगर पथ आहेत, व त्याची निरनिराळी ध्येयें आहेत पण तेलग सप्रदायाचे मुख्य लक्षणच हे कीं देश सुधारणेकरिता सर्व बाजूनी चळवळ करावयाची. आधी ही व मग ती, हें त्याचे लक्षण नव्हे रानडे म्हणतात —

"But the great characteristic feature of what I have called the Telang school is that you cannot develop the chest without developing your other organs, you cannot starve yourselves and yet desire that your muscles shall grow and your nerves have the same elasticity as before There is an inter-dependence between the parts, so that it is not possible to do justice to one without doing justice to the other also"

याप्रमाणें सदहू संप्रदायाचे मुख्य लक्षणच असल्यामुळें, त्या सप्रदायातील सर्व मडळी आपापल्या सामर्थ्याप्रमाणें व सवडीप्रमाणे विविध चळवळीत भाग घेत असत व इतरास मदत करीत असत खुद्द तेलग यानी त्या तत्वाप्रमाणें कसकसें काम केले याचाही न्या रानड्यानी शेवटी थोडासा उल्लेख करून आपलें भाषण सपविले तेलगासबधाचा उल्लेख असा —

"He was a writer, a social and economical reformer, and he was the most active worker in the political field. He was a man who was a great scholar, not a scholar in the old sense of the word only, but a scholar both in the old and new sense of the word × × × He combined all these activities in himself, and he was trying to give a helping hand to all in other fields when he could not himself work"

या चार शब्दात तेलगाच्या विविध प्रकारच्या कामगिरीसबधाने न्या रानड्यानी जें वर्णन केलें आहे, त्यापेक्षा थोडक्यात व अधिक सुदर रीतीने त्याचे वर्णन करतां येणे शक्य नाही

कोणत्याही महत्वाच्या प्रसगी रानड्याची आपल्या भाषणाच्या शेवटी थोडासा तत्वबोध करण्याची वहिवाट असे, व तो तत्वबोध केव्हा केव्हा फार हृदयगम होत असे तसाच तो त्याच्या "तेलग सप्रदाया" वरील भाषणात झाला आहे. तो भाग असा —

"The teachings of the Telang School are seen in the life and writings of the men whose family likeness I have brought to your recollection on this occasion. We have a duty to discharge, we all owe a debt of duty, not of course

in feeding them with things which they do not want but to feel for a moment that you are not of this world, that you are in some better existence than in this world, and that your soul converses with their souls in the other existence in order to throw off its bondage This is an object to the accomplishment of which occasions like this should be utilized"

न्या रानड्याचे तीस वर्षापूर्वींचे हें भाषण त्यात प्रतिपादिलेलें तत्व आता सर्वमान्य झालेले असून हल्लीच्या सर्व सार्वजनिक चळवळी त्या तत्वाबरहुकूमच चालल्या आहेत म्हणजे "सामाजिक आधी की राजकीय आधी" असले वाद निघून तीस चाळीस वर्षापूर्वी देशात जे निरनिराळे पक्ष निर्माण झाले, ते आज नष्ट होऊन तेलग-रानडे याच्याच तर्कशुद्ध विचारसरणीवर लोकाच्या पसतीचा छाप बसला आहे अर्थात् प्रस्तुतचे बहुतेक सर्व पुढारी तेलग-रानडे सप्रदायाचेच अनुयायी झाले आहेत, याबद्दल तिळमात्र शका नाही

---

प्रकरण चव्वेचाळिसावे.

## गुणदोष.



काशीनाथपत तेलग याच्यामध्ये वैशिष्टय काय होतें याविषयी कांही गृहस्थांनी आपली मते नमूद करून ठेविली आहेत त्यापैकी फक्त आर पी करकेरिया, बी एम् मलबारी व एकाकालीं मुबई हायकोर्टाचे चीफ जस्टिस असलेले सर चार्लेस सार्जट या तिघानी काढलेल्या उद्गाराचाच सक्षेपानें येथे उल्लेख करतों.

करकेरियानी सन १८९४ सालीं "कलकत्ता रिव्हु" नामक मासिकात "न्या तेलग" याच्याविषयीं एक गुणदोषविवेचनात्मक लेख लिहिला, त्यात त्यानी असें म्हटलें आहे —" महाराष्ट्रीयाना चागलें ओळखणाऱ्या एका इग्लिश लेखकाने असें लिहिलें आहे कीं, 'With Nana Fadanvis has departed all the wisdom and moderation of Maratha Politics, (नाना फडणविसाबरोबर मराठ्याच्या राजकारणातले सर्व शहाणपण व नेमस्तपणा निघून गेला) असेंच तेलगासबधानें म्हणणें (aptly) योग्य होईल," करकेरियांनीं असें लिहून मग म्हटलें आहे की, तेलगांनीं केलेल्या कामगिरीचा कोण-

त्याही भाग करून दाखविणारा महाराष्ट्रात कोणी राहिला नाही असे नव्हे. तेलगासारखे दुसरेही पुष्कळ उत्तम विद्वान् असतील, प्रसिद्ध कायदेपडित असतील, कळकळीने समाजसुधारणा करणारे असतील, उत्साहाने शिक्षणप्रसाराकरिता झटणारे असतील, उत्तम अर्थशास्त्रज्ञ असतील, नैतिक दृष्टीनें शुद्ध शीलवान्—pure moral characters—असतील, पण "There is none who combines them (qualities) all so harmoniously together" हे सर्व गुण ज्याच्यामध्ये योग्य प्रमाणात एकवटले आहेत असा तेलगासारखा एकही पुरुष त्या वेळी नव्हता हेंच तेलगामधलें वैशिष्ट्य !

मलबारी शेट यानी आपल्या "*Indian Spectator*" मध्यें (ता ८-९-९३) तर तेलगाची त्याच्या वेळच्या काही प्रसिद्ध पुरुषाशी तुलना करून तेलगच कसे सरस रीतीने उतरतात हे दाखविले आहे मलबारीच्या मते, इग्लिश शिक्षणापासून उत्तमोत्तम असे काय फळ उत्पन्न झालें (The best product of English education) असे कोणी विचारल्यास त्या तेलग याजकडेच बोट दाखविलें पाहिजे ते इग्लिश मनुष्याप्रमाणें इग्रजी भाषा लिहीत असत, इग्लिश मनुष्या-प्रमाणेच ती बोलत असत तेलग हे एक अत्यत श्रेष्ठ प्रकारचे विद्वान्—a Scholar *par excellence*—होते ते इतके कीं, ते एक उत्तम कायदे-पडित (lawyer) व श्रेष्ठ प्रकारचे नमुनेदार जज्ज (a jurist) नसते तर ते एक नमुनेदार अध्यापकच (an ideal professor) शोभले असते. मलबारी पुढे म्हणतात की, "

"He lacked Ranade's breadth and Bhandarkar's acumen But what he wanted in intellectual virility was more than made up by a many-sided culture and brilliant power of expression held in balance by an eminently judicious turn of mind."

तेलगाचे ठिकाणी रानड्याच्या इतकी बुद्धीची विशालता व भाडारकराच्या इतकी बुद्धीची सूक्ष्मता नसेल पण तेलगाच्या मनावर विविध वाङ्मयवाचनानें उत्तम सस्कार झालेला होता व त्यायोगे आपले विचार अगदीं न्यायाधीशाच्या काटेतोलपणानें व्यक्त करण्याचे जें त्याचे अगी सामर्थ्य आलेले होते त्याच्या योगानें, वरील उणीव अगदी भरून निघाली होती, किंबहुना ती भासतही नसे ! त्याच-

प्रमाणे राजकारण व बॅरिस्टरीचा धदा यात बद्रुद्दीन तय्यबजी व फेरोजशहा मेथा याच्याशीच—जरी ते वयानें मोठे होते तरी—तेलगाची अगदी बरोबरी होत असे ती इतकी की, तेलगामध्ये बद्रुद्दीन याचा मोहकपणा व मेथाचा जोरदारपणा जरी कदाचित् कमी असला, तरी तेलगाच्या इतर गुणामुळें त्याचीच कृति केव्हा केव्हा त्या दोघाच्याहीपेक्षा जास्त सरस ठरत असे

" In politics, as also in his special profession of law, he (Mr Telang) ran neck and neck with Messrs Badruddin Tayebji and P M Mehta, showing himself often to better advantage than both, though perhaps less endowed with the persuasiveness of the former and the warmth and vigour of the latter."

सन १८९३ सालच्या आक्टोबर ६ रोजी मुबईच्या टाउन हॉलमध्ये तेलगाच्या स्मारकासबधाने जी सभा भरली होती, त्या वेळी चीफ जस्टिस सर चार्लस सार्जंट यानी तेलगाच्या अगच्या एक दोन विशेष गुणाचा उल्लेख केला ते म्हणाले, " न्या तेलग याच्या सबध कारकीर्दीत मला जें वैशिष्टय आढळून आले त्याचा आजच्या प्रसगी मला जरूर उल्लेख केला पाहिजे मला सागावयाची पहिली गोष्ट ती ही की, तेलग हे आपला देश सोडून कधीच बाहेर गेले नव्हते. हिंदुस्थानातले पुष्कळ लोक युरोपखडात जातात, तिकडे बरेच दिवस राहातात, पण ते परत आले म्हणजे त्याच्या बऱ्याचशा पूर्वीच्या कल्पना बदललेल्या आढळून येतात तेलगानी युरोपीयन लोकाच्या रहाणीसबधाने किंवा एकदर पाश्चात्य सस्कृतीसबधानें जी माहिती मिळविली होती ती इग्लिश भाषेंतले चागले ग्रथ वाचून मिळविली होती, पण तिकडील लोकाची नेहमीची खळबळ व धामधूम (unrest and disquiet) याची मात्र त्याना माहिती नव्हती. एका शब्दात सागावयाचे म्हणजे —

" Through the medium of books he was able to see the stir of the great Babel without feeling the crowd "

तेलगानीं याप्रमाणे युरोपीयन लोकासबधाने जरी सर्व माहिती मिळविली होती तरी ते स्वत. अगदी आपल्या पूर्वजाप्रमाणे अध्ययनात व शाततेत दिवस घालवीत असत

" He passed the whole of his time in study and the simple, quiet Hindu life which his forefathers had always led."

यामुळें त्याचे सर्व चारित्र्य आम्हास मोठे कौतुकास्पद वाटे तेलगाना ग्रथद्वारा झालेलें युरोपीयन सस्कृतीचे ज्ञान व त्याची हिंदु-पद्धतीप्रमाणें साधी रहणी या दोन गोष्टीमुळें त्याच्या मधील स्वाभाविक गुणाचे तेज वाढे व ज्याचा ज्याचा त्याच्याशी सबध येई, त्यांची त्याची मने त्याजकडे साहजिकपणे आकर्षिलीं जात

" It appears to me that this combination of knowledge, acquired by books, of Western life, combined with the quiet of Hindu life that he led, made him more especially interesting, and enhanced those natural qualities which made him so attractive to all those with whom he was brought into contact "

आणखी एका गोष्टीचा आज मला उल्लेख करावयाचा आहे तेलगाच्या सबध आयुष्यक्रमासबधाने बोलताना ते देशातील, सामाजिक व राजकीय बाबतीत चळवळ करून प्रगतीकरिता झटणारे, एक पुढारी होते हे विसरून चालावयाचें नाही त्याच्या बाबतीत फारशी धामधूम किंवा अस्वस्थता नसे ही गोष्ट खरी परतु ते नि सशय एक उदारमनस्क गृहस्थ असून मोठे देशाभिमानी होते, ( possessed of a thoroughly patriotic and liberal mind ) व ते कोणत्याही प्रश्नाचा शात चित्तानें विचार करीत असत अशा मनुष्याची हल्लीच्या दिवसात अत्यत जरूर आहे

" I think that in these days of social and political progress such a man is most invaluable."

याप्रमाणें तेलगामध्ये वैशिष्टय काय होतें यासबधाने तीन गृहस्थानीं निरनिराळ्या वेळी नमूद केलेल्या मताचा उल्लेख केला. न्या. रानडे व सर दिनशा वाच्छा याच्या मताचा अनेक ठिकाणीं पूर्वीच उल्लेख आला आहे. तथापि तेलगामधील आणखी काही गुणासबधानें व दोषासबधानेंही चार शब्द लिहिणें इष्ट आहे.

तेलगांमध्ये " विनय " हा एक लक्षात ठेवण्यासारखा गुण होता त्याच्याच एका चरित्रकारानें म्हटल्याप्रमाणें ते अत्यत निगर्वी असत. ते नेहमीं आपल्यापेक्षां

वयाने जे मोठे असतील त्याच्याविषयी मनात पूज्यबुद्धि बाळगीत असत व त्याच्याशी तसे वागत असत न्या रानड्याना त्यानी अनेकदा आपल्या लेखात किंवा भाषणात—त्याच्याशी मतभेद झाला असला तरी—"my revered friend and teacher" अशा सादर भाषेत सबोधिले आहे दादाभाईशी वागतानाही तोच प्रकार तेलग हे मामा परमानद व डॉ. भाडारकर याना तर—विशेषेकरून अध्यात्मिक बाबतीत—गुरुस्थानी मानीत असत कित्येकाच्या मनाचा कल—स्वत चे इग्लिश शिक्षण व सस्कृतचे थोडेसे अध्ययन झालेलें असले म्हणजे—जुन्या शास्त्री पडिताविषयी अनादर दाखविण्याकडे असतो, हें आम्हास माहीत आहे काशीनाथपताचे तसे नसे महामहोपाध्याय भीमाचार्य झळकीकर हे तेलगाचे कॉलेजातील शास्त्री होते ते हिदु यूनियन क्लबमध्यें व्याख्यानाचे वेळी वगैरे आले म्हणजे तेलगानी आदराने उठून, त्याना वरचे स्थान देताना आम्ही अनेकदा पाहिलें आहे अर्थात् असे आपले एका कालचे विनयशील शिष्य उत्तरोत्तर योग्यतेस चढत असलेले पाहून त्या शास्त्रीबोवाना मोठे कौतुक वाटावे यात आश्चर्य नाही त्याचप्रमाणें तेलगानी गीतेचे इग्रजी पद्यात एक भाषातर केल्याचे व "शहाणा नेथन" नावाचें मराठीत एक पुस्तक लिहिल्याचें मागे सागितलेंच आहे त्यापैकी तेलगानी गीतेचे भाषातर रा आबासाहेब काथवटे व दुसरे मित्र याजकडून व मराठी पुस्तक रा गणपतराव किर्लोसकर व रा. विनायक कोंडदेव ओक याजकडून तपासवून घेतल्याचा (revised) त्या त्या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत उल्लेख आहे ह्या सर्व गोष्टींची आठवण झाली म्हणजे कविकुल गुरूची "विनय खलु पौरुषालकार ।" "ज्ञाने मौन क्षमाशक्ता त्यागे श्लाघा विपर्यय ।" हीं वचनें सहज दृष्टीसमोर येतात या गोष्टीचें कित्येकास महत्व वाटत नसेल परतु याच्या उलट प्रकार काहीं सुशिक्षित पुढाऱ्याकडून महाराष्ट्रात अनेकदां घडलेले आहेत व त्याचेंच अनुकरण करण्याकडे कित्येक तरुण मडळींची प्रवृत्ति हल्ली दिसत असते त्यामुळें तेलगासारख्या महाराष्ट्रात काहीं वर्षांपूर्वी होऊन गेलेल्या सर्वथव लायक अशा पुढाऱ्याच्या अगीं कोणते अनुकरणीय गुण होते याचें अल्पसे विवेचन करणें इष्ट वाटतें म्हणूनच हा यत्न आहे

तेलगाचे अगीं "सौजन्य" हा एक दुसरा गुण होता तेलंग व रा श्रीपाद बाबाजी ठाकूर हे दोघे सहाध्यायी हायस्कुलात असतांना दोघानीं मिळून सस्कृतचा अभ्यास केलेला होता पण पुढें अनेक सार्वजनिक प्रसगीं "आपण श्रीपादरावामुळें सस्कृत शिकलों" असे तेलंगानीं प्रांजलपणानें बोलून दाखविले

होतें, व ते वारल्यावर तेलगाच्याच सूचनेवरून हिंदु यूनियन क्लबतर्फे दु खव-ठ्याचा ठराव पास करून ठाकुराच्या कुटुबांतील माणसाकडे पाठविण्यात आला होता. तेलंगामधील या गुणासबधानें दलाल व देसाई या त्यांच्या सहाध्यायी मित्रानी आपले अनुभव सागितल्याचें मागील एका प्रकरणांत लिहिलेंच आहे. तसेच दुसरें एक लहानसें उदाहरण सन १८८३ साली घडलें होतें त्या वर्षी इल्बर्ट बिलासबधीं युरोपीयन लोकानीं मोठी चळवळ केल्याचें मागें सागितलेंच आहे त्या वेळी युरोपीयन लोक सर्व बगाली लोकाविरुद्ध होऊन—कारण इल्बर्ट बिलाचा सबध इतर प्रांतांपेक्षा बगाल प्राताशींच जास्त येत होता—त्यांच्या विरुद्ध वाटेल त्या बातम्या उठवीत असत त्यांतच "बगाली लोक इग्लडचा द्वेष करीत असून ते त्याचे शत्रु आहेत" ही एक कडी होती पण ती अगदीं निराधार होती, आणि हा जो एक प्रकारें बगाली लोकांच्या राजनिष्ठेवर हल्ला करण्यात आला होता, तो काशीनाथपत तेलग यानी इल्बर्ट बिलावरील भाषणाचे वेळीं, कलकत्त्यामधील आपला अनुभव सागून, परतविला तिसरें उदाहरण सन १८८४ च्या सुमारास मुबईचे गव्हर्नर सर जेम्स फर्ग्युसन यानीं "तुम्ही वरिष्ठ कायदे कौन्सिलमध्यें जाण्यास कबूल आहा काय ?" असे तेलगास विचारलं होतें तेलगानीं नकारार्थी उत्तर दिलें नतर थोड्या दिवसांनीं रा. सा मडलिकांची वरिष्ठ कायदे कौन्सिलमध्यें नेमणूक झाली तेव्हा मुबईतील एका पत्राने—इदुप्रकाशाने—म्हटले की तेलगानीं नाकारलेली जागा मडलिकाना देण्यात आली आणि ती त्यानीं स्वीकारली ! या लिहिण्याचा दुसऱ्या कित्येक वर्तमानपत्रकर्त्यांना (केसरीला) राग आला व त्या पत्रामध्यें आणि इदुप्रकाश यामध्ये बराच कडाक्याचा वाद सुरू झाला पण अखेर तेलग यानी खरी वस्तुस्थिति काय होती ती एका इग्रजी दैनिक वर्तमानपत्रात आपल्या सहीनें पत्र प्रसिद्ध करून सागितली तेलगानीं म्हटलें की, आपणास कलकत्त्याच्या वरिष्ठ कौन्सिलमध्यें जाण्याविषयी सर जेम्स फर्ग्युसन यानी विचारलें होतें, व मडलिकाची नेमणूक परभारें गव्हर्नर जनरल याचेकडूनच झालेली होती. सबब दोन्ही गोष्टीमध्ये अर्थाअर्थी काही सबध नव्हता याप्रमाणें तेलगानीं खुलासा करून तो वाद मिटविला

केसरींतील (ता २४–१२–९२) एका लेखकानें म्हटल्याप्रमाणें "लोकोपयोगित्व" किंवा "आपल्या गुणाचा उपयोग लोकांस करून देणें" हा एक तेलगांचे ठिकाणीं गुण होता. ते सुमारें तीनशें विद्यार्थ्यांना द्रव्यद्वारा मदत करीत असत हें मागें

आलेंच आहे दुसरी एक गोष्ट आम्हास हल्लींच समजली रा ब विनायकराव देशमुख, नाशिक हायस्कूलचे माजी हेडमास्तर हे जेव्हां कॉलेजांत शिकत होते तेव्हा त्याची दुसरी भाषा लॅटिन होती ते एक दोन वेळा बी ए. परीक्षेंत नापास झाले. तिसऱ्या खेपेस चागली तयारी करून ते परीक्षेस बसले तरी नापास झाले तेव्हा त्यासबधात यूनिव्हर्सिटीकडून काही तरी चूक झाली असावी असे वाटून विनायकरावानी सर्व हकीकत सर माधव चौबळ यांना कळविली. त्यांनीं ती तेलगांच्या कानावर घातली तेलग हे सिंडिक होते त्यानी मग लॅटिनचा परीक्षक कोणी साहेब होता त्याला विचारलें, तो त्याना समजलें की, तो साहेब "बोटींग"ला (boating) गेला होता तेव्हा त्याच्या खिशातून काही उत्तराचे कागद नदीत बुडाले! म्हणून त्यानें त्या सर्व विद्यार्थ्यांना नापास केले! त्यांत विनायकराव देशमुख होते! तेलगानी लागलेंच त्या साहेबास म्हटलें, "हें काय? तुमच्या चुकीमुळें विद्यार्थ्यांचे नुकसान व्हावें काय? तसें असेल तर सर्वच विद्यार्थ्यांना पास करा" त्याप्रमाणें मग त्या साहेबानें ज्याचे कागद हरवले होते त्या सर्व विद्यार्थ्यांना पास केले त्यात विनायकराव पास झाले! ह्याबद्दलचे सगळें श्रेय तेलगांना तर खरेंच, पण देशमुखानी खटपट केली म्हणूनच इतक्या विद्यार्थ्यांचे होणारें नुकसान टळले! ही हकीकत विनायकरावाचे चिरंजीव रा बाबासाहेब देशमुख, पुण्याचे एक प्रसिद्ध वकील, याजकडून आम्हास समजली.

तेलग आपल्या पूर्वीच्या मित्राना किंवा संस्थाना—स्वत. मोठ्या पदावर चढलेले असले तरी—कधी विसरत नसत याबद्दल देसाई आणि दलाल यानीं आपले अनुभव सागितलेले मागें दिलेच आहेत त्याचप्रमाणें आपल्या—एल्फिन्स्टन—कॉलेजाच्या सोयी-गैरसोयीकडे—त्याबद्दलची बातमी त्याना समजल्यास—ते लक्ष देऊन गैरसोय दूर करण्यात कसूर करीत नसत एल्फिन्स्टन कॉलेजमधील विद्यार्थ्यांच्या हल्लींच्या वसतिगृहाबद्दलचें सर्व श्रेय तेलगांना दिलें पाहिजे असें इदुप्रकाशकर्ते म्हणतात, व तसें मिस्टर हॉर्थॉर्नथ्वेट—त्या वेळचे प्रिन्सिपॉल—यांनीं एका सार्वजनिक प्रसंगीं बोलून दाखविलें होतें त्या वसतिगृहासबधीं जेव्हा काहीं अडचणी उत्पन्न झाल्या, तेव्हा तेलगानीं खुद्द लॉर्ड रे साहेबाची गाठ घेतली व त्या ताबडतोब दूर केल्या

तेलगाच्या आगचे एक दोन दोष लोक त्या वेळीं दाखवीत असत. त्याविषयीं दोन शब्द लिहिले पाहिजेत सामाजिक सुधारणेच्या बाबतींत तेलग कच खात

असत, हा त्याच्यावर लोकाचा मोठा आरोप असे पण त्याचें खरें कारण, त्याविषयीं त्याना कळकळ कमी होती किंवा ते लोकाना भीत असत, हें नसून त्याची घरची परिस्थिति हें होय याबद्दलचा सर्व खुलासा मागील एका प्रकरणात आलेला असल्यामुळें त्याची इकडे पुनरुक्ति करीत नाही ही आपल्या बाजूस एक मोठी उणीव आहे ह्याची स्वत तेलगाना जाणीव होती. त्यामुळें सामाजिक बाबतीत ते—राजकीय बाबतीतल्याप्रमाणे—आपण होऊन कोणतीही जबाबदारी घेत नसत व पुढाकारही घेत नसत सामाजिक सुधारणा झाली पाहिजे असे त्याना मनापासून वाटत असे व त्याकामी सहाय्य करणें, आपलें कर्तव्य आहे असे त्याना अत - करणपूर्वक वाटत असे त्यात त्याच्याकडून प्रतारणा होत नसे त्यामुळे रानडे, भाडारकर, नूलकर याच्या ते नेहमी सहवासात रहात असत व ते जें सागतील तें हे आनदानें सहाय्य करीत असत हाच प्रकार प्रार्थनासमाजासबधाचा ते उपासनेला जात असत, देणगी देत असत, इतर प्रकारेंही तिकडे सहाय्य करीत असत, पण घरची स्थिति प्रतिकूळ म्हणून ते सभासद झाले नाहीत दुसरेंही एक कारण असें होते की ते आपल्याला उरकता येतील इतकीच कामे घेत असत अधिक घेत नसत त्याच्या धद्यामुळे त्याना आधी फुरसत कमी मिळे शिवाय त्याची आवडीची वाङ्मयात्मक काहींना काही कामें असतच त्याशिवाय राजकीय कामातही त्याचा वेळ जाई मग दुसऱ्या कामाला लागणारा वेळ कोठून आणावयाचा ? सबब सामाजिक बाबतीतील जोखमेची कामे ते आपण होऊन सहसा घेत नसत तशी कामे करणाराना सहाय मात्र ते अत करणपूर्वक करीत असत. रानडे—भाडारकर हे प्रथमपासूनच सरकारी नोकरीवर होते त्यामुळें त्याना फुरसत—सुटीच्या रूपानें—हवी तेवढी मिळत असे अर्थात् सामाजिक व धार्मिक सुधारणेकडे विशेष लक्ष पुरविण्यास त्याना मुबलक सवड मिळे तेलग, अखेरचीं तीन चार वर्षें खेरीज करून, बॅरिस्टरीसारखा स्वतत्र धदा करीत असत त्यामुळें मेथा—बद्रुद्दीन—वाच्छा याजबरोबर मोकळेपणानें राजकीय कामें करण्यातच त्याची फुरसतीची वेळ निघून जाई म्हणजे तेलग—मेथा—बद्रुद्दीन या मडळींनी राजकीय चळवळी जोमानें चालविल्या होत्या व भाडारकर—रानडे, नूलकर यानी सामाजिक चळवळ चालविली होती त्यामुळें सर्व सार्वजनिक कामें अत्यत उच्च दर्जाचीं ( higher plane of public life ) ठरून बिनबोभाट व सुसूत्रपणें चालत असत; इतकेच नव्हे तर, त्या चळवळींचे सरकारावर देखील वजन पडत असे. या सगळ्याचें

मुख्य कारण म्हणजे सदरील मडळीमध्ये "मीच काय तो शहाणा, दुसऱ्याना काय समजते ?" असे उक्तीने अगर कृतीनें दाखविणारा अगर मनात समजणारा असा एकही मनुष्य नव्हता सर्वच मडळी एकमेकाशी बधुभावानें व देशहितैक दृष्टीनें—प्रसग आल्यास आपल्याकडेच कमीपणा घेण्यास तयार अशारीतीने—वागत होती त्यामुळें तटे, बखेडे, भांडणें होण्याला वाव नसे पुढे जेव्हा अशा मनोवृत्तीचीं माणसें सार्वजनिक कामात पडू लागलीं, तेव्हा ते सुरू झाले व त्या सगळ्याचा परिणाम काय झाला हें सर्वविश्रुत आहे. त्याचा विस्तार इकडे आम्ही करीत नाही.

तेलगाचा दुसरा एक प्रकार असे त्याना सार्वजनिक कामाची हौस होती म्हणून ते सर्वच चळवळीत पडत नसत व सर्वच सभामधून बोलत नसत सामाजिक बाबतीतले त्याचें धोरण काय होतें याचा उल्लेख वर आलाच आहे तसेच एक दोन प्रसंगीं—विल्सन हायस्कूलमध्ये—अध्यक्ष आग्रह करीत असतानाही त्यानी बोलण्याचे नाकारलें हेंही मागे सागितले आहे त्याचप्रमाणे म्युनिसिपालिटीशी सबध ठेवण्यासबधाने तेलग म्युनिसिपालिटीचे सुमारे पाच वर्षे सभासद होते ते व मेथा असे दोघेही म्युनिसिपालिटीचे सभासद असल्यामुळे व त्याच वेळी दोघे कायदेकौन्सिलचेही सभासद असल्यामुळें सन १८८८ चा म्युनिसिपालिटीचा कायदा आपल्याला हव्या त्या स्वरूपात पास करून घेण्यात दोघांच्या वजनाचा कसा उपयोग झाला हें मागील एका प्रकरणात निर्दिष्ट केलेच आहे. तरी पण इतर कामामुळें तेलगाना फुरसतच न मिळू लागल्यामुळें सन १८८९ मध्ये त्यांनीं म्युनिसिपालिटींतल्या आपल्या जागेचा राजीनामा दिला. मेथामात्र अखेरपर्यंत म्युनिसिपालिटीचे सभासद होते हें सर्वांस विदितच आहे सस्थेत राहिल्यापासून आपला कांही तरी उपयोग झाला पाहिजे तो वेळेच्या अभावी होणें शक्य नसेल तर राजीनामा देऊन मोकळें होणें हेंच विहित. तोच मार्ग तेलगानीं येथे पतकरला.

काहीं पत्रकर्ते व लेखक तेलगावर दुसरा एक आरोप करीत असत व करीत असतात त्याबद्दल थोडा खुलासा करणें जरूर वाटतें तेलगाच्या अगी धैर्य नव्हते व बड्या साहेब लोकाच्या विरुद्ध जाण्याची त्याना हिम्मत होत नसे. या आरोपासबधीं मागें सातव्या प्रकरणात खुलासा केलाच आहे. हें देखील इकडे सागण्याचे कारण इतकेंच कीं, हा दुसरा आरोप देखील त्या पहिल्या आरोपाचें दुसरें भावड आहे केसरीनें (१५-१०-८९) एकदां "मधुरावाणी" हा एक काशीनाथपतात

विशेष आहे " असे म्हटलें होते. त्याच्याही पूर्वी दुसऱ्या एका प्रसगीं केसरीनें (ता ३-६-८४) तेलगाना सी आय ई. (C. I. E) हा किताब मिळाल्याबद्दल त्याचें अभिनदन केलें होतें परंतु दादाभाई, रानडे, बद्रुद्दीन व मेथा याना तो मान मिळाला नाही व तेलगाना तो मिळाला, याबद्दल केसरीनें असे लिहिलें होतें की, " मि तेलग यांना जी खुबी साधली आहे ती वरील बॅरिस्टरद्वयाला कधीच साधायाची नाहीं! " याचा स्पष्ट अर्थ असा की, तेलगानीं सदरील किताब साहेब लोकाजवळ गोड बोलून मिळविला होता! यासबधी खरा प्रकार असा होता तेलगात " मधुरावाणी " होती, ही गोष्ट खरी. पण ती ईश्वरदत्त देणगी होती. व ती बहुतेक देशकार्याला वाहून त्यानीं तिचा सदुपयोग केला तिचा उपयोग करून त्यानी आपल्या कुटुबीय माणसाचा अगर आपल्या स्वत चा फायदा करून घेतला असें म्हणण्याला अगर सुचविण्याला कल्पनेच्याशिवाय दुसरा आधार मिळेल असे वाटत नाही तेलग याचे जनक वडील, दत्तक वडील व बधु हे एका युरोपीयन व्यापारी पेढीवर नोकर होते ते तेथेच शेवटपर्यत होते दोघे मुलगे तर तेलग निवर्तले तेव्हा शिकतच होते अर्थात् तेलगानी निदान कुटुबीय माणसांच्या फायद्याकरिता तरी "मधुरावाणी"चा उपयोग केला नाहीं हें उघड आहे. त्यानी स्वत चा फायदा तरी त्या मार्गाने काय करून घेतला हें दाखविण्याकरिता त्याच्या आयुष्यातील दोन तीन प्रसग घेऊन त्याविषयी विचार करू प्रथम त्याना सी आय् ई. हा किताब मिळाला यासबधींच पाहू सार्वजनिक कामात लक्ष घालणाऱ्या प्रत्येक मनुष्याला—व त्याबरोबरच केसरीकर्त्यालाही—माहीत असलें पाहिजे कीं, सरकार हे C I E च्या सारखे किताब कांहीं विशेष कामाकरितां बहुत करून देत असतें तेलगाना तो एजुकेशन कमिशनमध्ये त्यानीं चागलें काम केल्याबद्दल देण्यांत आला होता तेलगांनीं कमिशनच्या रिपोर्टास एक भिन्नमतदर्शक पत्रक जोडून त्यात त्यानीं, काहीं युरोपीयन अधिकाऱ्याच्या मताविरुद्ध, आपले मत निर्भीडपणें मांडलें होतें, हें केसरीकर्त्याला माहीत नव्हते काय ? मग किताब मिळविण्याकरिता तेलगानी काहीं खुबी केली असें कसे म्हणता येईल? पुढें सन १८८७ सालीं न्या रानड्यांना देखील, त्यांनी फायनॅन्स कमिटीमध्यें चांगलें काम केल्याबद्दल C. I. E. हा किताब मिळाला. त्याचप्रमाणें त्याच्यानतर अशाच निमित्तानें फेरोजशहा मेथा व गोपाळराव गोखले यांनाही तोच किताब ( C. I. E. ) मिळाला या गृहस्थानीं देखील त्या त्या वेळीं काही खुब्या केल्या असेंच म्हणावयाचे काय?

आम्हास तर या सर्व टीकेत केसरीकर्त्याच्या अनुदार कल्पनेचेच केवळ खेळ दिसतात याच्याच जोडीचें दुसरें एक उदाहरण पहा सन १८९३ सालीं, तेलगाच्या निधनानतर, त्याच्या रिकाम्या जागेवर नेमण्याच्या बाबतीत जी नावे पुढे आली होती त्यात मिस्तर बद्रुद्दीन तय्यबजी याचे एक होते पण त्यानीं ती जागा "नको" म्हटली त्याबरोबर केसरीकर्त्यांनी आपल्या (ता ३१–१०–९३) पुढच्याच अकात असे प्रशसोद्गार काढले —"ऑनरेबल मिस्तर बद्रुद्दीन यानी ही जागा न पतकरण्यात आपली **स्वातंत्र्यप्रियता दाखविली हेंच खरें** आहे" इकडे प्रश्न इतकाच की, हें केसरीकर्त्यास समजले कसे ? कारण, फक्त दोनच वर्षानतर (सन १८९५ मध्ये) मि बद्रुद्दीन यानी हायकोर्ट जज्जाची जागा पतकरली ! त्या वेळी त्याची स्वातत्र्यप्रियता मावळली असें समजावयाचे की काय ? खरा प्रकार असा होता सन १८९३ मध्ये मिस्तर बद्रुद्दीन याची डोळ्याच्या आजारामुळें प्रकृति नीट नव्हती, व त्याना बरेच दिवस विश्राति पाहिजे होती त्यामुळें त्यानी त्या वेळी जागा पतकरली नाही, ते ठीकच झाले सन १८९५ मध्ये जेव्हा हायकोर्टात दुसरी जागा रिकामी झाली तेव्हा पूर्वीचे कारण शिल्लक राहिलें नसल्यामुळें त्यानी ती पतकरली असो वरील दोन्ही प्रसगीं केसरीने कोणत्याही कारणाकरिता असो, नुसती कल्पना केली होती हे उघडच दिसतें सन १८८४ मध्ये तेलगानी काही खुबी करून सी आय् ई किताब मिळविला हीही केसरीची कल्पनाच ! व सन १८९३ साली मिस्तर तय्यबजी यानी स्वातत्र्यप्रियतेमुळें जज्जाची जागा नाकारली हीही कल्पनाच ! ! कल्पनेच्याच भराऱ्या मारणाऱ्या मनुष्यास अशक्य काय आहे ?

पुढें तेलगाना त्याच साली ( १८८४ ) दुसरा एक मान मिळाला गव्हर्नरसाहेब सर जेम्स फर्ग्युसन यानी त्याना नामदार केलें त्याबद्दल केसरीकर्त्यांनी तेलगाचें अभिनदन केल्याचें मागील एका प्रकरणात सागितलेंच आहे पण त्यात तेलगानी काही खुबी करून तो मान मिळविला असे मात्र केसरीनें म्हटलें नाही हे आश्चर्य ! कारण त्या वेळपर्यंत तो मान मेथा, बद्रुद्दीन व रानडे यापैकी कोणालाच मिळाला नव्हता तेलग हेच पहिले नामदार झाले होते. नतर काही दिवसानीं मि. बद्रुद्दीन, मि मेथा व रा. ब. रानडे याना तो मान मिळाला, हें प्रसिद्धच आहे. तिसरा प्रसग, तेलग याना हायकोर्टच्या जज्जाचा मान मिळाला तेव्हाचा. तेव्हा केसरीकर्त्यांनीं तेलगांचे अभिनदन करताना ती जागा प्रथम रानड्यांना मिळाली असती तर नामी झालें असते व त्यात तेलगांनाही कांहीं वैषम्य वाटलें

नसतें—कारण तेलग हे रानड्याना गुरुस्थानी लेखीत असत—असे म्हटलें आहे. पण तेलगानीं तो मान मिळविण्याकरिता काही खुबी केली असे मात्र केसरीने म्हटले नाही पण तसे दुसऱ्या एका लेखकानें ध्वन्यर्थानें म्हटले आहे मद्रासच्या मि नटेसन यानी आपल्या एका चरित्र–मालेत न्या रानडे याचे एक लहानसें चरित्र प्रसिद्ध केले आहे तो चरित्राचा लेखक बहुधा कोणी महाराष्ट्रीयच असावा असे वाटते त्यानें चरित्रास काही परिशिष्टे जोडली असून त्यापैकी, एक " Characteristics " हे आहे त्यात—त्याने "ईस्ट आणि वेस्ट" मधील एका लेखकाच्या आधारावर असे लिहिले आहे —

" K. T Telang was earlier elevated to the Bench than M G. Ranade, because the latter was less known to influential Europeans than Mr Telang. We do not think that lack of energy to advance one's own interests is much of a vice "

तेलगापेक्षा रानड्याचे साहेबलोकाशी प्रथम काही वर्षे दळणवळण कमी असे हें खरें आहे पण तेलग आपल्या फायद्याकडे जास्त लक्ष देत असत व त्याकरिता ते बड्या बड्या साहेबलोकाशी सलगीने वागत असत असा जो वरील अवतरणातून ध्वनि निघतो तो मात्र निराधार आहे वरील लेखकाचा हेतु कोणताही असला, तरी त्याच्या उताऱ्यातील गर्भित प्रश्नाविषयी येथे खुलासा करणे जरूर आहे तेलगानी सन १८८९ मध्ये हायकोर्ट जज्जाची जागा का पतकरली याविषयी मागे सातव्या प्रकरणात जरूर तो सर्व खुलासा आलाच आहे परतु ती रानड्याना जागा न मिळता तेलगाना आधी मिळाली, याविषयी अनेकानी आजवर अनेकदा आपल्या बुद्धीप्रमाणे कारणमीमासा केली आहे त्यापैकीच एक वरील लेखक दिसतो यासबधाचा खरा खुलासा असा होता रानडे तेलगापेक्षा आठ वर्षांनी वडील तेलग कॉलेजात विद्यार्थी होते तेव्हा रानडे हे असिस्टट प्रोफेसर होते म्हणजे त्याच्यामध्ये गुरुशिष्याचे नाते होते. रानडे हे तेलगांपूर्वी बरेच दिवस ॲडव्होकेट झाले होते व तेलग ॲडव्होकेट व्हावयाच्या पूर्वीच रानड्यानी सरकारी नोकरी पतकरली होती अर्थात् रानडे हे तेलगाची जज्जाचे जागी नेमणूक होण्यापूर्वीच त्या मानाला पात्र झालेले होते ! तेव्हा त्यात रानड्याच्या लायकीचा प्रश्नच मुळी नव्हता. पण

दुसरी काहीं कारणें होतीं, त्याचाही विचार केला पाहिजे सरकारी वरिष्ठ अधिकाऱ्याची मनें पुण्याच्या ( पेशव्याच्या राजधानीतल्या ) लोकाविषयी बरेच दिवस साशक होतीं व त्यांतून रानडे वगळले जात नसत गेल्या शतकाच्या शेवटील चरणात पुण्यास ज्या धामधुमी झाल्या त्यात रानड्याचें अग असावे असा वरिष्ठ अधिकाऱ्याना वरचेवर सशय येत असे. यामुळें रानड्याना बराच त्रास झाला पण त्यानी तो धैर्याने सोसला याबद्दलचे वाचनीय असे वर्णन श्री रमाबाईसाहेब रानडे याच्या "आठवणीत" आलें आहे तें वाचकानीं सवड तर जरूर वाचावे याशिवाय पुण्यास त्या वेळी सार्वजनिक कामे करणारी फक्त "सार्वजनिक सभा" हीच काय ती मुख्य सस्था होती तिच्याशी रानड्याचा सबध होता ही गोष्ट सर्व अधिकाऱ्याना माहीत होती सभेच्या त्रैमासिकामधले लेख नेहमी स्वतत्र बाण्याचे असत, व त्यातले सर्वच लेख रानड्याचे नसले तरी त्यात त्याचे अग असे हे सर्वत्र महशूर होतें असो वरील सर्व गोष्टी समुच्चय—दृष्टीने रानड्याच्या बढतीच्या आड येत असत सन १८८० मध्ये ठाण्याच्या सेशन जज्जाच्या जागेकरिता हायकोर्टाकडून तेलग व रानडे या दोघाची शिफारस झाली होती तेलगानी ती जागा "नको" म्हटली सरकारने रानड्याना अजीबात वगळले व जागा रा ब गो ह देशमुख याना दिली ! रानड्याची खरी योग्यता जाणणाऱ्या न्यायखात्यातील अधिकाऱ्याना याबद्दल वाईट वाटत असे एकदा तर चीफ जस्टिस सर मायकेल वेस्ट्राप साहेबानी तेलगामार्फतच "तुमचे लिहिणें जरा काही दिवस बद करा ते तुमच्या बढतीच्या आड येत आहे" असा रानड्याना निरोपही पाठविला होता साराश, रानड्याची हायकोर्ट जज्ज होण्याची सर्वथैव लायकी होती, तरी सरकारकडूनच त्याची बढती बरेच दिवसपर्यत थोपवून धरली जात होती त्यासबधाने सरकारी वातावरण लॉर्ड रे याच्या कारकीर्दीपासून पुढें हळू हळू निवळत चाललें, व जेव्हा अधिकारी लोकाच्या मनांतील रानड्यासबधाचे सशयपिशाच्च अखेर निघून गेलें, तेव्हा त्याची शिफारस झाली व त्याची जज्जाचे जागीं, तेलगाच्या मागून, नेमणूक करण्यात आली तेलगाच्या वाटेत अशा प्रकारच्या अडचणी मुळीच नव्हत्या त्याचें मुबईसच कायमचे वास्तव्य असल्यामुळे व त्यांचा बॅरिस्टरीचाच धदा असल्यामुळें प्रथमपासूनच नेहमीं बड्या बड्या साहेब लोकाशी सबध यावा यात आश्चर्य नाहीं त्याचप्रमाणें प्रसिद्ध "मानकुवर बाईच्या" ( १८७६ ) खटल्याच्या वेळेपासून तर तत्कालीन हायकोर्टचे चीफ जस्टिस, सर मायकेल वेस्ट्राप, याचें व इतर जज्जांचें तेलगांसबधींचें मत त्याच्या विद्वत्तेवरून अत्यत

आदरपूर्ण झालेलें असल्यामुळें, या सर्व गोष्टींचा तेलगांच्या बाजूस फायदा मिळाला. असा प्रकार होता तरी तेलगाच्या राजकीय चळवळी काही कमी नव्हत्या ते प्रेसिडेन्सी असोशिएनचे एक सेक्रेटरी होते, तसेच ते कॉग्रेसमध्ये प्रथमपासूनच होते कॉल्व्हिन साहेबास व डफरिन साहेबास उत्तरे, इग्लडला पाठविलेलीं हस्तपत्रकें वगैरे त्याच्या इतरही चळवळी चालल्या होत्याच यामुळें तेलगाचा साहेबलोकाशीं केवळ जास्त सबध येत असे एवढयाचवरून, काही तरी अनुदार कल्पना काढणें कोणत्याही दृष्टीनें बरोबर नाहीं शिवाय स्कोबल बॅरिस्टर यानीं सन १८८० सालापूर्वी मुबई सोडून जाताना “ तेलग हे पुढे मागे हायकोर्टाचे जज्ज होणार ” असे भाकित करून ठेविलेच होते त्याचप्रमाणे चीफ जस्टिस सर मायकेल वेस्ट्रॉप याच्या तोडातून वरचेवर तसेच उद्गार निघत असत इदुप्रकाशने ( ता ४-९-९३ ) एकदा असे नमूद करून ठेविले आहे कीं,

“The late Chief Justice (Sir Michael Westropp) took such a kindly interest in him (Telang) that he never missed an opportunity to pay him a compliment and was frequently heard to say, he would see him (Telang) made a Judge.”

सन १८८९ मध्ये नानाभाई हरिदास याची हायकोर्टातील जागा रिकामी झाली त्यावेळी सदर्हु वेस्ट्रॉप साहेब इग्लडात हयात होते मागे सागितल्याप्रमाणें इकडून त्या जागेकरिता तेलगाची हायकोर्ट व लॉर्ड रे याजकडून शिफारस झाली व त्याप्रमाणे तेलगाची नेमणूक झाली ! दोनच शब्दात सागावयाचे म्हणजे प्रथमपासून पुण्यास रहाणे व सरकारची काही काळपर्यत इतराजी, या रानड्याच्या मार्गात मुख्य अडचणी होत्या तेलगाच्या बाबतीत स्वतत्र धदा, सार्वजनिक कामे, मुबईस रहाणे, वाङ्मयात्मक कामे व तदनुषगाने साहेब लोकाशी सबध या गोष्टी अनुकूल होत्या व त्याचा तेलगाना फायदा मिळाला अशी त्यावेळी खरीखुरी स्थिति होती.

तेलगाची साहेबलोकामध्ये जी इतकी चहा होती, ती फक्त त्याच्या अगच्या विद्वत्तेमुळे व इतर गुणामुळे होती. त्यात त्या लोकांकडे गोड बोलून एकाद्या सामान्य मनुष्याप्रमाणें आपला फायदा करून घेण्याच्या इच्छेचा तेलगांत लेशही नव्हता. लॉर्ड रे यानीं तेलगाच्या कामाविषयी लिहिताना “ disinterested efforts” असे म्हटलें आहे, तर जॉन ॲडम यांनीं तेलगांना “incorrupti-

ble patriot" असें म्हटलें आहे साहेबलोकाशी निकट स्नेह अगर सलगी असण्याचे मुख्य लक्षण म्हणजे त्याच्या बरोबर खाणेपिणें करणे असे मानण्यात येत असते पण तेलगाच्या बाबतीत हा प्रकार मुळीच नव्हता बरे, तेलगानी जज्जाची जागा पतकरून आपला फायदा करून घेतला की तोटा ? हे पहावयाला नको काय ? त्या जागेच्या उत्पन्नापेक्षा तेलगाचे धद्यापासून होणारें उत्पन्न कितीतरी अधिक होते असे केसरीनेच एकदोन वेळां प्रसिद्ध केले होते ! बरें, मानाची जागा म्हणावे तर तेलगाच्या स्थितीत जज्ज व्हावयाच्या पूर्वी व नतर कितीसे पडले होते ? खरें पाहिल्यास सरळ मनाच्या माणसास कोणत्याही प्रकरणी सर्व गोष्टीचा उदार दृष्टीने विचार करून मग निर्णय करण्याची बुद्धि होत असते व अनुदार मनाच्या मनुष्याला क्षुद्र मन करून मनास वाटेल तसें लिहिणे आवडत असते, असा साधारण नियम आहे प्रस्तुत बाबतीत सर्व गोष्टीचा विचार केला म्हणजे असे आढळून येईल की, कारकुनीच्या जागेकरिता जसे उमेदवाराचे अर्जावर अर्ज येतात व त्याच्यामध्ये चढाओढ सुरू होते व अखेर जसा, त्यापैकी एकादा अर्जदार दुसराच काहीं वशिला आणून ती जागा पटकावतो, तशीच हायकोर्ट जज्जाची जागा असें समजून काहीं अनुदार दृष्टीच्या—दुसरीं कारणे असल्यास परमेश्वर जाणे !—लेखकानी क्षुद्र मनाने आजवर तेलग—रानडे याच्यामध्ये चढाओढ कल्पून तेलगाची त्याच्या गोडवाणीमुळे सरशी झाली असे दाखविण्याचा प्रयत्न केला आहे त्यामुळे तत्कालीन खऱ्या परिस्थितीच्या दृष्टीने या चरित्रात थोडासा खुलासा करावा हें इष्ट वाटल्यावरून तो केला आहे

सर दिनशा वाच्छा यानी एके ठिकाणी मेथा, तेलग व रानडे याची सार्वजनिक प्रश्नाच्या दृष्टीनें तुलना करून जो निष्कर्ष काढला आहे तो आमच्या मते मोठ्या मार्मिकपणाचा आहे तेलग, रानडे व मेथा याच्या विवेचनपद्धतीविषयी वाच्छा म्हणतात —

" If Mr. Ranade was truly Socratic in his intellect so also, though in a minor degree, was Mr. Telang. Mr. Ranade's pen went on smoothly over the most complicated field of controversy. You perceive in his reasoning all the powers of a great persuasive intellect without ever feeling the sharp point of the steel In the case of Mr. Telang, that point was at once

felt as he went on with the iron logic of his argument." "The last (Sir P. M. Mehta) in him had not only the sharp-pointed steel of argument but also the fire of flint. And flint and steel between them did their vanquishment of the opposing contraversialists as neither the one nor the other could do." "In short, I may venture to say that Sir Phirozshah in the field of public life was superlative in his combativeness; Mr. Telang was comparative, while Mr. Ranade was positive."

प्रतिपक्षी कोणीही असो, त्याच्या समोर धैर्याने पुढें सरून दोन ठोसे देण्यात व घेण्यात वाच्छानी मेथाना पहिला नबर दिला आहे, व तेलगाना दुसरा नबर, रानड्याना तिसरा नबर दिला आहे या तिघांही पुरुषाच्या स्वभाववैचित्र्याचा व त्यानी केलेल्या कामाचा विचार केल्यास वाच्छानी वर केलेले वर्णन चुकीचे होईल असे वाटत नाही. प्रतिपक्षी कितीही मोठा अगर विद्वान असो, त्याला तेलगानी आपल्या लेखात व भाषणात—फेरोजशहाच्या प्रमाणें जोरदार भाषेत नसलें तरी—स्पष्ट व नि सदिग्ध शब्दानी ठोसे दिल्याची अनेक उदाहरणे मागील काहीं प्रकरणांत आलीच आहेत.

तात्पर्य, तेलगाच्या सबध सार्वजनिक कारकीर्दीचा निर्विकार मनाने विचार केल्यास त्यात कोणास नांव ठेवण्यासारखे काही विशेष मिळेल असें वाटत नाहीं. त्याचे नैतिक वर्तन अत्यत निर्मल असे. ते स्वभावानें गोड होते, पण आपलें प्रामाणिक मत अगदी निर्भीडपणें देत असत सार्वजनिक कामे ते ते एक आपलें कर्तव्य आहे अशा हेतूनें—अत्यत शुद्ध हेतूनें—करीत असत मिस्तर जॉन ॲडम यानीं आपल्या एका लेखांत तेलगाविषयी ("India" for October 1893)

"He was ever the incorruptible patriot."

आपल्या शुद्ध हेतूपासून कधींही न ढळणारे असे देशाभिमानी असें म्हटलें आहे तसेंच लॉर्ड रे यांनीं डॉ. भांडारकरांना ता. ३०-११-९३ रोजीं लिहिलेल्या पत्रांत तेलगांविषयीं असा उल्लेख आहे :—

"I had often occasion to appreciate his marvellous sagacity, his unerring judgement, his grasp of the most difficult problems, his devotion to the true interests of his country-men, his disinterested efforts to promote their welfare."

(आपल्या देशबांधवांच्या खऱ्या हिताकरिता नि स्वार्थबुद्धीने झटणारे गृहस्थ) फक्त सामाजिक सुधारणेच्या बाबतीत त्याना आपली मते आचरणात आणता येत नसत पण ती स्थिती दुसऱ्या काही समाजिक पुढाऱ्याच्या बाबतीत देखील त्या वेळीं घडत असे याला मुख्य कारण त्याच्या त्याच्या घरची परिस्थिति. याशिवाय तेलगाच्या सर्व सार्वजनिक आयुष्यक्रमात दोष देण्याला मोठीशी जागा मिळेल असे वाटत नाही ते स्वभावाने गोड असत हे खरे पण सरकाराशी अगर लोकाशी स्पष्ट बोलावयाची वेळ आली तर तसे बोलण्यास ते केव्हाही कमी करीत नसत तेलगामधले एका चरित्रकाराने गुणवैशिष्ट्य सागताना असे म्हटले आहे —

"The secret of his power lies in his keen intellect, his rare oratorical gifts, his singularly spotless personal character, and above all, in that profound sagacity to discern at once between what may be productive of harm or good and advise accordingly."

तात्पर्य, तेलग हे दादाभाई, मेथा, ब्रद्रुद्दीन याजबरोबरच काम करणारे असल्यामुळे राजकीय बाबतींत ते सनदशीर मार्गानेंच—क्रांतिकारक मार्गाने नव्हे—जात असत त्याच प्रमाणे ते सामाजिक बाबतीत भाडारकर, रानडे याजबरोबरच काम करणारे असल्यामुळे ते स्त्रीशिक्षण, सामाजिक परिषद वगैरे कामात त्यांना अत करणपूर्वक सहाय्य करीत असत वाङ्मयक्षेत्रातील त्याच्या कामगिरीबद्दल तर बोलावयासच नको त्याच्याइतके वाङ्मयक्षेत्रात काम त्याच्या वेळच्या अगर पूर्वीच्या (डॉ भाडारकर सोडून) कोणीच पदवीधराने केलें नाही असें वाच्छा यानीं स्पष्ट म्हटलें आहे चारच शब्दात सागावयाचें म्हणजे मेथा, ब्रद्रुद्दीन यांचा भर मुख्यत राजकीय चळवळीवर असे रानड्यांचा अर्थशास्त्रीय, सामाजिक व धार्मिक चळवळींवर असे. भाडारकर यांचें लक्ष विशेषत वाङ्मयात्मक, सामाजिक व

धार्मिक कामावर असे. तेलगांमधले वैशिष्ट्य हे कीं, त्यानी वरील सर्व क्षेत्रातून कामगिरी केली असून, ती उत्तम प्रकारची आहे आणि हे सगळें काम तेलगांनीं अवघ्या वीसबावीस वर्षात ( सन १८७२ ते १८९३ ) केले हे लक्षांत आणले म्हणजे मन थक्क होते व वाच्छा यानींच त्याचे वर्णन केलेले,

" One crowded hour of glorious life,"

' एक तासाचाच पण वैभवशाली चरित्रक्रम ' तें अगदी अन्वर्थक ठरतें. सन १८७२ सालीं तेलग वद्यास लागल्या दिवसापासून, त्याची जी—धद्याच्या दृष्टीनें व सार्वजनिक कामाच्या दृष्टीनें—भरभराट सुरू झाली ती उत्तरोत्तर शुक्लेदूप्रमाणें वाढत जाऊन, त्याचा वैभवरवि सन १८९२ मध्ये अगदी ऐन मध्यान्हीं चढला होता असे म्हणण्यास मुळीच हरकत नाहीं. सर दिनशा वाच्छा म्हणतात—

" While during the last period of his full manhood alas ! so soon cut off, it seemed that he was at the very height of political sagacity and worldly wisdom."

राजकीय कामाच्या दृष्टीने तेलग हे आपल्या वेळी वैभवशिखरास चढले होते

त्याच प्रमाणे त्याचा एक चरित्रकर्ता ( श्री चुनिलाल पारेख ) म्हणतो—

" Thus at the University, as in the High Court, as well as on the public platform, he has reached the zenith of power attainable."

म्हणजे तेलग दिवगत झाले तेव्हा ते मुबईतील बहुतेक सर्व मोठ्या सार्वजनिक सस्थाच्या उच्चस्थानी होते, ( बाकीच्या सस्था सोडून दिल्यातरी ) ते हायकोर्टाचे एक जज्ज होते, युनिव्हर्सिटीचे ते व्हाइसचॅन्सेलर होते, रॉयल एशियाटिक सोसायटीचे ( मुबई ) ते अध्यक्ष होते व मुबईतील राजकीय व सामाजिक बाबतीत ते एक पुढारी म्हणून प्रसिद्ध होतेच त्यामुळें तेलग गेले तेव्हां त्यांची जागा भरून काढणारा मुबईत एकही हिदु पुढारी उरला नाही असे जें इदुप्रकाशकर्त्यांनें म्हटले ते अगदी सत्य होते इदुप्रकाशचे शब्द असे आहेत —

" There is not one Hindu left in Bombay that can at present fill his place."

वरील सर्व प्रकारात मनास अत्यत चटका लावणारी गोष्ट ही होती की, तेलगांनी इतकी पुष्कळ व महत्वाची कामे आपल्या वीसबावीस वर्षाच्या कारकीर्दीत करून वयाला त्रेचाळीस वर्षें होतात न होतात तोच ते स्वर्गस्थ झाले ! व सृष्टिक्रमाप्रमाणें ज्याच्या पुण्यतिथि साजऱ्या करण्याकरिता तेलगांनी मागे राहावयाचें त्यानींच मग तेलगाच्या पुण्यतिथि साजऱ्या केल्याचा हृदयद्रावक देखावा लोकाच्या दृष्टीस पडला ! तेलगाच्या वेळचे प्रसिद्ध पुढारी म्हणजे दादाभाई, भाडारकर, रानडे व मेथा हे होते तेलग हे या सर्वांपेक्षा वयाने लहान होते हे मागें सागितलेंच आहे. पण ते त्या सर्वांच्याही पूर्वी परलोकवासी झाल्यामुळे तेलगाच्या पुण्यतिथीच्या दिवशी—निरनिराळ्या प्रसगी रानडे व भाडारकर याची मुख्य भाषणें झाली !

असो एका शब्दात सागावयाचे म्हणजे अल्पकालात पुष्कळ व महत्वाची सार्वजनिक कामे करून ज्यानीं आपली जीवनयात्रा सपविली असे आधुनिक कालात महाराष्ट्रात घडलेलें तेलगाच्या सारखें दुसरें उदाहरण मिळेल असे वाटत नाहीं पाचवे वर्षी शिक्षणास आरंभ, नववे वर्षी इग्रजी शिक्षणास सुरवात; चवदावे वर्षी मॅट्रिक, सतराव्या वर्षी बी ए, एकोणिसाव्या वर्षी एम् ए; विसाव्या वर्षी एलएल बी, बाविसावे वर्षी ॲडव्होकेट व सार्वजनिक कामास आरभ, बत्तिसावे वर्षी एजुकेशन कमिशनचे सभासद, चवतिसावे वर्षी नामदार; एकुणचाळिसावे वर्षी हायकोर्टाचे जज्ज, बेचाळिसावे वर्षी व्हाइसचॅन्सेलर; त्रेचाळिसावे वर्षी मृत्यू ! असलें दुसरें उदाहरण कोठे आहे ?

---

## प्रकरण पंचेचाळिसावें.

# कुटुंबस्थिति.



काशीनाथपत तेलग यांचे जनक वडील म्हणजे बापूभाई तेलग हें मागे सांगितलेंच आहे त्याना दोनच मुलगे होते, कृष्णराव व काशीनाथपत. काशीनाथपताचे चुलते त्रिंबकराव यांना पुत्र संतान नव्हतें म्हणून त्यांनी काशीनाथपतांना दत्तक घेतलें होतें. तदनुसार हे पुढें काशीनाथ त्रिंबक तेलग या नांवानेंच प्रसिद्धीस आले.

सदहू कुटुब लहानच पण खाऊनपिऊन सुखी असे त्रिंबकराव व बापूभाई हे दोघेही फॉर्ब्स कपनीत नोकरीवर होते, ते बहुतेक अखेरपर्यंत तेथेच होते. मुलांपैकी कृष्णराव व काशीनाथपत हे दोघेही एक दोन वर्षांनीच मोठे—लहान असल्यामुळे ते दोघेही बालपणी बरोबरच शाळेंत जात असत नतर काशीनाथपत आपल्या बुद्धीच्या बळावर पुढे सरसावले कृष्णराव याचा मॅट्रिकपर्यंत अभ्यास झाल्यावर त्यानीही फॉर्ब्स कपनीत नोकरी धरली

कुटुबांतील वळण अगदी जुन्या चालीचे असे. सर्वांचाच पोषाख म्हणजे अगात वास्कुट, त्यावर जुन्या तऱ्हेचा लाब अगरखा व डोक्यास परभी तऱ्हेचे पागोटे इतकाच असे त्याना कोणी उपरणे घेतलेले, शुभ कार्यांच्या वेळेशिवाय, कोणी कधीच पाहिले नाही काशीनाथपत हे लहानपणी शाळेत—पुढे कॉलेजात जात असत तेव्हापासून बुट—पाटलोण वापरीत असत, तो अखेरपर्यंत त्याचा तोच पोषाख असे हल्लीचे शर्टस, नेकटाय, कफ्स वगैरे प्रकार त्या वेळी माहीतही नव्हते. काशीनाथपत यास साधा सदरा, त्यावर पारशी तऱ्हेचा पाढरा कोट, (थडीच्या दिवसात काळा बनातीचा कोट), गळ्यात बॅरिस्टरी चष्मा लटकलेला पण वाटेल तेव्हा डोळ्यावर सहज चढविता येणारा, व डोक्यास परभी पागोटे, या साध्या पोषाखात पुष्कळानी किती वेळा तरी पाहिलेले आहे घरी असले म्हणजे एक नुसते धोतर व अगात सदरा इतकाच त्याचा पोषाख असे घराच्या बाहेर पडले म्हणजे मात्र वर सागितलेला त्याचा पोषाख असे

घरात त्रिंबकराव सर्व व्यवस्था पहात असत. त्याची सर्व कामात मोठी शिस्त असे तीच काशीनाथपताना पुढे लागली विद्येची गोडी त्या कुटुबात पूर्वी नव्हती, ती पुढें केवळ स्वयस्फूर्तीनें काशीनाथपताना लागली मग ती सधि मिळताच कशी वाढत गेली व शेवटी ते नव्या—जुन्या पडितात कसे अग्रेसरत्व पावले हे मागील प्रकरणी लिहिताना दाखविलेच आहे

काशीनाथपतानी घरातल्या वागणुकीसबधाने इदुप्रकाशकर्त्यानें (ता. ४-९-९३) असे लिहिले आहे —

"In private relations, Mr. Telang was a model of perfection. As a son, husband, father and friend, he was faultless."

तेलगाच्या खासगी वागणुकीच्या बाबतीत—मग घरात असो, बाहेर असो—नांव ठेवण्याला जागाच नसे जवळ जवळ असाच प्रकार—एक दोन बाबी वगळून त्याच्या सार्वजनिक कारकीर्दीसंबधाने होता हे मागील प्रकरणात सागितलेच आहे

तेलगाच्या खासगी वर्तणुकीत एक महत्वाचे तत्व असे ते वडील माणसाच्या इच्छेविरुद्ध कधीही वागत नसत हा पुष्कळाना गुण वाटेल कित्येकाना कदाचित् दोष वाटेल पण खऱ्या हिंदु मनुष्याला त्यावरून तेलगाविषयी आदरच वाटेल असे वाटतें. हें त्याचें तत्व सामाजिक सुधारणेच्या बाबतीत त्याना अनेकदा बाधक झालेले होतें व त्यामुळें लोकानी त्याचेवर एक दोन वेळा केलेली कडक टीकाही त्यानी सोसली, पण आपले तत्व मात्र त्यानी शेवटपर्यंत सोडले नाही. सामाजिक बाबतीतील आपला भित्रेपणा झाकण्याकरिता तेलगही आईबापाची सबब पुढे करीत असत असेही कित्येकानी म्हटले होते पण खरा प्रकार तसा नव्हता. याबद्दल त्याच्या चरित्रात दाखले मिळतात.

जुन्या घरातून नव्या घरी जाताना तेलगानी वडिलाच्या सतोषाकरिता घरचे देव हातांत घेऊन ते तेथे नेल्याचे मागे सागितलेच आहे दुसऱ्या एका प्रसगीं अशी गोष्ट घडली तेलग हे नेहमी दहा वाजता कोर्टास जाताना आपल्या आईला विचारून जात असत एके दिवशी चद्रग्रहण होते आणि तत्पूर्वी दोन प्रहर उपाशी राहून रात्रो ग्रहण सुटल्यावर जेवावयाचे होते नेहमीच्या रिवाजाप्रमाणे तेलग सकाळी दहा वाजता आईला सागण्याकरिता गेले, तो आईने म्हटले, "अरे आज ग्रहण आहे व सध्याकाळी जेवावयाचें नाही ग्रहण सुटल्यानतर जेवावयाचे आहे." तेलगानी उत्तर दिलें की, "मला त्याचे काही वाटत नाही व माझी जेवावयाला हरकत नाहीं" त्याबरोबर त्या बाई म्हणाल्या, "हे काय ? आमच्या घरात असलें कोणी केलें नाही" त्यावर तेलग म्हणाले, "बरे तर, मी तुमच्या बरोबर जेवीन" आणि मग ते तसेच कोर्टास निघून गेले त्या दिवशी रात्री घरांतील सर्व मडळी ग्रहण सुटल्यावर स्नानें करून जेवलीं व तेलगानीही तसेंच केले ही गोष्ट आम्हास मुबईस कांही वर्षांपूर्वी एका मित्राकडून समजली

तेलगाना मूळव्याधीची जबर व्यथा होती अखेर त्यातच त्याचा अत झाला. पण ती विकृति त्यांना निदान दहा बारा वर्षांपूर्वी जडलेली होती त्यापासून त्याना रोज मनस्वी रक्तस्राव होत असे; पण ही गोष्ट त्यानीं आपल्या वडील माणसांना

कित्येक वर्षेपर्यंत—ते घाबरतील म्हणून—कळविली नाही. वस्तुत तेलगानी इतकीं वर्षें प्रकृतीची अशी आबाळ करणें ही हरएक दृष्टीनें चूक होती परतु आपल्या आईबापाना ज्यापासून दु ख होईल ती गोष्ट ते कसे टाळीत असत हेंच ह्या-वरून पहावयाचें आहे शेवटीं केवळ यदृच्छेनें ही गोष्ट त्याच्या आईच्या नजरेस पडली व मग उपाययोजना सुरू झाली ही गोष्ट आम्हास ( कै आता त्याना कैलासवासी म्हणावे लागत आहे याबद्दल खरोखर वाईट वाटते ) प्रो पढरीनाथपत तेलग याजकडून समजली

सदहू मोडावर तेलगानी थोडीशी शस्त्रक्रिया करून घेतली असती तर ते कदा-चित् बरेही झाले असते. पण “ भवितव्यता बलीयसी ” तिकडे कोणाचा उपाय ? आईबापाना पहावत नाही, म्हणून तेलगानी शस्त्रक्रिया करून घेतली नाही व त्यामुळें आपल्यावर मृत्यु ओढवून घेतला ! याचा मागे एकदा उल्लेख झालेलाच असल्या-मुळे इकडे इतकाच विस्तार पुरे

सन १८७२ मध्ये तेलग आपल्या वद्यास लागल्यावर त्याची भरभराट होऊ लागली व त्याचे उत्पन्न वाढू लागले. ते प्रथम कादेवाडीतील आपल्या वडिलो-पार्जित घरात रहात असत. पुढे त्यानी चौपाटीवरील बगला विकत घेतला ही गोष्ट त्यानी वडिलाना प्रथम कळविली नव्हती. बयाणा म्हणून काही रक्कम त्यानीं भरली होती व पक्के खरेदीपत्र व्हावयाचे होते. अशा स्थितीत काशीनाथपतानी चौपाटीवरील बगला घेण्याचे ठरविल्याबद्दल वडिलाना सागितले वडिलानी उत्तर दिलें, “ ठीक आहे तू आणि तुझी बायको, मुले जाऊन बगल्यात रहा बाकीची माणसे आम्ही याच ( कादेवाडीतल्या ) घरात राहतो. ” हे उत्तर ऐकून काशी-नाथपताना वाईट वाटले व त्यानीं लागलेंच म्हटले, “ असे असेल तर मी बगला घेत नाही. बयाण्याचे पैसे गेले तर गेले कुटुबातील सर्व माणसे राहाण्यास जाव-याची नसतील तर मला तें नवीन घर नको मीही सर्वाबरोबर याच घरात राहतो ” मग वडिलानी “ बरें तर, खरेदीपत्र कर जा सगळी मडळीच तिकडे जाऊ ” असे म्हटले नतर तेलगांनी बगला घेतला व त्याच्या कुटुबातील सर्वच मडळी तिकडे राहू लागली हा प्रकार पाहून तेलगाच्या वडिलाना व इतर मड-ळीला देखील अत्यत समाधान वाटले असल्यास नवल काय ? वरील हकीकत तेल-गाचेच एक आप्त रा ब आनदराव सदाशिव दळवी यांजकडून आम्हास समजली.

तेलगाच्या घरातील सर्व व्यवस्था त्याचे वडीलच पहात असत हे मागे सांगि-तलेच आहे. खुद्द काशीनाथपत तिकडे मुळींच पाहात नसत व त्यांना पहावें

लागतही नसे. एका दृष्टीने ही स्थिति काशीनाथपतांना सोयीची असे. घराकडे काहीं पहावे न लागल्यामुळे त्याना त्याच्या सार्वजनिक कामाकडे किंवा वाङ्मयसेवेकडे देण्याला हवीतशी फुरसत मिळत असे तेलगाच्या वडिलाचे लक्ष घरातल्या व्यवस्थेकडेच असे. इतकेच नव्हे, तर स्वत काशीनाथ-पतांच्या काही काही व्यवस्थेकडे देखील त्याचे लक्ष असे त्याच्या घरी घोडा-गाडी मूळपासूनच असे आणि दहा-अकराच्या सुमारास गाडीत ( बगीत ) बसून जनक वडील, दत्तक वडील, बधु कृष्णराव व स्वत काशीनाथपत असे चौघे कोर्टांत आपापल्या कामाकरिता जाताना आम्ही किती वेळा तरी पाहिलेले होतें. पुढे तेलगाचा धदा चागला चालून जेव्हा सरकार दरबारात व सार्वजनिक कामात त्याचे वजन वाढू लागले तेव्हा त्याच्याकरितां घोड्याची एक चागली जोडी व गाडी पाहिजे असे त्याच्या वडिलाना सहज वाटले, व त्यानी ती सर्व योजना केली पुढे दोन घोड्याच्या गाडीत बसून ज्या दिवशी काशीनाथपत हायकोर्टात प्रथमच आलेले दिसले, तेव्हा त्याच्या वकील-बॅरिस्टर मडळीपैकी काही मित्रानी स्वाभाविकपणेच, "हे काय आज, काशीनाथपत?" असे उद्गार काढले त्याबरो-बर तेलगानीच सागितले की, "वडिलानीच ही घोड्याची जोडी परवा विकत घेऊन दिली आहे." ही गोष्ट ते जज्ज व्हावयाच्या पूर्वीची जज्ज झाल्यावर ते दोन घोड्याच्या गाडीतून कोर्टास जात असत ते ठीकच होते वरील हकीकत आम्हास रा ब वासुदेव गोपाळ भाडारकर याजकडून समजली रा. ब त्या वेळीं हायकोर्टात वकिली करीत होते

असो आणखी काही अशाच गोष्टी सागता येतील पण विस्तारभयास्तव त्या येथे सागत नाही एकदरीत काशीनाथपत हे आपल्या वडील माणसाशी व घरातील इतर मडळीशी किती प्रेमळपणाने वागत असत याची वरील हकीकती-वरून वाचकास सहज कल्पना होऊ शकेल त्यांचे स्वत चे जरी असे वर्तन असे तरी त्याना अखेरीस अखेरीस गृहसुख नव्हतें असें म्हणतात—काय असेल तें असो. मरणापूर्वी त्याची वृत्ति अमळ उदासीन झाली होती इतकें मात्र खरें. चदावर-करांनी एके ठिकाणी असें म्हटलें आहे, व कै. अण्णासाहेब महाजनी याची तेलगाशी १८९३ मध्ये एकदा आगगाडीत गाठ पडल्याची जी हकीकत प्रसिद्ध झाली आहे त्यातही असेच आहे.

तेलग वारले तेव्हा त्याचे वडील, मातुश्री वगैरे माणसे हयातच होतीं. त्यांना त्या वेळी काशीनाथपतासारखा वैभवशिखरास पोहोंचलेला—हरएक दृष्टीनें सत्पुत्र

व कर्तृत्ववान् मुलगा डोळ्यादेखत गेलेला पाहून काय वाटले असेल, किती दुःख झाले असेल याची कल्पनाच केली पाहिजे! त्रिबकराव तर मग एक वर्षानेच गेले. बापूभाई सात आठ वर्षानी गेले बधु कृष्णराव हेही काही वर्षानी गेले

अतकाळी काशीनाथपताना तीन मुलगे व चार मुली इतकी अपत्यें होती. एक मुलगा लहानपणीच मृत झाला. दोन मुलगे—पढरीनाथपत व द्वारकानाथपत—व चार मुली इतकी मुले हयात होती मुलीची लग्ने पूर्वीच झाली होती मुलाचें वय लहान असल्यामुळें त्याचे शिक्षण चालले होते मुलीपैकी हल्लीं दोनच हयात आहेत, एक आठवणकराचे घरी दिलेली व दुसरी खोटे याचे घरी दिलेली दोघीही आपापल्या घरीं सुखी आहेत. मुलापैकी पढरीनाथपत हे हल्लीच स्वर्गस्थ झाले. द्वारकानाथपत हे मद्रासेस डॉ ॲनी बेझट बाईना त्यांच्या कामांत मदत करण्याकरिता तेथेच असतात पढरीनाथपताशी आमची हल्लीच ओळख झाली होती परतु इतर मार्गानी आम्हास त्याच्यासबधी जी माहिती मिळाली होती त्यावरून ते बुद्धिमत्ता, कर्तृत्वशक्ति, चित्तौदार्य, निगर्वीपणा व नि स्वार्थता या गुणात काशीनाथपतांचीच प्रतिकृति होते यात शका नाही पण पुढे ते थिऑसॉफीमध्यें शिरून डॉ बेझटबाईचे अनुयायी झाल्यामुळें त्याच्या गुणाचे देशहिताच्या दृष्टीनें व्हावें तितके चीज झाले नाही असा मुबईत कित्येकाचा आक्षेप आहे पण त्यासंबधी जास्त लिहिण्याची आमची इच्छा नाही पढरीनाथपतानी पतकरलेल्या मार्गासबधाने कदाचित् कोणाचा मतभेद होऊ शकेल, परतु विद्याव्यासगाची आवड हा गुण त्याचे ठिकाणी त्याच्या वडिलापासूनच उतरला होता व तो व्यासग त्यानी आमरण चालविला होता, तसेच त्याची एकनिष्ठता, अवर्णनीय स्वार्थत्याग, जनसेवेची आवड या त्याच्या गुणाबद्दल कोणासही प्रेमादरच वाटेल त्यात फिरून विशेष हा की, स्वत एलएल बी असूनही द्रव्यार्जनाच्या मोहास बळी न पडता पढरीनाथपतानी आपला आवडता व्यासग चालविला, इतकेच नव्हे, तर त्यानी अध्ययन व अध्यापन ही पवित्र कर्तव्ये केवळ नि स्वार्थ बुद्धीने कित्येक वर्षे चालवून सरस्वतीची अखड सेवा केली आहे असा वाग्देवीचा नि सीम भक्त वयाला पन्नास वर्षे होतात न होतात तोच, (ता० ५ जून १९२९ रोजी) कालवश व्हावा ही खरोखर अत्यत दु खाची गोष्ट होय असो पढरीनाथपताचे जेष्ठ चिरजीव त्रिबकराव हे बी ए असून ते बनारस येथे एक इग्रजी शाळा चालवीत आहेत बाकीची मुले शिकत आहेत

---

## प्रकरण शेचाळिसावें.

# अखेर.



काशीनाथपत हे सन १८९२ सालच्या मध्यापासूनच आजारी होते त्यांनीं लिहिलेला "Gleanings from Maratha Chronicles" हा निबध "डेक्कन कॉलेज यूनियन" संस्थेपुढे त्याच साली वाचण्यात आला. पण स्वत. तेलग त्या वेळी हजर नव्हते हें मागे एकदा सागितलेच आहे सबब तो निबध डॉ भाडारकर यानी वाचला. त्याच साली त्याची व्हाइस–चॅन्सेलरच्या जागीं नेमणूक झाली त्याप्रमाणें ते सन १८९३ च्या फेब्रुवारीत झालेल्या युनिव्हर्सिटीच्या पदवीदानसमारंभाचे वेळी हजर होते पण त्याच्या चेहऱ्यावरील फिक्कटपणावरून ते फार अशक्त झालेले स्पष्ट दिसत होते सर रेमड वेस्ट यांनी म्हटले आहे की —

"During the last year of his life, his rapidly declining health and the exhaustion consequent on a painful operation, must have made his work at times almost a torture. He could not ascend the long flight of stairs leading to his court without assistance. Still he struggled on bravely until wearied nature could hold out no longer"

वेस्ट साहेबानी तेलगाच्या स्थितीचे हे केलेलं वर्णन बरोबर आहे, पण तेलगाच्या मोडावर शस्त्रक्रिया मात्र केलेली नव्हती तेलगानी थोडे दिवस रजा घेतली. जरा प्रकृतीला आराम वाटावा म्हणून दोन तीन ठिकाणी त्याना नेण्यात आले ते काही दिवस महालक्ष्मीजवळ एक बगला घेऊन राहिले होते. पुढे ते लोणावळ्यास आपल्या बगल्यात काही दिवस राहिले पण प्रकृतीत सुधारणा काहीच दिसेना त्याना गाणे ऐकण्याचा बराच नाद असे. मुबईस गिरगाव बॅक रोडवर कै महादेव चिमणाजी आपटे यांचे घरीं केव्हा केव्हा रात्रौ आठाच्या सुमारास गायन समाजाची बैठक होत असे, तेथें मुबईतील त्या वेळची बरीच दक्षिणी सुशिक्षित मडळी जमत असत. त्यात काशीनाथपत तेलग असत असे

श्री. काशीबाई कानिटकर यानी आपल्या एका लेखात ("महाराष्ट्र साहित्य पत्रिका"– मार्च १९२१) म्हटले आहे त्याचप्रमाणें तेलगाच्या शेवटल्या आजारीपणात रा मगेश रामकृष्ण तेलग हे वरचेवर येऊन सतार वाजवून त्याचे ( तेलगाचे ) मनरजन करीत असत मगेशराव हे सतार, बीन वगैरे ततुवाद्यवादनात निष्णात आहेत हे प्रसिद्ध आहे आम्ही स्वत त्या वेळी मुबईस होतो, त्यामुळे अशा काही गोष्टी सहज समजत असत. असो याप्रमाणे तेलग सुमारे एक वर्ष आजारी पडल्यामुळे त्याची प्रकृति दिवसेदिवस क्षीण होत गेली व शेवटीं ता १ सप्तबर सन १८९३ रोजी पहाटे दोन अडीच वाजता त्यानी इहलोकची यात्रा सपविली ! सर रेमड वेस्ट म्हणतात —

" He died with calm resignation, as he had lived in simplicity, benevolence and usefulness "

तेलगाच्या प्रेतयात्रेला न्या फुल्टन, डॉ. मॅकिकन वगैरे प्रमुख युरोपीयन व हिदु, पारशी वगैरे मिळून शेकडो लोक हजर होते असो

काशीनाथपत तेलगाच्या सबध चरित्राचा विचार केला म्हणजे असे वाटते की नभोमडलात एकादा दैदीप्यमान तारा उदय पावावा, तो काही दिवस चमकत रहावा व नतर एकदम अदृश्य व्हावा, अशीच तेलगाची स्थिति झाली शेवटचे एक वर्ष सोडून दिले तर त्याची सार्वजनिक कारकीर्द सारी वीस वर्षांची होती वयाच्या बाविसाव्या वर्षी त्याच्या कारकीर्दीस सुरवात झाली व त्रेचाळिसाव्या वर्षी ते दिवगत झाले जे वकिली—बॅरिस्टरीचा अगर डॉक्टरीचा धदा करतात त्याना वयाच्या दृष्टीने सामान्यत स्थाईकपणा वाटून, सार्वजनिक कामाकडे जरा त्याचे लक्ष जाऊ लागते तो त्याचे सहज चाळीस वर्षांचे वय होते म्हणजे इतराच्या सार्वजनिक कारकीर्दीस सुरवात होते त्या वयावर तेलग हे आपल्या कारकीर्दीच्या अत्युच्च शिखरास—रानड्याच्या भाषेत—To the very highest stages of our social and political life—पोचून त्याची इहलोकीची यात्राही सपली होती ! तेलगाच्या चरित्रास एका आग्ल कवीच्या पुढील ओळी अगदी ततोतत लागू पडतात —

" To all the sensual world proclaim,<br>One crowded hour of glorious life,<br>Is worth an age without a name. "

जे मान इतर लायक माणसांना वय झाल्यावर व बरींच सार्वजनिक कामें केल्यावर मिळावयाचे, ते सर्व तेलगाना त्याची चाळिशी व्हावयाचे पूर्वींच मिळून गेले होते. बद्रूद्दीन, मेथा रानडे, भाडारकर याना नामदारीचा मान त्याची चाळिशी होऊन गेल्यावर मिळाला होता भाडारकराच्या वयास तर सत्तरीचा सुमार झाला होता इतकेच नव्हे तर तो मान आपणास फार उशिरा मिळाला असा त्यांनी आपल्या डायरीत—Honours of Membership of Legislative Council have come late in life—शेरा मारला आहे. पण तो मान तेलगाना वयाच्या चवतीसाव्या वर्षी मिळाला होता! पहिले हिंदी व्हाइस चॅन्सलर तर तेलगच होते तसेच विद्वत्तेच्या दृष्टीने मुबईच्या रॉयल एशियाटिक सोसायटीचे पहिले हिंदी अध्यक्ष तेलगच होते तेलग हे हायकोर्टाचे जज्ज वयाच्या एकोणचाळीसाव्या वर्षी झाले होते हें मागें आलेच आहे हे मान तेलगाना—ते बऱ्या लोकाशी गोड बोलून वागत असत म्हणून अगर ते दैववान् म्हणून इतक्या लवकर लवकर मिळाले होते असे कित्येक म्हणतात पण ती अनुदारपणाची कल्पना होईल तेलगानी गोड बोलून मान मिळविले ही गोष्टच मुळी असत्य, हे मागे दाखविलेच आहे दैववान् कोणास म्हणावयाचे? अगी लायकी नसता किंवा अल्पशी लायकीच असताना ज्याला मान मिळतो त्याला कदाचित् दैववान् म्हणता येईल पण तेलगाना ज्या ज्या मानाच्या जागा मिळाल्या त्या त्या जागा जर त्यानी आपल्या गुणानी व कृतीनी अलकृत केल्या होत्या तर ते मान त्याना " ते केवळ दैववान् " म्हणून मिळाले असे कसे म्हणता येईल? ते सर्व मान मिळण्यास कारण—जज्जाच्या जागेसबधानें जॉन ॲडम यानी म्हटल्याप्रमाणे—केवळ तेलगाच्या अगचे गुण होत हेंच खरें जॉन ॲडम म्हणतात —

" He rose before he was forty to the highest official position to which a native of India can aspire, by sheer dint of that rare combination of talents and qualities which make genius."

या शिवाय त्याचा कॉंग्रेसशीसंबध होताच. प्रेसिडेन्शी असोशिएशनचे तर ते सेक्रेटरी होते बाकीच्या सस्थाचा किंवा कामांचा उल्लेख इकडे करीत नाहीं. तसा उल्लेख मागील प्रकरणांत योग्य स्थळी आलाच आहे थोडक्यात सांगावयाचे म्हणजे, परमेश्वरानें दिलेल्या अल्पशा आयुष्यांत तेलगाच्या सारखी सर्व दिशानी

आणि बहुतेक सर्व क्षेत्रातून ज्यांनी सार्वजनिक कामगिरी केली आहे अशा पुरुषाचें गेल्या सुमारें शभर वर्षांत महाराष्ट्रात घडलेले दुसरे उदाहरण मिळेल असे वाटत नाही

तेलग वारले ही बातमी समजताच मुबईंत व इतर सर्व प्रातात सर्वत्र उदासीनतेची छाया पसरली होती " कित्येकास तर आपल्यामधील सूर्यच मावळल्यामुळे सर्वत्र अधार पसरला आहे " असे वाटले. चदावरकरानी आपणास एका मोठ्या गृहस्थाकडून आलेल्या पत्रात पुढील मजकूर असल्याचे लिहिले आहे:—

" The Sun has set even while in the meridian, and darkness and desolation have spread everywhere. The prospect before us is very gloomy. "

पण हा प्रकार केवळ हिंदु लोकापुरताच नसून तेलग वारल्याचें ऐकून हिंदु मुसलमान, पारशी, युरोपीयन वगैरे सर्व लोकास दु ख झालेले स्पष्ट दिसत होते. सन १८९३ अक्टोबरमध्ये मुबई येथे तेलगाच्या स्मारकाबद्दल जी सभा झाली त्यात चदावरकरानी जे भाषण केले त्यात त्यानी आपल्याजवळ एका मोठ्या मुसलमान गृहस्थानीं असे उद्गार काढल्याचें सागितले —

" Mr. Telang was a Hindu, an Englishamn, a Parsi, a Mohomedan, all rolled into one."

त्याचप्रमाणे लडन येथील " इडिया " पत्राच्या आक्टोबर १८९३ च्या अकात एका मुख्य पारशी पुढारी गृहस्थांचें पत्र प्रसिद्ध झाले होते त्यात त्यानी पुढीलप्रमाणे लिहिले आहे –

" In Mr. Telang, not only the community of Bombay, but the people of India have lost one of their few brilliant leaders. Mr. Telang was a noble specimen of the Hindus, and also a bright product of our early University. It is mournful to think that he should have been thus prematurely cut off in the prime of manhood. There are not, I think, half a dozen men in all India to compare with him. He was not only a learned judge and a sound scholar,

he was a sober politician and an infallible guide and adviser. His death is, indeed, very very sad. All India from one corner to the other must bemoan his loss It is a public calamity, for it will be difficult to replace his loss for years to come."

इदुप्रकाशाने "सगळ्या मुबईत असा एकही आजमित्तीस हिंदु गृहस्थ उरला नाही की जो तेलंगाची रिकामी झालेली जागा भरून काढील ! " असे उद्गार काढल्याचे मागे सागितलेच आहे तो पुढे म्हणतो.—

"He was the brightest jewel of his family. He was one of the brightest jewels of India."

त्याचप्रमाणे दु खाच्या आवेशात इदूने अखेर असे उद्गार काढले —

"तेलग याच्या योग्यतेचा मनुष्य निर्माण होण्यास किती काळ जाईल याचा अजमासच सागता येत नाही * * * हिदुस्थानचें नष्टचर्य जोपर्यंत संपले नाही तोपर्यंत असले मोहरे आम्हास लाभणें कठीण आहे " असो

रीतीप्रमाणे मुबईच्या शेरीफने जाहीर केल्यावरून ता ६ अक्टोबर १८९३ रोजी टाऊनहॉलमध्ये तेलग याच्या स्मारकाबद्दलची मुबईच्या नागरिकाची सभा भरली होती अध्यक्षस्थान स्वीकारण्याकरिता त्या वेळचे मुबईचे गव्हर्नर लॉर्ड हॅरिस याना निमत्रण करण्यात आले होतें प्रथम लॉर्ड हॅरिस याच्या मनातून सभेस यावयाचें नव्हते, पण मग ते कबूल झाले यासबधाने फेरोजशहा मेथा याचा चरित्रकर्ता (मिस्तर एच. पी मोदी) हा असें लिहितो —

"His Excellency had written to Pherozesha that though he considered it very undesirable that the Govorner should preside at meetings held to perpetuate the memory of distinguished citizens, he had so great an admiration for the abilities and character of Mr Telang that he was willing to associate himself with the public meeting."

सभेंत पुष्कळ वक्त्याचीं भाषणे झालीं. त्यात हिंदु, पारशी, मुसलमान, युरोपीयन वगैरे सर्व जातीचे व धर्मांचे पुढारी लोक होते. त्यात रानडे, मेथा व सर

चार्लेस सार्जट याचीच भाषणे महत्वाची झाली पैकी रानडे व सार्जट याच्या भाषणाचा साराश मागील एक दोन प्रकरणात आलाच आहे फेरोजशहा मेथा याचे मुख्य ठरावापैकी एकाद्या ठरावावर भाषण व्हावयाचे, परतु ते झाले नाही त्यानीं फक्त अध्यक्षाचे आभार मानण्याचे काम तेवढे आपणाकडे घेतलें होते तो ठराव प्राय औपचारिक स्वरूपाचा असतो पण त्या ठरावावर भाषण करतानांच मेथा याचे तेलगाविषयीचे प्रेम—हृद्गत—उत्तम रीतीने जमलेल्या मडळीपुढे व्यक्त झाले त्यानी एकाद्या मुख्य ठरावावर—सर्वाच्या अपेक्षेप्रमाणें—भाषण न करता आपण शेवटच्या आणि अगदी औपचारिक ठरावाचे काम आपल्याकडे का घेतले याविषयी बोलताना ते अगदी सद्गदित कठाने ( with some emotion ) म्हणाले असे सदर्हू चरित्रकर्ता सागतो —

"In doing so, he ( Mr Mehta ) explained to the audience with some emotion that with the recollection and associations of so many years crowding on the mind as they could not but do in that hall and with those surroundings, any endeavour to speak of him ( Mr Telang ), as he was, large in heart and brain, so soon after his loss in the prime of manhood and in the plentitude of his powers, could only lose itself in that bitterest of pagan cries as to the mystery of the cruelty of things."

मेथा म्हणाले—"त्या हॉलमध्ये बोलण्यास उभे राहिले असता तेलग व आपण कित्येक वर्षे त्याच जागी व खाद्यास खादा लावून सार्वजनिक कामे केल्याच्या एकामागून एक आठवणी होऊ लागल्या म्हणजे मन अत्यत विषण्ण होते; आणि तशा थोर मनाच्या व बुद्धीमत्तेच्या माणसासबधाने (तेलगासबधानें)—त्याची स्मृति इतकी ताजी असताना—काय बोलावे हेच सुचेनासे होते व अज्ञ मनुष्याप्रमाणे "देवा कोण ही निर्घृणता" इतकेच दु खावेगात तोडावाटे आपोआप शब्द निघून जातात! इतके बोलून मेथानी सोळा वर्षापूर्वी ( १८७७ ) त्या वेळच्या गव्हर्नर साहेबाच्या ( सर रिचर्ड टेपल ) अध्यक्षतेखाली त्याच हॉलमध्यें "व्हालटीयर" पलटण तयार करण्याबाबतची कशी एक सभा भरविण्यात आली

होती व त्या सभेत तेलग व आपण अशा उभयतानीं कसा भाग घेऊन आपल्या सार्वजनिक कारकीर्दीस सुरवात केली होती याचा उल्लेख करून म्हटलें की,

"Since then they ( Telang and Mehta ) had fought together many a battle, and their close association in public life had ceased only with the elevation of Mr Telang to the Bench, four short years before his death "

मेथाच्या सबध भाषणासबधानें त्याचा चरित्रकर्त्ता म्हणतो —

"It was with a very heavy heart that Pherozesha spoke of his departed friend and fellow-worker in the short speech which he made at the memorial meeting "

सभेत ठरल्याप्रमाणे स्मारकाकरिता बरीच रकम ( ४०,००० रु. ) जमल्यावर त्यांतून एल्फिन्स्टन कॉलेजातील विद्यार्थ्याकरिता तेलगाच्या स्मरणार्थ वसतिगृह ( Telang wing ) बाधण्यात आलें हे प्रसिद्धच आहे त्याचप्रमाणे त्या वेळी पचमहाल जिल्ह्याचे कलेक्टर डॉक्टर पोलन यानी गोध्रा येथे एक नवीन हायस्कूल बाधण्यात आलें होते त्याला तेलगाचे नाव देऊन "तेलग हायस्कूल" असे दुसरें स्मारक केले तिसरें कै रा. सा नारायण विष्णु बापट यानी युनिव्हर्सिटीतील एम्. ए. च्या परीक्षेंत "इतिहास व तत्वज्ञान" या विषयात पहिला येणाऱ्या उमेदवाराला देण्याकरिता तेलगाच्या नावें एक सुवर्णपदक ठेवून स्मारक केलें आहे. आपल्या पूज्य वडिलाच्या नावे ठेवलेलें हे पदक पुढे कै पढरीनाथपत तेलगानीं मिळविलें! थोड्याच वर्षापूर्वी मुबई म्युनिसिपालिटीनें माटुगा येथील जी. आय् पी. रेल्वेच्या बाजूस झालेल्या नवीन वसाहतींतील एका सुदर व प्रशस्त रस्त्याला 'तेलग रोड' असे नाव दिलें तसेच गौड सारस्वत ब्राह्मण को-आपरेटिव्ह हाउसिंग सोसायटीच्या मालकीच्या माटुगा येथे असलेल्या इमारतीपैकीं एकीस तेलग यांचें नांव दिलें आहे. याप्रमाणें आम्हास माहीत असलेलीं तेलगांच्या नांवाचीं स्मारकें आहेत.



# शुद्धिपत्रक.

—— ०:——

| पृष्ठ | ओळ. | अशुद्ध | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ४ | ७ | fiocked | flocked. |
| १४ | २७ | पुढें | ते पुढे |
| १९ | २३ | (प्र् वि) | ,(अ वि.) |
| २१ | २२ | "—" periods | (periods) |
| ३२ | २२ | जोखमीची | जोखमेची |
| ४४ | १२ | justice | Justice |
| ४५ | २४ | वाढ | वाढ आहे |
| ५३ | २९ | एतद्देशीय | एतद्देशीय मनुष्य |
| ७० | १३ | डॉ ट्रॉस | डॉ स्ट्रॉस |
| ९१ | ११ | ? | ! |
| ९७ | २३ | तज्ञ | तज्ज्ञ |
| १०३ | ११ | महाराष्ट्री | महाराष्ट्रीय |
| १०४ | ३ | त्याच्या | त्याच्या |
| ११६ | ९ | चालविला | चालविला होता. |
| ,, | २४ | देऊन, | देऊन, |
| ,, | २८ | ह्या | त्या |
| १२० | २७ | जुने | जुनें गद्य |
| १२१ | १२ | सचले | रुचलें |
| १२४ | १५ | वाटणार | वाढणार |
| १३१ | २६ | या सर्व | सर्व |
| १३४ | २१ | Conferring | conferring |
| १४४ | १६ | यावेळी | त्या वेळी |
| १८० | १३ | tatter | matter |
| २०६ | २२ | girl | a girl |
| ,, | २८ | वश | वश |
| २१७ | २० | shall | shalt |
| २२२ | २२ | मोठ्या | त्या मोठ्या |
| २२३ | ३ | असेल | असले |
| २३९ | ८ | initiating | imitating |
| २४५ | २२ | statisfied | satisfied |

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २५२ | ६ | केसरीच्य | केसरीच्या |
| २५३ | ४ | eating, | eating |
| २६२ | २३ | प्रकारा | प्रकाराचें |
| २७४ | ५ | होत आहे | चालले आहे |
| ३०२ | १२ | दिलें, | दिले |
| ३१६ | ५ | ठराव सभेपुढे | ठराव |
| ३१७ | १५ | Law | law |
| ३१९ | ३ | spared | shared |
| ३२४ | १५ | exclusion | execution |
| ३३१ | २९ | 1890 | 1870 |
| ३४० | २७ | यावश्चद्र | यावच्चद्र |
| ३४१ | २२ | law | laws |
| ३४४ | १७ | or | a |
| ३४६ | ४, ५, ६ | Capital | capital |
| ३४७ | ५ | Capital | capital |
| ३५८ | ५ | तरी | तर |
| ३५९ | २२ | तजविज | तजवीज |
| ३६५ | २४ | Lists | List |
| ३६९ | १ | मनाप्रमाणें | मताप्रमाणें |
| ३७० | ४ | आहे | होती |
| ४१५ | ५२ | सभत | सभत |
| ४२० | २३ | of purse | of the purse |
| ४२१ | ६ | interpollation | interpellation |
| ४२२ | ३० | recking | reeking |
| ४६२ | ६ | discussions | social discussions |
| ४६८ | ४ | प्रतिपादिषु | प्रतिमादिषु |
| ४७४ | ३० | अश | अशा |
| ४९३ | २२ | आपत्या | आपल्या |
| ४९६ | ७ | कितीसें | कितीसे अतर |
| ५०५ | ४ | अतकाळीं | ( तिकडे तो शब्द नको ) |
| ,, | ५ | दोन मुलगे | अतकाळीं दोन मुलगे |
| ५०९ | १६ | Englishamn | Englishman |

# کتب خانہ
## جامعہ عثمانیہ

۱- اراکین مجلس اعلیٰ، مجلس وقار، مجلس انتظامی، مجالس شعبہ جات و نصاب پانچ کتابیں ایک ماہ کے لیے اپنے پاس رکھ سکیں گے۔

۲- اساتذہ جامعہ عثمانیہ و کلیہ جات ملحقہ و گزشتہ و موجودہ اراکین جامعہ اور اراکین دار الترجمہ دس کتابیں ایک ماہ تک اپنے پاس رکھ سکیں گے۔

۳- طیلسانین جن کا نام درج رجسٹر شدہ ہو دو کتابیں، بی اے اور انٹرمیڈیٹ کے طلبہ تین کتابیں، ایم اے، ایل ایل بی و تحقیقاتی جماعتوں کے طلبہ پانچ کتابیں دو ہفتہ تک اپنے پاس رکھ سکیں گے۔

۴- مدت مقررہ پر کتابیں واپس نہ ہوں تو طلبہ سے بحساب ایک آنہ یومیہ فی کتاب جرمانہ لیا جائیگا۔

۵- بشرط موقع کتابیں گھر جاری کی جا سکیں گی اگر وقت کے لئے کتب خانہ میں کتاب کا لانا لازم ہے۔

۶- کتابیں گم یا خراب ہو جائیں تو مستعیر پر ذمہ داری عائد ہوگی۔

۷- کتابوں پر کسی قسم کا نشان سیاہی یا پنسل سے نہ لگایا جائے۔

۸- قلمی نسخے اور حوالے کی کتابیں جاری نہ کی جا سکیں گی۔

